श्री.

# यथार्थबोधिनी

अथवा

## श्रीमद्भगवद्गीतेची गद्यात्मक मराठी टीका.



रा. व्यंकटेश कृष्ण देसाई, वकील, आकोलें, वऱ्हाड

यांनीं

श्रीमद्वामनपंडितकृत 'यथार्थदीपिके'च्या आधारानें तयार केली

ती

मुंबई येथें

"नेटिव ओपिनिअन" छापखान्यांत छापून प्रसिद्ध केली.

---

हा ग्रंथ सन १८६७ चा आक्ट नंबर २५ प्रमाणें नोंदला आहे.

---

सन १९०० ईसवी.

किंमत १। रुपया

श्री.

# प्रस्तावना.

ॐ नमो भगवते वासुदेवाय.

सर्व प्राण्यांत मनुष्य प्राणी श्रेष्ठ आहे, हें कोणीहि नाकबूल करणार नाहीं. हें श्रेष्ठत्व विचारशक्तीमुळें आहे हेंहि निर्विवाद आहे. या विचारशक्तीचा उत्तम उपयोग करून तो आपली उन्नति करूं शकतो. असें असून कोणी तसें न करील तर त्याचा दोष नशीबावर किंवा देवावर नाहीं; त्याचा त्याजवरच आहे. ज्ञान हें सर्व सृष्टीच्या उत्पत्तीचें बीज आहे व तें सर्वांत आहे. परंतु विचाररूप जीवन मिळून तें वाढण्यास नरदेहच साधनीभूत आहे. "नर करनी करे तो नरका नारायन हो जाय" अशी जुनी ह्मण आहे तींतील तथ्य हेंच आहे. ज्या ज्ञानाचा आश्रय करून नराचा नारायण होतो, तें ज्ञान कोठून व कसें समजणार अशी कोणा सभाग्यास काळजी पडली असेल तर, ती काळजी करणें नको. कारण हें ज्ञान नारायणानें ( श्रीकृष्णानें ) नरास ( अर्जुनास ) भारतीययुद्धाचे प्रारंभीं सांगितलें आहे आणि तें "भगवद्गीता" या नांवानें प्रसिद्ध आहे. या ग्रंथाचा बोध करून घेऊन, त्याप्रमाणें वागणूक केल्यास, मनुष्य ईश्वर होईल, यांत तिळभराहि शंका नाहीं. परंतु हें ज्ञान युद्धाचे तांतडीमुळें, इतकें संक्षिप्त रीतीनें सांगितलें गेलें आहे कीं, सामान्य मनुष्यास, या गीतेचा, पूर्ण व खरा अर्थ समजणें, दुरापास्त झालें आहे. हीच अडचण जाणून शेंकडों विद्वान् व अनुभवी पुरुषांनीं या ग्रंथावर टीका केल्या आहेत. फार काळापूर्वीं ह्या टीका संस्कृत भाषेंत केल्या गेल्या. काळमानानें ह्या भाषेचें ज्ञान कमी कमी होत

गेल्यामुळें त्याहि मूळाप्रमाणेंच होऊन बसल्या. अलीकडे ह्मणजे सुमारें ७०० वर्षांपासून ह्या ग्रंथावर महाराष्ट्रभाषेंत व इतर देशभाषांत टीका प्रसिद्ध झाल्या. त्या, त्यावेळच्या लोकांस समजत होत्या, परंतु कालमानानें त्याहि आतां समजेनाशा झालेया आहेत. याम कारण केवळ भाषेचें काठिण्यच आहे असें नाहीं तर दिवसानुदिवस आत्मविद्येच्या विषयापासून आम्हीं दूरदूर होत गेलों हेंहि एक मुख्य कारण आहे असें माझ्या समजुतीप्रमाणें मला वाटतें. पूर्वीचे महाराष्ट्रग्रंथ सर्व पद्यात्मक (ओंवीबद्ध) आहेत. गद्यात्मक ग्रंथ नाहींत म्हटलें तरी चालेल. गद्यात्मक टीका हल्लींचे लोकांस समजेल अशा भाषेंत होईल तर, कांहीं फायदा होईल, असें वाटल्यावरून, तसा यत्न करण्याचें माझें मनांत आलें आहे. परंतु हा माझा मुख्य उद्देश आहे, असें कोणींहि समजूं नये. कारण एवढें महत्वाचें काम योग्य रीतानें मजकडून होण्यासारखी माझ्यांत विद्वत्ता अथवा अक्कल नाहीं. व तसा मोठेपणा मी आपणाकडे घेतहि नाहीं. माझा मुख्य उद्देश मी आतां सांगाणारच आहें. तो पूर्ण होऊन जर त्यांतल्या त्यांत वर सांगितल्याप्रमाणें कांहीं लोकसेवा घडली तर घडेल, म्हणून ही गद्यात्मक टीका करण्याचें मनांत योजिलें आहे.

२. ज्या गीतेच्या बोधानें नर ( अर्जुन ) नारायण झाला, त्याच गीतेंत तें पद प्राप्त करून घेण्याचे अनेक मार्ग सांगितले आहेत. बंदुक कशी धरावी व नेम कसा धरून मारावा, ह्या गोष्टीचें शाब्दिक ज्ञान एका मिनिटांत देतां येईल. परंतु उत्तम निशाण मारतां येण्यास फार काळपर्यंत अभ्यास केलाच पाहिजे. त्याप्रमाणें गीताश्रवणानें शाब्दिक ज्ञान, विद्वान् असला तर, स्वतः करून घेईल व सामान्य मनुष्य विद्वानांचे तोंडून ऐकून, अथवा त्यांचे लेख वाचून करून घेईल. परंतु तें ज्ञान आपले अंगीं बाणण्यास अभ्यासच केला पाहिजे. त्याच्या ज्या अनेक रीति आहेत, त्यांत आपल्यास जें समजलें आहे, त्याचें

अध्यापन दुसरे लोकांस करावें ही एक आहे. या योगानें तें ज्ञान फार लौकर बिंबतें, असें गीतेच्या अंतीं भगवान् श्रीकृष्णानें सांगितलें आहे.

**य इदं परमं गुह्यं मद्भक्तेष्वभिधास्यति ।**
**भक्तिं मयि परां कृत्वा मामेवैष्यत्यसंशयः ॥ ६८ ॥**

श्री. भ. गी. अ. १८

अर्थ-हे अर्जुना, आतांपर्यंत जें हें अत्यंत गुह्य ज्ञान मीं तुला सांगितलें, तें माझे भक्तांस, माझी भक्ति श्रेष्ठ करून जो सांगेल तो माझें पदास प्राप्त होईल, यांत संशय नाहीं,

मला माझें नरजन्माचें सार्थक करून घेणें आहे व भगवंताचे वरील वचनावर माझा पूर्ण भरंवसा आहे. ह्मणून नारायणाचे जे कोणी भक्त असतील त्यांस, त्याची भक्ति थोर करून गीताव्याख्यान, मला समजलें आहे त्या मानानें स्पष्ट करून सांगावें, असें वाटतें. चार भगवद्भक्त जमवून तोंडानें पुराणरूपानें व्याख्यान करितां येईल. पण तसें केल्यापेक्षां टीकारूपानें ग्रंथ केल्यास जास्त फायदा होईल, ह्मणून हें काम मीं हातीं घेतलें आहे. ही ईश्वराची सेवा आहे, व तिनें तो संतुष्ट होऊन मज गरिबाचा उद्धार करील अशा स्वहितबुद्धीनें मीं तें करित आहें. यावरून मी आपणाकडे परोपकार करण्याचा मोठेपणा घेत नाहीं हें उघड दिसून येईल; व ह्मणूनच सुज्ञ लोक माझ्या या यत्नाचें कृपादृष्टीनें निरीक्षण करून, चांगलें असेल तितकें घेऊन, दोषांकडे दुर्लक्ष करतील अशी उमेद बाळगितों.

३ ही टीका मी माझे स्वतःचेच अकलेनें करितों असें नाहीं. श्रीमद्वामनपंडितकृत "**यथार्थदीपिका**" नांवानें प्रसिद्ध असलेल्या ग्रंथाचे आधारानें करित आहे. पंडितांचा हा ग्रंथ फारच पांडित्याचा आहे. श्रीमद्भवद्गीतेच्या अर्थासंबंधानें निरनिराळ्या टीकांतून सर्वांशी अथवा कांहीं अंशीं मतभेद आहेत. पंडित पूर्ण अद्वैतमताचे होते

परंतु केवळ निर्गुणाभिमानी नसून जाडे सगुणभक्त होते. गीताशास्त्र ज्ञानयुक्त सगुणभक्तीनें ओतप्रोत भरलें आहे, असें त्यांनीं स्पष्ट दाखविलें आहे; व तसें करितांना अर्थात् तद्विरुद्ध टीकाकारांचें मताचें अतुल पांडित्यानें खंडन केलें आहे. तितकें पांडित्य मजकडून होईल न होईल याची वानवाच आहे व जरी त्यांच्या कृपेनें तें मीं केलें, तरी सुलभ रीतीनें त्यांचा मुख्य आशय समजविण्याचा जो माझा उद्देश आहे त्यास बाध येईल. ह्मणून, पंडितांचे मताप्रमाणें जो अर्थ आहे तो स्पष्ट रीतीनें दाखविण्याचाच हेतु आहे.

ता० २३ माहे जुलई }
सन १८९९ इ० }

त्र्यं. कृ. देसाई.

# ग्रंथप्रसिद्धीचा उद्देश.

---

या ग्रंथाचा आरंभ करण्यास केवळ स्वहितेच्छाच कारण झाली हें प्रस्तावनेंत स्पष्ट सांगितलें आहे. ईशकृपेनें ग्रंथ संपूर्ण होऊन तें स्वहित साधलें. झाल्यास लोकहित होईल ह्मणून हा ग्रंथ छापण्याचा हेतु आरंभींच होता. तो, ग्रंथ पुरा झाल्यावर निश्चयात्मक झाला. श्रीमद्भगवद्गीतेवर मोठमोठ्या विद्वान् लोकांनीं टीका केल्या आहेत व हल्लींहि होत आहेत. अशा स्थितींत मी आपली गाजराची पुंगी वाजवूं नये; परंतु कांहीं महत्वाचे कारणाकरितां तसें करणें जरूर आहे असें मला वाटतें. तीं कारणें कळविलीं असतां केवळ ग्रंथ प्रसिद्ध करण्याचा उद्देश प्रगट होईल इतकेंच नाहीं, तर एका जबर शंकेचें निरसनहि होईल; व त्यामुळें या ग्रंथाचा उपयोग करण्याकडे मनाची संदेहरहित प्रवृत्ति होईल, ह्मणून तीं देण्याचें योजिलें आहे.

२. ही टीका वाचल्यावर सुज्ञ वाचकांचे लक्षांत येईल कीं, भगवान् गोपाळकृष्णानीं या गीतेंत सगुणभक्तिच श्रेष्ठ करून सांगितली आहे. हा उपदेश द्वापारयुगाचे अंतीं व कलियुग सुरू होण्याचे सुमारास केला आहे. त्यापूर्वी केवळ निर्गुणोपासना करण्याचीच प्रवृत्ति होती असें दिसतें. निर्गुणोपासना करणें जास्त कष्टाचें व दिनावधीचें काम आहे. पूर्वयुगांतील लोकांचें आयुष्य व बळ पुष्कळ असल्यामुळें त्या मार्गानें ते आपली मुक्तता करून घेऊं शकले. कलियुगांत तशी वस्तुस्थिति राहणार नाहीं हें सर्वज्ञ भगवंतानें जाणून निर्गुणोपासनेहून सोपा असा स्वभक्तिमार्ग, अर्जुनास व उद्धवास उपदेश करण्याच्या निमित्तानें, आह्मां शक्तिहीन लोकांकरितां प्रगट केला, असें अनुमान, अठरावे अध्यायांतील ७९ वे श्लोकाचे पूर्वार्धावरून करितां येतें. तो

पूर्वार्ध असाः—"व्यासप्रसादाच्छ्रुतवानेतद्गुह्यमहं परम्". ही उक्ति संजयाची आहे. संजय श्रीव्यासाचा शिष्य होता व त्याला गुरूपासून ब्रह्मप्राप्ति झाली होती. परंतु भगवंतांनीं सांगितलेला ऐश्वर्ययोग त्यास त्यापूर्वी माहित नव्हता, ह्मणूनच त्यानें त्यास "गुह्य" असें विशेषण दिलें आहे. तें गुह्य कोणतें हेंहि त्या श्लोकाचे उत्तरार्धावरून स्पष्ट समजतें व पुढच्या दोन श्लोकांनीं ती समजूत दृढ होते. असें असून, श्रीमच्छंकराचार्यस्वामींनीं व त्यांचे मागून झालेल्या लोकांनीं, अर्थात् त्यांचे मतास अनुसरून, ही भगवद्गीता निर्गुणपर वाखाणिली आहे. यामुळें बहुतेक लोकांचें मन द्विधा होण्याचा संभव आहे; कारण आचार्य केवळ भगवदवतार होते अशी आह्मां लोकांची समजूत आहे व वास्तविक खरी गोष्टहि तशीच आहे. तेव्हां आचार्यांनीं गीतेचा सगुणपर अर्थ न करितां निर्गुणपर कां केला याचें योग्य कारण समजलें तरच श्रीमद्वामनपंडितांनीं केलेला अर्थ ग्रहण करण्यास मनाची निःशंक तयारी होईल. याकरितां त्याचें स्पष्टीकरण करणें जरूर आहे, ह्मणून तिकडे वळतों.

३. आचार्यांस गीतेचा सगुणपर खरा अर्थ समजला नाहीं असें ह्मणणें निवळ वेडेपणाचें होईल. त्यांनीं मुद्दाम निर्गुणपर अर्थ केला व तसें करण्यास योग्य कारणहि झालें. भगवान् व्यासांनीं अद्वैतमार्गाची स्थापना केली. हा अद्वैत मार्ग साध्य होण्यास चित्ताची शुद्धि असली पाहिजे. ज्यांचे चित्ताची शुद्धि झाली नाहीं, असे लोक ज्ञानमार्गाकडे वळले, तर त्यांचा कांहीं एक फायदा न होतां उलटें नुकसान होतें. ह्मणून अशा लोकांनीं कर्मच केलें पाहिजे असें जाणून भगवान् व्यासांनीं, आपला शिष्य जैमिनि यास आज्ञा करून त्याजकडून मीमांसाशास्त्र उत्पन्न करविलें. त्यांत व्यासाज्ञेवरून जैमिनीनें ज्ञानमार्गाचें खंडण करून कर्माचें मंडण केलें आहे; कारण कर्ममार्गाची स्थापना करण्याकरितां तसें करणें आवश्यक होतें. कर्म करून हळू हळू चित्ताची शुद्धि

झाली ह्मणजे ज्ञानमार्ग धरण्यास अडचण पडणार नाहीं अशा उद्देशानें कर्ममार्गाची स्थापना झाली. पण अनादि विषय वासनेच्या जोरामुळें तो मूळचा उद्देश बिलकूल बाजूस पडून तो मार्ग इतिकर्तव्य बनून बसला. ही स्थिति इतक्या वाईट थरास येऊन पोंचली कीं, खरा धर्म निखालस नाहींसा होण्याचा प्रसंग येऊन ठेपला. त्या वेळीं खऱ्या धर्माची स्थापना करण्याकरितां श्रीमच्छंकराचार्यांचा अवतार झाला. त्या वेळचे पंडित कर्मशास्त्रांत इतके प्रवीण झाले होते कीं, आपल्या विद्वत्तेच्या बळावर ज्ञानाचें नांव देखील कोणास काढूं देईनात. ह्मणून पांडित्याचे बळानेंच त्या लोकांस जिंकलें पाहिजे होतें. उपनयन झाल्यावर लवकरच आचार्यांनीं संन्यासदीक्षा घेऊन आपल्या अवतारकृत्यास आरंभ केला. उपनिषद्भाग, व्यासांनीं केलेलीं वेदांतसूत्रें व गीताशास्त्र हे ग्रंथ फार काळापासून आधारभूत मानले गेले आहेत. त्यांजवर व इतर महत्वाचे ग्रंथांवर आचार्यांनीं भाष्यें केलीं. वास्तविकपणें वेदांत कर्म, उपासना व ज्ञान या तिहींचें प्रतिपादन केलें आहे व ज्या संबंधाचें कांड असेल त्यांत त्याचेंच विशेषत्वें वर्णन केलें आहे. अशा स्थितींत कर्माचें महत्व कमी केल्याशिवाय ज्ञानमार्गाची स्थापना करणें अशक्य होतें. ह्मणून या विशेष कार्याचे सिद्धीकरितां अनुकूल होतील. अशा अर्थाचीं भाष्यें आचार्यांस तयार करावीं लागलीं. तीं तयार करून उलटपक्षाकडील मंडणमिश्र नांवाच्या महापंडिताशीं प्रतिज्ञापूर्वक मोठ्या कडाक्याचें व चातुर्याचें वाग्युद्ध करून त्याचा बिनतोड पराजय केला व त्याला संन्यासी बनविला. अशा प्रकारें दिग्विजय करून आचार्यांनीं ज्ञानमार्गाची स्थापना केली. हें महत्कृत्य करण्यांत कर्ममार्ग व उपासनामार्ग यांचा पाडाव करावा लागला. वास्तविकपणें मोक्षप्राप्तीकरितां कर्म, उपासना आणि ज्ञान या तिहींचीहि जरूर आहे. पण या सर्वांत ज्ञानास श्रेष्ठत्व आहे, कारण ज्ञानाशिवाय मुक्ति मिळतच नाहीं. हें खरें तत्त्व

विसरून जे कोणी एकासच धरून चालतात, ते गोते खातात हें पंडितांनीं स्पष्ट करून दाखविलें आहे. अस्तु. यावरून उघड दिसून येईल कीं, आचार्यांनीं गीतेचा जो निर्गुणपर अर्थ केला तो विशेष प्रसंगाकरितां केला. दिग्विजय केल्यावर त्यांनीं बहुतेक देवतांचीं स्तोत्रें तयार करून लोकोपयोगाकारितां प्रसिद्ध केलीं व वेळोवेळीं भगवन्नाममहिमा ही जोरानें वर्णन केला. यामुळें तर वरील गोष्टीस फारच बळकटी येते. जैमिनीनें कर्ममार्ग स्थापन केल्यावर त्याचे लिहिण्याचा खरा आशय न समजून जसा मागाहून घोंटाळा उडाला त्याचप्रमाणें आचार्यांचे मार्गेंहि घडलें. गीतेवर केलेलें आचार्यांचें भाष्य वादग्रंथ आहे हें न समजतां तें उपदेशपर समजून त्यांचे मागाहून झालेल्या शिष्यपरंपरेनें फारच गोंधळ उडवून दिला. अवतारकृत्य साधण्याकरितां आचार्यांनीं तेवढ्यापुरता ज्ञानाचा अभिमान धरून कार्यसिद्धि झाल्या बरोबर तो टाकून दिला. पण त्यांचे मागून झालेल्या मंडळींनीं तर त्या अभिमानास कायमचा मित्रच करून घेतलें व कर्म आणि उपासना यांस अगदींच तुच्छ करून टाकलें. आचार्यांनीं आपलें भाष्य फार संक्षिप्त केलें, कारण वादामध्यें पांडित्याचे बळावर निसटून जाण्यास तसें करणें जरूर होतें. हें इंगित त्यांचे मागून झालेल्या ज्ञानाभिमानी टीकाकारांस न कळून ते आचार्यांचे भाष्याचा विस्तार करण्यास लागले तेव्हां त्यांस पदोपदीं अडचणी येऊं लागल्या. तरी अभिमानामुळें तो मार्ग सोडून न देतां त्यांनीं विलक्षण अर्थ केले. त्याचे मासले या टीकेंत दिलेच आहेत. असो.

४. आचार्यांचे मागून झालेली बंडाळी मोडण्या करितां श्रीज्ञानेश्वर, तुकाराम इत्यादि संतांचे अवतार झाले. त्यांनीं श्रीगीतेचा यथार्थ प्रकट केला, परंतु वादाविवादाच्या पद्धतीनें सिद्ध करून न दाखवितां तो गोवमांत सांगितला व शेंकडो भाळेभोळे लोकांनीं त्याजवर श्रद्धा ठेवून ते मुक्तहि होऊन गेले. ही उणीव भरून काढण्याकरितां

श्रीमद्वामनपंडितांनीं "यथार्थ दीपिका" नांवानें प्रसिद्ध असलेली टीका प्रकाशित केली. तिजमध्यें श्रुति, स्मृति व शास्त्र यांच्या आधारानें सगुणभक्तीचें श्रेष्ठत्व प्रतिपादन करून यथार्थाचें मंडण केलें. पण तिकडे आमचे संस्कृताभिमानी पंडित पाहतील तर ना ! ! या शास्त्री मंडळीस व संन्यासी लोकांस प्राकृत भाषेचा इतका तिटकारा असें कीं, त्यांनीं एकनाथस्वामी सारख्यांचे ही हाल केल्या वांचून सोडिले नाहींत. पण सत्याचा जय होणारच. ह्मणून श्रीज्ञानेश्वर, एकनाथस्वामी, तुकारामबोवा, यांचे ग्रंथ साधारण लोकांस व कित्येक निरभिमानी विद्वानांसही मान्य झाले. पंडितांचा ग्रंथ शास्त्रीय पांडित्याचा असल्यामुळें सामान्य लोकांस त्यांतील रहस्य समजलें नाहीं व विद्वान् लोकांनीं तो प्राकृत भाषेंत आहे ह्मणून तिकडे पाहिलें नाहीं, यामुळें त्याचा व्हावा तसा प्रसार झाला नाहीं. थोडे दिवसांपूर्वींपर्यंत तशी स्थिति होती, पण ती आतां बरीच बदलली आहे. आमची दुरभिमानी शास्त्री मंडळी बरीच कमी झाली आहे, व खरें समजून घेण्याकडे अलिकडील समजुतदार मंडळीचें लक्षाहि लागत चाललें आहे. परंतु जुन्या भाषेंत लिहिलेल्या पद्यात्मक ग्रंथांचा त्यांस कंटाळा येतो. अशा प्रसंगीं पंडितांच्या अमोल टीकेचा बोध करून देणारी गद्यात्मक टीका झाल्यास तिचा उपयोग होण्याचीं सुचिन्हें दिसूं लागलीं, ह्मणून हा माझा ओबडधोबड ग्रंथ माझ्या बंधुवर्गापुढें मांडावा असें माझ्या मनांत आलें.

९. वर लिहिलेल्या कारणांकरितां पंडितांच्या या टीकेचें महत्व तर आहेच, परंतु आह्मां प्रापंचिकांस तिचें अत्यंत महत्व आहे. इतर टीकाकारांप्रमाणें पंडितांनींही अनुभव दिले आहेत, व त्यांनीं आपला ग्रंथ फारच विस्तारानें लोकांस समजण्यासारखा लिहिला आहे, ह्मणून साधारण सर्व लोकांस त्याचा विशेष उपयोग आहे. शिवाय पंडित गृहस्थाश्रमी होते व जीवकोटींतून मुक्त झाले, ह्मणून सर्व संगपरि-

त्याग केलेल्या संन्याशयांचे अनुभवांहून यांचे अनुभव आमच्या फायद्याचे आहेत. या कारणांकरितां त्यांनीं केलेली टीका आह्मां प्रापंचिकजनांस विशेष उपयोगी आहे.

६. या ग्रंथाच्या प्रसिद्धीपासून एक कवडीचाहि फायदा करून घेण्याचा माझा इरादा नाहीं. ग्रंथ छापण्यास जो खर्च लागला तेवढा वसूल होण्यापुरतीच किंमत ठेविली आहे. ह्मणून सर्व लोकांस त्याचा संग्रह करण्यास जड जाणार नाहीं अशी उमेद आहे. लोकांनीं कृपा करून हा ग्रंथ वाचला ह्मणजे मला शेंकडो रुपये मिळाले असें मी समजेन.

७. या ग्रंथाचें शोधन करण्याचे कामीं माझे मित्र रा. रा. हरि मोरेश्वर शेवडे, प्रिन्सिपाल ट्रेनिंग कॉलेज आकोलें, यांनीं मनापासून मदत केली, तीबद्दल मी त्यांचे आभार मानितों.

व्यं. कृ. देसाई.



श्री.

# श्रीमद्भगवद्गीताप्रारंभः

## अध्याय १ ला.

ॐ नमो भगवते वासुदेवाय.

ही गीता उत्पन्न होण्यास काय कारण झालें व ती कोणते प्रसंगीं सांगितली हें या अध्यायांत वर्णिलें आहे. वास्तविक गीतेचा आरंभ दुसऱ्या अध्यायाचे अकराव्या श्लोकापासून होतो. ह्मणून तेथपर्यंत फक्त मूळ संस्कृत श्लोक दिले आहेत; व या अध्यायाचे शेवटीं त्यांचा सारांश देऊन, दुसऱ्या अध्यायांतील दहा श्लोकांचा सारांश त्या श्लोकांपुढें दिला आहे.

धृतराष्ट्र उवाच.

धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे समवेता युयुत्सवः ।
मामकाः पांडवाश्चैव किमकुर्वत संजय ॥ १ ॥

संजय उवाच.

दृष्ट्वा तु पांडवानीकं व्यूढं दुर्योधनस्तदा ।
आचार्यमुपसंगम्य राजा वचनमब्रवीत् ॥ २ ॥

पश्यैतां पांडुपुत्राणामाचार्य महतीं चमूम् ।
व्यूढां द्रुपदपुत्रेण तव शिष्येण धीमता ॥ ३ ॥
अत्र शूरा महेष्वासा भीमार्जुनसमा युधि ।
युयुधानो विराटश्च द्रुपदश्च महारथः ॥ ४ ॥
धृष्टकेतुश्चेकितानः काशिराजश्च वीर्यवान् ।
पुरुजित्कुंतिभोजश्च शैब्यश्च नरपुंगवः ॥ ५ ॥
युधामन्युश्च विक्रांत उत्तमौजाश्च वीर्यवान् ।
सौभद्रो द्रौपदेयाश्च सर्व एव महारथाः ॥ ६ ॥
अस्माकं तु विशिष्टा ये तान्निबोध द्विजोत्तम ।
नायका मम सैन्यस्य संज्ञार्थं तान्ब्रवीमि ते ॥ ७ ॥
भवान्भीष्मश्च कर्णश्च कृपश्च समितिंजयः ।
अश्वत्थामा विकर्णश्च सौमदत्तिस्तथैव च ॥ ८ ॥
अन्ये च बहवः शूरा मदर्थे त्यक्तजीविताः
नानाशस्त्रप्रहरणाः सर्वे युद्धविशारदाः ॥ ९ ॥
अपर्याप्तं तदस्माकं बलं भीष्माभिरक्षितम् ।
पर्याप्तं त्विदमेतेषां बलं भीमाभिरक्षितम् ॥ १० ॥
अयनेषु च सर्वेषु यथाभागमवस्थिताः ।
भीष्ममेवाभिरक्षंतु भवंतः सर्व एव हि ॥ ११ ॥
तस्य संजनयन्हर्षं कुरुवृद्धः पितामहः ।
सिंहनादं विनद्योच्चैः शंखं दध्मौ प्रतापवान् ॥ १२ ॥
ततः शंखाश्च भेर्यश्च पणवानकगोमुखाः ।
सहसैवाभ्यहन्यंत स शब्दस्तुमुलोऽभवत् ॥ १३ ॥
ततः श्वेतैर्हयैर्युक्ते महति स्यंदने स्थितौ ।
माधवः पांडवश्चैव दिव्यौ शंखौ प्रदध्मतुः ॥ १४ ॥

पांचजन्यं हृषीकेशो देवदत्तं धनंजयः ।
पौंड्रं दध्मौ महाशंखं भीमकर्मा वृकोदरः ॥ १५ ॥
अनंतविजयं राजा कुंतीपुत्रो युधिष्ठिरः ।
नकुलः सहदेवश्च सुघोषमणिपुष्पकौ ॥ १६ ॥
काश्यश्च परमेष्वासः शिखंडी च महारथः ।
धृष्टद्युम्नो विराटश्च सात्यकिश्चापराजितः ॥ १७ ॥
द्रुपदो द्रौपदेयाश्च सर्वशः पृथिवीपते ।
सौभद्रश्च महाबाहुः शंखान्दध्मुः पृथक्पृथक् ॥ १८ ॥
स घोषो धार्तराष्ट्राणां हृदयानि व्यदारयत् ।
नभश्च पृथिवीं चैव तुमुलो व्यनुनादयन् ॥ १९ ॥
अथ व्यवस्थितान्दृष्ट्वा धार्तराष्ट्रान्कपिध्वजः ।
प्रवृत्ते शस्त्रसंपाते धनुरुद्यम्य पांडवः ॥ २० ॥
हृषीकेशं तदा वाक्यमिदमाह महीपते ।

अर्जुन उवाच.

सेनयोरुभयोर्मध्ये रथं स्थापय मेऽच्युत ॥ २१ ॥
यावदेतान्निरीक्षेऽहं योद्धुकामानवस्थितान् ।
कैर्मया सह योद्धव्यमस्मिन्रणसमुद्यमे ॥ २२ ॥
योत्स्यमानानवेक्षेऽहं य एतेऽत्र समागताः ।
धार्तराष्ट्रस्य दुर्बुद्धेर्युद्धे प्रियचिकीर्षवः ॥ २३ ॥

संजय उवाच.

एवमुक्तो हृषीकेशो गुडाकेशेन भारत ।
सेनयोरुभयोर्मध्ये स्थापयित्वा रथोत्तमम् ॥ २४ ॥

भीष्मद्रोणप्रमुखतः सर्वेषां च महीक्षिताम् ।
उवाच पार्थ पश्यैतान्समवेतान्कुरूनिति ॥ २५ ॥

तत्रापश्यत्स्थितान्पार्थः पितॄनथ पितामहान् ।
आचार्यान्मातुलान्भ्रातॄन् पुत्रान्पौत्रान्सखींस्तथा ॥ २६॥

श्वशुरान्सुहृदश्चैव सेनयोरुभयोरपि ।
तान्समीक्ष्य स कौंतेयः सर्वान्बंधूनवस्थितान् ॥ २७ ॥

कृपया परयाविष्टो विषीदन्निदमब्रवीत् ।

अर्जुन उवाच.

दृष्ट्वेमं स्वजनं कृष्ण युयुत्सुं समुपस्थितम् ॥ २८ ॥

सीदंति मम गात्राणि मुखं च परिशुष्यति ।
वेपथुश्च शरीरे मे रोमहर्षश्च जायते ॥ २९ ॥

गांडीवं स्रंसते हस्तात्त्वक्चैव परिदह्यते ।
न च शक्नोम्यवस्थातुं भ्रमतीव च मे मनः ॥ ३० ॥

निमित्तानि च पश्यामि विपरीतानि केशव ।
न च श्रेयोनुपश्यामि हत्वा स्वजनमाहवे ॥ ३१ ॥

न कांक्षे विजयं कृष्ण न च राज्यं सुखानि च ।
किं नो राज्येन गोविंद किं भोगैर्जीवितेन वा ॥ ३२ ॥

येषामर्थे कांक्षितं नो राज्यं भोगाः सुखानि च ।
त इमेऽवस्थिता युद्धे प्राणांस्त्यक्त्वा धनानि च ॥ ३३ ॥

आचार्याः पितरः पुत्रास्तथैव च पितामहाः ।
मातुलाः श्वशुराः पौत्राः श्यालाः संबंधिनस्तथा ॥ ३४ ॥

एतान्न हंतुमिच्छामि घ्नतोपि मधुसूदन ।
अपि त्रैलोक्यराज्यस्य हेतोः किं नु महीकृते ॥ ३५ ॥

निहत्य धार्तराष्ट्रान्नः का प्रीतिः स्याज्जनार्दन ।
पापमेवाश्रयेदस्मान्हत्वैतानाततायिनः ॥ ३६ ॥

तस्मान्नार्हा वयं हंतुं धार्तराष्ट्रान्स्वबांधवान् ।
स्वजनं हि कथं हत्वा सुखिनः स्याम माधव ॥ ३७ ॥

यद्यप्येते न पश्यंति लोभोपहतचेतसः ।
कुलक्षयकृतं दोषं मित्रद्रोहे च पातकम् ॥ ३८ ॥

कथं न ज्ञेयमस्माभिः पापादस्मान्निवर्तितुम् ।
कुलक्षयकृतं दोषं प्रपश्यद्भिर्जनार्दन ॥ ३९ ॥

कुलक्षये प्रणश्यंति कुलधर्माः सनातनाः।
धर्मे नष्टे कुलं कृत्स्नमधर्मोऽभिभवत्युत ॥ ४० ॥

अधर्माभिभवात्कृष्ण प्रदुष्यंति कुलस्त्रियः ।
स्त्रीषु दुष्टासु वार्ष्णेय जायते वर्णसंकरः ॥ ४१ ॥

संकरो नरकायैव कुलघ्नानां कुलस्य च ।
पतंति पितरो ह्येषां लुप्तपिंडोदकक्रियाः ॥ ४२ ॥

दोषैरेतैः कुलघ्नानां वर्णसंकरकारकैः
उत्साद्यंते जातिधर्माः कुलधर्माश्च शाश्वताः ॥ ४३ ॥

उत्सन्नकुलधर्माणां मनुष्याणां जनार्दन ।
नरके नियतं वासो भवतीत्यनुशुश्रुम ॥ ४४ ॥

अहो बत महत्पापं कर्तुं व्यवसिता वयम् ।
यद्राज्यसुखलोभेन हंतुं स्वजनमुद्यताः ॥ ४५ ॥

**यदि मामप्रतीकारमशस्त्रं शस्त्रपाणयः ।**

**धार्तराष्ट्रा रणे हन्युस्तन्मे क्षेमतरं भवेत् ॥ ४६ ॥**

संजय उवाच.

**एवमुक्त्वार्जुनः संख्ये रथोपस्थ उपाविशत् ।**

**विसृज्य सशरं चापं शोकसंविग्नमानसः ॥ ४७ ॥**

कुरुक्षेत्रीं युद्धाची तयारी चालली असतां संजयास धृतराष्ट्रानें प्रश्न केल्यावरून, संजय खालीं लिहिल्याप्रमाणें तिकडील हकीकत त्यास सांगतोः—

कौरवपांडवपक्षांकडील उभय सैन्यें युद्ध सुरू करण्याचे तयारींत आहेत, प्रत्येक वीर आपआपले शंखाचा घोर नाद करीत आहे, आपले व विरुद्ध पक्षाकडील सैन्याची पाहणी करीत आहे, कोठें कोठें शस्त्रपात-ही होऊं लागले आहेत. अशा समयीं, ज्याच्या रथाचे ध्वजावर कपिराज हनुमंत शोभायमान आहे, व श्रीकृष्ण भगवान् ज्याच्या रथाचे घोड्यांचे लगाम हातीं धरून सारथ्य करण्यास बसले आहेत, असा अर्जुन, हातांत गांडीव धनुष्य घेऊन उभा असतां, श्रीकृष्णास ह्मणाला कीं, देवा, विरुद्ध पक्षाकडील कोणकोणत्या वीरांशीं युद्ध करावयाचें आहे, हें मी नीट पाहीपर्यंत आपला रथ दोन्ही सैन्यांचे मध्यभागीं उभा कर. त्याप्रमाणें देवानें रथ स्थित केला व अर्जुन पाहूं लागला तों, दोन्ही सैन्यांत चुलते, आजे, मामा, नातू, पुत्र, मित्र, सासरे व इतर आप्तजन युद्धाकारणें तयार आहेत. असें पाहून, करुणेनें पीडित होत्साता, खिन्न होऊन, श्रीकृष्णास ह्मणाला कीं, देवा, माझे हातपाय गळून गेले, शरिरास कंप सुटत आहे, व त्यावर रोमांच उठत आहेत, हातांतून माझें धनुष्य निसटून पडतें कीं काय असें झालें आहे. मला उभें देखील राहवत नाहीं व माझें डोकें फिरत आहे; हे केशवा, हें चिन्ह मला बरें दिसत नाहीं. राज्याचे आशेनें

हे जमलेले आप्तइष्ट मारून त्यांचे रक्तांनीं भिजलेल्या धनाचा उपभोग घेणें मला रास्त दिसत नाहीं. धृतराष्ट्राचे पुत्र कौरव हे माझे बंधु आहेत. यांना मारल्यापासून कुलक्षय केल्याचा दोष मला लागेल व माझे-कडून मोठा अधर्म होईल. या सर्व कर्माचें फळ नरकच मिळणार असें शास्त्रांतून मीं ऐकिलें आहें. तेव्हां अशा प्रसंगीं मी त्यांस मारण्यापेक्षां निःशस्त्र अशा मला तेच मारतील तर फार बरें होईल. असें बोलून अर्जुन हातांतील धनुष्य खालीं टाकून, रथाखालीं उतरला व रथाचे समोर जाऊन बसून राहिला.



श्री.

# अध्याय २ रा.

ॐ नमो भगवते वासुदेवाय.

संजय उवाच.

तं तथा कृपयाविष्टमश्रुपूर्णाकुलेक्षणम् ।

विषीदंतमिदं वाक्यमुवाच मधुसूदनः ॥ १ ॥

श्रीभगवानुवाच.

कुतस्त्वा कश्मलमिदं विषमे समुपस्थितं ।

अनार्यजुष्टमस्वर्ग्यमकीर्तिकरमर्जुन ॥ २ ॥

क्लैब्यं मास्म गमः पार्थ नैतत्त्वय्युपपद्यते ।

क्षुद्रं हृदयदौर्बल्यं त्यक्त्वोत्तिष्ठ परंतप ॥ ३ ॥

अर्जुन उवाच.

कथं भीष्ममहं संख्ये द्रोणं च मधुसूदन ।

इषुभिः प्रतियोत्स्यामि पूजार्हावरिसूदन ॥ ४ ॥

गुरूनहत्वा हि महानुभावाञ्छ्रेयो भोक्तुं भैक्ष्यमपीह लोके ।

हत्वार्थकामांस्तु गुरूनिहैव भुंजीय भोगान्रुधिरप्रदिग्धान् ॥ ५ ॥

न चैतद्विद्मः कतरन्नो गरीयो यद्वा जयेम यदि वा नो जयेयुः ।

यानेव हत्वा न जिजीविषामस्तेऽवस्थिताः प्रमुखे धार्तराष्ट्राः ॥ ६ ॥

कार्पण्यदोषोपहतस्वभावः पृच्छामि त्वां धर्मसंमूढचेताः ।
यच्छ्रेयः स्यान्निश्चितं ब्रूहि तन्मे शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम्
न हि प्रपश्यामि ममापनुद्याद् यच्छोकमुच्छोषणमिन्द्रियाणाम् ।
अवाप्य भूमावसपत्नमृद्धं राज्यं सुराणामपि चाधिपत्यं ॥ ८ ॥

संजय उवाच.

एवमुक्त्वा हृषीकेशं गुडाकेशः परंतप ।
न योत्स्य इति गोविंदमुक्त्वा तूष्णीं बभूव ह ॥ ९ ॥
तमुवाच हृषीकेशः प्रहसन्निव भारत ।
सेनयोरुभयोर्मध्ये विषीदंतमिदं वचः ॥ १० ॥

अर्जुनास अशा स्थितींत पाहून भगवान् त्यास ह्मगाले:—अर्जुना, अरे, अशा प्रसंगीं असा मोह तुला कोठून उत्पन्न झाला ? हें श्रेष्ठ पुरुषाचें लक्षण नव्हे. हें वर्तन फार अकीर्तिकारक आहे. असा भित्रेपणा काय ह्मणून धरिलास ? तूं शत्रूस भीति उत्पन्न करणारा आहेस. तुला हें शोभत नाहीं. ऊठ, युद्ध कर.

तेव्हां अर्जुन ह्मणालाः—हे मधुसूदना, भीष्मद्रोणांसारख्या पूज्य पुरुषांवर मी शस्त्रांचा प्रहार कसा करूं ? अशा मोठ्या मनाच्या पुरुषांस मारून जगण्याची मला मुळींच इच्छा नाहीं. या बिकट प्रसंगीं काय करावें हें मला समजत नाहीं; माझी बुद्धि गोंधळून गेली आहे. मी तुझा शिष्य आहें. मला काय ती आज्ञा कर.

यानंतर संजय धृतराष्ट्रास ह्मगाला कीं, याप्रमाणें भाषण करून अर्जुन स्तब्ध बसला. तेव्हां भगवान् श्रीकृष्ण किंचित् हांसल्यासारखें करून बोलूं लागले कीं,

अशोच्यानन्वशोचस्त्वं प्रज्ञावादांश्च भाषसे ।
गतासूनगतासूंश्च नानुशोचन्ति पण्डिताः ॥ ११ ॥

अर्थ.–श्रीभगवान् ह्मणाले, ज्यांचा शोक करणें योग्य नव्हे, अशांचा तूं शोक करीत बसला आहेस, आणि ज्ञानाच्या गोष्टीही सांगतोस; परंतु जे ज्ञानी असतात ते मेलेल्यांचा आणि जिवंतांचाही शोक करीत नाहींत.

टीका.–भगवान् ह्मणतात, 'अर्जुना, मला मोठें आश्चर्य वाटतें कीं, तुझ्यासारखा सुज्ञ मनुष्य, ज्यांविषयीं शोक करूं नये, अशांविषयीं शोक करीत आहे. इकडे पहावें तर शास्त्रांतरींच्या गोष्टी मोठ्या शहाणपणानें बोलतोस आणि तिकडे भीष्मादिकांवर शर टाकून त्यांच्यांशीं कसें युद्ध करूं ह्मणून शोक करीत आहेस. तुला वाटतें कीं, तुझ्या कुळांत तूंच कायतो शहाणा निघालास, बाकीचे तुझ्या कुळांतील चांगले चांगले लोक सर्व मूर्ख होते. तुझा आजा भीष्म, ज्याविषयीं एवढी पूज्यबुद्धि तूं आतांपर्यंत दाखविलीस, त्याचें उदाहरण तुला मी देतों. काशीराजाची ज्येष्ठ कन्या अंबा सती हिच्याशीं भीष्म लग्न करीना, ह्मणून ती त्याचा गुरु परशुराम यास शरण गेली. आचार्य भीष्मास लग्न करण्याविषयीं आग्रह करूं लागले. परंतु भीष्म कांहीं केल्या ऐकेना. अखेरीस गुरुशिष्यांचें कडाक्याचें युद्ध झालें. त्यांत भीष्मानें गुरूचे अंगावर बाण हाणून त्यास घायाळ केलें. अशा भीष्मावर बाण टाकण्याचा प्रसंग आहे ह्मणून तूं शोक करितोस! पहा, लहानशी प्रतिज्ञा मोडूं नये एवढ्याकरितां, पूज्य अशा गुरूशीं युद्ध करण्यास भीष्म मागें हटला नाहीं. तोच भीष्म, तुझे शत्रु दुर्योधनादि यांणीं तुझा नाश करण्याकरितां पोसून आज आणिला आहे. अशा भीष्मावर बाण कसे टाकूं ह्मणून रडतो आहेस हें नवल नव्हे काय? जुनाट, चालत आलेल्या धर्माप्रमाणें, युद्धाकरितां रणांत कोणीही समोर आला तर, तेथें युद्धाशिवाय आप्तपणाचा वगैरे इतर विचार मनांत आणणें उचित नाहीं. ज्ञानी लोक मेलेल्यांचा अथवा मरणाऱ्यांचा शोक करीत नाहींत. स्वप्नांतील आप्तइष्टांच्या मरणानें कोणास तरी शोक

होईल काय? नाहीं. ज्ञानी आपल्यास अतींद्रिय आत्मा समजतात व ज्ञानदृष्टीनें, मारणें, मरणें वगैरे सृष्टींतील सर्व खेळ, स्वप्नाप्रमाणें पाहतात'.

भगवंतांनीं या श्लोकांतील उपदेशानें अर्जुनाचा शोक धर्मनीती-विरुद्ध आहे व ज्ञानदृष्ट्या मरणें, मारणें हें स्वप्नासारिखें आहे असें दाखवून, शोकाचा निषेध केला. तेंच ज्ञान भगवान् पुढील श्लोकापासून सांगण्याचें सुरू करितात.

**न त्वेवाहं जातु नासं न त्वं नेमे जनाधिपाः ।**
**न चैव न भविष्यामः सर्वे वयमतःपरम् ॥ १२ ॥**

**अर्थ व टीका.**–मी, तूं, हे राजे, किंवा सर्व आपण पूर्वीं कधीं नव्हतों व पुढें असणार नाहीं असें नाहीं. जे सर्व आह्मी आतां देह-धारी दिसतों आहों ते पूर्वींही देह धरून होतों, व पुढेंही दुसरे देह धरून असूं. सर्व देहांत आत्मा हें शाश्वत तत्व आहे. देहांचें रूप नश्वर आहे. तें मात्र बदलून आत्मा दुसरें शरीर धारण करितो, हें या पुढील श्लोकांत भगवान् सांगतात.

**देहिनोऽस्मिन्यथा देहे कौमारं यौवनं जरा ।**
**तथा देहांतरप्राप्तिर्धीरस्तत्र न मुह्यति ॥ १३ ॥**

**अर्थ.**–देह धारण करणारा देही जो आत्मा, त्याला या देहांत जसें बाळपण, तारुण्य आणि वार्धक्य प्राप्त होतें, तसाच पुढें दुसरा देह त्यास होतो, याविषयीं ज्ञानवानाला संशय नाहीं.

**टीका.**–एक देह पडल्यानंतर आत्मा दुसरा देह घेतो. याचा प्रत्यक्ष अनुभव सामान्य लोकांस होत नाहीं. एवढ्याचवरून तसें होणें असंभवनीय आहे, असें मानणें प्रशस्त होणार नाहीं. कारण व्यवहारांत देखील सर्व गोष्टी प्रत्यक्ष पुराव्यांनींच नेहमीं सिद्ध होतात असें नाहीं. पुरावे तीन प्रकारचे आहेतः–प्रत्यक्ष, आनुमानिक आणि ऐतिह्य ( खात्री-

लायक तोंडी पुरावा. ) यांपैकीं आनुमानिक पुरावा या श्लोकांत दिला आहे. मरणानंतर दुसरा देह आत्म्यास होतो हें जरी प्रत्यक्ष अनुभवास येत नाहीं, तथापि यात्र देहांत देहाचा जाणणारा जशाचा तसाच राहून शरिराचें रूप मात्र कालमानानें पालटून बाळपण, तारुण्य, वार्धक्य ह्या अवस्था येतात. या सर्व अवस्था आत्मा ह्मणजे आपण ह्मणून जी वस्तु आहे ती जाणते. पण एका अवस्थेचें रूप दुसरे अवस्थेंत दिसत नाहीं. तसेंच, हा देह जाऊन दुसरा घेणें कसें अशक्य होईल? बाळपण सरून तारुण्य आलें ह्मणून कोणी रडत नाहीं. त्याचप्रमाणें हा देह पडला ह्मणून विचारी लोक कधींही शोक करीत नाहींत, कारण आत्मा मरत नाहीं; परंतु हा देह टाकून दुसरा धारण करितो, अशी त्यांची खात्री असते. एथें एक शंका उत्पन्न होते कीं, दुसरा देह आत्मा धारण करितो ही गोष्ट खरी; तरी मरणाराच्या देहाशीं आपले इंद्रियांना संयोग होऊन जें सुख होत होतें तें तर अंतरतेंच. या शंकेचा परिहार श्रीभगवान् पुढील श्लोकांत करितात.

**मात्रास्पर्शास्तु कौंतेय शीतोष्णसुखदुःखदाः ।**
**आगमापायिनो नित्यास्तांस्तितिक्षस्व भारत ॥ १४ ॥**

**अर्थ.**—परंतु, हे कौंतेया, शीत आणि उष्ण जशीं सुखदुःख देणारीं आहेत, तसेच विषयेंद्रियसंयोग सुखदुःख देणारे आहेत. त्यांना उत्पत्ति आहे, तसाच नाशही आहे, व ते अनित्य आहेत ह्मणजे चिरकाल राहत नाहींत, ह्मणून, हे भारता, त्यांना तूं धैर्यानें सोस.

**टीका.**—मरणारे आप्तांचे हल्लींचे असणारे देहांपासून इंद्रियद्वारा जें सौख्य होत होतें, तें नाहींसें झाल्यामुळें शोक तर झालाच पाहिजे, या शंकेच्या परिहाराकारणें भगवान् हा श्लोक सांगतात. इंद्रियद्वारा सुख होतें तें असें कीं, देह पाहिल्यानें डोळ्यांस, त्याच्या अंगावरून हात फिरविला असतां त्वचेस, त्याचें भाषण ऐकिलें असतां कानास, अशा प्रकारें

प्रत्येक इंद्रियद्वारा सुख होतें. भगवान् ह्मणतात कीं, इंद्रियद्वारा होणारें सुख नेहमीं टिकणारें नाहीं. व तें वास्तविकपणें सुख नसून खात्रीनें दुःखच आहे, असें ज्ञानी पुरुष समजून, ते वैराग्य धारण करितात आणि शोक न करितां जिवंत असतांनाच नेहमीं नित्यसुखाचा उपभोग घेतात.

इंद्रियांचा विषयांशीं संयोग शीतोष्णाप्रमाणें सुखदुःख देणारा आहे. उष्ण काळांत थंड पदार्थ सुखकर होतात. वस्तुतः ते अत्यंत दुःखरूप आहेत; कारण त्यांचा वियोग झाला ह्मणजे जास्त दुःख होतें. इतकेंच नाहीं तर तेच पदार्थ शीत कालांत दुःसह होतात. विचारदृष्टया विषयांचे अंगीं दुःखच आहे. सुख निराळें आहे व तें आत्म्याचें आहे. हरिण मृगजळ खरें पाणी समजून त्याकडे जाण्यास धांव घेतात. वाटेंत नदींत पाणी पिऊन संतुष्ट होतात आणि ज्याकरितां आपण धांवलों त्यानेंच आपली तृप्ति झाली, असें त्यांस वाटतें. ह्मणजे जें मृगजळ पाहिलें तेंच हें नदीचें पाणी अशी खोटी समजूत होते. या न्यायानें इंद्रियें आपापल्या विषयांकडे धांव घेतात, पण त्या विषयांत तर सुख नाहींच. मग सुख होतें तें कोठून होतें? तें सुख आत्मसुख होय, हें अनुभवी ज्ञानी समजतात. व असा जो सुखरूप आत्मा त्याचाच ते नेहमीं आश्रय करितात. परंतु अज्ञानी माणसें, विषय सुख देणारे आहेत असें मानून, अखेरीस दुःख भोगतात. गाढ झोपेंत आपल्यास जें सुख मिळतें, तें कोणत्याही विषयापासून मिळत नाहीं, हें सर्व कबूल करतील. यावरून एवढें सिद्ध होतें कीं, विषय आणि इंद्रियें यांच्या संयोगापासून होणारे सुखापेक्षां जास्त असें दुसरें सुख आहे. हे विषय पांच प्रकारचे आहेतः— शब्द ( कानाचा ), स्पर्श ( त्वचेचा ), रस ( जिव्हेचा ), रूप ( नेत्राचा ), व गंध ( नाकाचा ). त्यांतील एखादें इंद्रिय निकामें झालें ह्मणजे, त्यास त्याचे विषयाचा, तो असूनही उपयोग होत नाहीं, याचप्रमाणें इंद्रिय असून त्याचा विषय नसला तर इंद्रियाचा उपयोग होत

नाहीं, व यांचा संयोग नेहमीं असूं शकत नाहीं. ह्मणून विषयेंद्रिय-संयोगांत जें थोडें आत्मसुख आहे, तें नेहमीं तर मिळतच नाहीं, पण तें मिळालेल्या सुखाचे शेंकडो पटीनें दुःखद होतें. ह्मणून ज्ञानी पुरुष नेहमीं टिकणारें असें सुख मिळावें, या हेतूनें आत्मस्वरूपीं राहतात. ह्मणजे इंद्रियजनित अनित्य सुखाची इच्छा न करितां नेहमीं समाधान-वृत्तीनें राहतात. सुख देणारे विषय कालांतरानेंच दुःख देतात असें नाहीं, तर लागलीच देतात. हिंवाळ्यांत सकाळीं ऊन गोड लागतें. पण एका घटकेनंतर तेंच ऊन दुःखावह होतें. थंडीचे वेळीं आपण उष्णाची अपे-क्षा करितों. तीच उष्णता दुःसह झाली ह्मणजे शीत मागतों. व तेंच शीत पुन्हां त्रासदायक झालें ह्मणजे उष्ण मागतों. यावरून प्रत्येक विषय सुखाचे रूपानें दुःख देऊन जातो. जो अशा सुखाचे वेळीं मी सुखी ह्मणून अहंकार धरितो तो निश्चयेंकरून दुःख सोसतांना जास्त घाब-रा होतो. त्याचे रडण्यानें दुःख कांहीं कमी होतें काय ? नाहीं. त्यास तें भोगलेंच पाहिजे. ह्मणून विचारी मनुष्य दोन्हींही गोष्टी सारख्या भोगितो. याकरितां, हे भारता, तुझ्या आप्तांचे वियोगामुळें जें विषयेंद्रिय-जनित दुःख होईल, तें तूं समाधान ठेवून सोस. कारण त्यापासून होणारें सुख नेहमीं मिळणार नाहीं. कधींना कधीं तरी मरणानें आप्तांचा वियोग होणारच आहे. याकरितां आप्त मेल्याचें दुःख होऊं नये अशी तुझी इच्छा असल्यास जिवंतपणींच त्यांचा स्नेह ठेवूं नकोस. योगवि-योगाचें सुखदुःख समाधानवृत्तीनें सोस. असें देव अर्जुनास या श्लोकांत सांगतात.

इंद्रियांस विषयांपासून होणारे भोगांचा योग आणि वियोग सारखा पहा ह्मणून सांगितल्याबरोबर अर्जुनाचे मनांत आलें कीं, सुखी असतांना सुखी समजूं नये आणि दुःखांत दुःख आहेच, मग सुख कोठचें मिळणार. या शंकेचा परिहार भगवान् पुढील श्लोकानें करितात.

**यं हि न व्यथयंत्येते पुरुषं पुरुषर्षभ ।**
**समदुःखसुखं धीरं सोऽमृतत्वाय कल्पते ॥ १५ ॥**

**अर्थ.**–हे पुरुषश्रेष्ठा, पार्था, सुख आणि दुःख हीं ज्या ज्ञानी पुरुषाला पीडा करूं शकत नाहींत, व जो त्यांचा उपभोग घेतांना समबुद्धि ठेवितो, तो मोक्षप्राप्तीस योग्य होतो.

**टीका.**–विषयेंद्रियसंयोगापासून दुःख कसें होतें, याचा विचार करूं. प्रथम इंद्रियांस त्यांचे विषयांची इच्छा प्राप्त होते. निरनिराळ्या विषयांची इच्छा सर्वांस सारखी होते असें नाहीं. एकास तंबाखू खाण्याची पुष्कळ संवय असल्यामुळें त्याची जिव्हा तो विषय मागेल. याचा अनुभव असा कीं, इंद्रियांस एक प्रकारचा कंडू सुटतो, तो, तो विषय प्राप्त झाला ह्मणजे, त्याचे उपभोगानें तेवढ्या वेळेपुरता तृप्त होतो. परंतु ज्या संवयीमुळें त्या इंद्रियास कंडू उत्पन्न होतो, त्या संवयीस असा विषय दिल्यानें तितकी जास्त तीव्रता येते, व पुढें त्या विषयास तें इंद्रिय जास्त वेळ व कमी कमी कालांतरानें मागूं लागतें. अर्थात् त्या त्या मानानें परिणामीं जास्त दुःख होतें. यावरून स्पष्ट दिसतें कीं, त्या इंद्रियाची तृप्ति कायमची तर होतच नाहीं, परंतु तो कंडू जास्त जास्त होत जातो. व परिणामीं त्या त्या मानानें जास्त दुःख होतें. आतां इंद्रियाचा विषय त्यास न दिल्यानें होणारे कंडूचें दुःख सहन करावें लागतें हें खरें. परंतु तसें दुःख ज्ञानी लोक धैर्य धरून सोसतात. थोडा काळपर्यंत याप्रमाणें धैर्य धरिलें तर, पुढें नेहमीं होणारें दुःख कायमचें टळतें. कारण एकदां संवय मोडली ह्मणजे पुन्हां कंडूच उत्पन्न होत नाहीं, व अर्थात् परिणामींचें दुःखही टळतें. हा सर्व सुंदर परिणाम विषयाची इच्छा नाहींशी करण्याचा होय. व यासच वैराग्य ह्मणतात. असें वैराग्य ( इच्छाराहित्य ) ठेविलें ह्मणजे, प्रारब्धानें प्राप्त झालेल्या सुखदुःखाचा समबुद्धीनें उपभोग घेतला जातो व

व्यथा मुळींच होत नाहीं. पहा, आपले अंगास खरूज झाली ह्मणजे ती खाजविण्याची अत्युत्कट इच्छा उत्पन्न होते. ती धैर्य धरून आवरली तर मागाहून अतिशय होणारी भगभग टळून ती खरूज न खाजविल्यामुळें जास्त न चिडतां, उलटी लौकर बरी होते. ह्मणून भगवान् इंद्रियजनित सुखदुःख समान अंतःकरणानें भोगावें असा अर्जुनास उपदेश करितात.

स्वजनांचे मरणानें त्यांचें दर्शन वगैरेचें सुख अंतरेल, या शोकाचें निरसन या श्लोकापर्यंत झालें व अंतःकरणाची सुखदुःखीं समता ठेविल्यानें मनुष्य मोक्षास पात्र होतो, असें सांगितलें. तो मोक्ष ज्या ज्ञानानें होणार, तें ज्ञान आतां पुढील श्लोकापासून भगवान् सांगण्यास आरंभ करितात.

**नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः ।**

**अर्थ.**—जें असत् ह्मणजे मिथ्या आहे, त्याचे ठिकाणीं अस्तित्व नाहीं. आणि जें सत् ह्मणजे खरें आहे, त्यांत अभाव ह्मणजे नाहींपणा असत नाहीं.

**टीका.**—जड वस्तूचे अंगीं आस्तित्वाची अथवा नेहमीं टिकण्याची शक्ति नाहीं. या दोन्ही शक्ति फक्त एका सद्वस्तूचे ( ब्रह्माचे ) ठिकाणीं आहेत. या सद्वस्तूच्या सत्तेनेंच जड पदार्थ भासमान होतात. ह्मणून त्यांस अनित्यत्व आहे. उदाहरणार्थ सोनें आणि त्याचा अळंकार घेऊं. सोनें स्वतःसिद्ध असूं शकतें. परंतु अलंकार ( रूप ) त्याशिवाय असूं शकत नाहीं, कारण त्यास सोन्याच्या सत्तेनें अस्तित्व आहे, स्वतःचें नाहीं. अळंकार आकाररूपानें दिसतो, परंतु तो नाहींच असें ह्मटलें पाहिजे; कारण आकार कांहीं निराळी स्वतःसिद्ध वस्तु नाहीं. वास्तविक सर्व अलंकार सोनेंच आहेत, ह्मणून अलंकार असद्वस्तु होय. त्याचप्रमाणें माती आणि तिचा आकार घट, यांचाही विचार समजावा.

हे सर्व दृष्टांत नेहमीं एकदेशीय असणार, सर्वांशीं कधींही लागू पड-णार नाहींत. ब्रह्मासारखी दुसरी वस्तुच नाहीं, कारण तें एकच आहे. तेव्हां त्याचे साम्यास दुसरी वस्तु कोठून आणावी? आकार मोडला तरी सोनें किंवा माती कायम राहते. यावरून जग नसलें तरी ज्या ब्रह्माचें जग बनलें आहे तें कायम राहतें एवढेंच लक्षण दाखविण्यापुरता या दृष्टांताचा उद्देश आहे. आकार भासतात, परंतु त्यांस विचारदृष्ट्या अस्तित्व नाहीं; मूळ वस्तुच आहे असें वरील दृष्टांतानें सिद्ध केलें. सर्व जग अलंकार आहे व तें ब्रह्मरूपी सोन्यांत वास्तव्य करितें. परंतु तें मिथ्या आहे या भावानें "**नासतो विद्यते भावः**" असें भगवान् ह्मणतात. याचेच उलट "**नाभावो विद्यते सतः**" हें आहे. सत् (ब्रह्म) याचे ठायीं अभाव नाहीं. हें कालत्रयीं कायम राहतें. हें जग कोणते तरी आधारा-वर स्थित असलें पाहिजे. हें सर्व जग नाहीं अशी कल्पना करून तें काढून टाकिलें असतां, जी वस्तु (अर्थात् निराकार) राहील तेंच ब्रह्म सद्वस्तु होय; व त्याचेच आधारावर हें जग वास्तव्य करित आहे.

जगदुत्पत्तीचे पूर्वीं हें ब्रह्म मूळ स्थितींत होतें. याचे ठिकाणीं माया ह्मणजे स्फूर्ति उत्पन्न झाली. तेंच त्याचें ईश्वरपण. या मायेपासून सत्व, रज व तम हे तीन गुण उत्पन्न झाले. यांपैकीं सत्व गुणांत ईश्वरप्र-तिबिंब पडलें, तोच जीव होय. या सर्व विषयाचा तपशीलवार विचार येथें देतां येणार नाहीं, कारण या प्रत्येक गोष्टीकरितां स्वतंत्र एक एक अध्याय पुढें दिला आहे. त्या त्या अध्यायाची टीका होतांना याचें स्प-ष्टीकरण होईल. तूर्त एवढेंच समजावें कीं, जीव ह्मणजे ईश्वराचें प्रति-बिंब होय. जसें पाण्यांत सूर्याचें प्रतिबिंब पडतें व त्याचे गुण त्यांत असतात (अर्थात् अंशरूपानें), त्याचप्रमाणें जीवाचे ठायीं अंशरूपा-नें ईश्वराचे गुण आहेत. जसें निरनिराळ्या जलाशयांत एकाच सूर्याचें मंडल प्रतिबिंबित होतें, त्याप्रमाणें अनेक जीव झाले आहेत. बिंब ह्मणजे न नासणारें ब्रह्म होय. तेव्हां प्रतिबिंबही, उपाधि आहे तोंप-

यंत टिकणारच आहे. उपाधीचा नाश झाला ह्मणजे प्रतिबिंब नासत नाहीं, तर मूळ बिंबांत मिळून जातें. तें नासत नाहीं, कारण पुन्हां उपाधि मिळाल्याबरोबर त्याच बिंबापासून तें उत्पन्न होतें. एवंच ईश्वर आणि जीव हे दोन्हीही न नासणारे आहेत हें सिद्ध झालें. सत्व ह्मणजे बुद्धि होय. या बुद्धीचे ठायीं मीपणाची स्फूर्ति ह्मणजे अहंकार उत्पन्न झाला कीं, तेंच प्रतिबिंब होय. त्यासच जिव ही संज्ञा आहे. जें मूळचें बिंब तें आपण असत् बुद्धिरूप जळाचे उपाधीनें देहाहंकार उत्पन्न होतो, त्यामुळें, तो देह आपण आहों असें समजतों. ह्मणजे असत् देहास आपण सत् समजतों. वास्तविक आपण तर सत्स्वरूप आहों. मग या खोट्या देहाचा स्नेह ठेवणें शहाणपणाचें होईल काय?

हा सदसताचा (जड चैतन्याचा) व्यतिरेकानें ह्मणजे जडापासून चैतन्य निराळें, असा विचार झाला. परंतु हें जड चैतन्याचाच आकार आहे, व त्याचेशिवाय तें राहूं शकत नाहीं, ह्मणून आकार मात्रही चैतन्यच आहे असें पाहणें हा दुसरा विचार होय. यास अन्वय ह्मणतात. या दोन्ही बाजूंचे विचारासंबंधानें, या श्लोकाचें उत्तरार्धांत उल्लेख केला आहे.

उत्तरार्ध–उभयोरपि दृष्टोंतस्त्वनयोस्तत्वदर्शिभिः ॥ १६ ॥

**अर्थ.**–या दोन्ही गोष्टींचा निर्णय, तत्वदर्शी ह्मणजे अनुभवी ज्ञानी पुरुष जाणतात.

**टीका.**–सत् व असत् या दोहींचेंही तत्व वर सांगितल्याप्रमाणें अनुभवी ज्ञानी या दोहोंतच पाहतात. मातीचे घट होतात. घट होण्यापूर्वीं माती होती त्याचप्रमाणें घट नष्ट झाल्यावरही त्याची मातीच होते. घट असते वेळीं चर्मदृष्टीनें आकार दिसतो. परंतु ज्ञानदृष्टीनें घट देखील मातीच आहे. अज्ञानी लोक त्या घटास

घट या दृष्टीनें पाहतात व समजतात. ज्ञानी त्यास मातीच समजतात. ब्रह्म जगाचे रूपानें आकारवंत झालें आहे, तथापि त्याचे स्थितिकाळीं ज्ञानवान् त्यांत ब्रह्मच पाहतात. सर्व इंद्रियांस मात्र प्रपंचाचा भास होतो. तो झाल्याशिवाय राहणार नाहीं. परंतु बुद्धीनें तो ब्रह्मरूप पाहतां येतो. इंद्रियांस होणारा भास खरा मानणें, हें अज्ञान होय. गुळाचा भेला डाळ्यांनीं पाहिला असतां, ते रस जाणूं शकत नाहींत. तीच जीभ त्याचे रसाला जाणते. मनुष्याचे अंगीं विचार असल्यामुळें मृगजळ हें सूर्याचीं किरणें आहेत, असें तो जाणतो. परंतु अज्ञान हरिण तें थंड पाणी आहे असें समजतो. ह्मणून इंद्रियांना जे विषय गोचर होतात, ते अज्ञ लोक खरे मानतात. इंद्रियांस ते भासमान होतात, परंतु ते तत्वदृष्ट्या मिथ्या असून, सर्व ब्रह्मच आहे असें विचारदृष्टीनें ज्ञानी नेहमीं पाहतात. त्यांचे मनावर त्या विषयांचा परिणाम होत नाहीं. याच कारणास्तव, ते या विषयांनीं न बांधले जाऊन, मोकळे राहतात. ह्मणूनच त्यांस मुक्त अशी संज्ञा आहे; व अशा स्थितीस मुक्ति ह्मणतात.

या श्लोकानें भगवंत काय बोलले याचा सारांश काढूं. बिंबरूप ( ईश्वर ) व त्याचें प्रतिबिंब जीव, ( ज्यास क्षेत्रज्ञ असें १३ वे अध्यायांत ह्मटलें आहे, कारण तो असत् क्षेत्र ह्मणजे देह याचा जाणणारा आहे. ) हे सत् होत, व देह व सर्व जग हीं असत् आहेत, असें ठरलें. हें सत् तत्व असत् प्रपंचांत पाहणें, व तें निराळें समजणें, या दोहींचाही निर्णय तत्वदर्शी जाणतात.

यावरून देह अनित्य आहे, त्यांत आत्मा आहे तो नासत नाहीं, तो नित्य आहे. तेव्हां भीष्मादिकांस मारण्याचा शोक व्यर्थ आहे, असें भगवानांनीं सिद्ध करून दाखविलें. तथापि अर्जुनास वाटलें कीं, असत व सत् या दोहींचें तत्व एकच आहे, तर एकास ह्मणजे असतास

अनित्यत्व आहे तर सतास कां नसावें ? या शंकेचा परिहार पुढील श्लोकानें भगवान् करितात.

**अविनाशि तु तद्विद्धि येन सर्वमिदं ततम् ।**
**विनाशमव्ययस्यास्य न कश्चित् कर्तुमर्हति ॥ १७ ॥**

**अर्थ.**-ज्या तत्वानें हें सर्व जगत् व्यापिलें आहे तें नासणारें नाहीं, असें जाण. तें अव्यय आहे. त्याचा नाश करण्यास कोणीही समर्थ नाहीं.

**टीका.**—असत् देह व सत् जीव, या दोहींचेंही तत्व ब्रह्म होय, हें वर सांगितलें आहे. तथापि जीव नाशवंत नाहीं व देह आहे. जीव नाशवंत नाहीं याचें कारण असें कीं, तो जीव चिदंश आहे व तो सत्प्रतिबिंब आहे. बिंबप्रतिबिंबांत वैलक्षण्य नाहीं, ह्मणून तें बिंबाप्रमाणेंच अविनाशी आहे. तसें देहाचें नाहीं. चित्स्वरूप बिंब देहाचें कारण असून, तो देह विलक्षणत्वें त्याचें कार्य आहे, व जड आहे, ह्मणून तो नाशवंत आहे. ज्या वस्तूनें सर्व जड जग व्यापिलें आहे ती अविनाशी आहे, कारण तिचें कार्य जड जग नित्यत्व सहन करीत नाहीं. सोनें स्वतः न नासणारें आहे, परंतु ज्या नगास त्यानें व्यापिलें असतें, तो त्याचें कार्य ह्मणून नाशवंत आहे. एवंच, कार्य जड नश्वर व कारण अविनाशी हें सिद्ध झालें; व ज्या अर्थी जीव चिदंश आहे, व धर्मेंकरून बिंबाशीं विलक्षण नाहीं, त्या अर्थी तोही अविनाशी आहे. देह सताचें कार्य असून धर्मानें विलक्षण आहे, ह्मणून तो नाशवंत आहे, हें पुढील श्लोकांत सांगितलें आहे.

**अंतवंत इमे देहा नित्यस्योक्ताः शरीरिणः ।**
**अनाशिनोऽप्रमेयस्य तस्माद्युध्यस्व भारत ॥ १८ ॥**

**अर्थ.**-हे देह अंतवंत ह्मणजे नाशवंत आहेत. परंतु ते धारण

करणारा देही नित्य, अविनाशी व प्रमाणांनीं ज्यास ओळखतां येत नाहीं असा आहे, ह्मणून, हे भारता, तूं युद्ध कर.

**टीका.**—या देहीचा ( जीवाचा ) भाव अविनाशी आहे. कारण, अप्रमेय असा जो आत्मा त्याचें हा प्रतिबिंब आहे. देह मारिला तर मरेल, परंतु जीव मरेल हा मोह व्यर्थ आहे. ह्मणून युद्ध कर, असें भगवान् अर्जुनास सांगतात.

कर्ममीमांसा आणि तर्कशास्त्र असें सांगतात कीं, आत्मा कर्ता आहे, तेव्हां आत्मा मारतो असें दिसतें. त्याचप्रमाणें बृहस्पति देहास आत्मा समजून, तो मरतो असें ह्मणतो. शास्त्रें याप्रमाणें सांगत असून श्रीकृष्ण निराळें मत सांगतात, ह्मणून अर्जुनाचें मन शंकित झालें. हें जाणून भगवान् पुढील श्लोक बोलतात.

**य एनं वेत्ति हंतारं यश्चैनं मन्यते हतम् ।**
**उभौ तौ न विजानीतो नायं हंति न हन्यते ॥ १९ ॥**

**अर्थ.**—जो या आत्म्यास मारणारा समजतो, व जो हा आत्मा मरतो असें समजतो ते दोघेही नेणते होत. आत्मा मारीत नाहीं व मरतही नाहीं.

**टीका.**—मीमांसक व देहात्मवादी लोकांचे मतांचें खंडन एथें केलें आहे. देहास आत्मा समजणारे लोक, आत्मा मारतो व मरतो, असें ह्मणतात. या लोकांस वेद प्रमाणभूत नाहींत. वेद प्रमाण धरणारे भेदवादी देखील जीवास कर्तृत्व मानतात. या ठिकाणीं इतकें सांगितलें पाहिजे कीं, आत्मा शब्द जीवास, त्याचप्रमाणें ज्याचें तो प्रतिबिंब आहे असा जो ईश्वर त्यासही लावतात. ईश्वरास शिवात्मा ह्मणतात, व जीवास जीवात्मा ह्मणतात.

आतां, आत्मा ( जीव ) यास मरणार समजणारे भेदवादी व

आत्मा देह समजून तो मरणार ह्मणणारे चार्वाकमतानुयायी, या दोहींच्या मतांचें खंडन भगवान् करितात.

कर्ममीमांसाशास्त्र व्यासशिष्य जैमिनि यानें केलें, व तर्कशास्त्र गौतम मुनीनें केलें. हे दोघेही ब्रह्मानुभवी अद्वैतमताचे होते. व्यास पूर्ण अद्वैती होते. कारण वेदांतशास्त्राचे उत्पादकच ते होत. त्यांचा शिष्य जैमिनि यास तीच विद्या गुरूपासून मिळाली. असें असून तो विरुद्ध मत स्थापन करितो, याचें कारण असें आहे कीं, अद्वैत बिंबण्याकरितां चित्त शुद्ध झालेला असा अधिकारी पाहिजे. निष्काम कर्म केल्याशिवाय चित्तशुद्धि होत नाहीं. असे अधिकारी फारच विरळा असणार; मनांत काम्य बळकट धरणारे असेच पुष्कळ. काम्य कर्म तर सुटतच नाहीं व निष्काम होत नाहीं, अशांस अद्वैत उपदेश केल्यानें, ते दोन्ही बाजूंनीं नागवले जातील असें जाणून स्वतः वेदव्यासांनींच आपला शिष्य जैमिनि यास काम्यकर्माचें मंडन करून आपला वेदांतपक्ष बेशक निंदावा अशी आज्ञा दिल्यावरून जैमिनीनें मीमांसाशास्त्र उत्पन्न केलें. अर्थात् काम्य कर्मास अहंकार पाहिजेच, ह्मणून त्यानें अहंप्रत्ययाचे ठिकाणींच आत्मत्व स्थापन केलें. गौतमाचेंही याचप्रमाणें मत आहे. अहंप्रत्ययानें ह्मणजे मी ह्मणतां जर आत्मा सांपडतो, तर तूं ह्मणतां कां सांपडूं नये? मीपणाचें स्फुरण आत्मा आहे, तर तूंपणाचें स्फुरण आत्मा कां असूं नये? स्फुरणांत एकत्व नाहीं, अनेकत्व सिद्ध होतें. सबब तें आत्मा नव्हे हें उघड आहे. कारण आत्मा अद्वय आहे. अहंकार तीन प्रकारचे आहेतः सात्विक, राजस, आणि तामस. देहाभिमान तामस अहंकार, इंद्रियें मी असें मानणें राजस अहंकार, दोन्हीही मी नव्हें असें समजणें सात्विक अहंकार होय. या तिन्ही अहंकारांचे पलीकडे आत्मा आहे व तो अर्थात् अकर्ता आहे. असें जाणणारा मनुष्य विरळा सांपडतो.

चार्वाक ह्मणतो कीं, देहच आत्मा आहे, व तो मरतो. त्याचप्रमाणें दिसतें तेवढें खरें, बाकी सर्व झूट. असेंच बृहस्पतिही बोलतो.

पण शापामुळें त्याची बुद्धि नष्ट होऊन हा विपर्यास त्यास झाला. पंच-भूतांचा मेळाच आत्मा होय असें हे लोक स्थापित करितात. दगड आपल्यास जाणत नाहीं, परंतु देहास आपण जाणतों. तेव्हां असें जाणणारा कोण ह्मणून त्यांस विचारतां, ते असें ह्मणतात कीं, काथ, चुना, पान, व सुपारी हीं एकत्र चाविलीं असतां तांबडा रंग उत्पन्न होतो, त्याचप्रमाणें शुक्र शोणित एकत्र झालीं असतां देह उत्पन्न होतो व त्यांत जाणीव कळा अद्भुत उत्पन्न होते. तें अहंस्फुरण नाहींसें झालें ह्मणजे देहास मरण येतें. ह्मणून ते ह्मणतात कीं, " **यावज्जीवं सुखं जीवेदृणं कृत्वा घृतं पिबेत् । भस्मीभूतस्य देहस्य पुनरागमनं कुतः ॥** "

या श्लोकावरूनच हें त्यांचें मत किती शहाणपणाचें आहे, हें उघड दिसेल. तथापि एवढ्यानेंच या मताचे लोक स्तब्ध बसणार नाहींत, ह्मणून त्याचें थोडक्यांत खंडन केलें पाहिजे.

छांदोग्य उपनिषदांत हाच पूर्व पक्ष घेऊन त्याचें खंडन केलें आहे. जेव्हां या जगाची उत्पत्ति झाली नव्हती त्या वेळेस एकच सद्व-स्तुच होती, द्रष्टा मुळींच नव्हता. स्फुरणानें द्रष्टुत्व उत्पन्न होतें. हें चिद्व-स्तुस्फुरण जडाचें कारण होय. असा सिद्धांत बोलून वरील पूर्वपक्ष खंडन केला आहे. पूर्व पक्ष असा कीं, हीं पंच भूतें केवळ जडस्वरूप आहेत व ही जड सृष्टिच अनादि आहे. जडापासूनच जड उत्पन्न होतें व त्यापासूनच जाणीव कळा (चैतन्य) उत्पन्न होते. या मताप्रमाणें प्रथम सर्व जड होतें, चैतन्य मागाहून झालें. तें कितपत साधतें हें पाहूं. चैतन्य जडापासून उत्पन्न झालें तेव्हां जड कारण व चैतन्य कार्य झालें. परंतु प्रत्यक्ष अनुभवांत असें दिसतें कीं, चैतन्य जडास वर्तावितें. यावरून कार्य कारणास वर्ता-वितें असें होतें. यापेक्षां अज्ञान तें कोणतें!! अळंकाराचें कारण सोनें आहे, तेव्हां या न्यायानें अलंकाराचे आधीन सोनें आहे असें होतें. हें प्रत्यक्षास विरुद्ध आहे. वास्तविक चैतन्याच्या आधीन देह व सुवर्णा-च्या आधीन अळंकार आहे. कारणें दोन प्रकारचीं आहेतः एक उपा-

दान व दुसरें निमित्त. सोनें उपादान व सोनार निमित्त कारण. उपादान कारण सोनें अलंकार सोडून राहूं शकत नाहीं. परंतु निमित्त कारण सोनार त्यास सोडून राहूं शकतो. असें निमित्त कारण देह आणि चैतन्य यांत नाहीं. देह उपादान कारण व चैतन्य कार्य आहे असें होतें. कारणामुळेंच कार्य दिसतें व राहूं शकतें. सोन्यामुळें अलंकार दिसतो. तसें देहामुळें चैतन्य दिसतें किंवा राहूं शकतें काय? नाहीं. तेव्हां हें मत आपल्या आपणच घसरून पडतें.

या मताचें खंडन करून खरें स्वमत आतां भगवान् सांगतात.

**न जायते म्रियते वा कदाचिन्नायं भूत्वा भविता वा न भूयः।**
**अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो न हन्यते हन्यमाने शरीरे॥२०॥**

**अर्थ.**—आत्मा उत्पन्न होत नाहीं. मरेल हेंही कधीं घडत नाहीं. हा मागें जन्मला होता किंवा पुढें जन्मेल असेंही नाहीं. हा जन्मरहित, नित्य, शाश्वत, पुराण पुरुष आहे. मरणास पात्र अशा शरिरांत हा राहिला तरी तो मारला जात नाहीं.

**टीका.**—देह उत्पन्न होतो व नाशही पावतो, परंतु त्यांत असणारा आत्मा उपजत नाहीं व नाशही पावत नाहीं. राजा शिबिकेंत बसून देवदर्शनास चालला आहे असें ह्मणतात. परंतु वास्तविक तो सुखानें बसलेला असतो, चालत नाहीं. परंतु चालण्याचे गतीशिवाय दर्शनास जाणेंही होत नाहीं. ह्मणून तो जसा न चालून चालतो, त्याप्रमाणें आत्मा होऊनही होत नाहीं. एक देह टाकून दुसरे अनेक देह तो धारण करितो. तो कायमचाच आहे. देहाबरोबर तो जन्मतो आणि मरतो हा मोह आहे. ज्या वस्तूला वृद्धि आहे तीस क्षय आहे. आत्म्यास देहासारखी वृद्धि नाहीं, ह्मणून त्यास क्षय नाहीं. हा आत्मा सूक्ष्मांहून सूक्ष्म व स्थूलांहून स्थूल आहे. जेवढा देह तेवढा तो व्यापून असतो. देहाच्या सर्व भागांत होणारें सुखदुःख हा भोगतो. देहाप्रमाणें तो

लहान मोठा होतो, तेव्हां त्यास वृद्धि आहे, मग त्यास शाश्वत कसें ह्मणावें, अशी शंका येते. तिचें निरसन "पुराणः" या शद्बानें केलें आहे. भोक्ता अंशरूपानें आत्म्याचें प्रतिबिंब आहे. आत्मा बिंब, पुराण आहे, तेव्हां आत्मा प्रतिबिंबही पुराणच आहे. उपाधिजळांत बिंब, प्रतिबिंब रूपानें दिसतें. ती उपाधि नाहींशी झाली ह्मणजे प्रतिबिंब बिंबांत मिसळून जातें. ज्या प्रमाणानें उपाधीचा अवकाश लहान मोठा असतो, त्याच प्रमाणानें प्रतिबिंब लहान मोठें होतें. यावरून हे लहान-मोठेपणाचे धर्म उपाधीच्या मागें आहेत. आत्माबिंब अनंत आहे, ह्मणून आत्मा जीव शाश्वत आहे, असें सिद्ध होतें.

आत्मा नित्य आहे, हें तत्व अर्जुन समजला. परंतु त्याचें अकर्तृत्व त्याचे लक्षांत बरोबर आलें नाहीं. आत्म्यास देह व इंद्रियें नाहींत. परंतु मारीन अशी इच्छा तो करितो, तेव्हां कर्तृत्व त्याजकडे आल्यासारखें दिसतें. संकल्पादिक करणारें मन शुद्ध आत्मा आहे असा अर्जुनाचे मतांत भ्रम उत्पन्न झाला. देह व इंद्रियें यांचा चालक तो आहे, तेव्हां त्याजकडे कर्तृत्व येऊं पाहतें. या भ्रमाचें निरसन भगवान् आतां करितात.

**वेदाविनाशिनं नित्यं य एनमजमव्ययम् ।**
**कथं स पुरुषः पार्थ कं घातयति हंति कम् ॥ २१ ॥**

**अर्थ.**–पार्था, हा अविनाशी, नित्य, अनादि, अव्यय ह्मणजे विकाररहित असा आहे, असें जो पुरुष जाणतो, तो कसा कोणाचा घात करवील अथवा करील ?

**टीका.**–अनुभवानें आत्मा कळेपर्यंत त्याचें अकर्तृत्व कसें कळेल? शब्दानें आतांपर्यंत सांगितलेलें ऐकिलें, परंतु तो अविनाशी, नित्य, अनादि व अव्यय आहे, असें अनुभवानें समजेपर्यंत त्याचे अकर्तृत्वाचा निश्चय होणार नाहीं. ज्या ठिकाणीं मारणें, मारविणें नाहींच, तेथें कोण मारतो व कोण मारवितो ? मारीन, मारवीन, हा

मीपणाचा धर्म मनाचा आहे. त्यासच शुद्ध आत्मा समजल्यानें अशी भ्रांति होते. असे मनाचे धर्म जागृतींत व स्वप्नांत दिसतात, परंतु गाढ सुषुप्तींत हें मन कोठें असतें ? सुषुप्तींत आपण निराळे उरतोंच. कारण जागें झाल्यावर, 'मला झोंप चांगली लागली होती' असा अनुभव आपण सांगतों. हा सुषुप्तींत उरलेला निर्विशेष आत्मा जागृतींत जाणला, ह्मणजे आत्म्याचे अकर्तृत्वाबद्दल संशयच राहणार नाहीं. हें सद्गुरुकृपेवांचून समजणें नाहीं. हा आत्मा एक देह टाकून नवा देह घेतो, हें पुढील श्लोकानें सांगितलें आहे.

**वासांसि जीर्णानियथा विहाय नवानि गृण्हाति नरोऽपराणि ।**
**तथा शरीराणि विहाय जीर्णा न्यन्यानि संयाति नवानि देही २२**

**अर्थ.**—जुनीं वस्त्रें टाकून नवीं वस्त्रें जसा कोणी मनुष्य घेतो तसा हा देही जुना देह टाकून नवा देह धारण करितो.

**टीका.**-आत्मा अज, अव्यय व अविनाशी आहे असें सांगितलें. यास विलक्षणत्वें जड देह आहे. देहास क्षीणत्व, रोडपणा, नाश हे आहेत. आत्मा स्वलक्षणांहून विलक्षण असा देह धरितो. देह ह्मातारा झाला ह्मणजेच मरतो असें नाहीं. तारुण्यांत व बालपणांतही तो मरतो, तेव्हां त्या अवस्थेंतही तो जीर्ण होतो हें उघड आहे. ज्वारीचे धाटास कणीस येऊन दाणा भरल्यानंतर तें वाळून जातें. परंतु लहान असतां-नाच मुळाशीं उंदीर लागला, तर तें आधींच वाळून जातें. ह्मणून काळ येईल तेव्हांच शरीर जीर्ण झालें असें समजलें पाहिजे. विवेकी मनुष्य याचा शोक करीत नाहींत.

वस्त्राची उपमा दिल्यानें अर्जुनास शंका आली कीं अंगावरील वस्त्रास शस्त्र मारिलें तर शरिरास घाव लागेल. त्याचप्रमाणें त्यास विस्तव लाविला तर शरीर भाजेल. तसें, ज्यानें देह धारण केला आहे,

त्या आत्म्यास, देहास जाळलें पोळलें तर, त्रास झाला पाहिजे. परंतु तसें होत नाहीं, असें भगवान् सांगतात.

**नैनं छिंदंति शस्त्राणि नैनं दहति पावकः ।**
**न चैनं क्लेदयंत्यापो न शोषयति मारुतः ॥ २३ ॥**

**अर्थ.**—आत्म्यास, शस्त्र तोडूं शकत नाहीं आणि अग्नि जाळूं शकत नाहीं. पाणी भिजवूं शकत नाहीं व वारा वाळवूं शकत नाहीं.

**टीका.**—यापुढें भगवान् सांगतील कीं शुद्ध आत्मा कळल्याशिवाय मनाचे क्लेश नाहींसे होणार नाहींत.

**अच्छेद्योऽयमदाह्योऽयमक्लेद्योऽशोष्य एव च ।**
**नित्यः सर्वगतः स्थाणुरचलोऽयं सनातनः ॥ २४ ॥**

**अर्थ.**—हा आत्मा छेदावयास, जाळावयास, भिजवावयास, अथवा शोषावयास पात्र नाहीं. हा नित्य, सर्वव्यापी, स्थिर स्वभावाचा, अचल आणि अनादि कालापासून नेहमीं असणारा आहे.

**टीका.**—हिरा, मोतीं, माणीक हीं सर्व रत्नेंच आहेत. परंतु हिऱ्याचे अंगीं जें अभंगत्व आहे, तें इतर रत्नांचे अंगीं आहे काय? देह अनित्य आहे, त्याप्रमाणें आत्मा मानणें कसें शोभेल? आत्मा नित्य आहे, त्याला नाश नाहीं. कारण तो आकाशाप्रमाणें सर्वगत आहे. वस्त्राचा नाश केला असतां देहाचा नाश होईल, परंतु त्यांतील सर्वगत आकाश कसें नष्ट होईल? असें जें आकाश त्यास व्यापून असणारा निराभास असा आत्मा नासेल अशी कल्पना करणें केवळ वेडेपणाचें होईल. आतां, झाडाच्या वरचा भाग कापून टाकून खालचा जो सोट राहतो, त्यास स्थाणु म्हणतात. तो दृष्टिभ्रमानें पुरुषासारिखा दिसतो. परंतु वास्तविक तो स्थाणुच असतो. त्याचप्रमाणें जगाचा आकार दिसतो हा भ्रांतीचा खेळ आहे. खरा स्थाणु आत्माच सर्व होऊन राहिला आहे. व

तो अचल आहे ह्मणून पाषाणादिकांसारिखें त्यास नश्वरत्व असेल तर तसें नाहीं. तो सनातन आहे. आणखी तो कसा आहे हें पुढील श्लोकानें सांगितलें आहे.

**अव्यक्तोऽयमचिंत्योऽयमविकार्योऽयमुच्यते ।**
**तस्मादेवं विदित्वैनं नानुशोचितुमर्हसि ॥ २५ ॥**

**अर्थ.**—हा अमूर्त व अचिंत्य ह्मणजे मनानें न जाणतां येण्याजोगा आहे व विकाररहित आहे, असें यास ह्मणतात. ह्मणून याप्रमाणें याला जाणून शोक न करणें हें तुला उचित होय.

**टीका.**—ज्या वस्तूस मूर्ति अथवा वर्ण असेल तिला नाश आहे असें ह्मणतां येईल. पण आत्मा अव्यक्त आहे, ह्मणून त्यास नाश नाहीं. याचें चिंतनही होऊं शकत नाहीं. ज्याच्या सत्तेनें मन सचतेन होतें त्यास तें कसें जाणूं शकेल ? पहा, ज्या नेत्रांमुळें उपनेत्राचे अंगीं पाहण्याची शक्ति येते, तें उपनेत्र डोळयास पाहूं शकेल काय ? दोर दृष्टीचे भ्रमानें सर्पाकृति दिसतो. तो भ्रम दोरास पाहूं शकत नाहीं. दोरास दृष्टि स्पर्शून असतेच. फक्त सर्पाची भ्रांति मात्र जाते, व दोर दोरपणें दिसूं लागतो. त्याप्रमाणें आत्म्याची ज्ञानशक्ति त्यास धरून असतेच पण भ्रम असेपर्यंत त्याचें ज्ञान होत नाहीं. भ्रम गेला ह्मणजे तो आपोआप दिसतो. आत्म्याचें चिंतन करितां करितां मनच तद्रूप होऊन जातें. ती स्थिति अनुभवली जाईल परंतु चिंतली जाणार नाहीं. मन वस्तूच्या आकाराची कल्पना करितें, मग तो आकार समोर असो अगर नसो. ज्या सत्तेनें तें कल्पना करूं शकतें तिचें चिंतन त्यास कसें करवेल? नाहीं. ह्मणून तो अविकार्य आहे ह्मणजे तो कारण आहे, त्यास कार्य बनवितां येणार नाहीं. तस्मात् संतांस शरण जाऊन त्यांजपासून तो आत्मा जाणावा ह्मणजे शोकाचा नाश होतो. या उपदेशानें आत्मा अविनाशीसा कळला, परंतु अविद्येमुळें पुन्हां अर्जुनाचें मन खवळलें आणि

त्यास वाटलें कीं, देह उपजतो व मरतो त्याबरोबर आत्मा कां उपजूं व मरूं नये ? या विपर्यासाचा निरास देव पुन्हां दुसरे तऱ्हेनें करितात.

**अथ चैनं नित्यजातं नित्यं वा मन्यसे मृतम् ।**
**तथापि त्वं महाबाहो नैनं शोचितुमर्हसि ॥ २६ ॥**

**अर्थ व टीका.**—हा देहधारी पुन्हां जन्मत नाहीं व मरत नाहीं असें आतांपर्यंत सांगितलें. असें असून तो जन्मतो व मरतो, अशी भ्रांति पुन्हां तुला पडली तेव्हां असेंच खरें आहे, असें मानिलें तरी त्याजविषयीं शोक करणें रास्त नाहीं. कारण,

**जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च ।**
**तस्मादपरिहार्येऽर्थे न त्वं शोचितुमर्हसि ॥ २७ ॥**

**अर्थ.**—जो जन्मला त्यास मृत्यु निश्चित आहे, आणि जो मेला त्याला जन्म निश्चित आहे; आणि हें टाळतां येत नाहीं. ह्मणून याविषयीं शोक करणें तुला उचित नाहीं.

**टीका.**—जन्मानंतर मृत्यु व मृत्यू नंतर जन्म हे येणारच. हे टाळण्यास एक आत्मा जाणण्याशिवाय दुसरा उपाय नाहीं. आत्मा जाणला ह्मणजे हे जन्ममृत्यु मिथ्याभास आहेत, असें समजेल, व त्यापासून तूं मुक्त होशील. नाहींपेक्षां वारंवार गर्भवास व मरण यांच्या चक्रांत भ्रमण करशील. याकरितां मी सांगतों याचा चांगला विचार कर, असें भगवंतांनीं अर्जुनास सांगितलें.

तथापि अर्जुनास वाटलें कीं, जन्ममृत्यु यांचा परिहार नसला तरी जबरदस्तीनें बळवंत आपली वस्तु हिसकावून नेतो त्यास अडवितां येत नाहीं ह्मणून त्याबद्दल देहास त्रास उपजेलच. या शंकेच्या निरसनार्थ भगवान् ह्मणतात कीं,

अव्यक्तादीनि भूतानि व्यक्तमध्यानि भारत ।
अव्यक्तनिधनान्येव तत्र का परिदेवना ॥ २८ ॥

**अर्थ.**–हे भारता, हीं भूतें अव्यक्त तत्वापासून उत्पन्न होतात. मधल्या काळांत व्यक्त दिसतात, व पुन्हां त्याच अव्यक्त तत्वांत तीं मिळून जातात, त्यांचा शोक कां करावा?

**टीका.**–अहो, हीं सर्व भूतें पंचतत्वांपासून उत्पन्न होतात. पंचतत्वें ( पृथ्वी, आप्, तेज, वायु व आकाश ) अहंकारापासून उत्पन्न झालीं. अहंकार महत् तत्वापासून, व महत् तत्व अव्यक्त तत्वापासून ह्मणजे मुळ प्रकृतीपासून उत्पन्न झालें. मूळ प्रकृति हें अनादि कारण व हीं त्याचीं कार्यें होत. प्रथम हीं कार्यें कारणापासून उत्पन्न होतात, कांहीं काळपर्यंत राहतात, व पुन्हां कारणांत मिसळून जातात. अव्यक्त तत्वरूपी जळास काळवायूचा स्पर्श झाल्यानें, भूतरूपी तरंग उठतात, व ते पुन्हां जळांत मिळतात. यांचा शोक कां करावा? देहाचें मरण कसें होतें हें आतां सांगतों. मरणास पंचत्व ह्मणतात. ज्या पंचतत्वांचा जड देह बनतो, तीं देह नासल्यावर आपआपल्या तत्वसमूहांत जाऊन मिळतात. परंतु देहांतील मन, बुद्धि, इंद्रियें व त्यांचे विषय ( शब्द, स्पर्श रूप, रस व गंध ) हे मात्र नासत नाहींत, परंतु आत्मा त्यांस दुसरे देहांत घेऊन जातो. ज्याचें धन तो घेऊन गेला तर आपण शोक कां करावा? हा देह पंचभूतांचा आहे. त्यांचा देह ते घेऊन गेले तर इतरांस कां दुःख व्हावें बरें? परधन आपलेंसें जो अविचारी मनुष्य मानितो, त्यासच तें गेल्यानें दुःख होतें. वास्तविक आपलें धन आत्मा आपले जवळच असून, त्यास आपण जाणूं नये व परक्याचें धन आपलें समजावें याखारखा दुसरा वेडेपणा कोणता? हें आपलें धन कसें आहे ह्मणाल तर तोडिल्यानें तें तुटत नाहीं, फोडिल्यानें तें फुटत नाहीं, कोणास आपलेजवळून तें नेतां येत नाहीं. असें निजधन जो पहील, तो राहा-

ण्यांतला शाहणा होय. आतां, आत्मा किती आश्चर्यकारक आहे, हें भगवान् सांगतात.

आश्चर्यवत्पश्यति कश्चिदेनमाश्चर्यवद्वदति तथैव चान्यः ।
आश्चर्यवच्चैनमन्यः शृणोति श्रुत्वाप्येनं वेद न चैव कश्चित् ॥२९॥

**अर्थ.**–या आत्म्यास कोणी आश्चर्यानें पाहतो, दुसरा आश्चर्यानें याच आत्म्याविषयीं बोलतो, आणखी तिसरा आश्चर्यानें तो ऐकतो. व कोणी ऐकूनही त्यास जाणत नाहीं.

**टीका.**–आपलाच जो आत्मा यास पाहिलें असतां आश्चर्य कां वाटावें? ज्या विदेही आत्म्याचा स्नेह अनादि आहे त्यास देहच समजून राहणें हें आश्चर्य नव्हे काय? कोणी, देहच मी आत्मा आहें असें मीपण धरून मानतो, तोच आत्मा ज्ञानी पुरुष सर्वत्र पहातो, हें आश्चर्य नव्हे काय? सर्व भूतांत तोच असून नसल्याप्रमाणें दाखवितो, हें आश्चर्य नव्हे काय ? अशा अनेक प्रकारांनीं याविषयीं विचार केला असतां आश्चर्य वाटल्याशिवाय राहत नाहीं. जें चित्त त्यास पाहतें, तेंच तन्मय व जगन्मय होऊन राहतें. त्या चित्तास त्याचें आश्चर्य वाटतें यांत आश्चर्य तें कोणतें ? हें सर्व आश्चर्यही तोच आहे. कारण जें आहे तें नवें कांहीं नसून अनादि असेंच चालत आलें आहे. असें असून आश्चर्यच भासतें, हें काय आश्चर्य? गुरु आत्म्यास पाहतो तोही आश्चर्य करितो. शिष्य गुरूस ह्मणतो, "गुरूजी, मी आत्मा जाणत नाहीं." असें जाणूनही नेणतेपण दाखवितो, हें आश्चर्यच. तेंच श्रीगुरु त्यास सांगूं लागला तेव्हां आश्चर्य वाटण्यास कारण नसूनही तो आश्चर्य मानतो. याप्रमाणें जो आत्मा पाहतो व जो दाखवितो या दोघांचेंही आश्चर्य श्लोकाचे पहिल्या दोन चरणांत वर्णिलें आहे; तिसऱ्या चरणांत जिज्ञासूची स्थिति दाखविली आहे. गुरुमुखानें जों जों शिष्य आत्म्याविषयीं विवेचन ऐकतो, तों तों त्यास आश्चर्यच वाटत जातें. असें करीत करीत अनुभवजन्य आनंद त्यास

झाला ह्मणजे त्यास पुन्हां आश्चर्य वाटतें. आतां चवथे चरणांत अनादि अविद्येची निःसीम करणी दाखवितात कीं, गुरूस शरण जाऊन आत्मा समजला तरी हें सर्व भारूड आश्चर्यमय असल्यामुळें त्या ठिकाणीं अश्रद्धा उत्पन्न होऊन देहात्मभाव बळावतो व ऐकिलेल्या ज्ञानाचा कांहीं उपयोग न होतां, तो मनुष्य पूर्ववत् होतो हा दोष उपदेशकाचा नाहीं. शिष्य करंटा पडला, त्यास गुरूनें काय करावें ? चंद्रोदय झाला ह्मणजे सर्व मनुष्यांस आनंद होतो. परंतु चोरास खेद उत्पन्न होतो. तसेंच आत्मज्ञान ऐकूनही कित्येकांस उपरति होत नाहीं. याप्रमाणें एक आश्चर्यवत् पाहतो, एक ऐकतो व एक बोलतो हे तिघेही भाग्यवान् होत. आपलें धन आपण पाहून आनंदित राहणारे ज्ञानी कधीं शोकाधीन होत नाहींत. याकरितां, 'तूं विचार करून आपला आत्मा जाण ह्मणजे परक्याचें धन, देह, गेल्याचा शोक तुला होणार नाहीं', असें भगवान् अर्जुनास सांगतात. पुढील श्लोकांतही हाच उपदेश चालविला आहे.

**देही नित्यमवध्योऽयं देहे सर्वस्य भारत ।**
**तस्मात्सर्वाणि भूतानि न त्वं शोचितुमर्हसि ॥ ३० ॥**

अर्थ.—हे भारता, सर्व देहांत असणारा हा देही (आत्मा) वध करण्याजोगा नाहीं. ह्मणून कोणत्याही प्राण्यासंबंधानें शोक करणें तुला उचित नाहीं.

**स्वधर्ममपि चावेक्ष्य न विकम्पितुमर्हसि ।**
**धर्म्याद्धि युद्धाच्छ्रेयोऽन्यत्क्षत्रियस्य न विद्यते ॥ ३१ ॥**

अर्थ.—स्वधर्माकडे लक्ष देऊन तूं भित्रेपणा टाकून दिला पाहिजे. कारण स्वधर्मानें सांगितलेल्या युद्धाहून क्षत्रियाला दुसरें कोणतेंही कर्म श्रेयस्कर नाहीं.

**यदृच्छया चोपपन्नं स्वर्गद्वारमपावृतम् ।**
**सुखिनः क्षत्रियाः पार्थ लभंते युद्धमीदृशम् ॥ ३२ ॥**

अर्थ.—हे पार्था, हें युद्ध कसें आहे ह्मणशील तर न मागतां स्वर्गाचें द्वार उघडून देणारें आहे. हें ज्या क्षत्रियांना मिळतें, ते भाग्यवंत होत.

अथ चेत्त्वमिमं धर्म्यं संग्रामं न करिष्यसि ।
ततः स्वधर्मं कीर्तिं च हित्वा पापमवाप्स्यसि ॥ ३३ ॥
अकीर्तिं चापि भूतानि कथयिष्यंति तेऽव्ययाम् ।
संभावितस्य चाकीर्तिर्मरणादतिरिच्यते ॥ ३४ ॥
भयाद्रणादुपरतं मंस्यंते त्वां महारथाः ।
येषां च त्वं बहुमतो भूत्वा यास्यसि लाघवम् ॥ ३५ ॥
अवाच्यवादांश्च बहून् वदिष्यंति तवाहिताः ।
निंदंतस्तव सामर्थ्यं ततो दुःखतरं नु किम् ॥ ३६ ॥

अर्थ.—धर्मास अनुकूळ असें युद्ध तूं न करशील तर स्वधर्म आणि कीर्ति घालवून उलटें पाप जोडून घेशील. सर्व लोक निरंतर तुझी अकीर्ति वर्णन करतील. संभावित मनुष्याला अपकीर्ति मरणाहून जास्त दुःखकर होते. महारथी योद्धे तुला मान देत आहेत. तेच ह्मणतील कीं, भयामुळें हा रणांतून पळून गेला. आणि इतके दिवस बहुमान पावून आतां लघुत्व पावशील. तुझे हितशत्रु बोलूं नये तें तुजविषयीं बोलतील आणि तुझ्या सामर्थ्याची निंदा करतील. याहून दुःखतर आणखी काय आहे?

हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम् ।
तस्मादुत्तिष्ठ कौंतेय युद्धाय कृतनिश्चयः ॥ ३७ ॥

अर्थ.—युद्धांत मेलास तर स्वर्गास जाशील. यश मिळाल्यास पृथ्वीचा उपभोग घेशील. करितां, हे कौंतेया, युद्धाचा निश्चय करून ऊठ.

टीका.—कौंतेय असें अर्जुनास संबोधन देण्यांत गूढ भाव आहे. तो असा कीं, " तूं कुंतीची कन्या असतास तर तुला आह्मी युद्ध करण्यास आग्रह न करितों. तूं तिचा पुत्र आहेस ह्मणून स्त्रियांस उचित जें दौर्बल्य तें टाकून युद्धास ऊठ, " असें भगवान् ह्मणतात. या उपदेशानें अर्जुनाचा भ्रम गेला व युद्ध करणें स्वधर्म आहे, अशीही त्याची समजूत झाली. परंतु स्वर्गास जाऊनही पुन्हां जन्म आहे व एथें पृथ्वीचा उपभोग घेतल्यांतही तो आहेच, तेव्हां बंधक असें जें कर्म त्यापासून सोडविणारें ब्रह्मज्ञान प्राप्त व्हावें अशी अर्जुनास इच्छा झाली. ती सर्वसाक्षी भगवानांनीं जाणून तें ज्ञान सांगण्यास ते आरंभ करितात.

**सुखदुःखे समे कृत्वा लाभालाभौ जयाजयौ ।**
**ततो युद्धाय युज्यस्व नैवं पापमवाप्स्यसि ॥ ३८ ॥**

**अर्थ.**—सुख आणि दुःख, लाभ आणि हानि, व जय आणि अपजय हे समान समजून युद्ध कर ह्मणजे पापातें पावणार नाहींस.

**टीका.**—स्वधर्मास अनुसरून कर्म केलें तरी तें बंध ह्मणजे पाप जोडणारच. या सर्व पापास कारणीभूत कामना होय. निष्काम कर्म केलें असतां तें बंधमूळ होत नाहीं. मला सुखच होवो, दुःख कधीं न होवो, असें वाटणें हेंच कामनेचें स्वरूप होय. याकरितां जयापजयाची इच्छा न ठेवितां, निरहंकारबुद्धीनें युद्ध कर असें भगवान् सांगतात. आणि याचीच परिस्फुटता यापुढें करितात.

**एषा तेऽभिहिता सांख्ये बुद्धिर्योगे त्विमां शृणु ।**
**बुद्ध्या युक्तो यया पार्थ कर्मबंधं प्रहास्यसि ॥ ३९ ॥**

**अर्थ.**—हे पार्था, एथपर्यंत तुला सांख्यरीतीचें ज्ञान सांगितलें. आतां कर्मयोगाची बुद्धि सांगतों. याप्रमाणें तूं वागशील, तर कर्मबंधापासून मुक्त होशील.

टीका.—असत् क्षेत्र (देह) व सत् क्षेत्रज्ञ (साक्षी) या दोहोंविषयीं विचार एथपर्यंत सांगितला. सत् क्षेत्रज्ञ शाश्वत आहे व असत् देह नाशवंत आहे हें ज्ञान मोक्ष देणारें आहे. परंतु या अनुभवाची प्राप्ति चित्तशुद्धि झाल्याखेरीज होत नाहीं; व ही चित्तशुद्धि, वेदविहित कर्म निष्कामत्वें केल्यानें होते. याचें दिग्दर्शन पूर्वीचे श्लोकीं केलें आहे, परंतु तेवढ्यानें व्हावा तसा बोध झालासा दिसला नाहीं, ह्मणून 'तुला कर्मयोग उपदेशितों' असा भाव दाखवून भगवान् त्यास आरंभ करितात.

नेहाभिक्रमनाशोऽस्ति प्रत्यवायो न विद्यते ।
स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात् ॥ ४० ॥

अर्थ.—या निष्काम योगाचे ठायीं आरंभलेल्या कर्माचा नाश नाहीं. याचप्रमाणें प्रत्यवायाचाही दोष याचे ठिकाणीं वास करीत नाहीं. इतकेंच नव्हे, तर या योगाचा स्वल्प जरी आरंभ केला, तरी मोठ्या भयापासून तो रक्षण करितो.

टीका.—हा कर्मयोगाचा मार्ग मोठा सुगम आहे. एखादें कर्म आरंभलें व त्यास विघ्न येऊन तें पूर्ण झालें नाहीं, तरी तें न नासतां फलप्रद होतें. तें असें कीं, ईश्वर तेणेंकरून संतुष्ट होऊन इच्छित फल ह्मणजे आपली प्राप्ति त्यास करून देतो. कारण कर्म करणारा ऐहिक व पारलौकिक फलासंबंधानें निरिच्छ असतो. अमुक एक परिणाम व्हावा ह्मणून जो कर्म करीत नाहीं, त्यास त्याचे शेवटास न गेल्याबद्दल दुःख कां होईल? पहा, कोणी मनुष्य रोजमुरा न घेतां काम करतो; त्यांत त्याच्या चुकाही झाल्या तरी त्या चुका कोणी धरील काय? नाहीं. त्याप्रमाणें निष्काम कर्म करितांना चुका झाल्या तरी त्यामुळें प्रत्यवाय नाहीं. हें निष्काम कर्म करणें इतकें महत्वाचें आहे कीं, मोठें जें संसारभय त्यापासून तें

कर्मकर्त्यास रक्षितें. याच निष्काम व सकाम कर्म करणाऱ्या दोन्ही पक्षांचे बुद्धीचें प्रसंगोपात्त भगवान् वर्णन करितात.

व्यवसायात्मिका बुद्धिरेकेह कुरुनंदन ।
बहुशाखा ह्यनंताश्च बुद्धयोऽव्यवसायिनाम् ॥ ४१ ॥

अर्थ.—हे कुरुनंदना, निश्चयात्मक बुद्धि एकच असते. अनिश्चयी मनुष्यांच्या बुद्धी अनेक असतात व त्यांस शेंकडो फांटे फुटतात.

टीका.—एक सर्वेश्वर आपल्यास तारील अशी निश्चयात्मक बुद्धि ज्याची असेल त्यालाच ह्या मार्गासारिखा सोपा मार्ग दुसरा कोणताही नाहीं. त्या सर्वेश्वरास एकनिष्ठ शरण राहून, त्याचेचकरितां कर्म आचरावें, या बुद्धीस एकबुद्धि ह्मणतात. अशी ज्यांची बुद्धि नाहीं, त्यांच्या बुद्धींचे अनंत आशय असतात. त्या आशयांस काममय अनेक फांटे फुटतात. एकएका मनोरथाकरितां नाना यत्न ते करितात. एक निश्चय ठेवित नाहींत. यामुळें असुक केल्यानें असुक होईल न होईल अशा विवंचनेंत ते नेहमीं राहतात. त्यांना सुख कोठून असणार ? नेहमीं तळमळ, हळहळ चाललीच असते.

हें ऐकून अर्जुनास वाटलें कीं, जे वेदपारंगत महाजन मार्ग सांगतात, त्या मार्गास भगवान् दूषण देतात हें कसें ? हें जाणून भगवान् बोलतात.

यामिमां पुष्पितां वाचं प्रवदंत्यविपश्चितः ।
वेदवादरताः पार्थ नान्यदस्तीति वादिनः ॥ ४२ ॥

अर्थ.—हे पार्था, अर्थवादीं रत असणारे अज्ञानी, स्वर्गादि फळावेगळें दुसरें कांहींच थोर नाहीं, अशी कानास गोड वाटणारी बडबड करितात.

टीका.-ह्या वेदवादींच रत असणाऱ्या लोकांचे भाव दिसण्यांत मोठे गूढ दिसतात, पण वस्तुतः ते फार उथळ आहेत. फुलास फळ ह्मणणारे ते वेडेपीर होत. त्यांचे मतें मोक्ष अशी वस्तुच नाहीं. ते मूर्ख ह्मणावे, तर वेदांचा अर्थही जाणतात. परंतु त्यांची विचारदृष्टि फारच कोती आहे.

कर्म हा एक वेल आहे, स्वर्ग त्याचें फूल, व मोक्ष त्याचें फळ होय. वेलास आधीं फूल येतें, मग फळ येतें व नंतर वेल वाळून जातो, असा क्रम जगजाहीर आहे. ज्ञान होणें ही मुक्ति होय. कारण मनुष्य जागा झाला ह्मणजे स्वप्नाची निवृत्ति होते. तरी ब्रह्मरूप होण्यास चित्तशुद्धि लागते. चित्तशुद्धि कर्मापासून होते व हळू हळू निष्काम कर्म केल्यानें मोक्षसिद्धि होते. ज्याला फळाची इच्छा असेल त्यानें वेलाचें फूल तोडूं नये; तोडल्यास फळ मिळत नाहीं. त्याप्रमाणें कर्मवेलास स्वर्गपुष्प येतें, तें न घेतां राहिलें तर पुढें येणारें मोक्षफळ हातीं लागून, कर्मवेल जळून जातो. फळाकरितां वेल लावावा ह्मणून बाप अज्ञान पुत्रांस सांगतो. परंतु ते फळ येईपर्यंत वाट न पाहतां, त्यांस फूल आवडून तेंच घेतात, कारण तें तूर्त खेळण्यास उपयोगी पडतें. बाप ह्मणतो, बरें, तसें कां होईना; वेल तर लावा, तुह्मांस समजूं लागलें ह्मणजे तुह्मी फूल न घेतां फळच घ्याल. मुलें वेल लावितात परंतु बापाचे शहाणपणाचा विचार ते जाणत नाहींत. वेद हा जगाचा पिता आहे. तो मोक्षार्थ कर्ममार्ग बोलतो. परंतु विषयभोग आवडणाऱ्यांस मोक्ष आवडत नाहीं. तथापि पाप करून नरकास जाण्यापेक्षां, पुण्यकर्म आचरून स्वर्ग भोगणें फार बरें. कामनेचीं फुलें तोडोत परंतु कर्म करोत, ह्मणून काम्य चांगलें, तें करा, अशी रुचिकर वाचा वेद बोलतात. यज्ञदानादिक वैदिक कर्मे करून चित्तशुद्धि झाल्यानंतर ब्रह्मप्राप्ति होते, अशी श्रुति आहे. ह्मणून भगवान् सांगतात कीं, मुख्य फळ मोक्षच आहे. ज्या ज्या ठिकाणीं वेदाची कामनिक वाणी दिसेल, त्या त्या ठिकाणीं ती

सुचित आहे असें समजावें. बाप मुलास त्याची मांदगी जावी ह्मणून ह्मणतो कीं, 'हा निंबाचा रस पी ह्मणजे लाडू देईन'. मुलगा समजतो कीं, लाडू मिळणें हेंच निंब पिण्याचें फळ आहे. परंतु शहाणा बाप आरोग्य-फळाकडे लक्ष ठेवून रस पाजीत असतो. या बापाचे बोलण्यास अर्थ-वाद ह्मणावें. याचप्रमाणें पुरुष मोक्षमार्गास लागावा ह्मणून वेद कर्म करण्यास सांगतात. निंब प्यालयावर मुलगा लाडूकरितां हात पसरतो, तसें हे अज्ञानी लोक कर्म करून स्वर्ग मागतात. श्रुति ह्मणते कीं, चातुर्मास्य यज्ञ करतील त्यांस अक्षय्य सुख होईल. या अक्षय्य शब्दाचा खरा अर्थ ते लोक समजत नाहींत. मनुष्य मर्त्य आहेत व देव अमर आहेत, असें वेद बोलतात. देवांस मनुष्यांपेक्षां जास्त आयुष्य आहे एवढेंच, बाकी देव देखील कल्पांतीं मरणारच. असा गूढभाव न जाणतां वरपंगी अर्थाकडे ते लक्ष देतात. वेदच दुसऱ्या ठिकाणीं ह्मणतात कीं, स्वर्ग वगैरे कर्मफळ नाशवंत आहे. या दोहोंची एकवाक्यता वरप्रमाणें न समजल्यामुळें, हे वेडे लोक फसतात. जसें कर्माचें फळ शाश्वत आहे असें एके ठिकाणीं ह्मटलें आहे व दुसरे ठिकाणीं तें नाशवंत आहे असें ह्मटलें आहे, त्याप्रमाणें मोक्ष नाशवंत आहे, असें वेदानें कोठेंच ह्मटलें नाहीं; ह्मणून देव अमर आहेत यांत जसे दोन अर्थ, एक वरपंगी व दुसरा गूढ, असे काढितां येतात, त्याप्रमाणें मोक्षासंबंधानें तर्क करण्यास जगाच नाहीं.

**कामात्मानः स्वर्गपरा जन्मकर्मफलप्रदाम् ।**
**क्रियाविशेषबहुलां भोगैश्वर्यगतिं प्रति ॥ ४३ ॥**

अर्थ.–हे वर सांगितलेले काम्य कर्म करणारे व स्वर्गप्राप्ति हेंच सर्वस्व मानणारे अज्ञानी लोक, ऐश्वर्यभोगाकडे सर्व लक्ष ठेवितात. आणि ज्या कर्मांचें फल पुनर्जन्म आहे अशीं निरानिराळीं कामनिक कर्में करावीं ह्मणून ते इतरांना फुगवून सांगतात.

टीका.-इहलोकीं मानवी स्त्रिया व परलोकीं देवांगना भोगूं, या कामनेच्या समुद्रांत त्यांचें मन बुडालेलें असतें. नाशवंत असा जो स्वर्ग, तोच सर्व पुरुषार्थ होय, असें त्यांस वाटतें. व तो प्राप्त करून घेण्याकरितां अनेक प्रकारचीं वेदोक्त कामानिक कर्में ते आचरतात. यामुळें अंतीं त्यांस दुःसह असा गर्भवास प्राप्त होतो. सामान्य मनुष्याचे गर्भवासाहून यांचा जास्त वाईट असतो. वासनानदीच्या जन्ममरणरूप प्रवाहांत, मनुष्य साधारणपणें पूर्वकर्मजनित कामनारूप वाऱ्यानें वाहतच असतो. परंतु हे लोक हा वारा अभ्यासानें जास्त जोराचा करितात. सामान्य मनुष्य या नदीच्या पैलतीरास जाण्याचा यत्न करूं लागल्यास तो कधीं तरी व कसा तरी जातो. पण जो कामनेचा वारा त्यांनींच अविचारानें जोराचा केलेला असतो, तो या लोकांस तसें करूं देत नाहीं. सामान्य लोकांस याच लोकांतील उपभोगांची इच्छा असते; परंतु यांस स्वर्गीय उपभोगांची इच्छा असते. हे स्वर्गांतील उपभोग इंद्रियांस जास्त सुख देणारे असल्यामुळें त्यांची चटक जर एकदां लागलेली असली, तर त्यांच्या कामनेचा वारा, यत्न केला तरी त्यांना प्रवाहांतून लवकर निघूं देत नाहीं. यावरून त्यांचें कर्म किती घातक आहे, हें स्पष्ट दिसून येतें. बरें, हें नश्वर परंतु अंतीं अतिशय क्लेशदायक असें सुख मिळविण्याकरितां, क्रिया तरी किती कठीण कराव्या लागतात ! त्यांत थोडेंसें चुकलें कीं सर्व कर्म निष्फळ होतें. तसें निष्काम कर्माचें नाहीं. कर्म सांग होवो अगर न होवो, ईश्वर त्यांस समाधिसुख त्याच जन्मीं देतो.

भोगैश्वर्यप्रसक्तानां तयापहृतचेतसाम् ।
व्यवसायात्मिका बुद्धिः समाधौ न विधीयते ॥ ४४ ॥

अर्थ.-भोग आणि ऐश्वर्य यांचे ठायीं ज्यांचीं मनें आसक्त आहेत व त्या आसक्तीनें ज्यांचीं चित्तें हरण झालीं आहेत, त्यांस अंतःकरण एकाग्र करणारी एकनिष्ठ बुद्धि उत्पन्न होत नाहीं.

टीका.-चित्ताची एकाग्रता ह्मणजे समाधिच होय, व ही एकाग्रता आत्यंतिकसमाधानकारक असते. ही एकाग्रता एकनिष्ठ बुद्धीनेंच प्राप्त होते. ह्मणून या लोकांस तें सुख प्राप्त होत नाहीं, कारण त्यांचीं मनें अनेक कामनांनीं ग्रस्त झालेलीं असतात. दरवेशाजवळच्या माकडापेक्षांही यांचे मनाची स्थिति फारच वाईट असते. दरवेशी एकटाच एकाच दोरीनें त्या माकडास झटके देऊन आपल्यास पाहिजे तिकडे नेतो व पाहिजे तें करावयास लावितो. परंतु या काम्यकर्में करणारांची स्थिति फारच दुःखतर होय. कारण या अनेक कामना, आपआपले दोर याचे गळ्यांत बांधून निरनिराळ्या बाजूंनीं त्यास ओढितात. या स्थितीचें वर्णन ऐकण्यापेक्षां श्रोत्यानें स्वतःच तिची कल्पना केल्यानें तें विशेष स्पष्ट दिसेल.

त्रैगुण्यविषया वेदा निस्त्रैगुण्यो भवार्जुन ।
निर्द्वंद्वो नित्यसत्वस्थो निर्योगक्षेम आत्मवान् ॥ ४५ ॥

अर्थ.—वेद हे तिन्ही गुणांनीं बद्ध अशा लोकांचे विषय झाले आहेत. अर्जुना, त्रिगुणरहित, द्वंद्वरहित, नित्य असें जें सत्व त्याचे ठिकाणीं स्थिर, पदार्थ मिळविणें व त्याचें रक्षण करणें याचे काळजीरहित व सावध असा तूं हो.

टीका.—हे वेद स्वतः अभेद असून, त्रिगुणभेद हरण करण्यास प्रवर्तले. शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध, हे पांच विषय तमोगुणात्मक होत; इंद्रियें रजोगुणात्मक होत; आणि मन सत्वगुणात्मक होय. हें सत्वरूपी मन रजतममय झालें ह्मणजे विषयभोगाची वासना उत्पन्न होते. ह्मणून या तिहींच्या चक्रांत जे लोक सांपडतात त्यांस "त्रैगुण्य" असें ह्मणावें. 'वेद अद्वैत ह्मणजे ब्रह्म प्रतिपादन करणारे असून, ते ज्या त्रैगुण्यांस विषयरूप झाले आहेत, त्यांसारखा तूं होऊं नकोस. तूं "निस्त्रैगुण्य" हो, ह्मणजे रजतममिश्रितसत्वस्थ होऊं

नकोस', असें भगवान् अर्जुनास सांगतात. हे त्रिगुण टाकून कसें रहावें याचा आतां विचार करूं. या त्रिगुणांचें मूळ त्यांहून निराळें आहे. त्यासच "**नित्य सत्व**" ह्मणतात. त्याचे ठिकाणीं राहण्याविषयीं अर्जुनास उपदेश केला आहे.

दृष्टींत भ्रम झाल्यानें दोर सर्प आहे असें वाटतें. दृष्टींत जो भ्रम आहे, तोच सर्प होय. तथापि असा भ्रम असतांना दृष्टि दोरास स्पर्शलेलीच असते. दोर कळल्याबरोबर सर्प नाहींसा होतो; तेव्हांही दृष्टि दोरास स्पर्शलेलीच असते. दोर जाणला न जाणला तरी त्याचें दोरपण कायमच राहतें. ह्मणून जी दृष्टि दोरास नेहमीं दोर ह्मणून पाहते ती नित्य दृष्टि होय. आतां बुद्धि ही सत्वरूप आहे. ती केवळ रजतमास (इंद्रियें आणि विषय यांस) स्पर्शून राहिली ह्मणजे भ्रामक विषयवासना उत्पन्न होते. तीच निर्विकार आत्म्यास स्पर्शून, निर्विकार राहून इंद्रियद्वारा विषय पाहते, तेव्हां ती नित्यत्वात्मक समजावी. ज्ञानदशेंत आणि अज्ञानदशेंत दृष्टि एकच दोरास पहाते, परंतु भाव मात्र निराळे होतात. ज्ञानानें खरी वस्तु दिसते, अज्ञानानें भ्रमजनित वस्तु दिसते. त्याचप्रमाणें ज्ञान झालें ह्मणजे बुद्धि विषयांस आत्मस्वरूपच पाहते, ह्मणून इंद्रियांचे व मनाचे विकार उत्पन्न होत नाहींत; व ती तन्मय होऊन राहते. तसेंच हे सर्व विषय आत्मच होत याचें अज्ञान असलें, किंवा ज्ञान झाल्यावर त्याची विस्मृति पडली तर विषय विषयरूपच दिसतात, व मनुष्य भ्रमाचे सपाट्यांत सांपडतो; व त्या मोहामुळें अनर्थ होतो. दोन्हीही स्थितींत एकच बुद्धि असते. आत्मा पहात असतांना बुद्धि शुद्धसत्वरूपी असते, आणि जड पहातांना ती मिश्रसत्वरूपी असते. त्यांत पाहिले प्रकारची बुद्धि नित्य वस्तु पहाते, ह्मणून त्या स्थितीस "**नित्य सत्व**" ह्मणावें. अशा 'नित्यसत्वीं तूं रहा' ह्मणून भगवान् अर्जुनास उपदेश करितात. आतां ही दृष्टि इंद्रियद्वारा भासमान होणारे रूपांस दुसरे प्रकारें कशी पाहूं शकेल, अशी सहज शंका उत्पन्न होते. तिचें निरसन

रज्जुसर्पदृष्टांतानें झालेंच आहे. तथापि एवढ्यानें ज्यांचे मनांतून ही शंका जाणार नाहीं, त्यांचेकरितां आणखी एक दृष्टांत सर्वांचे ओळखीचा असा देतों. आपली माय, बहीण, लेक यांचे ठिकाणीं आपली कामवासना नसते. परंतु उत्तम पुरुषास स्वस्त्रीचे ठिकाणीं आणि अधम पुरुषास इतर स्त्रिया पाहिल्या म्हणजे कामवासना उत्पन्न होते. असा दुसरे दर्जाचा मनुष्य घ्या व त्याची बहीण अगर लेक जन्मापासून त्यानें पाहिली नाहीं अशी कल्पना करा. कालांतरानें त्यानें तीस पाहिलें व त्यास ती अमुक आहे हें माहित नसलें, तर तिचे ठिकाणीं त्या पुरुषाची वाईट वासना होईलच. याचें कारण ती कोण आहे, याविषयीं अज्ञान होय. तेंच खात्रीलायक ही आपली बहीण अथवा लेक आहे असें समजल्याबरोबर त्याचा तो मनोविकार बदलून शुद्ध प्रेमाचा होईल. एथें आणखीही एक क्लिष्ट कल्पना निघते कीं, सर्व जग ब्रह्मच आहे असें आह्मांस समजूनही पुनः मनोविकार कां उत्पन्न होतात? त्यास वरील दृष्टांताचें वर्णन करितांना "**खात्रीलायक**" शब्द घातला आहे तो उत्तर देतो. आह्मांस सर्व जग आत्मा आहे असें समजतें, परंतु तसा निश्चय होत नाहीं, असेल नसेल असा वारंवार मोह होतो. निश्चयात्मक बुद्धि असेल तेव्हां आह्मी विकाररहितच राहूं. तींत जरा संशयाची डळमळ झाली कीं विकारांनीं आपलें तोंड बाहेर काढलेंच. दृष्टांतातही याचप्रमाणें होईल. ती स्त्री, बहीण अगर लेक आहे याजविषयीं संशय असल्यास, मनोविकार तोंड दाखविणारच.

आतां रजतम टाकिले असतां उर्वरीत सत्व राहतें त्याचा अवलंब केल्यानें पुरुष त्रिगुणातीत कसा होतो याचें स्पष्टीकरण केलें पाहिजे. कारण सामान्य दृष्टीनें तो गुणद्वयातीत होतो, असें म्हणतां येतें. यास दृष्टांत हिनकस सोनें आहे. त्यांत कांहीं तांबें व कांहीं रुपें मिश्रित आहे. तें अग्नींत घालून त्यांतील तांबें व रुपें जाळून टाकिलें म्हणजे बाकी शुद्ध सोनें राहतें. त्याचे ठिकाणीं हीनपणा रहात नाहीं याप्रमाणें हे तिन्ही

गुण एकमेकांत मिश्र झालेले आहेत. रजतम टाकिले ह्मणजे मिश्रपणा जातो व शिल्लक निव्वळ सत्व राहतें. हेंच नित्यसत्व होय याचे ठायीं रहा म्हणून भगवानाचा उपदेश आहे. म्हणजे तामस विषय, राजस इंद्रियें आणि रजतममय मिश्रसत्वात्मक मन हीं तिन्ही टाकून रहा असें सांगतात. अशा अनुभवीं शब्द देखील राहूं शकत नाहीं. वेद हा शब्द-स्वरूप आहे तेव्हां तूं "**निस्त्रैगुण्य**" म्हणजे वेदातीत हो असाही आशय निघतो. या अनुभवीं बुद्धि आत्माकार होऊन राहते. श्रुतिही याचप्रमाणें बोलतेः– **यतो वाचो निवर्तंते अप्राप्य मनसा सह। आनंदं ब्रह्मणो विद्वान् न बिभेति कदाचन॥** आत्म्याचा अनुभव सत्वाशिवाय होणारच नाहीं, ह्मणून फक्त कल्पना आणि शब्दस्फुरण त्या अनुभवीं नाहींशीं होतात. कल्पनेच्या ठिकाणींच द्वैत आहे. असें नित्यसत्वस्थ राहणें, शीतोष्ण, मानापमान, लाभहानि, जयापजय, अशा अनेक देहाभिमानजनित द्वंद्वापासून मुक्त राहिल्याखेरीज शक्य नाहीं. ह्मणून "**निर्द्वंद्व**" हो असा उपदेश केला आहे. हा देहात्मभाव जों-पर्यंत उत्पन्न होत नाहीं, तोंपर्यंतच नित्यसत्वस्थ राहणें होतें. प्रारब्ध-कृत देह आहे तोंपर्यंत अनिवार्य भोगकाळीं, मी सुखी, मी दुःखी असा भाव उत्पन्न होतो. तान्ह्या मुलास भूक लागली ह्मणजे तें रडतें. दूध मिळाल्याबरोबर तें स्वस्थ राहतें, पण पुन्हां असेंच दूध मिळावें ही इच्छा त्यास नसते. त्याप्रमाणें सुखोपभोग झाल्याबरोबर पुन्हां असेंच सुख मिळावें, अशी इच्छा न केली पाहिजे. द्वंद्वांचे ठिकाणीं धैर्य ठेविलें तरी देह आणि त्यास चिकटलेले स्त्रीपुरुषादिक यांचे निर्वाहाची चिंता राहील ती ठेवूं नये. पहा, तान्हें मूल दुधाची चिंता ठेवित नाहीं तरी त्यास तें मिळतेंच. जगन्नियंत्या विश्वंभरास सर्व प्राण्यांची काळजी आहेच. ह्मणून देहनिर्वाहाकारितां वेळोवेळीं लागणारे वस्तूंची काळजी करूं नको व जें जवळ असेल त्याचें संरक्षण कसें होईल याचीही काळजी करूं नको, ह्मणून "**निर्योगक्षेम**" या शद्बानें भगवान् अर्जुनास उप-

देश करितात. होणार तें होत असतें. पहा नारळांत पाणी जाण्यास कोठें-ही छिद्र नसून त्याचे आंत पाणी असतें. त्याचप्रमाणें हत्तीनें गिळलेलें कवठाचें फळ त्याचे गुदद्वारावाटे जशाचें तसें बाहेर पडतें. परंतु त्यास छिद्र नसूनही आंतील मगज नाहींसा होऊन नुसतें टरफल असतें. या-करितां योगक्षेमाची चिंता करूं नये. वर सांगितलेल्या कारणाकरितां मन चांगलें शुद्ध करून नित्यसत्वीं राहून आत्मचिंतन करावें असें भगवान् अर्जुनास सांगतात, वेदाचें वेदपण असें आहे कीं, त्रिगुणा-सहित आपला बोध करून देऊन ते निर्गुण ब्रह्म दाखवितात व मागें परततात. यास दृष्टांतः—माय आपले लेकीस तिचे नवऱ्याचे कोठडींत भोगार्थ पोंचवून देते व तेथून ती परतते. याप्रमाणें ही वेदमाता होय. ब्रह्म काय हें कळलें, परंतु वेदोक्त कर्माचें फळ अंतरतें याचा खेद अर्जुनाचे मनांत राहिला. त्याचा परिहार पुढील श्लोकांत भगवान् करितात.

**यावानर्थ उदपाने सर्वतः संप्लुतोदके ।**
**तावान् सर्वेषु वेदेषु ब्राह्मणस्य विजानतः ॥ ४६ ॥**

**अर्थ.**—लहानशा कूपापासून जें कार्य होतें तेंच सर्वत्र तुडुंब भरलेल्या जलाशयापासून होतें. तद्वत् सर्व वेदांपासून मिळणारें फळ ब्रह्मज्ञास सहज प्राप्त होतें.

**टीका.**—पाण्यानें भरलेल्या एखाद्या मोठ्या तळ्याच्या भोंवताली लहान मोठ्या विहरी असतात. त्या सर्व जशा त्या तळ्याच्या आश्रयानें असतात ह्मणजे तळ्यांतील पाणी पाझरून त्या विहरींस पाण्याचा पुर-वठा होतो, तसें सर्व प्रकारचीं विषयसुखें ब्रह्मसुखाच्या आश्रयानेंच असतात. अनेक प्रकारच्या कामना सिद्ध झाल्यानें, जें विषयसुख मिळतें, तें एक आत्मा अनुभविल्यानें ब्रह्मनिष्ठास मिळतें. इतकेंच नाहीं तर, ब्रह्मानंदाच्या अनुभवानें इच्छाच राहत नाहींत. तसें विषयभोगाचें नाहीं. जों जों त्यांचा उपभोग घ्यावा तों तों त्यांची इच्छा जास्त

वाढते व तृप्ति अशी कधींच होत नाहीं. याकरितां निस्त्रैगुण्य होऊन ब्रह्मानंदाचा अनुभव घे, असा भगवान् अर्जुनास उपदेश करितात. या उपदेशानें अर्जुनाचे मनांत आलें कीं, आतां कर्म करण्याची कांहींच जरूर नाहीं. कारण ब्रह्मसुखाचा मी अधिकारी आहें, ह्मणूनच देव मला निस्त्रैगुण्य होण्यास सांगतो, तेव्हां कर्म टाकून मी ब्रह्मच अनुभवीन. हा भाव जाणून भगवान् बोलतात.

**कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन ।**
**मा कर्मफलहेतुर्भूर्मा ते संगोऽस्त्वकर्मणि ॥ ४७ ॥**

**अर्थ.**—अर्जुना, कर्म करण्याचा तुझा अधिकार आहे. कर्मफलाचे ठायीं नाहीं बरें. फळाच्या हेतूनें कर्मकर्ता होऊं नकोस, पण कर्म न करण्याची आवड धरूं नकोस.

**टीका.**—सर्व क्रिया जन्मकर्मफलप्रद आहेत असें पूर्वीच सांगितलें आहे. निराकार अशा ब्रह्मास पावण्याची ज्याला इच्छा असेल त्यानें कर्म केलेंच पाहिजे. कर्म करण्याचा अधिकार नसता तरी कर्म करून फळाची इच्छा धरूं नये. राजसेवा केल्याशिवाय थोरपणा प्राप्त होत नाहीं. त्या सेवेंत चोरी, चहाडी वगैरे जे घातक गुण आहेत, ते दूर टाकून सेवा केली असतां, राजकृपा होते. तद्वत् वेदोक्त कर्में केल्याखेरीज ईश कृपा होत नाहीं. कारण तीं कर्में करणें ही त्याची सेवा होय. फक्त तीं कर्में निष्काम बुद्धीनें करावीं ह्मणजे झालें. समुद्र मनुष्यास बुडवितो हें खरें, परंतु नौकेंत बसून शेंकडो लोक द्वीपांतराहून धन मिळवून आणितातच. ह्याचप्रमाणें भवसमुद्रांत असलेल्या मनुष्यास तो भवसमुद्र बुडवील हें खरें. परंतु निष्कामकर्मरूप नौकेचा आश्रय केल्यास ती त्यास सहज तारून नेईल.

सकाम कर्म जन्ममरणास मूळ होतें, तसें निष्काम कर्महि झालें पाहिजे, असें अर्जुनास वाटलें. विषाचे अंगीं मारण्याचा धर्म आहे. तें

विष, त्याचें फळ मरण न यावें, या हेतूनें जरी कोणी पिईल, तरी तें आपला गुण न सोडतां, मरणफळ देईलच. ही अर्जुनाची शंका रास्तच होती. केवळ निष्काम कर्मही बंधकच होणार, परंतु तें भगवदर्पण केल्यानें बंधनाश होतो, हें तत्व अर्जुनास माहीत नव्हतें. तें आतां भगवान् त्यास सांगतात.

**योगस्थः कुरु कर्माणि संगं त्यक्त्वा धनंजय ।**
**सिद्ध्यसिद्ध्योः समो भूत्वा समत्वं योग उच्यते ॥ ४८ ॥**

**अर्थ.**—हे धनंजया, योगाचे ठिकाणीं स्थिर राहून व फलसंग टाकून कर्में कर. सिद्धि व असिद्धि या दोहींत समान बुद्धि ठेव. या समबुद्धीसच योग ह्मणतात.

**टीका.**—सर्वभावें शरण होऊन ईश्वराचे चरण अंतःकरणांत ठेवणें यास योग ह्मणतात. अशा योगीं राहून कर्म केलें ह्मणजे तें बंधक होत नाहीं. चित्तावांचून कर्म घडतच नाहीं. तें चित्तच जर ईश्वरचरणीं राहील तर अर्थात् कर्मही त्याच चरणीं समर्पण होतें. हें उघड आहे. बचनाग मारक विष आहे. परंतु तोच उत्तम वैद्याचे हातीं गेला म्हणजे त्याची तो रसराजमात्रा करून देतो. तिचें सेवन केल्यानें आरोग्य होतें. निष्काम कर्म करून तें विष्णूस अर्पण केलें असतां बंधक होत नाहीं, हें पुढें तृतीयाध्यायांत सांगणेंच आहे व तेंच नवव्यांतही सांगितलें आहे. परंतु सर्व गीतार्थ ऐकेपर्यंत अर्जुनाचें चित्त स्थिर रहावें ह्मणून सर्व गीतार्थ थोडक्यांत या अध्यायीं भगवान् सांगतात.

फलेच्छारहित कर्म करण्यास चित्त प्रवृत्त होत नाहीं, परंतु योगस्थ राहून तें कर्म ईश्वरीं अर्पण केल्यानें चित्ताची शुद्धि होऊन ब्रम्हप्राप्ति होते. चित्तशुद्धीनें विवेक उत्पन्न होतो व निष्काम कर्म करण्याकडे चित्त वळतें. या भावानें भगवान् ह्मणतात कीं, सिद्धि आणि असिद्धि यांत चित्त सम ठेविल्यानें ईश्वराचे चरणीं तें अचळ राहतें व

तसें झाल्यानें ब्रह्मप्राप्ति होते. याकरितां समत्वास योग ह्मटलें आहे. कर्मसिद्धीची इच्छा केल्यानें ईश्वरीं बुद्धि स्थिर होत नाहीं. निष्काम कर्मही केलें व तें सिद्धीस गेलें नाहीं ह्मणजे काम्याकडे मन जातें. याकरितां वर सांगितलेली समता ठेवणें अगदीं अवश्यक आहे. एथपर्यंत कर्मप्रशंसा बरीच झाली. यामुळें ब्रह्मप्राप्तीचा निर्धार अर्जुन विसरलासें दिसलें, ह्मणून भगवान् आतां ज्ञानाचा मोठेपणा सांगतात.

**दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगाद्धनंजय ।**
**बुद्धौ शरणमन्विच्छ कृपणाः फलहेतवः ॥ ४९ ॥**

अर्थ.—हे धनंजया, बुद्धियोगाहून कर्मयोग अत्यंत निकृष्टत्व आहे. याकरितां ज्ञानाचे आश्रयाची असोशी धर. सकाम कर्म करणारे दीन होत.

**टीका.**—बुद्धिचैतन्ययोगास **बुद्धियोग** ह्मणावें. यामागें सांगितला तो कर्मयोग होय. तें चैतन्य बुद्धीतच आहे. पण सर्व लोक तें कां शोधून पहात नाहींत याचें कारण असें आहे कीं, ते काम्यफलभोगाचे हेतूनें दीन झालेले असतात. बुद्धियोग फारच थोर व कर्मयोग फार नीच आहे. आणि काम्य तर त्याहून अत्यंत तुच्छ आहे. याकरितां ज्ञानमार्गाचा आश्रय करणें उत्तम होय.

यावरून अर्जुनास वाटलें कीं, निष्काम कर्म करून तें ईश्वरास अर्पण केलें असतां बंधक होणार नाहीं, ह्मणजे ब्रह्मप्राप्ति होईल. पण एवढ्यानें फक्त पुढें होणारें थोडेंसें कर्म नासेल. परंतु अनंतजन्मार्जित संचितकर्माची वाट काय हें त्याचे लक्षांत आलें नाहीं. ह्मणून भगवान् सांगतात कीं, ज्ञानावांचून तें नासत नाहीं आणि तें नासल्याशिवाय ब्रह्मप्राप्ति होत नाहीं.

**बुद्धियुक्तो जहातीह उभे सुकृतदुष्कृते ।**
**तस्माद्योगाय युज्यस्व योगः कर्मसु कौशलम् ॥ ५० ॥**

अर्थ.—बुद्धियुक्त पुरुष याच लोकीं, पुण्य आणि पाप या दोन्हींचा

नाश करितो. ह्मणून त्या ज्ञानाकरितां कर्मयोग कर. तो करून त्याचे बंधांत न सांपडणें हेंच कौशल्य होय.

टीका.—बुद्धि आणि चैतन्य यांचा संयोग ज्यानें संपादिला असा बुद्धियुक्त पुरुष जिवंत असतांनाच पापपुण्यापासून मुक्त होतो. चैतन्यानें जी बुद्धि प्रकाशली जाते, व जिचे योगानें त्या चैतन्याचा आपण अनुभव घेतों, त्या बुद्धीनें युक्त असणें यास बुद्धि आणि चैतन्य यांचा योग ह्मणतात. दह्यांत लोणी असतें, परंतु घुसळल्यानें तें दृष्टीस पडतें. त्याचप्रमाणें जडचैतन्य विचारानें निवडिलें असतां बुद्धीस चैतन्य सांपडतें. काष्ठास काष्ठ घांसल्याशिवाय अग्नि प्रगट होत नाहीं. तसेंच सत्वावांचून आत्मा अनुभवास येत नाहीं. काष्ठांत अग्नि आहेच, परंतु मंथन केल्यानें तो उत्पन्न होऊन त्याच काष्ठास जाळूं लागतो व काष्ठासह तो दिसतो. तद्वत् जड आणि चैतन्य हीं निवडितांना आत्मा बुद्धींत दिसतो व तीस तिच्या आंत असलेल्या पूर्वकर्मासहित तो जाळून टाकितो. बुद्धींत पूर्वकर्में कशीं राहतात याचें स्पष्टीकरण केलें पाहिजे. आपण जेवतों, तंबाखू खातों, लोकांस शिव्या देतों अशीं अनेक कर्में करितों. आज आपण एक कर्म करितों, पुन्हां चार वर्षांनीं त्याची आठवण करणें झाल्यास ती लवकर होत नाहीं. बुद्धीसच पुन्हां पुन्हां जागृत करून विचारतों, तेव्हां त्याची आठवण होते. पूर्वीं केलेलें कर्म आपणाबाहेर दूर कोठें निघून जात नाहीं तर त्या बुद्धींतच तें असतें, पण तें आकाररूपानें नसतें. तसें असतें तर दिसलें असतें. तें संस्काररूपानें असतें. याप्रमाणें अनंत जन्मांचीं बरीं वाईट कर्में संस्काररूपानें बुद्धींत असतात. आपण लोकांस शिव्या देण्याचा क्रम सुरू ठेविला व तो बराच काळपर्यंत चालविला तर बुद्धीची सहज प्रवृत्ति शिव्या देण्याकडे होते. ही संवय फारच दृढ झाली ह्मणजे यांत्रिक कामाप्रमाणें, इच्छा नसतांही, तें कर्म नकळत होऊन जातें. असेच मनुष्याचे स्वभाव बनतात; बनतात ह्मणजे पूर्वी त्या-

प्रमाणें नसतात. आपणच संवयीनें त्यांस बनवितों. उपजतच कित्येकांचे अंगीं विशेष गुण असतात. ते पूर्वीच्या संवयींप्रमाणें असले पाहिजेत. अर्थात् यावरून पूनर्जन्म सिद्ध होतो व उत्तर जन्मही सिद्ध झालाच. **'बुद्धिः कर्मानुसारिणी'** या सर्वश्रुत वाक्याचा हाच गुह्यार्थ आहे. वारंवार एकच कर्म घडल्यानें, ते सर्व संस्कार एकवटून जोरदार होतात व बुद्धीस तदनुरूप वागण्यास लावितात. परंतु आपणच ही संवय केलेली असते ह्मणून ती आपली आपल्यासच विचारबळानें मोडतां येते. हे संस्कार नाहींसे करण्याचे अधिकारानुरूप अनेक मार्ग आहेत. ते पुढें योग्य स्थळीं सांगितले जातील. हल्लीं, ज्ञानवान् पुरुष, अनेकजन्मसंचित पापपुण्य जाळतो, याचे स्पष्टीकरणापुरतें एवढें बस आहे. यावरून बुद्धि सर्व कर्मांचें भांडार आहे हें स्पष्ट झालें. चित्त, बुद्धि, मन आणि अहंकार हे एका सत्वाचे प्रकार होत. जागृतींत जें जें आपण करितों त्याचे बुद्धींत असलेले संस्कारच स्वप्नसृष्टि करितात. तेव्हां आपला कर्मकलाप जरी आपणांस विस्मृतीमुळें दिसत नाहीं, तरी तो बुद्धींत आहेच. त्या बुद्धीचा साक्षी ईश्वर आहे. तो ते सर्व जाणतो व त्या संस्कारानुरूप प्रेरणा करितो. याप्रमाणें अनेक जन्मांचें पूर्व कर्म असतें, त्यास "संचित" ह्मणतात. या देहीं जें कर्म घडतें त्यास "**क्रियमाण**" ह्मणतात. देह पडे-पर्यंत हें देहावरच असतें. देह सोडल्यावर पूर्वींचे ठेव्यांत तें मिसळतें; व या एकंदर संचितापासून पुढील जन्मांत उपभोगाकरितां कांहीं कर्मांचें फळ ईश्वर प्रारब्धरूपानें आपणांस देतो. हें भोगल्याशिवाय इलाजच नाहीं, कारण समर्थाची आज्ञा टाळण्याचें सामर्थ्य कोणांतही नाहीं. संचित मात्र नाहींसें करितां येतें. बुद्धियुक्त पुरुष तें वर सांगितल्याप्रमाणें नाहींसें करितो. वेदविहित कर्मापासून पुण्य प्राप्त होतें, तें तरी बेडीच होय. इतकेंच कीं, ती सोन्याची बेडी (जीस आपण तोडा ह्मणतो) व पाप लोखंडाची बेडी. लोखंडाची किंवा सोन्याची बेडी घालतांना त्रास सारखाच होतो. पण सोन्याचा तोडा ह्मणून घालतांना, आपण, क्लेश

असूनही अज्ञानामुळें सुख मानितों. असें पुण्य कर्म ईश्वरीं अर्पण केल्यानें फक्त क्रियमाण बांधूं शकणार नाहीं एवढेंच; परंतु अनेक जन्मार्जित संचित सुकृत किंवा दुष्कृत नासण्यास ज्ञानच शक्तिमान् आहे. याकरितां बुद्धियुक्त होऊन हें ज्ञान प्राप्त करून घेतलें पाहिजे. पण कर्मयोग आचरण केल्याशिवाय बुद्धियोग मिळत नाहीं. कर्मांत बंध आहे हें कळून, तें कर्म निष्काम करून, ईश्वरीं अर्पण करून त्या बंधांत न सांपडणें हीच कर्मयोगाचे ठिकाणीं कुशलता होय. विहित कर्में दोन प्रकारचीं आहेत. एक नित्य व दुसरीं काम्य. नित्य कर्म (वर्णाश्रमोचित कर्म) केलेंच पाहिजे. कारण ती सार्वभौम राजा ईश्वर याची आज्ञा आहे. ती आज्ञा उल्लंघन केल्यानें तो मनुष्य राजदंडास पात्र होतो, व पाळली असतां विशेष फळ कांहींच मिळत नाहीं. नित्य कर्म केल्यानें पितृलोक, व काम्य केल्यानें स्वर्गलोक मिळतो. दोन्ही केल्यानें जन्ममरण चुकत नाहीं. ईश्वरराजापाशीं मेल्यावर जीव जातात. त्यांत ज्यानीं नित्य कर्म आचरलें असेल, त्यांस यमधर्म, ईश्वराचा अमलदार, पानसुपारीदाखल पितृलोक देऊन, रवाना करितो. काम्य कर्म करून आलेल्यास स्वर्ग देऊन कांहीं दिवसांकरितां सुखाची जहागीर देतो. परंतु राजाची व त्यांची भेट होत नाहीं. कारण राजाचे भेटीस नजराणा फार मोठा लागतो. जो कोणी सर्व कामना टाकून सर्व कर्म ईश्वरास अर्पण करण्यास घेऊन जातो, त्यास ईश्वर राजा प्रसन्न होऊन कायमची जहागीर, मोक्ष, देतो. हा मोक्ष गुरुरूपानें प्रभु स्वतः येऊन ज्ञानोपदेशद्वारा त्यास देतात. सर्व बुद्धियुक्त लोक याचप्रमाणें मुक्त होतात असें भगवान् आतां सांगतात.

**कर्मजं बुद्धियुक्ता हि फलं त्यक्त्वा मनीषिणः ।**
**जन्मबंधविनिर्मुक्ताः पदं गच्छंत्यनामयम् ॥ ५१ ॥**

**अर्थ.**–निर्मळ अंतःकरणाचे लोक कर्मापासून होणारें फळ टाकून

बुद्धियुक्त होतात, आणि जन्मबंधनापासून सुटून निरुपद्रवी अशा मोक्ष-पदातें पावतात.

टीका.–नित्य कर्मै करून जें फळ होतें तें देखील ईश्वरार्पण केलें पाहिजे. ह्मणजे त्याची कृपा होऊन कर्मकर्ता पुरुष बुद्धियुक्त होतो व परमपदास पावतो. या पदाचे ठायीं पुनरावृत्तिरूप रोगाचें नांव देखील नाहीं. यावरून निष्काम ( नित्य ) कर्मही ईश्वरार्पण न केल्यानें काम्याप्रमाणेंच बंधक होतें, हें वर्म या श्लोकांत सांगितलें आहे. काम्य कर्म न टाकितां त्याचें फळ टाकून परमपद प्राप्त होतें असें नाहीं. समूळ काम्यकर्म टाकण्यासच संन्यास ह्मणतात. असें अठरावे अध्यायांत भगवान् सांगणार आहेत. तो श्लोक असा:–**काम्यानां कर्मणां न्यासं संन्यासं कवयो विदुः। सर्वकर्मफलत्यागं प्राहुस्त्यागं विचक्षणाः ॥** काम्य-कर्मत्यागास संन्यास ह्मणावें आणि सर्व प्रकारचीं कर्मफळें टाकणें यास त्याग ह्मणावें असें या श्लोकांत आहे. त्याज्य असें जें कर्म तें काम्य होय. यावरून उत्तरार्धांतील " **सर्वकर्मफलत्यागं** " या शब्दानें निष्कामकर्मफलसंयोग दर्शित केला हें उघड आहे.

**यदा ते मोहकलिलं बुद्धिर्व्यतितरिष्यति ।**
**तदा गंतासि निर्वेदं श्रोतव्यस्य श्रुतस्य च ॥ ५२ ॥**

**अर्थ.**–अर्जुना, जेव्हां तुझी बुद्धि मोहरूप डोहांतून पार पडेल, तेव्हां ऐकण्यास योग्य व ऐकिलेल्या अशा दोन्ही सुखांविषयीं तुला वैराग्य होईल.

**टीका.**–नुसते शब्द ऐकून अर्जुन खूष झालासें पाहून देव ह्मणतात कीं, 'प्राप्त करून घेण्याचें सुख यापुढेंच आहे. व तें अज्ञानापासून उत्पन्न होणाऱ्या मोहरूप डोहांतून पोंहून जाशील तेव्हां तुला अनुभवास येईल'.

बुद्धियुक्त होतात, आणि जन्मबंधनापासून सुटून निरुपद्रवी अशा मोक्ष-पदातें पावतात.

**टीका.**—नित्य कर्में करून जें फळ होतें तें देखील ईश्वरार्पण केलें पाहिजे. ह्मणजे त्याची कृपा होऊन कर्मकर्ता पुरुष बुद्धियुक्त होतो व परमपदास पावतो. या पदाचे ठायीं पुनरावृत्तिरूप रोगाचें नांव देखील नाहीं. यावरून निष्काम (नित्य) कर्मही ईश्वरार्पण न केल्यानें काम्याप्रमाणेंच बंधक होतें, हें वर्म या श्लोकांत सांगितलें आहे. काम्य कर्म न टाकितां त्याचें फळ टाकून परमपद प्राप्त होतें असें नाहीं. समूळ काम्यकर्म टाकण्यासच संन्यास ह्मणतात. असें अठरावे अध्यायांत भगवान् सांगणार आहेत. तो श्लोक असाः- **काम्यानां कर्मणां न्यासं संन्यासं कवयो विदुः। सर्वकर्मफलत्यागं प्राहुस्त्यागं विचक्षणाः ॥** काम्य-कर्मत्यागास संन्यास ह्मणावें आणि सर्व प्रकारचीं कर्मफळें टाकणें यास त्याग ह्मणावें असें या श्लोकांत आहे. त्याज्य असें जें कर्म तें काम्य होय. यावरून उत्तरार्धांतील " **सर्वकर्मफलत्यागं** " या शब्दानें निष्कामकर्मफलसंयोग दर्शित केला हें उघड आहे.

**यदा ते मोहकलिलं बुद्धिर्व्यतितरिष्यति ।**
**तदा गंतासि निर्वेदं श्रोतव्यस्य श्रुतस्य च ॥ ५२ ॥**

**अर्थ.**—अर्जुना, जेव्हां तुझी बुद्धि मोहरूप डोहांतून पार पडेल, तेव्हां ऐकण्यास योग्य व ऐकिलेल्या अशा दोन्ही सुखांविषयीं तुला वैराग्य होईल.

**टीका.**–नुसते शब्द ऐकून अर्जुन खूष झालासें पाहून देव ह्मणतात कीं, 'प्राप्त करून घेण्याचें सुख यापुढेंच आहे. व तें अज्ञानापासून उत्पन्न होणाऱ्या मोहरूप डोहांतून पोहून जाशील तेव्हां तुला अनुभवास येईल'.

मोहं ह्मणजे अविवेक. अविचारामुळें देहच आत्मा आहे असें वाटतें. हा एक प्रकारचा मोह होय. हा व्यतिरेकानें नाहींसा होतो. आकारवंत जग अनात्मत्वें भासून मोह होतो. हा दुसरे प्रकारचा मोह होय. अलंकारं तितकें सोनेंच या, पूर्वी स्पष्ट केलेल्या, तत्वाप्रमाणें सर्व जड जग आत्माच होय असा विचार ( ज्यास अन्वय ह्मणतात ) केल्यानें हा दुसरा मोह नाश पावतो. ह्या दोन्ही प्रकारचे मोहांतून पार पडलें ह्मणजे खरें ब्रह्म-सुख प्राप्त होतें.

**श्रुतिविप्रतिपन्ना ते यदा स्थास्यति निश्चला ।**
**समाधावचला बुद्धिस्तदा योग मवाप्स्यसि ॥ ५३ ॥**

अर्थ.—वेदांतील गुळचट वाक्यें ऐकून चंचल झालेली तुझी बुद्धि समाधानवृत्तींत स्थिर होईल तेव्हां तुला योगाची प्राप्ति होईल.

टीका.—'वेदांतील अनेक तऱ्हेचीं काम्यकर्में आचरण्याची फलश्रुति ऐकून व्याकूळ झालेली तुझी बुद्धि, यापूर्वी केलेल्या उपदेशानें शांत झाली हें खरें, परंतु ही बुद्धि नेहमीं विचारानें कायम राखशील, तेव्हां, ज्यायोगानें सुकृत दुष्कृत दोन्हीं नासतात, तो योग तुला प्राप्त होईल', असें भगवान् सांगतात. प्रथम आत्मज्ञान झालें पाहिजे. नंतर निर्विकल्प व सविकल्प या दोन्ही तऱ्हेचा अभ्यास करून ज्ञानसिद्धि होते. असें झालें ह्मणजे तो पुरुष नित्य समाधानांत राहतो, सर्व कर्मं करून अकर्ता राहतो, व पूर्वीचें सर्व संचित नाहींसें करून टाकून, जिवंत असतांनाच पापपुण्य नाहींसें करून मुक्त होतो. अशा पुरुषास जीवन्मुक्त ह्मणतात, त्याचे अशा स्थितीला स्थितप्रज्ञता ह्मणतात, व तो ज्या रीतीनें वर्तन करितो, त्यास योग ह्मणतात. या स्थितप्रज्ञाविषयीं अर्जुन यापुढें प्रश्न करित आहे.

**स्थितप्रज्ञस्य का भाषा समाधिस्थस्य केशव ।**
**स्थितधीः किं प्रभाषेत किमासीत व्रजेत किम् ॥ ५४ ॥**

**अर्थ.**—अर्जुन ह्मणतो, हे देवा, ज्याची बुद्धि स्थिर झाली व जो समाधिस्थ असतो, अशाची काय खूण आहे. असा स्थिरबुद्धि पुरुष काय बोलतो, काय करून असतो, व कसा वर्ततो तें सांगा.

या प्रश्नाचें उत्तर भगवान् देतात कीं,

**प्रजहाति यदा कामान् सर्वान् पार्थ मनोगतान्।**
**आत्मन्येवात्मना तुष्टः स्थितप्रज्ञस्तदोच्यते ॥ ५५ ॥**

**अर्थ.**—हे पार्था, जेव्हां कोणी पुरुष आपले मनांत येणारे सर्व काम टाकून, आपले ठायींच आणि आपणाशींच संतुष्ट असतो, तेव्हां त्यास **स्थितप्रज्ञ** असें ह्मणतात.

**टीका.**—प्रथम मनुष्यास वैराग्य झालें पाहिजे. नंतर तो ज्ञानप्राप्तीस योग्य होतो व तें ज्ञान त्याचे ठिकाणीं नेहमीं वसूं लागलें, ह्मणजे तो स्थितप्रज्ञ होतो. मन विषयावर स्वाभाविकपणें धांव घेतें. तें विचारबळानें जो आवरतो त्यास साधक ह्मणतात. विषयाचा कंटाळा येऊन तिकडे मन न जाईसें झालें ह्मणजे त्यास आवरण्याची जरूरच राहत नाहीं. अशी स्थिति अभ्यासानें प्राप्त झाली ह्मणजे त्यास स्थितप्रज्ञ ही पदवी प्राप्त होते. सर्व इच्छा टाकणें हें बोलून होत नाहीं. अनादिवासनेंमुळें विषय हेंच सुखाचें घर असें मनानें मानिलें आहे. विषयांत सुख मोहरीएवढें, परंतु परिणामिक दुःख मात्र पहाडाएवढें असतें, हें मागें सांगितलेंच आहे. असें मन चिखलांतील मासोळीसारखें असतें. चिखलांत मासोळी असते ती कोरड्या जागेवर आणली, तर कधींही वांचावयाची नाहीं. चिखलांत असतेवेळीं नाकातोंडांत चिखल जातो, तरी जें थोडेंसें पाणी त्यांत असतें, त्याचे आधारावर सुख मानून दुःखरूपी चिखलांत ती राहते. तीच मासोळी चिखलांतून काढून नदीप्रवाहांत टाकिली, तर तिला त्या पूर्वींच्या चिखलाची आठवणच होत नाहीं, व झाली तरी त्यांत जाण्याची तीस इच्छा होत नाहीं. तसेंच

विषयांत सुख मानून असलेलें मन, सद्गुरुकृपेनें ब्रह्मानंदांत पोंचविलें गेलें ह्मणजे मग त्या मनास विषयांची आठवण देखील होत नाहीं. चिखलांतून मासोळी काढल्यापासून नदींत पडेपर्यंत पूर्वीचें थोडेंसें प्राप्त असलेलें पाणीही अंतरतें व नदीही प्राप्त नसते, अशा स्थितींत तिचे हाल होऊन, कांहीं काळपर्यंत तिला दुःख सोसावें लागतेंच त्याप्रमाणें ब्रह्मसुखाचे प्राप्तीकरितां विषयत्याग केला ह्मणजे ब्रह्मप्राप्ति होईपर्यंत जो काल जातो तो पूर्वीपेक्षां जास्त कष्टाचा वाटतो हें उघड आहे. परंतु पुढें होणारा कायमचा व अमूप फायदा लक्षांत आणून मध्यंतरीं होणारे क्लेश सोसणें विचाराचें होय, हें कोणीही विचारी मनुष्य कबुल करील. मध्यंतरीं होणारे क्लेश भोगावे लागतात व त्या वेळेपुरतें तरी पूर्वी थोडेंसें असें जें विषयसुख मिळत होतें तें मिळत नाहीं, तेव्हां हा उपाय मोठासा फायदेशीर नाहीं, अशी कोणी शंका घेईल, तर तिचें समाधान असें आहे कीं, विषयसुख भोगिल्यावर परिणामीं दुःख भोगावें लागतेंच, त्याऐवजीं विषयत्यागाचें दुःख समजावें, ह्मणजे हा उपाय फायदेशीर आहे असें कळेल. हें स्पष्ट होण्याकरितां आपण गणित-पद्धतीनें पाहूं.

सुखदुःख मिळून १ रुपया धरूं. त्यांत ६~ आणा सुख व ।।।≡– दुःख आहे असें समजूं.

हल्लींची स्थिति.

जमा दुःख.

।≈ सुख मिळण्याकरितां अनंत खटपटी कराव्या लागतात त्यांचें दुःख.
।।– विषयावियोगाचें परिणामिक दुःख

।।।≈

।।।≈ निवळ दुःख.
६~ वजा विषयसुख.

।।।≈ बाकी निवळ दुःख.

अभ्यासकाळची स्थिति.

जमा दुःख

।।– विषयत्यागाचें थोडे दिवसांकरितां होणारें दुःख.
० विषयत्यागच होतो तेव्हां विषय मिळाविण्याचे खटपटींचें दुःख.

।।– बाकी निवळ दुःख.

ब्रह्मप्राप्तीचा उपाय करित नसतां सुख वजा जातां निव्वळ दुःख ।।।= व अभ्यासकाळीं निव्वळ दुःख ।।- होतें, यावरून अभ्यासाची स्थिति देखील ।- आण्यांनीं फायदशीरच आहे. आतां ८- विषयसुख कायमचें नाहीं, परंतु अभ्यासानें कायमचें १ रुपया ब्रह्मसुख मिळतें हा फायदा शिवाय होय.

यावरून सिद्ध होतें कीं, अभ्यासकाल देखील, त्यापूर्वीचे काळापेक्षां कमी दुःखाचा ह्मणजे जास्त सुखाचा होय. अभ्यासकाळीं होणारें दुःख कायमचें धरिलें तरी हा परिणाम निघतो. वास्तविकपणें तें थोडे दिवसांकरितां आहे हें लक्षांत ठेवलें पाहिजे. व तसें पाहूं गेलें असतां, तें गणित अगणित होतें. परंतु सामान्य रीतीनें दोन्ही स्थितींची कल्पना मनांत येण्याकरितां हा यत्न केला आहे याजबद्दल वाचक मला माफी देवोत.

आतां मूळ विषयाकडे वळूं. सर्व विषयकामना टाकून नेहमीं आत्मस्वरूपीं बुद्धि लीन ठेवून जो राहतो तो स्थितप्रज्ञ समजावा. अशा पुरुषास संतुष्ट राहण्यास दुसरें कोणतेंच साधन नको. तो आपल्या ठिकाणींच इतर साधनांखेरीज आनंदांत असतो.

यापुढील श्लोकांत भोगकाळीं स्थितप्रज्ञ कसा वागतो हें भगवान् सांगतात.

**दुःखेष्वनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः ।**
**वीतरागभयक्रोधः स्थितधीर्मुनिरुच्यते ॥ ५६ ॥**

**अर्थ.**—दुःख प्राप्त झालें असतां ज्याचें मन चंचळ होत नाहीं व सुख प्राप्त झालें असतां तें पुन्हां मिळावें अशी ज्यास इच्छा नसते, व आवड, भय, आणि क्रोध ज्याचेजवळून गेले आहेत, अशा विवेकी पुरुषास **स्थितप्रज्ञ** ह्मणतात.

टीका.—आत्मा सर्वव्यापक आहे हें समजलें असतां, जीव आणि ईश्वर दोघे एकच आहेत, ह्मणजे बिंबप्रतिबिंब यांचें ऐक्य आहे, असें तो जाणतो. पूर्वकालीं अज्ञानामुळें दुःख भोगून ज्ञान झाल्यावर ज्ञानी आत्मसुख पावतो व त्यास खरें तत्व समजतें कीं, सगुणब्रह्म ईश्वर (बिंब) प्रतिबिंबरूपें दुःख भोगितो, व पुन्हां बिंबैक्य पावून सुखी होतो. राजवाड्यांत राहून राजा कंटाळला ह्मणजे युद्ध्या शिकारीस जातो व जंगलांत क्लेश भोगून क्षुधा आणि तृषा यांनीं पीडित होत्साता आपले मंदिरास येऊन, श्रमपरिहाराकारणें सुखाचा उपभोग घेतो. ते सर्व उपचार पूर्वीपेक्षां त्या वेळीं जास्त आनंद देतात. आपण सावलींतच नेहमीं असलों ह्मणजे उष्णांत जाऊन आल्यावर, सावली जितकी सुखकर वाटते, तितकी सुखकर त्यापूर्वी वाटत नसते. त्याचप्रमाणें जीवन्मुक्तदशेंत ईश्वर अत्यंत सुख भोगितो. अशा युक्तीनें मनन करणारा मुनि दुःख भोगितांना उद्विग्न कां होईल बरें? नाशवंत दुःख भोगित असतां, नित्य सुखाचें स्मरण ज्यास होत आहे, तो घाबरा होत नाहीं. तसेंच सुखाचे वेळीं, तें पुन्हां प्राप्त व्हावें अशी इच्छा त्या मननशीलास कां होईल? नाहीं होणार. कारण तो खास समजतो कीं, अंगास खाज सुटली असतां खाजविल्यानें प्रथम थोडेंसें सुख वाटतें, पण परिणामीं आग होते, त्याप्रमाणें विषयसुख आहे. एखादा वाणी द्रव्यप्राप्तीकारणें जवळच्या आठवडेबाजारांत दुकान नेण्याची सर्व तयारी करून भोजनास बसतो. त्याची स्त्री त्यास मिष्टान्न वाढते, पण द्रव्याच्या आशेनें त्याचें मन बाजारांत फिरत असल्यामुळें जेवणांत नसतें. जेवून उठल्यावर वेळ झाली ह्मणून तो गडबडींत असतो. इतक्यांत त्याची तरुण स्त्री त्याला तांबूल देऊन आलिंगनहीं देते. पण त्या बिचाऱ्याचें मन त्या वेळींही बाजारांत फिरत असतें. कामानें संतप्त झालेला पुरुष भोगार्थ जात असतां, मध्यें कितीही दुसरे विषय आड आले, तरी त्यांची इच्छा त्यास होत नाहीं. एखाद्या धनगरास राज्यपद मिळालें, आणि ज्या खोंगडीची आणि त्याची कायमची

गांठ पूर्वकाळीं होती, तीच त्यास पुढें कांहीं निमित्तानें सेवावी लागली, तरी त्या वेळीं ती घोंगडी पुन्हां प्राप्त व्हावी अशी कधींही त्यास इच्छा होणार नाहीं. तद्वत् ज्ञानी पुरुषास उत्तम सुखकारक अशा आत्मस्वरूपाची प्राप्ति झाली असल्यानें, जर कधींमधीं त्यास विषयसुख भोगण्याची पाळी आली, तर तें पुन्हां मिळावें ह्मणून तो इच्छा करीत नाहीं. देह लटिका आहे असा त्याचा निश्चय असतो. तो नाश पावला तरी त्यास दुःख होत नाहीं. यास्तव तो मरणाची देखील भीति धरित नाहीं. दुःख भोगतेवेळीं, अथवा विषयसुखाचे आड कोणी आला तरी त्या वेळीं त्रास होऊन क्रोध येतो, तसा क्रोधही त्यास कधीं येत नाहीं.

हे वर सांगितलेले सिद्धांचे सहज गुण आहेत. एवंच, सर्व कामना टाकून, निजात्मयोगीं संतुष्ट राहणारा, वीतरागी, निर्भय, क्रोधरहित, आणि सुखदुःखीं सम, असा स्थितप्रज्ञ असतो. स्थितप्रज्ञाचीं लक्षणें काय हा अर्जुनाचा पहिला प्रश्न होता. त्याचें उत्तर एथपर्यंत भगवंतांनीं दिलें. तो काय बोलतो, हा अर्जुनाचा दुसरा प्रश्न आहे. त्याचें उत्तर भगवान् पुढील श्लोकांत देतात.

**यः सर्वत्रानभिस्नेहस्तत्तत्प्राप्य शुभाशुभम् ।**
**नाभिनंदति न द्वेष्टि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ५७ ॥**

**अर्थ.**—ज्याची सर्वत्र अनासक्ति असते, शुभ प्राप्त झालें असतां जो आनंद मानित नाहीं, आणि अशुभ प्राप्त झालें असतां जो त्याचा द्वेष करित नाहीं, त्याची बुद्धि स्थिर झाली असें समजावें.

**टीका.**—मी आणि माझें हे भाव अहंता आणि ममता यांपासून उत्पन्न होतात. ज्ञानी पुरुषास देहाच्या ठिकाणीं ममता नसते. तेव्हां तदनुषंगिक वस्तूवर कोठून असणार? असा पुरुष भलतेंसलतें इतर लोकांसारखें कां बोलेल? सुखाचे ठायीं ज्यास इच्छा असते किंवा दुःख होऊं नये ह्मणून जो काळजी करित असतो अशास, तो तो प्रसंग प्राप्त

झाला असतां, तो तदनुसार बोलेल. ज्ञानी पुरुषास तसे उद्गार काढण्याचें प्रयोजनच नाहीं, कारण शुभ आणि अशुभ या दोहींच्या ठायीं तो समबुद्धीनेंच असतो.

या वरील श्लोकाचा भाव असा आहे कीं, अशी स्थिति होईपर्यंत साधकदशाच समजली पाहिजे. सर्व स्नेह टाकून आपला देह देखील साक्षित्वानें परका पहावा. स्त्री, पुत्र, घर, दार, यांस जागृतींत असतांना स्वप्नाप्रमाणें पहावें. प्रारब्धानें देह, गेह, स्त्री, पुत्र न सुटतील तर त्यांचे ठिकाणीं असलेली ममता टाकावी. नेहमीं स्वरूपीं जागें रहावें ह्मणजे मोह उत्पन्न होत नाहीं. विचारानें जरी याप्रमाणें कळलें, तरी सुखदुःख-काळीं देहात्मता उपजतेच. ह्मणून जीवन्मुक्तिपदास पावण्यास हे अडथळे आहेत. हे विचारानें दूर करून त्या पदास पावावें. सुखीं सुख व दुःखीं दुःख न मानलें ह्मणजे जरी त्या वेळीं देहात्मता उपजली, तरी ती तेवढ्यापुरतीच; तिची बाधा होत नाहीं. असा स्थितप्रज्ञ झाल्यावर तो कांहींच बोलत नाहीं. आपल्याच आनंदांत डुलत असतो. यावरून कोणी असें समजूं नये कीं, तो मुकाच होतो. उपदेश व हरिकथा सांगण्याकडे वाणीचा तो उपयोग करितोच. हें बोलणें प्रपंच नव्हे, कारण यापासून प्रपंचाचा नाश होतो. श्रीशुक स्थितप्रज्ञ भागवत मुके नव्हते. त्यांनीं भागवतनिरूपण केलें व अनेक जनांस उपदेश केला. असे स्थित-प्रज्ञ योगी या जगांत पुष्कळ होऊन गेले. उपदेश किंवा हरिकथामृत जिज्ञासु लोकांस देण्यास ते नेहमीं तयार असत. फक्त टवाळांसारखे वावगे बोल ते तोंडावाटे काढित नसत.

हें अर्जुनाचे दुसरे प्रश्नाचें उत्तर झालें. आतां तिसरा प्रश्न 'स्थितप्रज्ञ काय करून असतो?' याचें उत्तर भगवान् देतात.

यदा संहरते चायं कूर्मोऽगानीव सर्वशः ।
इंद्रियाणींद्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ५८ ॥

**अर्थ.**—जेव्हां असा योगी आपलीं सर्व इंद्रियें पंचविषयांपासून कांसव ज्याप्रमाणें आपले हात पाय आवरून धरितो, त्याप्रमाणें आवरतो, तेव्हां त्याची बुद्धि स्थिर झाली, असें ह्मणावें.

**टीका.**—प्रारब्धकर्म भोगिल्याशिवाय त्याचा क्षय होत नाहीं, हें पूर्वी सांगितलेंच आहे. विनाप्रयत्न जे विषयोपभोग प्राप्त होतील ते भोगतांना कांसव ज्याप्रमाणें आपलें अंग विनाआयास बाहेर काढितो, त्याप्रमाणें हा योगी आपलीं इंद्रियें भोगीं वर्तवितो, व भोग संपल्याबरोबर तीं आवरून घेतो. चेंडू भुईवर आदळला ह्मणजे भुईस स्पर्शून तो वर उडतो, त्याप्रमाणें त्याचें मन तावन्मात्र विषयभूमि स्पर्शून लागलीच चिद्गगनांत उडून जातें. चिखलाचा गोळा भूमीवर आपटला ह्मणजे तो तीस चिकटून राहतो, त्याप्रमाणें अज्ञ लोकांचें मन विषयांस चिकटून राहतें. विषयवासनेमुळें इंद्रियांस इंद्रियत्व आहे. ती वासनाच नसल्यामुळें भोग संपल्याबरोबर, विनाप्रयास, त्याचीं इंद्रियें स्थिर राहतात. काम्य कर्म करणारे लोकही पुढील सुखप्राप्तीकरितां इंद्रियांस त्यांचे विषय देत नाहींत, परंतु असें करणें त्यांस फार कष्टप्रद होतें, कारण वासना कायम ठेवून ते तपश्चर्या करीत असतात. विश्वामित्रासारखा निश्चयी ऋषी तपश्चर्या करित असतां, मेनकेनें त्याचें चित्त हरण केलें, परंतु श्रीशुकाचें मन हरण करणें रंभेच्यानें झालें नाहीं. वासना कायम असतां, जबरदस्तीनें इंद्रियें आवरलीं तर भोगकाळीं श्वानमैथुनासारिखें होतें. मायाकर्तृत्व नवल करण्यासारिखें आहे. स्वस्त्री सुंदर, तरुण व प्रीति करणारी असूनही तिच्याहून कमी रूपवती, वयानें मोठी, व मायावी अशा वेश्येशीं पुरुष संग करितो. अस्तु; यथान्याय व अनायासें जो विषय प्राप्त होईल, तो प्रारब्धप्राप्त मानून स्थितप्रज्ञ आपलीं इंद्रियें वर्तवितो. वासनारहित अंतःकरण असलें ह्मणजे विषयप्राप्तीचा यत्न कोण करील? हें सिद्ध पुरुषाचें लक्षण सांगितलें. साधकानें इंद्रियांची कंडू सोसून स्वरूपीं चित्त देण्याचा अभ्यास केला असतां तोही या स्थितीस पावतो.

याप्रमाणें तिसऱ्या प्रश्नाचें उत्तर दिलें. विषयवासना मनांत नसून अनायासें विषयांपासून इंद्रियें आवरणें हा गुण ज्वारित व उपवासी पुरुषांतही दिसतो. तेव्हां तेही स्थितप्रज्ञच कीं काय अशी शंका अर्जुनास आली. तिचें निरसन भगवान् करितात.

**विषया विनिवर्तंते निराहारस्य देहिनः ।**
**रसवर्जं रसोऽप्यस्य परं दृष्ट्वा निवर्तते ॥ ५९ ॥**

**अर्थ.**—निराहारी लोकांचे विषय नाहींसे होतात, परंतु वासना कायम असते. स्थितप्रज्ञाची वासना परमेश्वरस्वरूप पाहून नाहींशी होते.

**टीका.**—ज्या इंद्रियाचा जो विषय असतो तो त्याचा आहारच समजला जातो. यावरून **निराहारी** या शब्दांत लंघनी व ज्वारित या दोन्ही पुरुषांचा समावेश होतो. अशा प्रकारचे देहाभिमान असणारे निराहारी पुरुषाचे इंद्रियांचे विषय त्यापासून दूर होतात, परंतु निःशक्तपणामुळें तितक्यापुरती तशी त्यांची स्थिति असते. "**अशक्तः सहजः साधुः**" ही ह्मण एथें लागू पडते. पण त्यांची वासना कायमच असते व शक्ति आल्यावर उपभोग घेण्याची ते लाळ घोटीत असतात. स्थितप्रज्ञाची अशी गोष्ट नसते. त्याची वासना देखील आत्मस्वरूप पाहून नाहींशी होते. स्वरूपामृत त्यास मिळूं लागल्यावर विषयसुखरूप कांजीची इच्छा कशी होईल? आणि ह्मणूनच कूर्मांगाप्रमाणें तो आपलीं इंद्रियें अनायासें आवरून धरितो.

सर्व जगच ब्रह्मरूपानें ज्या स्थितप्रज्ञास भासूं लागलें त्याला इंद्रियें आटोपून बसण्याची जरूर तरी कां असावी, अशी शंका अर्जुनास आली, ती सर्वेश्वरानें जाणून पुढील समाधान सांगितलें.

**यततो ह्यपि कौंतेय पुरुषस्य विपश्चितः ।**
**इंद्रियाणि प्रमाथीनि हरंति प्रसभं मनः ॥ ६० ॥**

**अर्थ.**–हे अर्जुना, मनुष्य ज्ञानसंपन्न असला व जपूनही वागत असला तरी क्षोभक अशीं इंद्रियें जबरदस्तीनें त्याचें मन हरण करितात.

**टीका.**–**विपश्चित्** या शब्दाचा अर्थ सर्वज्ञ असा आहे. तो योग्य रीतीनें एथें उपयोगांत आणिला आहे. सर्व जगताचें अधिष्ठान अशी एक आत्मसत्ता कळली ह्मणजे सर्व जगत् कळलें. जसें, समुद्र ओळखिला असतां, तरंग ओळखिल्याप्रमाणेंच आहेत. ह्मणून त्यास "**सर्वज्ञ**" या शब्दानें आळविलें आहे. एथें कोणी अशी शंका घेतील कीं, ईश्वरही सर्वज्ञ आहे. तर त्यांत व यांत काय अंतर राहिलें? याचें उत्तर असें कीं, सोनार व सुवर्णपरीक्षक असे दोघेही सुवर्णाचा अलंकार कसास लावून त्या सोन्याचा कस समजतात. यामुळें दोघेही सुवर्णज्ञ खरेच, परंतु सोनाराचे अंगीं अलंकार घडण्याची कला असते, ती परीक्षकांचे अंगीं नसते. त्याचप्रमाणें ईश्वर सृष्टिनियंता आणि स्थितप्रज्ञ सृष्टि जाणता यांत फरक आहे. स्थितप्रज्ञास मुक्तीची जरूरी असते व त्याजकडे सृष्टि उत्पन्न करण्याचें काम नसतें, ह्मणून ईश्वराचे सर्वज्ञतेची त्यास जरूर नाहीं. ज्ञानी पुरुषांसही भूतभविष्याचें ज्ञान होतें. परंतु या शक्तीचा उपयोग करूं नये ह्मणून सद्गुरूची कडक आज्ञा असते, कारण तसें केलें असतां तात्कळ देहाभिमान उत्पन्न होऊन चढलेल्या उच्चपदापासून तो घसरेल. शिवाय हें सर्वज्ञत्व नसलें, तरी मुक्ति अडत नाहीं ह्मणून आत्मज्ञ कार्यापुरता सर्वज्ञच होय.

असा सर्वज्ञ आपलीं इंद्रियें आवरणार नाहीं तोंपर्यंत तो स्थितप्रज्ञच नव्हे. सर्व ब्रह्म जरी कळलें तरी पूर्वसंस्कारानें तीं दुर्निवार असतात. सर्वच ब्रह्म असें समजून जर तो आपलीं इंद्रियें मोकळीं सोडील, तर ब्रह्म विसरून भ्रम पावेल. याकरितां त्यानें नेहमीं इंद्रियांचा जय ठेवण्याचा यत्न केलाच पाहिजे. नाहीं तर तीं त्याचें मन बलात्कारानें हरण करतील. ज्ञानी पुरुषाचें मन विवेकाचे आंत लपून बसतें. तेथून-

ही ताकांतून मंथन करून बलात्कारें लोणी काढितात, त्याप्रमाणें इंद्रियें, मंथन करून ह्मणजे बलात्कारें, विवेकांतून मन बाहेर ओढून काढितात, ह्मणून त्यास "प्रमाथी" असें ह्मटलें आहे. ही इंद्रियांत असलेली शक्ति अनादि मायेचीच शक्ति आहे. ह्मणून तिच्या सपाट्यांत न जाण्याचे अभ्यास आणि विरक्ति, हे दोन मार्ग आहेत. आत्मज्ञान होऊन इंद्रियें ताब्यांत ठेवण्याची खटपट केली तरी तीं मनास हरण करितात. पण कूर्मांगांप्रमाणें अनायासें स्थितप्रज्ञ इंद्रियें आवरून असतो, तेव्हां वर सांगितलेल्या दोन उपायांपेक्षां तिसरा उपाय असला पाहिजे कीं, ज्या उपायानें स्थितप्रज्ञ इंद्रियें आवरून धरूं शकतो. तो उपाय कोणता हें भगवान् सांगतात.

**तानि सर्वाणि संयम्य युक्त आसीत मत्परः ।**
**वशे हि यस्येंद्रियाणि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ६१ ॥**

**अर्थ.**--हे अर्जुना, जो आपलीं इंद्रियें आवरून व स्वस्वरूपीं मन योजून मत्पर ( सगुणभजनीं सादर ) राहतो, व ज्याचीं इंद्रियें वश झालेलीं असतात त्याची बुद्धि स्थिर झाली असें ह्मणावें.

**टीका.**–असा योगी इंद्रियांस आवरून व स्वस्वरूपीं चित्त योजून असला तरी त्याचें मन हरण होतें ह्मणून तो सगुणभजनीं सादर असतो. अशा भजनबळापुढें इंद्रियांचें कांहीं चालत नाहीं. मन आपले शक्तीनें विषय कल्पितें तेव्हांच इंद्रियांच्या वृत्ति उठतात. ह्मणून मनास कल्पनाच न करूं देणें, हाच मार्ग इंद्रियदमनाचा होय. कितीही विचार केला तरी निर्विकल्प निर्गुणाकडे मन लागत नाहीं. तें वारंवार विषयांकडे धांव घेतें. सगुण ईश्वर निर्गुणच आहे व सर्व जगदाकार त्याच्याच कल्पनेनें झाला आहे असें स्मरणांत ठेवून, निरनिराळ्या विषयांचें भगवद्भावानें भजन केलें असतां, निर्गुणस्वरूपाची प्राप्ति होते. सगुण साकार विश्व निर्गुणाचेंच रूप आहे असें ज्ञान झाल्यावर कळतें व तसें तदनंतर

नहमीं लक्षांत ठेविलें ह्मणजे त्यास निर्गुणस्फूर्ति लागतात. अशी निर्गुण-स्फूर्ति सगुण साकार विश्वाचे ठायीं कायम ठेविली ह्मणजे इंद्रियजय राहतो. हा "मत्पर" याचा भावार्थ होय. याप्रमाणें सगुणीं मन तत्पर राहिलें नाहीं, तर निर्गुणीं स्थिर राहत नाहीं व तशी स्थिरता राहिली नाहीं ह्मणजे भ्रम उत्पन्न होऊन विषयरूपानेंच विषय दिसूं लागतात वें अनर्थ होतो. त्याचा क्रम आतां भगवान् सांगतात.

**ध्यायतो विषयान्पुंसः संगस्तेषूपजायते ।**
**संगात्संजायते कामः कामात्क्रोधोऽभिजायते ॥ ६२ ॥**
**क्रोधाद्भवति संमोहः संमोहात्स्मृतिविभ्रमः ।**
**स्मृतिभ्रंशाद्बुद्धिनाशो बुद्धिनाशात्प्रणश्यति ॥ ६३ ॥**

**अर्थ.**–जो मनुष्य विषयांचें चिंतन करितो त्यास त्यांचा लोभ उत्पन्न होतो. लोभामुळें इच्छा उत्पन्न होते. इच्छेला प्रतिबंध झाला ह्मणजे क्रोध उत्पन्न होतो. क्रोधामुळें तारतम्यज्ञान नाहींसें होतें आणि त्यामुळें बुद्धि नष्ट होते. बुद्धीचा नाश झाला ह्मणजे सर्वस्वाचा नाश होतो.

**टीका.**– ध्यानानें विषयांचा आदर उत्पन्न होतो, त्यास **संग** ह्मणावें. त्यापासून तीव्र काम उत्पन्न होतो. तो होण्यापूर्वींच विचारानें मन वळवितां येतें. संग तोच काम होय. असा तीव्र काम उत्पन्न झाला ह्मणजे तो पूर्ण होण्यास कदाचित् विघ्नें येणार. विघ्नें आलीं कीं क्रोध बहालच आहे. क्रोध उत्पन्न झाला ह्मणजे बऱ्यावाईटाच्या विचारास बिदागीच मिळते. गुरुशास्त्रबोधानें ज्ञान प्राप्त होऊनही जर वेळेवर मन आटोपलें नाहीं, तर तोही अज्ञान मनुष्याप्रमाणेंच वाहवतो ह्मणून, मत्पर रहा ह्मणजे निर्गुण्यैक्यें सगुणभजन कर, असें भगवान् सांगतात.

असा अर्थ सरळ दिसतो, तरी निर्गुणाभिमानी कांहीं टीकाकार या "**मत्पर**" शब्दाचा अर्थ "**निर्गुणपर**" करितात. हा अर्थ खरा समजावा तर मागें जो विपश्चित् वर्णन केला त्याचें मन त्याच्या इंद्रि-

यांना बलात्कारानें हरण करितें असें भगवान् बोलले. तेव्हां तो विपश्चित् निर्गुणपर नव्हे काय असा बळकट संशय उत्पन्न होतो. आधीं निर्गुण-ज्ञान, मग निर्गुणचिंतन आणि त्याकरितां इंद्रियदमन पाहिजे. तें झालें ह्मणजे स्थितप्रज्ञ झाला असा क्रम आहे. "**यततोह्यपि कौंतेय**" या श्लोकांत जो "**विपश्चित्**" शब्दानें वाखाणिला, त्याची स्थिति, या अर्थाप्रमाणें, साधकाची होते. त्या श्लोकानंतर दुसरे श्लोकांत भगवान् सांगतात कीं, इंद्रियें अशीं अनावर आहेत, तरी "**मत्पर**" राहिल्यानें तीं वश होतात. ह्मणजे तसें राहणें, हें एक विशेष साधन या श्लोकानें सांगितलें हें सिद्ध होतें, व असें विशेष साधन "**निर्गुणपर राहणें**" विपश्चित् ह्मणून वर्णन केलेल्या पुरुषाला नाहीं, असें दिसून येतें, ह्मणून तो साधक होतो. पण तें वर्णन स्थितप्रज्ञाचें आहे हें निर्विवाद आहे. तेव्हां **मत्पर** या शब्दाचा अर्थ निर्गुणपर नाहीं हें सिद्ध झालें. बरें, तो विपश्चित् निर्गुणपर आहे असें ग्रहण केलें, तर जो पूर्वींच निर्गुणपर होता, त्याचीं इंद्रियें चंचळ न व्हावीं, यासाठीं निर्गुणपर होण्याचें विशेषत्वें साधन सांगितलें, यांत भगवंताचा वेडेपणा दिसतो. तेव्हां दोन्ही बाजूंनीं हा अर्थ खोटा ठरतो. यावरून "**मत्पर**" शब्देंकरून "**सगुणपर**" हेंच स्पष्ट झालें. या श्लोकाचा भावार्थ असा कीं, सगुण सर्वेश्वराचें भजन केल्यानें तो प्रसन्न होऊन भक्तांचें मन प्रसन्न करितो.

एथें अर्जुनास शंका आली कीं, ज्ञानी पुरुषाचा देह देखील प्रारब्धाचाच असतो, तेव्हां त्यास विषय भोगावे लागतीलच, व ते भोगितांना बरेंवाईट वाटणारच, तसें वाटल्यानें अहंकार उठलाच, व तो उठला ह्मणजे ज्या सगुणध्यानानें मनाची प्रसन्नता राहते ह्मणून भगवान् सांगतात, तें ध्यानच होणार नाहीं. तेव्हां मनाची प्रसन्नता कशी राहणार याचा परिहार पुढले श्लोकांत केला आहे.

**रागद्वेषवियुक्तैस्तु विषयानिंद्रियैश्चरन् ।**
**आत्मवश्यैर्विधेयात्मा प्रसादमधिगच्छति ॥ ६४ ॥**

अर्थ.–मनोजयी पुरुष प्रीति आणि द्वेष यांपासून मोकळीं व मनाच्या स्वाधीन असलेलीं जों इंद्रियें, त्यांच्या द्वारा विषयसेवन करितो, ह्मणून त्यास चित्ताची प्रसन्नता प्राप्त होते.

टीका.–ज्याला विषयप्रीति असते त्यालाच वर सांगितल्याप्रमाणें अनर्थ प्राप्त होतात. जो आत्मरसाचें सेवन करितो, तो विषय कसे भोगितो, तें ऐका. विषय सुख देतात ह्मणून त्यांचें तो कौतुक करित नाहीं. कारण ते खाजविलेल्या खरुजेप्रमाणें दुःख देतात, हें त्याचे नेहमीं लक्षांत असतें. विषयसुख हें पुण्याचें ऋण होय. हें भोगूनच फेडलें पाहिजे, ह्मणून तें भोगितांना तो सुख मानीत नाहीं. प्रारब्धाच्या जोरानें तें भोगणें भाग आहे व तसें करून तें ऋण फेडलेंच पाहिजे, असें समजून प्राप्त विषयांचे ठायीं प्रीति न ठेवितां, त्यांचा उपभोग तो इच्छेविरुद्ध घेतो. त्याचप्रमाणें कष्टी झाल्यावांचून दुःखरूपी ऋण फिटणार नाहीं असें समजून त्याचे उपभोगीं तो द्वेषरहित असतो. निर्गुणत्वें सगुण भजन करून तो जिवंतपणींच मुक्तीचा सोहळा भोगीत असतो. प्रारब्धरूप ऋण, भोगानें फिटत आहे, याचें त्यास समाधानच वाटतें. इंद्रियें वश असल्यानें त्याचें मन त्याचे ताब्यांत राहतें. अशा मनाच्या साह्यानें सगुणभजन केलें असतां परमेश्वराचा प्रसाद प्राप्त होतो.

प्रसादे सर्वदुःखानां हानिरस्योपजायते ।
प्रसन्नचेतसो ह्याशु बुद्धिः पर्यवतिष्ठते ॥ ६५ ॥

अर्थ.–असा प्रसाद प्राप्त झाला असतां ज्ञानी पुरुषाच्या सर्व दुःखांचा नाश होतो, कारण ज्याचें चित्त प्रसन्न आहे, त्याची बुद्धि फार जलद स्थिरता पावते.

टीका.–ईशप्रसादेंकरून चित्त प्रसन्न झालें ह्मणजे जीवन्मुक्तिसुखाची समृद्धिच होते. सर्व दुःखांचें बीज वासना होय. हीच नष्ट झाली

ह्मणजे स्वस्वरूपीं चित्त आपोआप स्थिर होतें; व तें स्वरूप सर्वव्यापक आहे असा बुद्धीचा निश्चय झाला ह्मणजे प्रतिबिंबांश दिसतच नाहीं. बुद्धि आणि विषय यांच्या संयोगानें प्रतिबिंब उत्पन्न होतें. पण या गृहस्थाच्या बुद्धीस सर्वत्रच स्वरूप (बिंब) दिसतें, मग प्रतिबिंब कोठून उत्पन्न होणार? हें सर्व फल सगुण ईश्वराच्या प्रसादाचें होय. श्रुति सांगते कीं, 'यस्य देवे परा भक्तिर्यथा देवे तथा गुरौ । तस्यैते कथिता ह्यर्थाः प्रकाशंते महात्मनः ॥' ह्मणजे देवाचे ठायीं तशीच गुरूचे ठायीं भक्ति केली असतां, गुरूपदेशाचा प्रकाश शिष्याचे अंतःकरणांत पडतो, ह्मणून ज्ञान प्राप्त होण्याकरितां देव आणि गुरु यांची भक्ति केली पाहिजे, हेंही येथें सांगितल्यास वावगें होणार नाहीं.

आत्मज्ञान झाल्यावर निर्गुणत्वें सगुणध्यान करून चित्ताची प्रसन्नता होते व बुद्धि स्थिरता पावते. पण असें होण्यास रागद्वेषरहित इंद्रियें सहाकारी असलीं पाहिजेत, असें भगवंतांनीं एथपर्यंत सांगितलें. परंतु अर्जुनास वाटलें कीं, सगुणध्यानबळानेंच इंद्रियदमन होणार, मग रागद्वेषरहित इंद्रियांचें साह्य कशास पाहिजे? याचें उत्तरश्लोकीं निरसन केलें आहे.

**नास्ति बुद्धिरयुक्तस्य न चायुक्तस्य भावना ।**
**न चाभावयतः शांतिरशांतस्य कुतः सुखम् ॥ ६६ ॥**

**अर्थ.**—ज्यास इंद्रियें वश नाहींत त्यास बुद्धि नाहीं व भावना ह्मणजे ध्यानही नाहीं. ध्यानरहित पुरुषास शांति ह्मणजे स्वरूपनिष्ठता नाहीं. मग अशा अशांतास मोक्षानंद कसा मिळेल?

**टीका.**—रागद्वेषविरहित होऊन ज्यानें इंद्रियग्राम जिंकला नाहीं त्यास **अयुक्त** ह्मणावें. अशा अयुक्त नरास बुद्धि कोठून असणार? विषयसेवनीं इंद्रियें बेछूट सोडिलीं असतां बुद्धि नष्ट होते, हें पूर्वीं सांगितलेंच

आहे. अशा बुद्धिनष्टास निर्गुणैक्यें सगुणध्यान कोठून होणार बरें? काष्ठांत अग्नि आहे, परंतु मंथन केल्यावांचून तो बाहेर निघत नाहीं. त्याप्रमाणें बुद्धींत ज्ञान असूनही विचारानें मंथन केल्याशिवाय तें प्राप्त होत नाहीं. काष्ठांत अग्नि दिसूं लागल्यावर त्यास वारा न मिळेल तर तो विझूं लागतो. त्याचप्रमाणें ज्ञान झाल्यावरही इंद्रियसंयमरूपी वारा त्या ज्ञानास न लागेल, तर तें ज्ञान हळू हळू नाहींसें होणारच. ह्मणून इंद्रियसंयम ज्ञानवृद्धीस अगदीं आवश्य आहे. अयुक्तांस इंद्रियसंयम नसल्यानें त्यांचें मन विषयांकडे धांवणार. मग त्यांस ध्यान कसें बाणेल? ध्यानीं मन न रिघेल तर शांति मिळणारच नाहीं, आणि शांति नसली तर अर्थात् सुखही नाहीं.

**भावना** शब्दें ध्यान ह्मणून सांगितलें तें सगुणध्यान होय. कोणी त्याचा अर्थ निर्गुणध्यान ह्मणून करितात तो बरोबर नाहीं, कारण भावना ह्मणजे कल्पना. निर्गुणीं कल्पना तर नाहींच ह्मणून सगुणध्यानकल्पनेस भावना ह्मणावें. एवंच, इंद्रियें यत्नानें आवरलीं असतां सगुणध्यान बाणतें. ध्यान बाणलें ह्मणजे इंद्रियें अनायासें आवरलीं जातात, असें स्पष्ट सिद्ध झालें. विषय सेवित असतां, मन सावध ठेविलें नाहीं, तर अनर्थ होतो, असें आतां भगवान् पुढील श्लोकांत सांगतात.

**इंद्रियाणां हि चरतां यन्मनोनुविधीयते ।**
**तदस्य हरति प्रज्ञां वायुर्नावमिवांभसि ॥ ६७ ॥**

**अर्थ.**-इंद्रियें विषयांचें सेवन करीत असतां ज्याचें मन आवरलेलें नसतें, त्याच्या बुद्धीस त्याचें मन, समुद्रांत वायु नावेचें जसें हरण करितो, तसें हरण करितें.

**टीका.**—रागद्वेषविरहित असूनही इंद्रियांनीं विषयसेवन करित असतां मन त्या प्रवाहीं पडूं देऊं नये. कारण एकाही इंद्रियाकडे जरी मन

गेलें, तरी तें स्वरूपापासून वेगळें होऊन विषयासक्त होतें. संसारसमुद्रांत बुद्धि ही नाव आहे व विषयवासना वारा होय. वासनेवेगळा विषयवारा इंद्रियाचें प्रारब्धलब्ध खाद्य आहे खरें, तथापि मन नावाडी सावध पाहिजे, नाहींतर बुद्धिरूप नावेचा वासनारूप वाऱ्यानें चुराडा होईल, यांत संशय नाहीं. एका इंद्रियावर मनाची उडी पडल्यानें जर असा अनर्थ होतो, तर सर्व इंद्रियें अनावर झालीं ह्मणजे काय परिणाम होईल, याचा विचार सुज्ञ वाचकच करोत.

**तस्माद्यस्य महाबाहो निगृहीतानि सर्वशः ।**
**इंद्रियाणींद्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ६८ ॥**

**अर्थ.**–ह्मणून, हे महाबाहो अर्जुना, ज्यानें आपलीं सर्व इंद्रियें त्यांचे त्यांचे विषयांपासून नीट आवरून धरलीं आहेत, त्याची बुद्धि स्थिर झाली असें ह्मणावें.

अर्जुनाच्या तीन प्रश्नांचें उत्तर एथपर्यंत झालें. आतां स्थितप्रज्ञाचें वर्तन कसें असतें, या चवथ्या प्रश्नाचें उत्तर भगवान् देतात.

**या निशा सर्व भूतानां तस्यां जागर्ति संयमी ।**
**यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः ॥ ६९ ॥**

**अर्थ.**–सर्व प्राण्यांची जी रात्र त्या रात्रींत वर सांगितलेला इंद्रियसंयम करणारा जागतो व ज्या वेळीं प्राणी जागे असतात, ती आत्मतत्व पाहणाऱ्या मुनीची रात्र असते.

**टीका.**–सर्वसामान्य प्राणी विषयांचे ठिकाणीं जागे असतात व स्वस्वरूपाचे ठायीं त्यांची विस्मृति ह्मणजे निद्रा असते. निद्रा ह्मणजे रात्र व जागृति ह्मणजे दिवस. परंतु स्थितप्रज्ञाची वागणूक याचे उलट असते,

असें भगवान् दाखवितात. स्थितप्रज्ञ स्वरूपाचे ठायीं नेहमीं जागा असतो व विषयांचे ठिकाणीं त्याची विस्मृति असते. असा ब्रह्मनिष्ठ विषय जाणतच नाहीं असें नाहीं. विषय त्याचे इंद्रियांस भासतात, परंतु ते तो ब्रह्मरूप पाहतो, ह्मणून ते त्यास बाधा करीत नाहींत. नेत्रांस अंधकार दिसतो, परंतु त्यांत आवृत असलेले पदार्थ दिसत नाहींत. त्याप्रमाणें विषय त्यास दिसतात, परंतु त्यांत गुप्त असणारे कामलोभादिकांस तो पहात नाहीं, कारण त्यास वासनाच नसते. सराफाचें लक्ष सोन्यावर असतें, पण वेश्येचें लक्ष अलंकारांवर असतें. तद्वत् संयमी सर्व जगत् ब्रह्मरूप पाहतो. परंतु सामान्य जन विषयनिष्ठ असल्यानें त्यास सर्व जगत् विषयरूपच भासतें. वरप्रमाणें संयमी इंद्रियें आवरून असतो, पण भोगकाळीं तो इंद्रियें वर्तवितो तेव्हां त्यास संयमी कसें ह्मणावें असा अर्जुनास संशय आला. त्याचे परिहारार्थ भगवान् पुढील श्लोक सांगतात.

आपूर्यमाणमचलप्रतिष्ठं समुद्रमापः प्रविशंति यद्वत् ।
तद्वत्कामा यं प्रविशंति सर्वे स शांतिमाप्नोति न कामकामी ॥७०॥

**अर्थ.**—समुद्रांत नद्यांचा संतत प्रवाह चालला असून तो मर्यादा सोडून जात नाहीं. त्याप्रमाणें त्याचे ठायीं सर्व कामना प्रवेश करितात, परंतु तो शांतीप्रतच पावतो. भोगाची इच्छा करणाऱ्याची गोष्ट अशी नाहीं.

**टीका.**—हजारो नद्या समुद्रांत सारख्या पाणी पोंचवीत असतात. परंतु समुद्र मर्यादा सोडून पलीकडे गेला असें कधींही होत नाहीं. तसेंच इंद्रियग्राम वासनायुक्त नसल्यामुळें विषयोपभोगीं संयमी पुरुष कधींही चंचल होत नाहीं. त्याची शांति कायम राहते. परंतु विषयसुखाची इच्छा असलेल्या प्राण्यांची तशी स्थिति नसते. लहान ओहळास पर्जन्याचे पाण्यानें पूर येतो, पण ज्या नदीस तो मिळतो तिलाही पूर असला ह्मणजे तो उफराटा वाहूं लागतो. तसें वासनारूप ओहळास विषयरूप

पर्जन्याचें पाणी मिळालें म्हणजे भोक्ता प्रफुल्लित होतो. त्यांत धनसंचयनदीचा पूर असला म्हणजे तो गर्वानें फुगून उफराटा चालूं लागतो.

एवंच, विषय भोगिले तरी संयमी पुरुषाची शांति ढळत नाहीं, हें अर्जुनास समजून तो समाधान पावला. पण ही स्थिति पावण्यास सरळ साधन कोणतें तें समजण्याची त्यास इच्छा झाली, म्हणून भगवान् तें साधन सांगतात.

**विहाय कामान्यः सर्वान्पुमांश्चरति निस्पृहः ।**
**निर्ममो निरहंकारः स शांतिमधिगच्छति ॥ ७१ ॥**

**अर्थ.**–सर्व कामना टाकून जो निस्पृह वागतो, व जो ममता आणि अहंकार बाळगीत नाहीं, त्यास शांति प्राप्त होते.

**एषा ब्राह्मी स्थितिः पार्थ नैनां प्राप्य विमुह्यति ।**
**स्थित्वास्यामंतकालेऽपि ब्रह्मनिर्वाणमृच्छति ॥ ७२ ॥**

**अर्थ.**–हे अर्जुना, जी ब्राह्मी स्थिति ती वर सांगितलेलीच होय. ही प्राप्त झाली असतां मोह उत्पन्न होत नाहीं. अंतकाळीं जरी ही स्थिति राहिली तरी निर्वाणप्राप्ति होते.

**टीका.**–स्थितप्रज्ञाची जी स्थिति सांगितली तिलाच ब्राह्मी स्थिति असें म्हणावें. ही स्थिति मनुष्यप्राण्यांत मूळचीच नाहीं असें नाहीं. कधीं कधीं सर्व मनुष्यांच्या अनुभवास ती येते. परंतु त्या स्थितीचें त्यांस ज्ञान नसतें; व ती नेहमीं राहूं शकत नाहीं. तीच वैराग्यानें आणि अभ्यासानें कायम ठेविली असतां मनुष्य मुक्त होतो. अशी ब्रह्मस्थिति पावल्यावर भ्रम कोठचा राहणार बरें ? याकरितां सत्वरजतमरहित ( ज्यास **नित्यसत्व** म्हणून पूर्वीं म्हटलें आहे ) करून त्याचेच ठायीं बुद्धि स्थिर करावी.

पूर्वभाग्यानें अंतकाळीं जरी ब्रह्मज्ञानी भेटून त्याचे उपदेशानें ही ब्रह्मस्थिति राहिली, तरी मुक्ति होणार यांत शंका नाहीं. परंतु असें घडणें अपवादादाखल होय, नियमांतली गोष्ट नव्हे. ह्मणून मुमुक्षूनें वैराग्य आणि अभ्यास यांचा आश्रय करून ती स्थिति जिवंत असतांनाच प्राप्त करून घेणें विचाराचें होय.

ह्या दुसरे अध्यायांत सर्व गीतेचा सारांश आहे. आतां तिसरे अध्यायांत भगवान् तपशीलवार रीतीनें कर्मसिद्धांत सांगतील.

ही दुसरे अध्यायाची टीका जगत्पिता व माझा पिता जो कृष्ण त्याचे चरणीं पुत्रभावानें सेवेदाखल अर्पण करितों.



श्री.

# अध्याय ३ रा.

ॐ नमो भगवते वासुदेवाय.

कर्माहून ज्ञान थोर असें दुसरे अध्यायांत निरूपण झालें. कर्म करून चित्तशुद्धि झाली ह्मणजे ज्ञानसिद्धि होते, हें मात्र अर्जुन विसरला, परंतु ज्ञानप्रशंसा त्याच्या पूर्ण लक्षांत राहिली. ज्याला जें करणें आवडत नाहीं, तिकडे तो लक्ष देत नाहीं व तसें केल्यानें तो ती गोष्ट विसरतो. युद्ध करणें अर्जुनाचे जिवावर आलें होतें, ह्मणून तिकडे त्याचें पूर्ण लक्ष राहिलें नाहीं व ज्ञानच श्रेष्ठ एवढें धरून बसला. व आपले मनास अनुसरून संशययुक्त प्रश्न करूं लागला एथून तिसरे अध्यायास सुरुवात झाली आहे.

ज्यायसी चेत्कर्मणस्ते मता बुद्धिर्जनार्दन ।
तत्किं कर्मणि घोरे मां नियोजयसि केशव ॥ १ ॥

**अर्थ.**–हे कृष्णा, जर कर्माहून बुद्धि श्रेष्ठ असें तुझें मत आहे, तर या घोर कर्माचे ठायीं मला तूं कां प्रवृत्त करितोस बरें?

**टीका.**–“ दूरेणह्यवरं कर्म ” या श्लोकानें ज्ञानाहून कर्म फारच नीच असें भगवान् बोलले, हें लक्षांत ठेवून अर्जुन ह्मणतो, “ देवा, माझें कर्म फारच नीच आहे, कारण दुसऱ्याचा प्राण घेण्यास तूं मला सांगतोस. ते अन्यायी असतील तर त्वां जनार्दनें त्यांस मारावें; मला तें कर्म करण्यास काय ह्मणून सांगतोस? ”

हें अर्जुनाचें वचन ऐकून भगवान् मंद हास्य करूं लागले. तें पाहून अर्जुनास वाटलें कीं, आपण अयुक्त बोलतों, असें समजून भगवान् हांसतात. त्याबरोबर "**धर्म्याद्धि युद्धाच्छ्रेयोऽन्यत्**" हें भगवंतांचें वाक्य त्यास आठवलें व लाजून पुढील श्लोक बोलतो.

**व्यामिश्रेणेव वाक्येन बुद्धिं मोहयसीव मे ।**
**तदेकं वद निश्चित्य येन श्रेयोऽहमाप्नुयाम् ॥ २ ॥**

**अर्थ**—हे देवा, धरसोडीचें तुझें बोलणें ऐकून माझे मनांत भ्रम उत्पन्न झाला आहे. करितां जेणेंकरून माझें कल्याण होईल अशी निश्चयानें एकच गोष्ट सांग.

हें ऐकून भगवान् ह्मणतात

**लोकेऽस्मिन् द्विविधा निष्ठा पुरा प्रोक्ता मयानघ ।**
**ज्ञानयोगेन सांख्यानां कर्मयोगेन योगिनाम् ॥ ३ ॥**

**अर्थ.**—ह्या लोकीं दोन प्रकारच्या निष्ठा आहेत, असें मी पूर्वींच सांगितलें आहे. सांख्यांची ज्ञानयोगावर व योग्यांची कर्मयोगावर.

**टीका.**—अर्जुनानें केलेला प्रश्न केवळ निष्कारण होता, असें नाहीं, कारण या लोकीं दोन प्रकारच्या निष्ठा आहेत, हें भगवंतच यापूर्वीं बोलले आहेत. आत्मा काय व अनात्मा काय असा विचार करणारे सांख्यांना ज्ञानयोगच योग्य आहे, कारण त्यांची चित्तशुद्धि पूर्वींच झाली असल्या कारणानें आत्मता त्यांस कळूं लागते. अशा लोकांस ज्ञानयोग केला पाहिजे, ह्मणजे त्यांनीं इंद्रियदमन करून स्वरूपीं मन लावून ध्यान करावें. ज्यांची चित्तशुद्धि झाली नाहीं, त्यांनीं तदर्थ निष्काम कर्मच केलें पाहिजे. "**चित्तशुद्धि**" हा शब्द सर्व ग्रंथांतून उपयोगांत आणिला आहे. परंतु याचें वर्म न समजल्यामुळें फार घोटाळा होतो, करितां त्याची

समजूत करून दिली पाहिजे. सर्वांचें चित्त मूळचें शुद्धच आहे. परंतु विषयांच्या संपर्कानें त्यांची आसक्ति उत्पन्न होऊन, चित्तावर त्या आसक्तीचीं पुटांवर पुटें चढतात. विषयासक्ति हाच मल होय. हा मळ काढून टाकणें ह्मणजे चित्तशुद्धि करणें होय. रजतममिश्रित सत्वास आत्मा कळत नाहीं, हें पूर्वीं सांगितलेंच आहे, कारण रज ( इंद्रियें ) व तम ( विषय ) यांचेपलीकडे तो आहे. चित्त सत्वरूप आहे हेंही पूर्वीं सांगितलेंच आहे. ह्मणून जोंपर्यंत इंद्रियें आणि विषय यांच्या संयोगापासून होणारे सुखाची आसक्ति मनांतून गेली नाहीं, तोंपर्यंत चित्त अशुद्ध आहे, असें समजावें. हा आसक्तिरूप मळ जाऊन चित्त शुद्ध झालें ह्मणजे आत्म्याचें स्वरूप अनुभवास येऊं लागतें. यावरून चित्तशुद्धीचा तात्पर्यार्थ वैराग्यप्राप्ति असा झाला. मूळचें शुद्ध चित्त एकदम थोडेंच अशुद्ध होतें. बहुत काळपर्यंत विषयसुखाचा संयोग झाल्यामुळें आसक्तिरूप मळाचीं पुटें जडलीं असतात, त्यांमुळें ती आसक्ति ह्मणजे मळ चित्तास फार घट्ट चिकटलेला असतो. कोणतीही फार दिवसांची संवय मोडणें झाल्यास, ती हळू हळू मोडावी लागते. तद्वत्, विषयोपभोगाचे संवयीनें चित्तावर चढलेला हा मळ हळू हळू नाहींसा केला पाहिजे व निष्काम कर्म करणें ह्मणजे तेंच करणें होय. मनुष्य प्रत्येक कर्म कांहीं तरी फळाचे आशेनेंच करितो, व तें फळ प्राप्त झालें ह्मणजे त्याचा उपभोग घेतो. अशा उपभोगानें त्या त्या विषयांची आसक्ति बळकट होत जाते. याचें मूळ फलाशा होय हें उघड दिसतें. ती फलाशा नाहींशी करून, तीविरहित कर्म केलें ह्मणजे पारिणामिक आसक्तिरूप मळ चित्तावर चढत नाहीं, व पूर्वींचा जमलेला मळ कालावधीनें विस्मृतीचे रूपानें नाहींसा होतो, ह्मणजे विषयांचा विराग उत्पन्न होतो. हेंच वैराग्य दृढ झालें ह्मणजे चित्त रजतमरहित होतें. तेव्हां चित्त शुद्ध झालें असें समजावें, आणि तेव्हांच तो पुरुष ज्ञानयोगास पात्र होतो. कोणताही उत्तम परिणाम एकदम व्हावा असें वाटणें सहज आहे, त्याप्रमाणें सर्वांत

श्रेष्ठ अशा ब्रह्मसुखाची प्रशंसा ऐकिल्याबरोबर तें एकदम मिळावें असें वाटतें. परंतु तें प्राप्त होण्यास चित्त शुद्ध असलें पाहिजे. व ती योग्यता आपले अंगीं आहे कीं नाहीं याचा विचार खऱ्या उत्सुक मनुष्यानें केला पाहिजे. या लिहिण्यानें आमचे आलीकडील मंडळीस दोष देतों असें नाहीं. हा मनाचा सहज धर्म आहे. कारण भगवंताचें सान्निध्य असूनही अर्जुनाची हीच स्थिति होती, हें स्पष्ट झालेंच आहे. **चित्तशुद्धि** हा शब्द शेंकडो वेळ ऐकूनही वरील विचार मनांत येत नाहींत. यावरून त्या शब्दाचा खरा अर्थच न समजल्यामुळें सर्व लोक एकदम ज्ञानमार्गावर उडी मारतात, ह्मणून तो अर्थ व्यक्त केला आहे. त्याचें नीट मनन करावें. चित्त शुद्ध नसल्यास योगाचा अभ्यास करून तें शुद्ध करावें. नंतर आत्मानात्मविचार करूं लागतो. तो करूं लागला ह्मणजे ज्ञानयोगाचा अभ्यास केला पाहिजे. याचकरितां, भगवान् कर्मयोग कसा करावा हें खुलासेवार सांगतात.

**न कर्मणामनारंभान्नैष्कर्म्यं पुरुषोऽश्नुते ।**

**न च संन्यसनादेव सिद्धिं समधिगच्छति ॥ ४ ॥**

**अर्थ.**—मनुष्यानें कर्माचा आरंभ केल्यावांचून त्यास नैष्कर्म्याचा अनुभव होत नाहीं. तसेंच कर्मत्याग केला तरी ज्ञानसिद्धीप्रत तो पावत नाहीं.

**टीका.**—कर्माची सिद्धि, तीच ज्ञानाची सिद्धि, असें नाहीं. परंतु कर्म केल्यानें मनाची वर सांगितल्याप्रमाणें शुद्धि होते, नंतर ज्ञान प्राप्त होतें असें आहे. कर्मच ज्ञान नव्हे, ह्मणून ज्ञानाचें नांव **नैष्कर्म्य** ठेविलें आहे. कर्म हें ज्ञानाचें साधन होय, याच भावानें कर्माचे आरंभावांचून नैष्कर्म्य ( ज्ञान ) मिळत नाहीं असें भगवान् सांगतात. परंतु ज्ञानप्राप्तिस्तव लोक संन्यास घेतात व ज्ञानी होतात. तसा संन्यास घेऊन, ज्ञानप्राप्ति कां करून घेऊं नये, या शंकेचें उत्तर भगवान् उत्तरार्धांत देतात कीं, केवळ संन्यासानेंच ज्ञान प्राप्त होत नाहीं. या केवळ शब्दानें

दुसरें कांहीं तरी साधन लागतें असें सुचविलें आहे. तें साधन चित्तशुद्धि होय. ज्यास संन्यासानेंच ज्ञान प्राप्त झालें असें दिसतें, त्याचें चित्त पूर्वीचे आश्रमांत, त्याच जन्मीं अगर पूर्वजन्मीं केलेल्या कर्मानें शुद्ध झालेलें असतें असें समजावें. कारण विनाचित्तशुद्धीवांचून ज्ञान प्राप्त होणारच नाहीं, हा अपवादरहित नियम आहे. ह्मणून काम्य कर्म टाकून नित्य कर्म निष्कामबुद्धीनें करावें व तें बंधक होऊं नये ह्मणून ईश्वरार्पण करावें, असें भगवान् सांगणार आहेत. त्यापूर्वी ते ह्मणतात कीं.

**नहि कश्चित्क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत् ।**
**कार्यते ह्यवशः कर्म सर्वः प्रकृतिजैर्गुणैः ॥ ५ ॥**

**अर्थ.**–कर्म केल्यावांचून क्षणभरही कोणी राहत नाहीं, कारण प्रकृतिजनित त्रिगुणांहीकरून परतंत्र होत्साते सर्व लोक कर्में करितातच.

**टीका.**–डोकें बोडून संन्यासी झाल्यानें कर्म सुटत नाहीं. लंगोटी टाकून नग्न असणें, हातपाय आवरून स्वस्थ बसणें, कांहीं न बोलणें, न खाणें, वगैरे सर्व कर्मेंच आहेत. हा देह कर्माचाच अहे. तेव्हां तें सोडून तो कसा राहूं शकेल बरें? मातीची घागर असते, ती कोठेंही गेली व कशीही राहिली, तरी मातीस सोडून ती राहूं शकत नाहीं. भूचर प्राण्यांनीं भूमीला सोडून, किंवा जलचरांनीं जलाला सोडून, अथवा गगनचरपक्ष्यांनीं आकाशाला सोडून जाऊं ह्मटलें, तर तें होऊं शकतें काय? एक ठिकाण सोडलें, तर दुसऱ्या तशाच ठिकाणीं जाणें भागच आहे. तसें, देह कर्माचा आहे, ह्मणून एक कर्म टाकलें तर दुसरें करावेंच लागणार. इतकेंच नव्हे तर, कर्म टाकणेंच कर्म होतें. ह्मणून कांहींच कर्म न करितां कोणी कधींही असूं शकणार नाहीं, कारण प्रकृतीचे तिन्ही गुण, सत्व (अंतःकरण), रज (इंद्रियें) आणि तम (विषय) मनुष्याची स्वतंत्रता हरण करून त्यांचे हातून कर्म करविणार, यांत संशय नाहीं.

**कर्मेंद्रियाणि संयम्य य आस्ते मनसा स्मरन् ।**

**इंद्रियार्थान् विमूढात्मा मिथ्याचारः स उच्यते ॥ ६ ॥**

**अर्थ.**—जो मूर्ख मनुष्य कर्मेंद्रियें ( वाणी, हात, पाय, गुद, शिश्न ) आवरून मनानें इंद्रियांचे विषय ( शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध ) यांचें स्मरण करीत स्वस्थ बसतो त्याचे वर्तनास कपटाचार ह्मणतात.

**टीका.**—कर्मेंद्रियें आवरून स्वस्थ बसणाऱ्या मनुष्याचें ध्यान बकाप्रमाणें असतें. मासे धरण्याकरितां बक जसा डोळे झांकून स्तब्ध बसतो, तसें हें त्याचें वर्तन ढोंगाचें होय. अशा पुरुषांस विषयांचें ध्यान होतच असतें त्यामुळें त्यांचे चित्तावर जास्त मळ बसत असतो. ज्याला ज्ञानप्राप्तीची इच्छा असते त्यानें कर्माचरणानें चित्तशुद्धि करून घेतली पाहिजे. तें कर्माचरण कसें करावें, हें यापुढें सांगितलें आहे.

**यस्त्विन्द्रियाणि मनसा नियम्यारभतेऽर्जुन ।**

**कर्मेंद्रियैः कर्मयोगमसक्तः स विशिष्यते ॥ ७ ॥**

**अर्थ.**—जो पुरुष मनाचे साह्यानें ज्ञानेंद्रियें ( शब्दादि पांच विषय जाणणारीं पांच इंद्रियें ) नीट आवरून धरून कर्मयोग आरंभितो व कर्मफळाची आसक्ति ठेवित नाहीं, तो विशिष्ट होय.

**टीका.**—पूर्व श्लोकीं सांगितलेला दांभिक कर्मेंद्रियें आवरून आंतून ज्ञानेंद्रियें मोकळीं सोडितो त्याचेच उलट कर्मयोग करणाऱ्याची स्थिति होय. **शिष्ट** या शब्दाचा श्रेष्ठ असा अर्थ आहे. विशेषेंकरून श्रेष्ठ तो **विशिष्ट** ह्मणावा.

याकरितां सर्व कर्मांचा त्याग न करितां निष्काम कर्म ( फलाशा न ठेवितां ) आचरावें, असा उपदेश भगवंतांनीं केला आहे. निष्काम कर्में कोणतीं हें आतां भगवान् सांगतील.

**नियतं कुरु कर्म त्वं कर्म ज्यायो ह्यकर्मणः ।**

**शरीरयात्रापि च ते न प्रसिद्ध्येदकर्मणः ॥ ८ ॥**

अर्थ.–मुळींच कर्म न करण्याहून नियतकर्म (नित्य) करणें श्रेष्ठ होय, ह्मणून तूं नित्यकर्म कर. कर्म न करणाराची शरीरयात्रा देखील चालणार नाहीं.

टीका.–फलश्रुति न सांगतां, जें कर्म करावें, अशी श्रुतीची आज्ञा आहे त्यास नियतकर्म ह्मणावें. जसें ब्राह्मणांनीं स्नानसंध्यादि षट्कर्मे करणें, क्षत्रियांनीं पृथ्वीचें व ब्राह्मणांचें रक्षण करणें, वैश्यांनीं व्यापार करणें व शूद्रांनीं तिन्ही जातींची सेवा करणें वगैरे. या नियतकर्मास स्वधर्म ह्मणावें. तें केल्यानें चित्त शुद्ध होतें. या चित्तशुद्धीसच संन्यास ह्मणावें. काम्य कर्म टाकून नियतकर्म आचरण करून चित्त शुद्ध झालें ह्मणजे डोकें बोडून जानवें तोडण्याची कांहीं जरूर नाहीं. हें नियतकर्म न केलें तर ईश्वराचा दंड होतो. तो असा कीं, चित्तशुद्धि लौकर होत नाहीं. शिवाय समूळ कर्म टाकणें अशक्यही आहे. कर्म न करितां उगाच बसेन असें कोणी ह्मणेल तर त्याचा शरीरनिर्वाह तरी कसा चालेल बरें? काम्य कर्म टाकून नित्यकर्म केलेंच पाहिजे असें वर सांगितलें आहे. नित्यकर्मास देखील पितृलोकप्राप्ति आहे, असें श्रुति सांगतात. प्रत्येक वस्तु आपआपला गुण करणारच. बचनाग विष आहे. त्याचें सेवन केल्यानें मनुष्य मरतो. परंतु उत्तम वैद्याचे हातीं तो गेला ह्मणजे तो त्याचेच साधनानें प्राण वांचवितो. नित्यकर्मानें देखील पितृलोक मिळतो. मोक्ष हा कांहीं लोक नव्हे. तेव्हां हें पितृलोकाचें फळ न मिळावें, एवढ्याकरितां तें कर्म ईश्वरीं अर्पण करावें. ह्मणजे तो भवरोगवैद्य त्याचा वाईट गुण हरण करून, तें मोक्षप्राप्तीचें साधन करून देतो. त्याग केल्याशिवाय मोक्ष मिळत नाहीं असें श्रुतिवाक्य आहे. तो त्याग ईश्वरीं कर्मार्पण करणें हाच होय. मोक्ष तर ज्ञानानेंच मिळतो, पण त्याग हें एक मुख्य साधन आहे. अशा त्यागानें ईश्वर प्रसन्न होऊन ज्ञान देतो. याकरितां भगवान् ह्मणतात

यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र लोकोऽयं कर्मबंधनः ।
तदर्थं कर्म कौंतेय मुक्तसंगः समाचर ॥ ९ ॥

अर्थ.—श्रीविष्णुप्रीत्यर्थ केलेल्या कर्माहून इतर कर्म लोकांचे बंधास कारण होतें. ह्मणून हे अर्जुना, त्याच विष्णुप्रीत्यर्थ तूं निर्बंध होत्साता नीट रीतीनें कर्म कर.

टीका.—कर्म समर्पण करणें तें सगुण भगवान् विष्णु यासच केलें पाहिजे. निर्गुणीं समर्पण केल्यानें कांहीं फायदा होत नाहीं. निर्गुण हें सगुणाचें मूळरूप आहे, ह्मणून तें श्रेष्ठ खरें; परंतु त्याचे अंगीं कांहींच धर्म नाहीं, ह्मणून तें कर्माचे फळाचा नाश करूं शकत नाहीं. खोट्या सर्पास जसा दोर अधिष्ठान आहे तसें निर्गुण सर्वाधिष्ठान आहे. दोरानें खोटा साप नाहींसा केला जात नाहीं; तसें निर्गुणाच्यानें कर्म नासलें जात नाहीं. दोरांत असलेला खोटा साप त्या दोराचें ज्ञान नाहींसें करितो. ज्ञान ह्मणजे विद्या व कर्म अविद्या होय. अविद्या विद्येच्याच प्रभावानें नासली जाते. अशी ही आद्यविद्या, सगुणब्रह्म, श्रीविष्णु याची शक्ति होय. तेव्हां तीच आपले शक्तीनें अविद्यारूप कर्म नासूं शकेल, हें उघड आहे. ईश्वरोपाधि ( मूळ माया ) आणि निर्गुण मिळून सगुण होय. त्यांत निर्गुणपण फळ होय, व ईश्वर मोक्षफळदाता होय. धनवंताजवळ धन हें फळ आहे. धनवंतास जो संतुष्ट करील त्यास तें फळ तो ( धनवंत ) देईल. परंतु धनवंताची कृपा न संपादितां धनाचीच प्रार्थना केल्यानें तें प्राप्त होईल काय? तद्वत् निर्गुणीं कर्म समर्पण करण्यानें कर्मबंध नाश पावत नाहीं. एवढ्याकरितां नित्य कर्म करून श्रीविष्णूस अर्पण करावें ह्मणजे बंधाचें हरण होईल, असें भगवान् सांगतात.

एथपर्यंत मुमुक्षूस ह्मणजे मोक्षाची अपेक्षा करणाऱ्यास उपदेश केला. परंतु अतिशय अशुद्धचित्ताचे लोकांचे हातून निष्कामकर्म होणें नाहीं, व त्यांनीं काम्य टाकिलें तर त्यांचें सर्वस्वी नुकसान होईल,

असें जाणून त्यांस सकामकर्म अवश्य केलें पाहिजे, ह्मणून तत्संबंधानें भगवान् बोलतात.

**सहयज्ञाः प्रजाः सृष्ट्वा पुरोवाच प्रजापतिः ।**
**अनेन प्रसविष्यध्वमेष वोऽस्त्विष्टकामधुक् ॥ १० ॥**

**अर्थ.**—पूर्वी जेव्हां प्रजा उत्पन्न केल्या तेव्हां त्यांचेबरोबरच यज्ञही उत्पन्न केले व सृष्टिकर्ता ब्रह्मदेव त्यांस ह्मणाला कीं, हे यज्ञ करून तुह्मीं कुशलतेप्रत पावा, हा यज्ञ तुह्मांस अपेक्षित फल देईल.

**देवान् भावयतानेन ते देवा भावयंतु वः ।**
**परस्परं भावयंतः श्रेयः परमवाप्स्यथ ॥ ११ ॥**

**अर्थ.**—या यज्ञेंकरून देवांस तुह्मीं संतुष्ट करा, व ते देव तुम्हांस संतुष्ट करोत. असें एकमेकांतें संतुष्ट करीत होत्साते उत्तम सुखातें पावाल.

**इष्टान्भोगान्हि वो देवा दास्यंते यज्ञभाविताः ।**
**तैर्दत्तानप्रदायैभ्यो यो भुंक्ते स्तेन एव सः ॥ १२ ॥**

**अर्थ.**—यज्ञानें देव तृप्त होऊन ते तुह्मांस इष्ट भोग देतील. त्यांनीं दिलेल्याचा भाग त्यांना न देतां जो त्याचा उपभोग घेतो तो चोरच होय.

**यज्ञशिष्टाशिनः संतो मुच्यंते सर्वकिल्बिषैः ।**
**भुंजते ते त्वघं पापा ये पचंत्यात्मकारणात् ॥ १३ ॥**

**अर्थ.**—यज्ञ करून शेष राहिलेलें अन्न भक्षण करणारे जन सर्व पापांपासून मुक्त होतात. केवळ आपल्याचकरितां पाक करून जे खातात ते पापी पापच खातात.

**अन्नाद्भवंति भूतानि पर्जन्यादन्नसंभवः ।**
**यज्ञाद्भवति पर्जन्यो यज्ञः कर्मसमुद्भवः ॥ १४ ॥**
**कर्म ब्रह्मोद्भवं विद्धि ब्रह्माक्षरसमुद्भवम् ।**
**तस्मात्सर्वगतं ब्रह्म नित्यं यज्ञे प्रतिष्ठितम् ॥ १५ ॥**

अर्थ.–अन्नापासून भूतें उत्पन्न होतात, पर्जन्यापासून अन्न उत्पन्न होतें, पर्जन्य यज्ञामुळें होतो. कर्म वेदांपासून उपजतें असें जाण. व ते वेद अक्षरब्रह्मापासून उद्भवतात. ह्मणून सर्वगत असें ब्रह्म यज्ञाचे ठायीं नेहमीं प्रकर्षेंकरून वास्तव्य करितें.

टीका.–श्लोक १० पासून एथपर्यंत टीका करण्याचें प्रयोजन न दिसल्यामुळें केली नाहीं. "तस्मात् सर्वगतं ब्रह्म नित्यं यज्ञे प्रतिष्ठितम्" हें न समजण्यासारिखें आहे तेवढें स्पष्ट करून सांगतों.

वेदांपासून कर्म व ब्रह्मापासून वेद झाले. तर मग ब्रह्म सर्वगत कसें? आणि तें यज्ञाचे ठायीं विशेषेंकरून कसें? वेदांतच ब्रह्माचीं सगुण निर्गुण अशीं उभय लक्षणें आहेत व यज्ञांत वेद आहेतच, कारण वेदांशिवाय यज्ञ होणार कसा? ह्मणून जेथें यज्ञ तेथें ब्रह्म आहेच असा भावार्थ निघतो. ब्रह्म सर्वगत आहे तेव्हां यज्ञांतही आहेच. परंतु इतर वस्तूंत सर्वसाधारणपणें आहे, तसें यज्ञांत नाहीं. त्यांत तें विशेषत्वें आहे. तें कसें ह्मणाल तर, त्यास दृष्टांतः– दूध गाईच्या देहांत आहे, परंतु स्तनांत प्रतिष्ठित असतें; शेंपूट पिळिलें असतां दूध निघत नाहीं.

**एवं प्रवर्तितं चक्रं नानुवर्तयतीह यः ।**
**अघायुरिंद्रियारामो मोघं पार्थ स जीवति ॥ १६ ॥**

अर्थ.–हे पार्था, याप्रमाणें प्रवर्तविलेलें चक्र जो चालवीत नाहीं, तो पापरूपी आयुष्याचा, इंद्रियांस भोग देणारा प्राणी, या जगीं व्यर्थ जिवंत असतो.

एथपर्यंत सकामाकरितां केलेला उपदेश प्रसंगोपात्त झाला. अर्जुन मोक्ष मिळविण्यास योग्य होता व मुमुक्षु होता ह्मणून त्यास काम्य टाकून नित्यकर्म करून तें ईश्वरीं अर्पण करण्यास सांगितलें. आतां असें कर्म तरी कोठपर्यंत करावें तो अवधि भगवान् सांगतात.

**यस्त्वात्मरतिरेवस्यादात्मतृप्तश्च मानवः ।**
**आत्मन्येव च संतुष्टस्तस्य कार्यं न विद्यते ॥ १७ ॥**

**अर्थ.**—जो कोणी मनुष्य आपल्याच ठायीं प्रीति करणारा, जो स्वानंदेंकरूनच तृप्त असतो व आपल्या ठायींच संतुष्ट असतो, त्यास कांहींच कर्म करण्याची जरूर नाहीं.

**टीका.**—परम पावन आत्मज्ञान होऊन मनास आत्म्याची गोडी लागते व विषयाची तिळभरही प्रीति नसते, तेंव्हां ती अव्यभिचारिणी आत्मस्वरूपरति होय. स्वपतीची आवड असून इतर पुरुषाचीही आवड असली, तर ती स्त्री व्याभिचारिणीच होय. परंतु केवळ पतीचेच ठिकाणीं ज्या स्त्रीची प्रीति असते, त्या स्त्रीस पतिव्रता ह्मणावें. अशा पतिव्रता स्त्रीस सर्व पुरुषसृष्टि दिसतेच. परंतु तिची दृष्टि विषयबुद्धीनें उष्टी होत नाहीं. तद्वत् आत्मज्ञान्याची आत्मप्रीति अव्यभिचारिणी झाली ह्मणजे तो सर्व जड प्रपंच आत्माच पाहतो. असा आत्मरत पुरुष त्या आत्मसुखींच तृप्त राहूं लागला ह्मणजे त्यास नियतकर्मही करणें नको. आत्म्याची प्रीति असूनही विषयसुखांत त्यास तृप्ति वाटत असेल, तर तो साधकच समजण्याचा आहे, व त्यास कर्म करणें जरूर आहे. प्रारब्धानें विषयभोग प्राप्त झाला, तर त्या भोगीं तृप्ति न वाटतां, आत्मसुखानेंच तृप्ति वाटूं लागली म्हणजे त्यास ती तृप्ति बाणली असें समजावें. अशा आत्मरत व आत्मतृप्त मानवाचे कर्माची समाप्ति झाली, असें भगवान् सांगतात. मग "**आत्मन्येव च संतुष्टः**" हा चरण सांगण्याचें काय प्रयोजन? एखादा भुकेलेला पांथस्थ ब्राह्मण भोजनाचें आमंत्रण लावून भोजनास येतो. त्यास भुकेमुळें भोजनाची प्रीति असते व भोजन झाल्यावर त्याची तृप्ति होते. परंतु दक्षिणा मिळाल्याशिवाय तो संतुष्ट होत नाहीं. ब्राह्मणास तृप्ति होऊनही संतुष्ट होण्यास दक्षिणाप्राप्तीची जरूर असते, तशी आत्मतृप्त मनुष्यास संतुष्ट राहण्यास इतर कोणतेही वस्तूची जरूर

नसते. तो आत्मतृप्तीनेंच संतुष्ट असतो. हें दाखविण्याकरितां तिसरे च-रणाची योजना केली आहे.

**नैव तस्य कृते नार्थो नाकृते नेह कश्चन ।**

**न चास्य सर्वभूतेषु कश्चिदर्थव्यपाश्रयः ॥ १८ ॥**

**अर्थ व टीका.**—कर्म करून कोणताही अर्थ अशा पुरुषास मिळविण्याचा नसतो. कर्म करून त्यास पुण्य दिसत नाहीं, न केल्यानें त्यास प्रत्यवाय वाटत नाहीं. ब्रह्मादिस्तंबपर्यंत सर्व भूतांपासून कोणताही लाभ प्राप्त करून घेण्याची त्यास जरूर नसते, कारण त्याचे सर्व अर्थ परमार्थानें सिद्ध झालेले असतात. ह्मणून भगवान् सांगतात कीं,

**तस्मादसक्तः सततं कार्यं कर्म समाचार ।**

**असक्तो ह्याचरन्कर्म परमाप्नोति पूरुषः ॥ १९ ॥**

**अर्थ.**—यास्तव, हे अर्जुना, तूं कर्मफलापेक्षारहित, विहितकर्म निरंतर बऱ्या प्रकारें आचर, कारण फलापेक्षारहित जो पुरुष कर्म आचरतो त्यास उत्तम पदाची प्राप्ति होते.

**टीका.**—'बऱ्या रीतीनें कर्म कर' या ह्मणण्याचा गूढ भाव असा कीं, केवळ अनासक्तीनें कर्मबंधाचा नाश होत नाहीं, तर तो होण्यासाठीं ईश्वरास कर्म अर्पण केलें पाहिजे, ह्मणून 'तसें तूं कर', असें "समाचर" या शब्दानें सुचविलें आहे. असें आसक्तिरहित केलेलें कर्म कृष्णार्पण केल्यानें परम पदाची प्राप्ति होते.

**कर्मणैव हि संसिद्धिमास्थिता जनकादयः ।**

**लोकसंग्रहमेवापि संपश्यन्कर्तुमर्हसि ॥ २० ॥**

**अर्थ.**—कर्मानेंच जनकादि भक्त ज्ञानसिद्धि पावले. लोकांस उत्तम मार्ग दाखवावा एवढीच गोष्ट लक्षांत ठेवून देखील तुला कर्म आचरणें योग्य आहे.

**टीका.**—'काम्यत्यागें वैराग्य ठेवून व नित्यकर्मार्पणें हरिभक्ति करून,

जनकादि सिद्धि पावले, ह्मणून तूं कर्मच कर', असें भगवान् अर्जुनास ह्मणतात. हें ऐकून अर्जुनास वाटलें कीं, मी आत्मज्ञानी नव्हें ह्मणून मला भगवान् कर्म करण्यास सांगतात काय? मला राज्याची किंवा जीविताची देखील इच्छा नाहीं, हें मीं पूर्वींच सांगितलें आहे. असें असून मला ब्रह्मोपदेश न करितां कर्म करण्यास भगवान् कां सांगतात? हा अर्जुनाचा अंतर्यामींचा भाव देवानें जाणला. परंतु भीष्मादिकांचा वध करण्याचें काम याचेच हातून होण्याचें याचे प्रारब्धीं आहे, तें करवून घेतलेंच पाहिजे, ह्मणून देव त्यास उत्तरार्धानें सांगतात कीं, कर्म न करण्याची योग्यता प्राप्त झाली, तरी लोकसंग्रहार्थ तुला तें केलेंच पाहिजे. कारण,

**यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः ।**

**स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते ॥ २१ ॥**

अर्थ.—मोठा मनुष्य जसें आचरण करितो, तसेंच इतर लोक आचरण करितात व तो जें प्रमाणभूत समजतो, तेंच प्रमाण धरून लोक चालतात.

**न मे पार्थास्ति कर्तव्यं त्रिषु लोकेषु किंचन ।**

**नानवाप्तमवाप्तव्यं वर्त एव च कर्माणि ॥ २२ ॥**

अर्थ.—हे पार्था, मला कांहींच कर्तव्य नाहीं. मला प्राप्त नाहीं असें, अथवा प्राप्त करून घेण्यासारखें असें, या त्रिजगतांत कांहींच नाहीं, तथापि मी कर्म करीतच आहें.

**यदि ह्यहं न वर्तेयं जातु कर्मण्यतंद्रितः ।**

**मम वर्त्मानुवर्तंते मनुष्याः पार्थ सर्वशः ॥ २३ ॥**

अर्थ.—हे अर्जुना, आळस सोडून जर मी कर्माचे ठायीं वर्तन करणार नाहीं, तर लोक सर्व प्रकारें माझ्या मार्गास अनुसरतील.

**उत्सीदेयुरिमे लोका न कुर्यां कर्म चेदहम् ।**

**संकरस्य च कर्तास्यामुपहन्यामिमाः प्रजाः ॥ २४ ॥**

अर्थ.—जर मी कर्म करणार नाहीं, तर हे लोक धर्मलोपामुळें भ्रष्ट होतील. वर्णसंकर केल्याचा दोष मजवर येईल, आणि या लोकांचा घात होईल.

टीका.—'मी कर्म केलें नाहीं, तर कर्म करण्याची जरूरच नाहीं, असें लोक समजतील व भ्रष्ट होतील. मी स्वतः देवाधिदेव आहें, ह्मणून माझा क्षत्रियधर्म सोडून, ब्राह्मणासारखी भिक्षा मागून मी पोट भरीन, असें मनांत आणून, तसें वर्तन करीन, तर वर्णसंकर होईल. परपुरुषापासून झालेल्या संततीस संकर ह्मणतात. तसेंच एक वर्णाचा मनुष्य दुसरे वर्णाचा धर्म आचरण करील, तर त्यास संकर ह्मणतात. असा संकर झाल्यानें लोकांचा घात होईल. लोकसंग्रहासाठीं मला कर्म केलें पाहिजे तसें तूंही कर' असें भगवान् अर्जुनास दर्शवितात.

**सक्ताः कर्मण्यविद्वांसो यथा कुर्वन्ति भारत ।**
**कुर्याद्विद्वांस्तथासक्ताश्चिकीर्षुर्लोकसंग्रहम् ॥ २५ ॥**

अर्थ.—हे अर्जुना, अविद्वान् लोक कर्माचे ठायीं आसक्ति धरून तें करितात. तशी आसक्ति न धरितां, लोकांस चांगला मार्ग दाखविण्याची इच्छा धरून विद्वानांनीं कर्म करावें.

टीका.—यांत असा भाव आहे कीं, ज्ञानी पुरुषांची दृष्टि सर्व ठिकाणीं ब्रह्म पाहते. तेव्हां कर्महीं ब्रह्मरूपच समजून ते तें करितात. कर्मच तारक आहे, अशी त्यांची अज्ञानी लोकांप्रमाणें श्रद्धा नसते. अशा अश्रद्धेनें देखील कर्म करावें, असें अर्जुनास भगवान् सांगतात.

**न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां कर्मसंगिनाम् ।**
**जोषयेत्सर्वकर्माणि विद्वान्युक्तः समाचरन् ॥ २६ ॥**

अर्थ.—कर्माचे ठायीं ज्यांचा आदर आहे अशा अज्ञ जनांच्या बुद्धीचा भेद ज्ञानी पुरुषांनीं करूं नये. तर आपण उत्तम प्रकारें कर्म करून सर्व कर्में करण्याविषयीं त्यांस उत्तेजन देत असावें.

आतां ज्ञानी व अज्ञानी यांचे वर्तनांत फरक काय तो भगवान् सांगतात.

**प्रकृतेः क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः ।**
**अहंकारविमूढात्मा कर्त्ताहमिति मन्यते ॥ २७ ॥**

**अर्थ.**—प्रकृतीचे गुण सत्व ( मन ), रज (इंद्रियें), तम ( पंचभूतात्मक देह ) यांचे योगानें होणारीं कर्मे, अहंकारानें भ्रांत झालेला मूर्ख मनुष्य, आपणच करितों असें मानितो.

**तत्ववित्तु महाबाहो गुणकर्मविभागयोः ।**
**गुणागुणेषु वर्तन्त इति मत्वा न सज्जते ॥ २८ ॥**

**अर्थ.**—हे अर्जुना, गुण आणि कर्म यांचा विभाग जाणणारा पुरुष, इंद्रियें विषयांचे ठायीं वर्ततात, असें जाणून कर्माचे ठायीं आसक्त होत नाहीं.

**टीका.**—सर्व तत्वें तपासून, जड कोणतें व चैतन्य काय, हें पृथक्त्वें जाणणारास तत्वज्ञ असें ह्मणतात. अशा तत्वज्ञास समजतें कीं, अहंकारापरतें शुद्ध जें आत्मतत्त्व तें आपण आहों. मग तो मीपण टाकून देतो, व आपण कर्ता असें कधींही मानित नाहीं. **गुण** ह्मणजे इंद्रियें. विषय ग्रहण करण्याचा इंद्रियांचा धर्म आहे. ते विषय त्यांनीं घेणें, यास **कर्म** ह्मटलें आहे. इंद्रियें व कर्म ह्मणजे विषयग्रहण, या दोन्हींचा पृथक्त्वें विचार करणें यास "**गुणकर्मविभाग**" ह्मटलें आहे. हा विभाग समजला ह्मणजे स्वतःला कर्तृत्वच नाहीं, असें यास कळून येतें. इंद्रियें विषयांचे ठायीं वर्तन करितात. विषयग्रहणाशीं आपला कांहीं संबंध नाहीं, असें मानून विषयग्रहणाचे ठायीं तो आसक्ति ठवित नाहीं. तात्पर्यार्थ असा कीं, इंद्रियें आणि त्यांचें कर्म यांचा मी द्रष्टा वेगळाच आहें, असें तो मानित असतो. नारायणराव एखादें कर्म करित आहेत, असें गोपाळराव पाहतो. तेव्हां तें नारायणरावानें केलेलें कर्म

मी केलें असें गोपाळरावास कधीं वाटेल काय? नाहीं. तो केवळ नारायणरावाचे कर्माचा द्रष्टा ह्मणजे प्रेक्षक असतो. तद्वत्च तत्वज्ञ द्रष्टा बनून राहतो. विषयोपभोग घेणारा मी आहें, असें वाटल्यावेरीज आपल्यास विषयवासनाच उद्भवत नाहीं. मीपणावरच कर्तृत्व स्थापित होतें, ह्मणून मीपणा अगदीं नाहींसा केल्यास त्याबरोबर कर्तृत्व नाहींसें होतें.

इंद्रियांचें कर्म इंद्रियेंच करितात, आपण निराळेच आहों, असें बहुतेकांचे तोंडून ऐकूं येतें. पण नुसतें "**भात भात**" ह्मटल्यानें जसें पोट भरत नाहीं, तसें वरप्रमाणें बोलल्यानें केलेल्या कर्माचे (विषयग्रहणाचे) आपण जबाबदार नाहीं असें होत नाहीं. हें स्पष्ट दाखविण्याकरितांच "**इति मत्वा न सज्जते**" असें भगवान् बोलतात.

अज्ञानी व ज्ञानी या दोघांचे कर्म करण्यांत महदंतर आहे, हें ह्यावरून उघड झालें. आतां काम्यपर अज्ञानी लोकांची बुद्धि फिरविण्याचा ज्ञानी पुरुषांनीं यत्न करूं नये, असें भगवान् सांगतात.

**प्रकृतेर्गुणसंमूढाः सज्जंते गुणकर्मसु ।**
**तान् कृत्स्नविदो मंदान् कृत्स्नविन्नविचालयेत् ॥ २९ ॥**

**अर्थ.**—प्रकृतिसंभव त्रिगुणकार्यांनीं मूढ झालेले लोक, गुण आणि कर्म यांचे ठायीं आसक्ति धरितात. अशा अज्ञानी व मंद लोकांची बुद्धि ज्ञानी पुरुषांनीं चळवूं नये.

**टीका.**—अहंकर्तृत्व, प्रकृतीपासून उत्पन्न झालेल्या सत्व, रज, तम या तीन गुणांमुळें उत्पन्न होतें. या तीन गुणांचे तीन अहंकार आहेत. मानसिक अहंकार सात्विक होय, इंद्रियगणासंबंधीं अहंकार राजस होय, व देहाहंकार तामस होय. या तिन्ही अहंकारांनीं ज्यांस गांठलें आहे, ते मूर्ख होत. त्यांचीं इंद्रियें व कर्म ह्मणजे विषयग्रहण, यांचे ठिकाणीं दृढ आसक्ति असल्यामुळें, शास्त्रज्ञ असूनही मंदबुद्धि होऊन कर्माविषयींच वेद वाखाणतात. पण ते सर्वज्ञ नव्हत, कारण त्यांचें वतन

सामान्य अज्ञानी मनुष्यांप्रमाणेंच असतें. अशा पुरुषांचें मन तत्वज्ञ पुरुषांनीं वळविण्याचा कधींही यत्न करूं नये. कारण दृढ विषयासक्तीमुळें निष्काम कर्म करणें त्यांचे हातून होणें नाहीं. तसें केल्यास स्वर्गही नाहीं व मोक्षही नाहीं अशी त्यांची स्थिति होईल. पक्कज्ञानी लोकसंग्रहार्थ कर्म करितात, हें तत्व सांगतांना ते कसें वागतात हेंही सांगितलें. अर्जुनानें ज्ञानोत्तर काळीं कसें वागावें, हें भगवान् आतां सांगतात.

**मयि सर्वाणि कर्माणि संन्यस्याध्यात्मचेतसा ।**
**निराशी र्निर्ममो भूत्वा युध्यस्व विगतज्वरः ॥ ३० ॥**

**अर्थ.**—माझे चरणीं सर्व कर्में अर्पण करून, सर्व आत्माच आहे अशा समजुतीनें चित्त एकाग्र करून, व आशा, ममता व मनाची तगमग टाकून, युद्ध कर.

**टीका.**—'मीच यज्ञ ह्मणजे विष्णु होय. त्या माझे चरणीं सर्व कर्में अर्पण कर', असें भगवान् सांगतात. "**कृष्णार्पण**" असें केवळ तोंडानें ह्मटल्यानें, तें तसें होत नाहीं. याकरितां "**कृष्णार्पण करणें**" या क्रियेचें वर्म सांगितलें पाहिजे. हें न समजल्यामुळें बहुत लोक ठकले व ठकत आहेत. आपला पैसा खर्च करून घर बांधलें ह्मणून तें "**माझें घर**" असें आपण ह्मणतों. तेंच उद्यां एका ब्राह्मणास अर्पण केलें तर पुढें त्या घरास "**माझें घर**" असें ह्मणवत नाहीं. या कृत्यानें आपण आपले "**माझेपणाचा**" त्याग करितों. "**मी**" व "**माझें**" यास अहंकार व ममता ह्मणतात. यावरून **अर्पण** या शब्दाचा मार्मिक अर्थ अहंकारत्याग असा होतो. ह्मणून अहंकाररहित कर्म करणें, यास कृष्णार्पण असें ह्मणावें, असें स्पष्ट दिसतें. यावरून कोणी असें ह्मणतील कीं, आह्मी निरहंकारानेंच कर्म करूं; विष्णूसच कर्म कां अर्पण करावें ? तर ही समजूत त्यांचे फायद्याची नाहीं. दोन्ही रीतींनीं परिणाम एकच व्हावयाचा

हें खरें, तथापि पहिले रीतीनें फार क्लेशानें कार्य होतें. त्या पेक्षां दुसरे रीतीनें थोड्या क्लेशानें होतें. तत्त्वदृष्टचा दोन्ही मार्ग एकच; परंतु व्यवहारांत ते कमीजास्त फायद्याचे आहेत. निरहंकारानें कर्म केलें तर कर्मबंध आपले जोरावरच टाळला पाहिजे. परंतु तेंच कर्म **विष्णूस** अर्पण केलें, तर त्याचे कृपेनें तो सहज टाळला जातो. ( हें भगवान् पुढें १२ वे अध्यायांत सांगणारच आहेत ) ह्मणून भगवंताचा दास ह्मणवून आपलें सर्वस्व त्यास देऊन त्याजवरच अवलंबून असणें चांगलें. कारण तो दयाळू असल्यामुळें तो आपला भार वाहतो, हें नववे अध्यायांत " **अनन्याश्चिंतयंतो मां** " या श्लोकानें स्पष्ट होईल. हत्ती होऊन लांकडें खाण्यापेक्षां मुंगी होऊन साखर खाणें बरें, हें सर्वांस माहित आहेच. याकरितां श्रेष्ठ असा कर्मार्पण करण्याचाच मार्ग धरण्याविषयीं सुज्ञ लोकांस माझी प्रार्थना आहे. तसें न केल्यानें, अहंकार टाकून कर्म करण्याचा उद्देश असला, तरी तो अहंकार सर्वांशीं टाकिला जात नाहीं. कारण सगुण भगवंत **श्रीविष्णूस** कर्म अर्पण करून त्याची मदत आह्मी घेणार नाहीं, आह्मी आमचेच हिंमतीवर कार्य करणार, हा तरी एक प्रकारचा सूक्ष्म अहंकारच होय.

अर्जुनास ज्ञान देण्यापूर्वींच हें ज्ञानोत्तरकालीं सांगण्याचें कर्मप्रकरण कां सांगितलें, पुढें सांगण्याचें तें पुढेंच सांगावयाचें होतें, आतां सांगण्याची जरूर नव्हती, असा सूक्ष्म आक्षेप उत्पन्न होतो. पण तो व्यर्थ आहे. कारण, पुढें राजा होणारे युवराजास, राज्यपद मिळाल्यावर राज्य कसें चालवावें हा उपदेश अगोदर करणें बरोबर नाहीं, असें कोणी ह्मणणार नाहीं. अर्जुनास ज्ञान देऊन त्याचे हातून युद्ध करविण्याचें होतें, ह्मणूनच हा उपदेश केला. यानंतरचे श्लोकांत ज्ञान नसूनही जे कर्मार्पण करितात, ते लोकही तरतात, असें भगवान् सांगतात.

**ये मे मतमिदं नित्यमनुतिष्ठन्ति मानवाः ।**
**श्रद्धावंतोऽनुसूयंतो मुच्यंते तेऽपि कर्मभिः ॥ ३१ ॥**

12

**अर्थ.**—माझे ठायीं श्रद्धा ठेवून आणि मजवर दोषारोप न करितां जे मनुष्य ह्या माझ्या मताप्रमाणें वागतील, ते कर्में करूनही मुक्त होतील.

**टीका.**—या वरील बोलण्याचा भाव असा कीं, ज्यांस ज्ञानप्राप्ति झाली नाहीं असेही लोक ईश्वरीं कर्में अर्पण करतील, तर ज्ञान प्राप्त होऊन मुक्त होतील. पण कांहीं लोक बरें, तसें वाईट कर्मही भगवंतच करवितो असा निर्दयपणाचा दोष त्यास देतात. तसें न करितां, जे कोणी श्रवणकीर्तनादि भगवद्भजन श्रद्धेंकरून करतील व त्यास कर्में अर्पण करतील, तेच ज्ञानप्राप्तीस योग्य होतील.

**ये त्वेतदभ्यसूयंतो नानुतिष्ठन्ति मे मतम् ।**
**सर्वज्ञानविमूढांस्तान्विद्धि नष्टानचेतसः ॥ ३२ ॥**

**अर्थ.**—या माझ्या मताची निंदा करून जे त्याप्रमाणें वागत नाहींत ते अज्ञानी लोक नष्टबुद्धि होऊन मूर्ख बनतील.

**टीका.**—हे लोक कोणते ह्मणाल तर काम्यतत्पर लोक होत. यांजविषयीं द्वितीयाध्यायांतील "**य एनं वेत्ति हंतारम्**" या श्लोकाचे टीकेंत वर्णन केलेंच आहे. ही काम्यतत्पर पुरुषाची निंदा ऐकून अर्जुनास वाटलें कीं, हे लोक विषयासक्त असतात ह्मणून ते भगवंतांस आवडत नाहींत. पण ज्ञानवानही कित्येक प्रसंगीं अज्ञासारखाच चेष्टतो असें असूनही तो भगवंतास प्रियच असतो हें कसें, अशी अर्जुनास शंका आली. ती सर्वेश्वरानें जाणून पुढील श्लोक आरंभिला.

**सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि ।**
**प्रकृतिं यांति भूतानि निग्रहः किं करिष्यति ॥ ३३ ॥**

**अर्थ.**—ज्ञानवान् पुरुषही पूर्वसंस्कारांच्या आधीन असलेल्या स्वभावानुरूप वर्तन करितो. प्राणिमात्र आपल्या प्रकृतीच्या वळणावर जातात, तेथें मनोनिग्रह कांहीं करूं शकत नाहीं.

**टीका.**—काम्यतत्पर लोक विषयोपभोग घेतात व ज्ञानीही उपभोग

वेतो हें खरें; पण त्याची प्रकृति प्रारब्धरूपिणीच असते. त्याचे मूळ अविद्येचा नाश झाला असतो. ह्मणजे संचित कर्माचा त्याच्या बुद्धीवर जोर चालत नाहीं. पण प्रारब्ध टाळणें त्याचे हातीं नसतें; व तें भोगानेंच नाश पावतें, असें यापूर्वी सांगितलेंच आहे. ज्या प्रारब्धप्रकृतीनें सर्व प्राण्यांचे देह उत्पन्न होतात, ती, देह पडेपर्यंत कायम असतेच. भोगकाळीं ज्ञानी तिला वश होऊन, अज्ञानी पुरुषाप्रमाणेंच चेष्टतो; व तेवढ्यापुरता विषयस्नेह त्यास होतो. अशा अनिवार्य प्रारब्धजनित भोगकाळीं मनोनिग्रहानें काय होणार? ज्ञानी पुरुष सर्व जड विषय आत्मदृष्टीनें पाहत असतो. परंतु या विचाराची अशा भोगकाळीं विस्मृति पडते, अर्थात् मग मनोनिग्रह करणारी विवेकदोरी नाहींशी झाल्यावर मन मोकळें होतें, हें उघड आहे. पण तो भोगकाळ सरतांच तो पूर्व स्थितीवर येतो. प्रारब्धभोग टाळणें ज्ञानी पुरुषाचे हातीं नसतें, ह्मणून तो भगवंतास अप्रिय होत नाहीं.

**इंद्रियस्येंद्रियस्यार्थे रागद्वेषौ व्यवस्थितौ ।**
**तयोर्नवशमागच्छेत्तौह्यस्य परिपंथिनौ** ॥ ३४ ॥

**अर्थ.**—अमुक इंद्रियाची अमुक विषयाशीं प्रीति व अमुक विषयाशीं द्वेष हें ठरलेलेंच आहे. या प्रीतिद्वेषांचे सपाट्यांत मनुष्यानें सांपडूं नये, कारण ते याचे शत्रु होत.

**टीका.**—प्रारब्धबलानें विषयेंद्रियसंयोग होईलच. परंतु रागद्वेषाचा स्पर्श बुद्धीस नसला ह्मणजे त्या संयोगापासून वाईट परिणाम होत नाहीं. प्रारब्ध टळत नाहीं, परंतु अनादि वासनेनें रागद्वेष होतात, ते नाहींसे करणें मनुष्याचे स्वाधीन आहे. तेवढें त्यानें केलें पाहिजे. वासनेचें बीज संचित कर्म होय. तें ज्ञानानें जळतें, असें " **बुद्धियुक्तोजहातीह उभे सुकृतदुष्कृते** " याश्लोकीं स्पष्ट करून दाखविलेंच आहे. रागद्वेषांस पुरुष वश झाला, तर बुद्धिभ्रंश होतो. तो न होऊं देणें विचारी

मनुष्याचें काम आहे. तें ज्ञानी पुरुष बजावितो, ह्मणून तो भगवंतास प्रिय असतो.

'सर्व कर्में माझे चरणीं अर्पण करून मनाची तगमग सोडून युद्ध कर' असा "मयि सर्वाणि कर्माणि" या श्लोकीं अर्जुनास उपदेश झाला. तत्संबंधानें शंकेवर शंका निघाल्या. त्यांचा एथपर्यंत परिहार झाला. आतां अर्जुनास युद्ध करणें इष्ट वाटेना, कारण तसें करण्यानें हिंसादि दोष लागतात असें त्यास वाटलें ह्मणून भगवान् पुन्हा सांगतात.

**श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ।**
**स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ॥ ३५ ॥**

अर्थ.—स्वधर्मांत गुणहीन कर्म असलें तरी तो आचरण्यास उत्तम अशा परधर्माहून श्रेष्ठच होय. स्वधर्मांत मरण येणेंही श्रेयस्कर आहे. पण परधर्म भयंकर होय.

टीका.—या तत्वाची स्पष्ट रीतीनें माहिती करून देणें अगदीं आवश्यक आहे. कालमानानें यासंबंधानें बराच घोटाळा झाला आहे. असलेल्या हल्लींच्या स्थितीस अनुसरून या श्लोकांतील उपदेशाप्रमाणें कसें वागलें पाहिजे हें बरोबर न समजल्यामुळें, बऱ्याच वितंडवादास कारण झालें आहे. परंतु हल्लींच्या प्रसंगीं तें बरोबर समजणार नाहीं, कारण पुढील अध्यायांतील कांहीं श्लोकांतील तत्वें आधीं समजलीं पाहिजेत. ह्मणून योग्य वेळ येईपर्यंत तें काम तहकूबच ठेविलें पाहिजे.

हा श्लोक ऐकल्यावर, ज्ञानी निग्रहशील असूनही, प्रारब्धभोगकालीं, त्यांस भोगाची अपेक्षा उत्पन्न होते, ती कशानें होते याविषयीं अर्जुन प्रश्न करितो.

**अथ केन प्रयुक्तोऽयं पापं चरति पूरुषः ।**
**अनिच्छन्नपि वार्ष्णेय बलादिव नियोजितः ॥ ३६ ॥**

**अर्थ.**–हे कृष्णा, ज्ञानी पुरुषास इच्छा नसूनही जबरदस्तीनें करवि-ल्याप्रमाणें विषयसेवन करण्यास त्यास कोण लावतो बरें ?

या प्रश्नाचें उत्तर भगवान् देण्यास सुरू करितात. इकडे वाच-काचें मननशील लक्ष असावें, कारण हा महत्वाचा विषय आहे.

**काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः ।**
**महाशनो महापाप्मा विद्ध्येनमिह वैरिणम् ॥ ३७ ॥**

**अर्थ.**–रजोगुणापासून उत्पन्न झालेला काम ( हाच क्रोधही होय ) हा कधींच तृप्त न होणारा भोक्ता आहे व पापरूपी आहे व हा मोक्ष-मार्गास आड येणारा शत्रु आहे, असें तूं जाण.

**टीका.**–भगवान् ह्मणतात, काम हाच सर्व अनर्थांचें मूळ आहे. जीव कर्म करितो, तें कर्मऋण त्याचे शिरावर बसतें, व तें प्रारब्धाचा देह घेऊन त्यानें फेडिलें पाहिजे. तें कर्म हा कामच करवितो, आणि भोगरूपानें जीवाकडून तें ऋण फेडवितो. अज्ञानी, अहंकारामुळें व भोगेच्छेमुळें, नवीन ऋण जोडतो. पण ज्ञान्यास नवें ऋण होत नाहीं. कारण 'मी कर्ता आहें' असें तो मानित नाहीं व 'मला अमुक प्रिय व अमुक अप्रिय' हा रागद्वेष त्यास नसतो. भोगसमयीं ज्ञान्यास देखील अहंस्फुरण होतें. मीपणावांचून भोगच होऊं शकत नाहीं. भोग जीवास होतो, आत्म्यास होत नाहीं. जीव ह्मणजे अहंभाव हें द्वितीयाध्यायांतील "**नासतो विद्यते भावो**" या श्लोकाचे टीकेंत स्पष्ट केलेंच आहे. या नियमासही अपवाद आहे. पूर्व कालीं निष्काम कर्म केलें पण इश्वरीं अर्पण केलें नाहीं अशा ज्ञानी लोकांस भोगकाळींही अहंभाव नसतो. अशी **जनकाची** स्थिति होती, ह्मणून त्यास **विदेही** ह्मणत होते. ती गोष्ट सर्व ज्ञान्यास लागू नाहीं. भोगकाळीं तो अज्ञान्याप्रमाणेंच घडीभर नाचतो. हा काम रजोगुणापासून उत्पन्न झाला आहे. हा महाशन आहे. याचेंच दुसरें रूप क्रोध होय. हा पाप उत्पन्न करणारा आहे. क्रोधा-

मुळें सर्व हिंसात्मक कर्मे घडतात, हें आपण पहातों. कामरूपानें हा महाशन ह्मणजे, कधींही तृप्त न होणारा आहे. त्रैलोक्यांतील सर्व भोग मिळाले, तरी याची तृप्ति व्हावयाची नाहीं. अग्नीवर तूप ओतलें असतां तो शांत न होतां उलटा जास्त बुभुक्षित होतो, तद्वत् कामास विषय देणें होय. इच्छित पदार्थ देऊन त्यास तृप्त केला, तरी तो बिचारा बुभुक्षित आहेच. त्याचे भोगांत जरा अंतर पडलें कीं त्यानें क्रोधाचें रूप धारण केलेंच. हा क्रोध फार दुष्ट आहे. ज्यास त्यास मारीन ह्मणून तो भय दाखवितो व चरफडत असतो. दुसऱ्यास पीडा करण्याची सवड न मिळाली तर आपल्या शरीरासच पीडा करितो. आपण पहातों कीं, अति रागीट मनुष्य आपलींच मणगटें चावून आपणास इजा करून घेतो. याच क्रोधाचें पूर्वरूप काम होय. कामाशिवाय कोणास क्रोध आल्याचें अनुभवांत नाहीं. एखादे नपुंसकास एक मुलगी देतों ह्मणतो, दुसरा त्यास नको देऊं ह्मणतो. त्यामुळें नपुंसकास राग येईल काय? स्मार्त एकादशीचें व्रत आचरण करणाऱ्या ब्राह्मणास त्यादिवशीं कोणी भागवत, जेवणाचें आमंत्रण देऊं लागला, व दुसऱ्यानें त्यास विघ्न केलें, तर त्या ब्राह्मणास राग येईल काय? याहीपेक्षां स्पष्ट दृष्टांत पाहूं. हिवानें थडथडत असलेल्या पुरुषास चंदनाची इच्छा नसते. त्यास चंदनाची उटी लावण्यास एकजण जातो व दुसरा त्यास नको ह्मणतो. यामुळें त्या मांद्या मनुष्यास राग येईल काय? नाहीं. एवंच कामाचें रूप क्रोध होय. त्यांत कामाचें लक्षण "**महाशनः**" व क्रोधाचें रूप "**महापाप्मा**" ह्मणून भगवानांनीं सांगितलें आहे.

काम रजोगुणापासून होतो व क्रोध तमोगुणापासून होतो. तेव्हां कामाचें रूप क्रोध ह्मणण्यानें विरुद्धता दिसते. या शंकेचा परिहार असा कीं, रजोगुणास तमोगुणाचा आधार आहे. तळ्यांत पाणी स्वच्छ असतें, पण खालीं गाळ असतो. जोंपावेतों पाणी ढवळलें जात नाहीं, तोंपर्यंत तें स्वच्छ असतें. ढवळल्याबरोबर पाणी गढूळ होतें. जलास आधार गाळच

असतो, तसा रजास तमाचा आधार असतो. व रज खवळलें ह्मणजे तेंच तम होतें. गाळास पाणी नसेल तर तो वाळून त्याची माती होईल. तसें काम नाहींसा झाला ह्मणजे क्रोध वाळून त्याची माती झालीच. जोंवर पाणी असेल तोंवरच नितळ, गढूळ हे गुण असूं शकतात. आतां नितळ पाणी काम व गढूळ पाणी क्रोध इतकें सिद्ध झालें. नितळ, गढूळ हे दोन्ही पाण्याचेच भेद आहेत. या भावानें काम तोच क्रोध असें भगवंतांनीं सांगितलें. यांत आणखीही गूढ भाव आहे, तो व्यक्त केला पाहिजे. तम ह्मणजे विषय. रज ह्मणजे इंद्रियें. काम ह्मणजे विषयाधार वासनामय इंद्रियें. जमिनीवर पाणी पडून तेथें चिखल होतो, त्याच चिखलावरील पाणी जमिनीचा आधार सोडवून पात्रांतरीं ठेविलें, तर त्या पाण्यांत गढूळपणा दिसत नाहीं व पुन्हां गढूळही होत नाहीं. त्याप्रमाणें भगवद्भक्तींत काम ठेविला, ह्मणजे क्रोधाचें रूप त्यास कधींच येत नाहीं. जमिनीचे आश्रयानें असलेलें गढूळ पाणीही पाणीच व पात्रांतरीं तेंच काढून ठेविल्यामुळें निवळलेलें पाणीही पाणीच. त्याप्रमाणें भगवद्भक्तीकडे लाविलेला कामही कामच होय. परंतु तो काम संसारापासून मुक्त करितो व विषयाधारें असलेला काम संसारांत अधिक बुडवितो. यावरून रजोगुण सर्व प्रसंगीं वाईट नाहीं हें सिद्ध झालें. तो तमाच्या आश्रयानें राहिला, तर तो घातक आहे. कामाशिवाय परमार्थसाधन तरी कसें होणार ? करितां याच कामास भगवद्भक्तीचा आश्रय दिला पाहिजे. भगवद्भक्तिरूप कुऱ्हाडीस या कामाचा दांडा घातला, ह्मणजे त्या कुऱ्हाडीनें कामरूप दांड्याचें सर्व कुळच नाहींसें होतें. एवंच, विषयवासनेवेगळा काम मोक्षदायक आहे व याच अर्थानें विषयाश्रित काम मोक्षमार्गांत वैरी आहे, असें भगवान् श्लोकाचे चतुर्थ चरणांत सांगतात. या कामाच्या बळानें ज्ञान्यास प्रारब्ध तेवढ्यापुरतें विषयासक्त करितें.

जिज्ञासु व साधक जनावर हा काम जोर करील; पण विरक्त अशा ज्ञानी पुरुषास इच्छा नसतांना हा काम त्रास देतो हें कसें ? अशी

शंका अर्जुनाच्या मनांत आली. तिचें दृष्टांतद्वारा पुढील श्लोकांत निरसन केलें आहे.

**धूमेनाव्रियते वन्हिर्यथादर्शो मलेन च ।**
**यथोल्बेनावृतो गर्भस्तया तेनेदमावृतम् ॥ ३८ ॥**

**अर्थ.**—ज्याप्रमाणें धुरानें अग्नि, मळानें आरसा, व खोळीनें गर्भ वेष्टित असतो, त्याप्रमाणें ज्ञान या कामानें वेष्टित असतें.

**टीका.**—काष्ठास अग्नि लावला ह्मणजे धूर उत्पन्न होतो व तो तें काष्ठ जळेतोंपर्यंत त्या अग्नीस वेष्टून असतो. काष्ठ जळून अग्नि विझला ह्मणजे धूर नाहींसा होतो. प्रारब्धकर्मामुळें देह होतो व तो देह, तें कर्म भोगून संपेपर्यंत राहतो. प्रारब्ध संचितामधूनच कांहीं भागाचें तयार होतें. तें जाऊन शिल्लक असलेलें अफलोन्मुख संचित ज्ञानानें नाहींसें होतें. पण फलोन्मुख झालेलें प्रारब्ध देहाबरोबर असतेंच, तें भोगतांना कामरूप धूर ज्ञानास झांकून टाकतो. कर्मरूप काष्ठास ज्ञानरूप अग्नि लागल्यावर कामरूप धूर असतोच. त्यास संयमरूप वारा वाळून ज्ञानी संचितरूप काष्ठास जाळून टाकतो. पण प्रारब्धरूप काष्ठशेष ज्ञानरूप अग्नीनें जळत नाहीं. तें आपोआप भोगेंकरून जळन गेल्यावर मग कामरूप धूर आपोआप नाहींसा होतो. ज्ञान्याचे देहाचा देहपणा भोगकाळींच असतो. तेवढ्या वेळेपुरता काम त्याचे ज्ञानास झांकून टाकितो. आतां आरशाच्या दृष्टांताचा उपयोग काय हें पाहूं. सत्व हा आरसाच होय. याचे द्वारा ज्ञानी पुरुष आपणास पाहतो. त्यावर भोगकाळीं कामरूप मळ थोडासा चढतो. तो, ज्ञानी आपलेजवळ सिद्ध असलेलें अभ्यासरूप जल व वैराग्यरूप खडू लावून, ताबडतोब साफ करितो, व सत्वरूप शुद्ध आरशांत आपणास पाहूं लागतो. आतां गर्भाचा दृष्टांत देण्याचें प्रयोजन स्पष्ट करूं. भोगकाळीं ज्ञानी पुरुष स्वरूपास अवलंबून असला ह्मणजे मग काम त्यास कसा स्पर्श करूं शकेल याचे निरसनार्थ

हा दृष्टांत दिला आहे. गर्भास जशी खोळ वेष्टिते तसा काम ज्ञानास वेष्टून असतो, ह्मणजे विचारास वगैरे आंत शिरण्यास जागाच नसते. हे तीन दृष्टांत देण्याचें प्रयोजन सारांशानें पुन्हां एकदम सांगणें जरूर आहे. भोगाचे स्थितिकाळीं ज्ञान झांकून जाऊन काम दिसतो, हें पहिले दृष्टांतानें, भोग संपल्याबरोबर तो कसा नाहींसा होतो, हें दुसरे दृष्टांतानें, व भोगकाळीं ज्ञानास कोणतेही प्रकारची मदत होऊं शकत नाहीं, हें तिसरे दृष्टांतानें दाखविलें आहे. सर्व शंकांचें समाधान होण्याकरितां एकाहून जास्त दृष्टांत देणें भाग झालें, असें दिसून येईल.

**आवृतं ज्ञानमेतेन ज्ञानिनो नित्यवैरिणा ।**

**कामरूपेण कौंतेय दुष्पूरेणानलेन च ॥ ३९ ॥**

अर्थ.—हे अर्जुना, कधीं तृप्त न होणारे अग्नीसारखा व ज्ञानी पुरुषाचा नेहमींचा वैरी असा हा काम त्याचे ज्ञानास झांकून टाकतो.

टीका.—हा काम ज्ञानी पुरुषाचा नेहमीं वैरीच बनून बसला असतो. संधि सांपडली कीं त्याचें ज्ञानधन तो चोरून नेतो. तो मोठा मायावी आहे, त्याला एकच रूप नाहीं, निरनिराळ्या विषयांचे रूपानें तो ज्ञानी पुरुषाचें ज्ञानधनाची चोरी करण्यास येतो. अज्ञ लोकांचाही तो वैरी आहे. परंतु अज्ञानानें ते त्यास आप्त समजून त्याला तृप्त करण्याची खटपट करितात. परंतु सापास दूध पाजलें तरी तो गरळच टाकितो त्याप्रमाणें हा दुष्ट विषय देणारे अज्ञ पुरुषांस क्लेश देतो व त्यांचा शेवटीं नाश करितो. ह्मणून ज्ञानी त्यास वैरी जाणून माजवीत नाहींत, त्यापासून लांब राहतात. तथापि वर सांगितल्याप्रमाणें भोगकाळीं तो त्यांना येऊन गांठतोच. भोग संपल्याबरोबर ज्ञानी सर्वत्र आत्मा पाहूं लागतो. प्रारब्धभोगकाळीं ईश्वरकृत शक्तीचा त्यास जोर असतो तसा त्यानंतर नसल्यामुळें ज्ञानी पुरुषावर त्याचें हत्यार चालत नाहीं. अपक्व ज्ञान्यांची अशी गोष्ट नाहीं, त्यांनीं आत्मा जाणून घेऊन अभ्यास व वैराग्य यांहींकरून त्या कामास मारिलेंच पाहिजे, असा उपदेश भग-

वान् अर्जुनास करणार आहेत. त्याचेपूर्वीं कामाच्या स्थितीचें ते वर्णन करितात.

**इंद्रियाणि मनोबुद्धिरस्याधिष्ठानमुच्यते ।**
**एतैर्विमोहयत्येष ज्ञानमावृत्य देहिनम् ॥ ४० ॥**

**अर्थ.**–इंद्रियें, मन आणि बुद्धि हीं याचें वसतिस्थान आहेत असें ह्मटलें आहे. यांच्या साह्यानें तो देहधारी जीवांचें ज्ञान झांकून टाकितो.

**टीका.**–आत्मा बिंब आणि जीव त्याचें प्रतिबिंब आहे, हें द्वितीयाध्यायांत स्पष्ट केलेंच आहे, तिकडे वाचकांचें लक्ष असावें. हाच जीव देहधारी होय व हा सुखदुःखाचा भोक्ता आहे. मी कर्ता ह्मणून जें कर्म देहधारी करितो, त्याचें फळ भोगतांनाही मी भोगितों असें त्यास वाटतें. भोगकाळीं ज्ञान्यासही देहभाव उत्पन्न होतो. धार्मिक राजाचा पुत्र प्रजेच्या मुलांस त्रास देऊन बापाच्यामागें जाऊन लपून बसतो. प्रजा येऊन, राजपुत्राचे अपराधाबद्दल राजाजवळ फिर्याद करिते. तेव्हां राजा त्या मुलास आपल्या मांडीवर बसलेला असतांही खालीं उतरवून कृतापराधाबद्दल शिक्षा करितो व पुनः मांडीवर घेतो. तद्वत् ज्ञानी पुरुष भगवंताचे आवडते पुत्रच होत. ज्ञानप्राप्तीचे पूर्वकाळीं केलेल्या कर्माचें फळ प्रारब्धरूपानें तो त्यांस भोगायास लावितो व भोग संपतांच त्यांस पुन्हां पूर्वीप्रमाणें आपली प्रीति देतो. ज्ञानी भक्तांस भगवंताखेरीज कशाची प्रीति नसते. सर्व जग त्याचेच रूपानें ते पाहतात. पण पूर्वकर्म भोगिते वेळीं स्वस्वरूपीं त्यांची असलेली प्रीति भगवान् काढून घेतो. तेव्हां प्रतिबिंबत्वें देहभाव उत्पन्न होतो. मग त्या देहधारी जीवांस, त्यांचीं इंद्रियें, मन आणि बुद्धि वश करून घेऊन त्यांचे साह्यानें तो काम मोहून त्यांचें ज्ञान झांकून टाकितो. या जीवाचें स्वरूप व त्याचें भोक्तृत्व यासंबंधानें पुढें १५ वे अध्यायांत खुलासा होणार आहे.

यापुढें या कामाचा जय कसा करावा, तें भगवान् अर्जुनास सांगतात.

तस्मात्त्वमिंद्रियाण्यादौ नियम्य भरतर्षभ ।
पाप्मानं प्रजहि ह्येनं ज्ञानविज्ञाननाशनम् ॥ ४१ ॥

अर्थ.–हे अर्जुना, ह्मणून तूं प्रथमतः इंद्रियांचा संयम कर व नंतर ज्ञान आणि विज्ञान यांचा नाश करणाऱ्या ह्या पापरूपी कामाला मारून टाक.

टीका.–इंद्रियें आणि मन हीं या कामाचें वसतिस्थान आहेत. व त्यांचे साह्यानें तो ज्ञानाचें मातेरें करितो, हें पूर्व श्लोकीं सांगितलें. ह्मणून भगवान् ह्मणतात कीं, कामाचें साहित्यबल जीं इंद्रियें आणि मन, यांस आधीं वश करून घेतलें पाहिजे. तीं ताब्यांत राहिलीं ह्मणजे मग एकट्या कामाची खबर घेण्यास फारसे श्रम पडणार नाहींत. आधीं इंद्रियें व मन स्वाधीन करून घे, असें श्लोकांत ह्मटलें आहे. या 'आदौ' शब्दानें तदुत्तरकालीं आणखी कांहीं साधन प्राप्त करून घेणें आहे, अशी सूचना होते. तें साधन "आत्मज्ञान" होय. एवंच इंद्रियें आणि मन हस्तगत करून आत्मज्ञान प्राप्त करून घेतल्यावर या ज्ञानविज्ञानाच्या नाश कणारे कामास मारण्याचा उद्योग करावा, असें भगवान् सांगतात. ज्ञान ह्मणजे व्यतिरेकानें शुद्ध आत्म्याचें ज्ञान व विज्ञान ह्मणजे सर्व आत्माच होय असें विशिष्ट ( सर्वात्मक ) ज्ञान होय. शुद्धसत्वानें या दोहींचाही अनुभव होतो. त्या शुद्धसत्वाचा नाश काम करितो. जरी ज्ञानविज्ञान काय हें निश्चयात्मक कळलें, तरी इंद्रियें आणि मन यांचा जय झाला नाहीं, तर काम आपलें कार्य करीलच. सिंहासनावर बसण्यापूर्वी राजनीतीचा अभ्यास ज्यांनीं केला आहे, तेच राजे राज्यकारभार नीट करूं शकतात व आपली गादी कायम ठेवितात. सिंहासनारूढ झाल्यावर राजनीति शिकूं ह्मणणारे कित्येक राजे पदच्युत होतात. ह्मणून आत्मज्ञानाचे सिंहासनावर बसण्यापूर्वी इंद्रियजय करणें अगदीं अवश्य आहे. नाहींतर हा काम ज्ञाननिश्चय नाहींसा करितो. गुरुमुखानें आत्म्याचें ज्ञान करून घेऊन, इंद्रियभोगासक्ति कायम ठेवणें

हें स्नान करून बगलेंत कुत्रें ठेवणें व 'मी सोंवळा आहें' असें ह्मणणें यासारखें होय. मन कधींही स्तब्ध बसावयाचें नाहीं. त्यास उद्योग असला तरच करमतें. "ध्यायतो विषयान्पुंसः" या व त्याचेपुढील दुसरे श्लोकानें, जड विषयांकडे मन गेल्यानें नाश कसा होतो, याचें वर्णन केलेंच आहे. तेव्हां जड विषयांकडे त्यास जाऊं न देणें, ह्मणजेच बुद्धीस नाशाचे भीतीपासून वांचविणें होय. हे जड विषय मनांतून काढून टाकले ह्मणजे केवळ आत्माच राहतो. त्याचे स्वरूपीं मनाची योजना केली, ह्मणजे त्याची रिकामपणाची कुरकुर न राहतां तें संतुष्ट राहतें. असें स्वरूपीं मन ठेविल्यानें इंद्रियांस विषय मिळेनासे होतात व काम महाराज दिवसेंदिवस रोड होऊं लागतात. अखेरीस उपवासामुळें मूर्छा येऊन ते स्वस्थ पडून राहतात. कधींमधीं प्रारब्धभोगकाळीं त्यांस थोडेंसें विषयरूप अन्नपाणी मिळतें. तेवढ्याचपुरते ते गडबड करितात. परंतु निर्विषय आत्म्याकडे पुन्हां मनाची योजना केली कीं त्यांचें कामच होतें. पण स्वरूपीं चित्त राहण्यास इंद्रियें व मन यांचा जय झाला पाहिजे, ह्मणून ज्ञानापूर्वी, हें कार्य करण्याविषयीं भगवान् अर्जुनास सांगतात.

हें आत्मज्ञान कसें प्राप्त करून घ्यावें हें पुढील श्लोकानें सांगितलें आहे.

**इंद्रियाणि पराण्याहुरिंद्रियेभ्यः परं मनः ।**
**मनसस्तु परा बुद्धिर्योबुद्धेः परतस्तु सः ॥ ४२ ॥**

**अर्थ.**—देहाहून ज्ञानेंद्रियें श्रेष्ठ, ज्ञानेंद्रियांहून मन श्रेष्ठ, मनाहून बुद्धि श्रेष्ठ आहे असें ह्मणतात व बुद्धीहून जो श्रेष्ठ तोच तो आत्मा होय.

**टीका.**—आत्मा (आपण) कोणता याचा निर्देश या श्लोकांत केला आहे. देह स्वतः स्थूल आहे. ज्ञानेंद्रियांशिवाय कर्मेंद्रियें व्यर्थ होतात. मनावांचून ज्ञानेंद्रियें व्यर्थ होतात व बुद्धि नसली तर मनही कांहीं करूं शकत नाहीं. या बुद्धीसही चालक आहेच. तोच आत्मा होय.

या श्लोकांतील "पर" शब्दाचा "पलीकडे" असा पंडितांनीं अर्थ केला आहे. या पद्धतीनें आत्मतत्व कसें शोधून काढावें हें कळतें. मी जो अर्थ दिला आहे त्यानें स्थूलदृष्टीनें आत्मा सर्वांत श्रेष्ठ आहे, हें कळतें.

आतां आपण या आत्म्याचें शोधन करूं. आत्म्याशिवाय जड राहूंच शकत नाहीं, ह्मणून इंद्रियें, मन व बुद्धि यांत आत्मा आहेच. परंतु तो त्यांत मिसळलेला आहे. ती भेसळ काढून टाकिली ह्मणजे शुद्ध आत्मा सांपडेल.

आपला देहच आपण आहों अशी पहिली समजूत असते. ती कितपत खरी आहे, हें पाहूं. आपण देहास जाणूं शकतो, व देह आपण आहों तर देहास देह जाणूं शकतो असें होतें. पण शव देहास जाणूं शकत नाहीं. देह दिसतो ह्मणून तो आत्मा होय असें ह्मणावें, तर स्वप्नकाळीं कल्पनेचा देह दिसतो, तोही आपण आहों असें वाटतें. पण तो लटिका असतो. आत्मा शाश्वत आहे यावरून देह आपण (आत्मा) नव्हे, हें समजलें.

आतां ज्ञानेंद्रियेंच आत्मा असें धरून चालूं. शरिरास डोळे, कान, नाक दिसतात तीं ज्ञानेंद्रियें नव्हत. बहिरेपण आलें ह्मणजे कानासारखे कान दिसतात, परंतु ऐकूं येत नाहीं. यावरून दिसणारे कान ज्ञानेंद्रिय नव्हत. तीं शरिरास दिसतात, पण तीं फक्त गोलकें होत. या गोलकांत जी शक्ति आहे, तीस ज्ञानेंद्रियें ह्मणावें. या ज्ञानेंद्रियांची वस्ती लिंगदेहीं असते. लिंगदेहास सूक्ष्मदेहही ह्मणतात. हीं इंद्रियें आत्मा ह्मणावीं, तर मन आपले ठिकाणीं नसलें ह्मणजे इंद्रियें कांहीं करूं शकत नाहींत, हें आपले अनुभवांत आहे. एखादे गोष्टींत आपलें मन गढून गेलें असलें व त्या वेळेस कोणी कांहीं बोललें, तरी आपणांस ऐकूं येत नाहीं, हें सर्वांच्या अनुभवांत आहे. यावरून इंद्रियें आत्मा नव्हत हें उघड दिसतें. इंद्रियें

ह्मणतां त्यांचे शब्दादि विषय सुचविले गेले, कारण इंद्रियांवांचून विषयग्रहण होणेंच नाहीं; ह्मणून विषयही आत्मा नव्हत.

मनावांचून इंद्रियें आपलीं कर्में करूं शकत नाहींत ह्मणून मन आत्मा होय असें धेऊन चालूं. स्वप्नावस्थेंत मनोमय स्वप्नदेह मी ह्मणून आपण समजतों. त्या वेळेस स्थूल देह मृतप्राय निश्चेष्ट पडलेला असतो, व स्वप्नावस्थेंत मन कायम असतें, पण गाढ सुषुप्तींत तें असतें काय? त्या वेळेस तें उरत नाहीं व बुद्धीचें बोद्धव्यही स्फुरत नाहीं. पण जागें झाल्यावर "**मी सुखानें निजलों होतों**" व "**मी त्या वेळेस कांहीं जागत नव्हतों**" असें आपली बुद्धि स्मरते. सुषुप्तिकाळीं जें सुख आपण अनुभवितों तोच आपला आत्मा होय. हें सुख ( आत्मा ) व कांहीं जाणत नव्हतों हें अज्ञान अशीं दोन्हीही मागाहून बुद्धिच सांगते. करितां बुद्धि मनाचे पलीकडे आहे, ह्मणून मन आत्मा नव्हे असें सिद्ध होतें. सुषुप्तिकाळीं बुद्धीचें स्फुरण नसूनही ती मागाहून सुषुप्तिकाळीं असलेला अनुभव कशी सांगते हें स्पष्ट समजण्याकरितां एक दृष्टांत घेऊं. आपण मौन धरून कांहीं वेळ बसतों. त्या वेळेस जिभेचें स्फुरण बंद असतें. पण मागाहून मौन टाकिल्यावर, तीच जीभ शब्दानें सांगते कीं, मौनावस्थेंत शब्द बंद होता. मौनकालीं जें जिभेचें न बोलणें, तेंच मागाहून ती जीभ वर्णन करिते. तद्वत् सुषुप्तिकाळीं बुद्धि आपलें जाणण्याचें कर्म करीत नाहीं, पण ती स्थिति मागाहून तीच सांगते.

आतां बुद्धिच आत्मा ह्मणावें तर तीही सुषुप्तींत उपरमाप्रत पावते, तिचें बोद्धव्य उपशम पावतें, व केवळ सुखस्वरूप आत्माच राहतो. बरें सुषुप्तींत कांहींच नव्हतें असें ह्मणावें, तर आनंद होता व तो आनंद जागृतींत बुद्धि स्मरते. एवंच त्या आत्म्याचेच योगानें बुद्धि जागृतींत त्यास जाणते, ह्मणून त्याचेच योगानें ती सचेतन आहे व तिनेंच तो जाणला जातो, असें ह्मणणें भाग पडतें. यावरून बुद्धि आत्मा नसून तिचेपलीकडे तो आहे, हें सिद्ध झालें.

अशा रीतीनें शुद्ध आत्मा जाणणें यास व्यतिरेक ह्मणतात. तो या श्लोकांत दाखविला आहे. यावरूनच अन्वयाचा ह्मणजे "सर्वं खल्विदं ब्रह्म" याचाही बोध होतो. तो कसा हें सांगतों.

हा आत्मा स्वतःसिद्ध आहे. याचे सत्तेनें सर्व जगत्प्रपंचास आस्तित्व आहे. सुषुप्तिकाळीं इंद्रियें, मन व बुद्धि हीं सर्व नसूनही आनंदस्वरूप आत्मा होता, यावरून तो स्वतःसिद्ध आहे असें उघड दिसतें. असा आत्मा सुषुप्तिकाळीं असतो, ह्मणूनच जागृतींत इंद्रियें, मन, बुद्धि हीं प्रगट होतात. यावरून या सर्वांस त्याचेच सत्तेनें अस्तित्व आहे हें स्पष्ट झालें. इतरांवीण असूं शकणें यासच सत्ता ह्मणतात. तरंगावांचून उदक, पटावांचून तंतु, अलंकारावांचून सोनें, व घटावांचून माती राहूं शकते. यावरून तरंग, पट, अलंकार व घट या सर्वांस उदक, तंतु, सोनें आणि माती हीं अधिष्ठान होत. व यांचेच सत्तेनें ते असूं शकतात ह्मणजे भासतात. वास्तविक त्यांस स्वतःसिद्ध अस्तित्व मुळींच नाहीं. तद्वत् आत्मसत्तेनें प्रपंच भासमान होतो. पण प्रपंचास स्वतःसिद्ध अस्तित्व नाहीं. हा सर्व प्रपंचाभास विवर्त होय. कारण जें नाहींसें होतें तें सर्व विवर्त असलें पाहिजे. सद्वस्तु नेहमीं असणारच. ती कधींही नाहींशी होणार नाहीं. यास दृष्टांतः-रज्जूचे ठायीं सर्प दिसतो त्यास रज्जुच आधारभूत असतो. त्याशिवाय सर्प दिसूं शकत नाहीं. सर्प दिसणें हा विवर्त व रज्जु खरी वस्तु होय. हा भासरूप विवर्तही रज्जुच होतो. तद्वत् आत्माच विवर्तरूपजग झाला आहे असें समजून, आत्मदृष्टीनें जगत् पाहणें यास **अन्वययोग** अथवा **विज्ञान** ह्मणावें.

या श्लोकानें तत्वसंख्याही दाखविलीआहे. "**इंद्रियाणि पराणि**" ह्मटल्यानें अलीकडे स्थूल देह आहे असें सांगितलें. स्थूल देह ह्मटल्यानें तो ज्यांचा बनला आहे अशा पंचतत्त्वांचाही बोध झाला. तीं पंचतत्त्वें:- १ पृथ्वी, २ आप्, ३ तेज, ४ वायु आणि ५ आकाश. या तत्वांत त्यांचे गुण, १ गंध, २ रस, ३ रूप, ४ स्पर्श व ५ शब्द यांचा समावेश होतो.

एवंच, स्थूल देह म्हणतां १० तत्वें दाखविलीं. स्थूलाचे नंतर इंद्रियें. त्यांची संख्या दहा होय, पांच कर्मेंद्रियें व पांच ज्ञानेंद्रियें, एकूण दहा अशीं येथपर्यंत वीस तत्वें झालीं. मन म्हणतां २१. मनांतच बुद्धि, चित्त आणि अहंकार यांचा समावेश होतो. बुद्धीस महत् तत्व म्हणतात, व चित्तास अव्यक्त तत्व ह्मणतात. एकूण २४ तत्वें झालीं. अशीं देहांत एकंदर २४ तत्वें आहेत. यांचें स्पष्ट विवरण १३ वे अध्यायांत होईल. या तत्वांच्या पलीकडे जें तत्व आहे, तेंच आत्मतत्व होय, असें या श्लोकानें भगवान् अर्जुनास सांगतात.

**एवं बुद्धेः परं बुद्ध्वा संस्तभ्यात्मानमात्मना ।**

**जहि शत्रुं महाबाहो कामरूपं दुरासदम् ॥ ४३ ॥**

**अर्थ.**—हे अर्जुना, याप्रमाणें बुद्धीहून पर असा आत्मा तूं जाण व बुद्धिबलानें मनास स्थिर करून, आटोक्यांत सांपडण्यास कठिण, अशा कामरूप शत्रूस मारून टाक.

**टीका.**—असा आत्मा जाणूनही स्वस्थ बसलें तर नुकसान होतें. राज्यप्राप्ति होण्यापूर्वी राजनीति शिकल्यानें राज्य मिळतें. परंतु राज्यप्राप्तीनंतर त्या नीतीचा अभ्यास न ठेविला तर तिची विस्मृति होऊन अन्याय होतात व कालेंकरून तो राजा राज्यभ्रष्ट होतो. तद्वत् आत्मज्ञान झालें ह्मणजे सर्व कर्तव्य झालें असें शहाण्यानें समजूं नये. तर तें ज्ञान नेहमीं जागृत ठेवून पूर्वीचे अज्ञानाचा स्पर्श होऊं देऊं नये. नाहीं. पेक्षां पूर्वस्थिति येण्यास फार काळ लागत नाहीं. ह्मणून पूर्वश्लोकीं सांगितल्याप्रमाणें आत्म्याचें ज्ञान झाल्यावर, विवेकबलानें बुद्धि शुद्ध करून तिचे साह्यानें मन आत्मस्वरूपीं ठेवून कामरूप शत्रूस मारून टाक असें भगवान् सांगतात. एथपर्यंत तिसऱ्या आध्यायाची टीका झाली. ती सर्वात्मा कृष्णपरमात्मा याचे चरणीं मी अनन्यभावें अर्पण करितों.



श्री.

# अध्याय ४ था.

ॐ नमो भगवते वासुदेवाय.

पूर्वाध्यायापर्यंत केलेला उपदेश परंपरागत चालत आलेला आहे व त्या मोक्षमार्गाचा प्रवर्तकही आपणच आहों असें भगवान् आतां सांगतात. ही परंपरा सांगण्याचा हेतु असा कीं, अर्जुन क्षात्र धर्मास कंटाळून युद्ध करूं इच्छीना. त्याचें मन वळविण्यासाठीं भगवान् त्यास या निमित्तानें सुचवितात कीं, पूर्व कालीं शेंकडो क्षत्रिय राजांनीं, स्वधर्मरक्षण करूनही, या योगाचा अभ्यास केला व ते मुक्त झाले.

**इमं विवस्वते योगं प्रोक्तवानहमव्ययम् ।**
**विवस्वान्मनवे प्राह मनुरिक्ष्वाकवे ब्रवीत् ॥ १ ॥**

**अर्थ.**—भगवान् ह्मणतात, हे अर्जुना, हा अनादिकालापासून चालत आलेला योग मी विवस्वानाला सांगितला होता. विवस्वानानें मनूला व मनूनें इक्ष्वाकूला सांगितला.

**एवं परंपराप्राप्तमिमं राजर्षयो विदुः ।**
**स कालेनेह महता योगो नष्टः परंतप ॥ २ ॥**

**अर्थ.**—हे अर्जुना, याप्रमाणें परंपरेनें प्राप्त झालेला हा योग सर्व राजर्षि जाणत होते. परंतु पुष्कळ काळ लोटून गेल्यामुळें तो नष्ट झाला.

**स एवायं मया तेऽद्य योगः प्रोक्तः पुरातनः ।**
**भक्तोऽसि मे सखा चेति रहस्यं ह्येतदुत्तमम् ॥ ३ ॥**

**अर्थ.**–तोच हा पुरातन योग, तूं माझा भक्त व मित्र आहेस ह्मणून आज तुझा मी सांगितला, कारण हें उत्तम रहस्य होय.

**टीका.**– "पुरातनः" या शब्दानें भगवान् असें सुचवितात कीं, भगवंत योगनिद्रेपासून जागृत झाले, तेव्हां ब्रह्मदेवास प्रथम हाच योग सांगितला आणि याच कारणाकरितां वेदांची उत्पत्ति झाली.

तृतीयाध्यायांतील उपदेश ऐकेपर्यंत **श्रीकृष्ण** परमेश्वरच आहे असें अर्जुन समजत होता व त्याप्रमाणें **मधुसूदना, केशवा, जनार्दना,** ह्या नांवांनीं तो त्यास आळवीत होता. परंतु तृतीयाध्यायांत जेव्हां त्यानें ऐकिलें कीं, आत्मा हा परमेश्वर होय व तो बुद्धीचे पलीकडे आहे, तेव्हां-पासून त्यास वाटूं लागलें कीं, **कृष्ण** परमेश्वर नव्हे. **श्रीगुरु** ईश्वर नव्हे असें वाटल्यावर संशयास वाण कोठची ? त्यास वाटलें कीं, आपला व **कृष्णा**चा जन्मदिवस तर एकच आहे. असें असून आपल्या जन्माचे शेंकडो वर्षांपूर्वींच्या गोष्टी हा कृष्ण कसा सांगतो? हाच संशय अर्जुन आतां बोलतो.

**अपरं भवतो जन्म परं जन्म विवस्वतः ।**
**कथमेतद्विजानीयां त्वमादौ प्रोक्तवानिति ॥ ४ ॥**

**अर्थ.**–आपला जन्म तर अलीकडचा आणि विवस्वान् त्यापूर्वींच होऊन गेला. तेव्हां आपण त्यास हा योग सांगितला असें मी कसें समजावें बरें? या प्रश्नाचें उत्तर भगवान् देतात कीं,

**बहूनि मे व्यतीतानि जन्मानि तव चार्जुन ।**
**तान्यहं वेद सर्वाणि न त्वं वेत्थ परंतप ॥ ५ ॥**

**अर्थ.**–हे अर्जुना, माझे तसेंच तुझेही पुष्कळ जन्म होऊन गेले आहेत. ते मी जाणतों पण तूं जाणत नाहींस.

**टीका.**–या भाषणाच्या द्वारा भगवंतांनीं असा भाव दाखविला

कीं, आपण ईश्वर आहों ह्मणून भूतभविष्यवर्तमान, असे सर्व व्यापार आपण जाणतों. पण अनादिमायेच्या प्रभावामुळें अर्जुन जाणत नव्हता, यावरून **कृष्ण** परमेश्वर आहे अशी अर्जुनाची पुनः खात्री झाली. पण दुसरा संशय उद्भवला कीं, आपल्यास कर्मामुळें जन्म होतात, पण हा **कृष्ण** ईश्वर असून याला निरनिराळे जन्म कां असावे? या शंकेचा परिहार भगवान् आतां करितात.

**अजोऽपि सन्नव्ययात्मा भूतानामीश्वरोऽपि सन् ।**
**प्रकृतिं स्वामधिष्ठाय संभवाम्यात्ममायया ॥ ६ ॥**

**अर्थ.**—मी जरी अविनाशी, जन्मरहित आहें व सर्व प्राण्यांचा स्वामी आहें, तरी माझे शुद्ध सत्वात्मिक प्रकृतीचा अवलंब धरून आत्ममायेनें मी मूर्ति प्रकट करितों.

**टीका.**—निर्गुण ब्रह्माचे ठिकाणीं असणारी शक्ति जी जगताचे स्थितिकाळाचे आधीं प्रकट होते, तीस **आत्ममाया** ह्मणतात व हिचेच योगानें आत्मानुभव होतो. हीच अनादि विद्याशक्ति होय. भगवंताचे अवतार या मायेच्या आश्रयानें होतात, ह्मणून तो सर्वज्ञ असतो. याच मायेपासून पुढें त्रिगुण ( सत्त्व, रज, तम ) उत्पन्न होतात. अशी त्रिगुणात्मक माया ती अविद्या होय. या अविद्येच्या प्रादुर्भावानें जीवकोटी उत्पन्न होते. त्या जीवांस अज्ञानाचें वेष्टण असतें, तसें आपणास नसतें, असें भगवान् ह्मणतात.

आतां असे देह धरण्याचें प्रयोजन भगवान् अर्जुनास सांगतात.

**यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।**
**अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहं ॥ ७ ॥**

**अर्थ.**—हे अर्जुना, जेव्हां जेव्हां धर्मास क्षीणत्व येतें व अधर्म बळावतो, तेव्हां तेव्हां मी अवतार घेतों.

असा अवतार घेऊन काय करितों हें यापुढें सांगितलें आहे.

**परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् ।**
**धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥ ८ ॥**

**अर्थ.**–साधूंचें रक्षण करावें, दुष्ट लोकांचें मर्दन करावें, आणि धर्माचें स्थापन करावें, या हेतूस्तव मी युगायुगाचे ठायीं उत्पन्न होतों.

एथें अर्जुनास वाटलें कीं, परमेश्वर सर्वशक्तिमान् आहे. याचे संकल्पमात्रानें जगत् उत्पन्न होतें व नाश पावतें. असें असूनही वर सांगितलेलीं छोटीं कार्यें करण्याकरितां जन्म घेण्याची यास काय जरूर आहे? तें जाणून भगवान् ह्मणतात.

**जन्म कर्म च मे दिव्यमेवं यो वेत्ति तत्वतः ।**
**त्यक्त्वा देहं पुनर्जन्म नैति मामेति सोऽर्जुन ॥ ९ ॥**

**अर्थ.**–हे अर्जुना, माझे अलौकिक जन्म आणि कर्म जो तत्वदृष्टीनें जाणतो त्यास मरणानंतर पुनः जन्म होत नाहीं व तो मला येऊन मिळतो.

**टीका.**–अर्जुनास आलेल्या शंकेचें समाधान या श्लोकानें केलें आहे. जीवांचे उद्धाराकरितां अवतारचरित्राच्या कथाश्रवणासारखा दुसरा उपाय नाहीं, ह्मणून मला अवतार घेणें भाग पडतें. भगवंताचे जन्म आणि कर्म अलौकिक असल्यामुळें त्यांच्या कथा मनास संतोष देणाऱ्या असतात. संसारव्यथा नाहींशी करण्याची त्यांच्या अंगीं शक्ति असते. सर्व सृष्टि ज्याच्या कल्पनेनें झाली, त्या ईश्वराची थोरवी जाणून जो त्याचें अवतारचरित्रकथामृत प्राशन करितो, तो मुक्त होतो, यांत संशय नाहीं. हें कथाश्रवण दोन प्रकारचें आहे. एक वर सांगितलेल्या समजुतीनें व दुसरें तसें न समजून. भगवंताची थोरवी न समजूनही जो त्याचें चरित्रामृत प्राशन करील, त्याचे पापाचा नाश होऊन, त्यास त्याच्या मूलस्वरूपाचें ज्ञान होतें. असें ज्ञान झाल्यानंतर अर्थात् तो समजतो कीं,

सर्व सृष्टीचें अधिष्ठान जें निर्गुण ब्रह्म तें योगनिद्रेंतून जागें झाल्याबरोबर ईश्वरत्व पावतें. तोच ईश्वर आत्ममायेचा आश्रय करून अवतारमूर्ति घेऊन प्रगट होतो व अशा दृष्टीनें तो अवतार चरित्राच्या कथेचें श्रवण, कीर्तन, स्मरण, वगैरे करितो. तेणेंकरून त्याचें ज्ञान पक्क होऊन तो त्याजप्रत पावतो, ह्मणजे सगुणमुक्तीस पावतो. ज्ञानी पुरुषाच्या सगुणभक्तीचे लक्षणाचें थोडेसें वर्णन द्वितीयाध्यायांत स्थितप्रज्ञप्रकरणीं झालें आहे. त्याचाच विस्तार पुढें बाराव्या अध्यायांत भगवान् करतील, व सगुणमुक्ति ह्मणजे कोणती स्थिति हेंही १४ वे अध्यायांत सांगतील.

**वीतरागभयक्रोधा मन्मया मामुपाश्रिताः ।**
**बहवो ज्ञानतपसा पूता मद्भावमागताः ॥ १० ॥**

**अर्थ.**–ज्यांची आसक्ति, भय व क्रोध हीं नाहींशीं झालीं, व ज्यांनीं अनन्यभावेंकरून माझे ठिकाणीं चित्त ठेवून माझा आश्रय केला, असे बहुत लोक या ज्ञानतपानें पवित्र होऊन माझ्या भावाप्रत पोंचले.

**टीका.**–भगवंताचें जन्मकर्माचें दिव्यत्व जाणून त्यांचें श्रवणकीर्तन करणें, हेंच आत्मज्ञान्याचें तप होय. या तपाचा असा अद्भुत प्रताप आहे कीं, सर्व पापाचें मूळ अशी जी अनादिवासना, ती या तपानें नाश पावते, व भगवत्पदप्राप्ति होते. ज्ञान झाल्याबरोबर मुक्ति व्हावी, परंतु काम, क्रोध आणि भय हे वैरी जिवंत आहेत तोंपावेतों जीवन्मुक्ति होत नाहीं. हे वैरी भगवंताचे जन्मकर्माचे भजनानें नष्ट होतात. जीवन्मुक्तदशा सर्वत्र समदृष्टि झाल्याखेरीज प्राप्त होत नाहीं. ही समदृष्टि ह्मणजे सर्वत्र भगवत्स्वरूप पाहणें ही याच भजनाचें फळ होय. भगवंतच तारक आहे असा भरंवसा ठेवून त्याचे जन्मकर्माचें भजन केल्यानें चित्ताची शुद्धि होते व त्यावर आत्मप्रीतीचा ठसा बसतो. सृष्टींतील ज्या ज्या वस्तूंवर आपली प्रीति बसते ती त्या त्या वस्तूकरितां नसते, तर

आपल्याचकरितां असते, हें प्रत्येकाचे अनुभवास आहे. पहा आपले देहासारखी दुसरे कोणतेही वस्तूची आपल्यास प्रीति नाहीं. पण तो देखील आपल्या आत्म्याइतका प्रिय नाहीं. आपले पायांस गोळी लागली तर आपल्यास दुःख होऊं नये ह्मणून पाय कापून टाकण्यास आपण मार्गे पुढें पाहत नाहीं. येथें कोणी ह्मणतील कीं, पायाखेरीज बाकीचे देहाचे प्रीतीनें त्याचे सुखाकरितां पाय कापतों एवढेंच यावरून होतें, आत्म्याचे प्रीतीकरितांच वरील कृत्य आपण करितों असें होत नाहीं, ह्मणून याहून दुसरा पुढचे पायरीचा दृष्टांत घेऊं. अब्रूदाराचे अब्रूस धक्का पोंचण्याची वेळ आली तर तो देहत्याग करितो, हें आपण पाहतों. तेव्हां तो कोणाच्या प्रीतीमुळें एवढा प्रिय देह सोडतो बरें? यावरून स्पष्ट सिद्ध होतें कीं, आपल्याला आपण प्रिय आहों तसें इतर कांहीं नाहीं. ही आत्म्याची प्रीति भगवद्भजनानें अव्यभिचारिणी होते. आत्मप्रीतीचा ठसा चित्तावर आयताच आहे. पण अनादिकर्मसंस्कारांमुळें तो ठसा विषयवासनेनें झांकून जाऊन मलिन होतो. तो भगवद्भजनानें धुऊन साफ होतो. असें शुद्ध आत्मतत्व कळलें ह्मणजे अज्ञानाचें आवरण बुद्धीवर असतें, तें नाहींसें होतें. पण विषयांचा अनादि स्नेह पुनः पुनः भूल पाडून मोह उत्पन्न करितो. एवढ्याचकरितां त्यानंतरही भगवंताचीं जन्मकर्में दिव्य समजून आत्मत्वानें त्यांचें भजन केलें असतां हळू हळू विषयांची प्रीति नाहींशी होऊन, आत्मप्रीति बाणते. असें हें ज्ञानयुक्त भजनतप अनादिवासनेचा नाश करितें व तो पुरुष मुक्त होतो. असें ज्ञानतप आचरण करून बहुत लोक भगवत्स्वरूपास पावले, असें भगवान् सांगतात.

निर्गुणोपासक ज्ञान्यास ज्ञानपरिपाकार्थ सगुण भगवंताची मदत नसते. पण ज्ञानी सगुणभक्तास ती मिळते. यावरून वैषम्याचा दोषारोप भगवंतावर येतो. त्याचा परिहार उत्तर श्लोकानें केला आहे.

**ये यथा मां प्रपद्यंते तांस्तथैव भजाम्यहम् ।**
**ममवर्त्मानुवर्तंते मनुष्याः पार्थ सर्वशः ॥ ११ ॥**

**अर्थ.**—जे मला ज्या प्रकारें भजतात त्या प्रकारेंच मी त्यांस फळ देतों. जे मनुष्य आहेत ते माझ्या भजनमार्गास अनुसरतात.

**टीका.**—निर्गुण तेंच सगुण होय, कारण सोन्याची मूर्ति बनविली, तरी त्या दोहोंत कांहीं फरक नसतो. पण निर्गुण निर्धर्म आहे व भगवंताचा कल्पवृक्षासारखा स्वभाव आहे. ज्या रूपीं ज्याचा जसा भाव त्याप्रमाणेंच त्याला फळ मिळतें. निर्गुणस्वरूपीं गुणधर्म नाहींत, ह्मणून त्या रूपीं उपास्य-उपासकाचा भाव तें जाणत नाहीं. अशा निर्गुणस्वरूपाची उपासना करणारे अव्यक्तोपासकांस सगुण भगवंत कसा मदत करील बरें? याकरितां जे लोक भगवंतास सगुणत्वें भजतात, त्यांचीं विघ्नें तो हरण करून त्यांस उत्तम बुद्धि देतो. हेंच पुढें दशमाध्यायांत भगवान् सांगणार आहेत. त्या बुद्धीच्या योगानें त्यांचे अविद्यावरणाचा व जडत्वभ्रांतीचा नाश होतो. योगाभ्यासकाळीं मनास लय आणि विक्षेप होतात, ते निर्गुणोपासकांस आपलेच यत्नानें, अभ्यासाचे व वैराग्याचे बलानें जिंकिले पाहिजेत. इंद्रियाभिमानी देवता अभ्यासकाळीं विषयभाव दाखवून नेहमीं विघ्नें करितात, तीं टाळतांना त्यांस फार क्लेश होतात. तसे क्लेश सगुणभक्तांस होत नाहींत. कारण सगुणत्वीं कृपाळुत्व असल्यामुळें तो सगुण भगवंत त्यांचे विघ्नांचा नाश करितो व प्रारब्धभोग संरतांच सगुण भक्त अनायासें इंद्रियें आवरून घेतो. सगुणभजनमार्गी जे लोक आहेत त्यांस जसें भजनफळ ऐकूं येईल तसेंच ते भजन करितात. अव्यक्तोपासक सगुण उपासनेचें फळ मागत नाहींत, ह्मणून भगवंत त्यांस तें देऊं शकत नाहीं. कारण तसें केल्यानें त्याचा कल्पवृक्षस्वभाव मोडेल व त्यास वैषम्य लागेल. एवंच भगवंतास पावण्याचे निर्गुण उपासना व सगुण उपासना हे दोन मार्ग आहेत. या दोहींपैकीं कोणत्या तरी एका मार्गानें जे चालतात तेच मनुष्य होत, इतर नव्हत, असा या श्लोकाचे उत्तरार्धाचा भाव आहे. मनुष्यास मनुष्यत्व भगवद्भजनामुळेंच आहे. नाहीं तर तो पशुच होय. मनुष्यांस दोन पाय असतात ह्मणून त्यास मनुष्य

ह्मणावें, तर पक्ष्यांसही दोन पाय असतात. त्यास दाढी असते ह्मणून मनुष्य ह्मणावें, तर बोकडासही दाढी असते. दोन हात आहेत ह्मणून त्यास मनुष्य ह्मणावें, तर माकडासही दोन हात असतात. सुरतसुखामुळें तो पशूहून श्रेष्ठ आहे ह्मणावें, तर सर्व जीवधारी प्राण्यांस तें सुख आहेच. मनुष्यें घरें बांधितात हें खरें, पण पक्षीही आपलीं घरकुलें करितात. मनुष्यें उद्यांची काळजी करितात त्याप्रमाणेंच पक्षीही पुढें होणाऱ्या अंड्यांची काळजी बाळगून त्यांचेकरितां मऊ बिछाना तयार करून ठेवितात. भीतीही सर्व प्राण्यांत आहेच. ह्मणून हरीचें भजन ज्यास आहे तोच मनुष्य, इतर नव्हत, हें सिद्ध झालें. एवंच मनुष्य आहेत ते भगवद्भजनमार्गांत असतात व ते जसें भजन करितात तसें फळ पावतात. सगुणभक्त सगुणचरणीं अनुरक्त असतात, ह्मणून ते अनायासें मुक्ति पावतात.

**कांक्षंतः कर्मणां सिद्धिं यजंत इह देवताः ।**
**क्षिप्रं हि मानुषे लोके सिद्धिर्भवति कर्मजा ॥ १२ ॥**

**अर्थ.**—कर्मसिद्धीची इच्छा बाळगणारे जन या लोकीं इतर देवतांचें पूजन करितात. याचें कारण असें कीं, या लोकीं कर्मोद्भवा सिद्धि लवकर प्राप्त होते.

**टीका.**—सगुण भजतां सगुण मोक्ष व निर्गुण भजतां निर्गुण मोक्ष असें भजनानुरूप विषमफळ देऊनही भगवंत विषम नाहीं हें पूर्व श्लोकीं दाखविलें. या दोघांसही मोक्ष प्राप्त होतो. कर्मसिद्धीच्या लालसेनें जे इतर देवतांचें भजन करितात त्यांस कर्मजनित सिद्धिही तोच देतो. मनुष्यदेह सर्व कर्मांचें सुपीक शेत आहे. जी इच्छा धरून मनुष्य कर्म करील ती इच्छा फार लवकर सिद्ध होते. सर्व देवताही भगवंतच आहे. पण भक्त मागतील तें तो देतो, ह्मणून यांतही त्याजकडे विषमता येत नाहीं. आतां विषमसृष्टिरचना करूनही आपलेकडे विषमता येत नाहीं, असें भगवान् दाखवितात.

**चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः ।**

**तस्य कर्तारमपि मां विद्ध्यकर्तारमव्ययम् ॥ १३ ॥**

**अर्थ.**–गुण आणि कर्म यांच्या विभागास अनुसरून मी चार वर्ण केले. अकर्ता आणि अव्यय असा जो मी तोच कर्ता आहे असें समज.

**टीका.**–ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शुद्र असे एकाहून एक नीच वर्ण कृपाळु ह्मणविणाऱ्या भगवंतानेंच उत्पन्न केले. ते उत्पन्न करूनही त्याजकडे त्यांचें कर्तृत्व येत नाहीं. सर्व कर्तृत्व मायेनें आहे. भगवंत स्वतः अकर्ता आणि अव्यय आहे. सर्व जड जग मायामय आहे. पण त्याचें अस्तित्व त्याच्या सत्तेनें आहे. जिभेवांचून आत्मा (आपण) बोलूं शकत नाहीं. पण आपल्या (आत्म्याचे) सत्तेनें ह्मणजे हुकुमानें जीभ शब्दाचा उच्चार करिते. आत्मा इंद्रियांविण असूं शकतो, पण इंद्रियें त्याचे सत्तेशिवाय असूं शकत नाहींत व कार्य करूं शकत नाहींत. या समजुतीनें ईश्वर करूनही अकर्ता राहतो. सत्ता त्याची ह्मणून तो कर्ता, परंतु प्रत्यक्ष कर्तृत्व मायेकडे आहे. राजा आपले मंदिरांत स्वस्थ बसून शिपायास एखादें कार्य करण्यास हुकूम देतो. शिपायी तें बजावितो. राजा प्रत्यक्ष कांहींच करित नाहीं, पण हुकूम त्याचा असतो. त्याप्रमाणें सत्ता ईश्वराची व कर्तृत्व मायेचें आहे. भगवंतांनीं हीं दोन रूपें बोलून दाखविलीं, हें देखील मायेचेंच कर्तृत्व होय. तो स्वतः बोलत नाहींच. मौन असतेवेळचें अबोलणें व तें टाकल्यावर बोलणें ह्या दोहींचेंही रूप जीभ एकटीच दाखविते. तद्वत् कर्ता व अकर्ता हीं दोन्हीं रूपें भगवंतांनीं सांगितलीं. तें मायेचें कार्य होय. या जिभेच्या दृष्टांतासंबंधानें कोणी असें ह्मणतील कीं, पुरुष इच्छा धरून जाणूनबुजून वाचा चाळतो. यावरून भगवंताकडेच कर्तृत्व येतें व वाचेचा दृष्टांत सम्यक् होत नाहीं. तर त्यांचें समाधान

असें होतें कीं, पुरुष बोलतच नाहीं, वाचाच बोलते. आपलें व मायेचें दाखविणें, हें मायेचें कतृत्व होय. आतां सृष्टि करण्याची भगवंताची इच्छा ह्मणजे त्रिगुणमाया होय. त्रिगुणमायेलाच भगवदिच्छा ह्मणतात. यावरून भगवंताचे अंगीं इच्छा स्थापणें होतच नाहीं. सृष्टि करण्याचें स्फुरण त्रिगुणांस भगवत्सत्तेनें होतें. यास दृष्टांत:--भ्रमणें हा लोहाचा गुण होय. चुंबक कांहीं हालचाल करित नाहीं. पण चुंबकावांचून लोह हालूं शकत नाहीं, ह्मणून सत्ता चुंबकाची असते. यावरून स्पष्ट दिसतें कीं कर्मास सत्ता नाहीं व सत्तेस कर्तृत्व नाहीं. दोहींचा मेळ मिळाला ह्मणजे क्रिया घडते. बोलण्याची इच्छा होणें हेंही पुरुषाचे सत्तेवांचून होत नाहीं. यावरून इच्छेस जातीची शक्ति नाहीं, हें उघड होतें. आतां इच्छा नसली तर पुरुषास कर्तृत्व नाहीं "माझी इच्छा" एवढें ह्मटलें तरी अहंकार आलाच. याहीपलीकडे पुरुष आहे, तेव्हां तो अकर्ता आहे हें सांगणें नको. काष्ठाग्नीचा प्रकाश असतो. नुसते काष्ठास प्रकाश नाहीं. तसें मायेवांचून आत्मसत्तेची खुण बोलतां येत नाहीं, ह्मणून आपलें रूप व मायेचें रूप अशीं दोन्ही रूपें भगवंत बोलले तें मायेचेंच कर्तृत्व होय. प्रकाशहीन काष्ठाचे योगानें त्यास व आपणास अग्निप्रकाशित करितो. तसें भगवंतानें माया व ब्रह्म हीं दोन्हीं रूपें केलीं, तें मायेचेंच कृतृत्व होय. परंतु अग्नि आपलेच प्रकाशानें प्रकाशतो, व प्रकाश हीन काष्ठासही प्रकाशवितो. तसें ब्रह्म आणि माया हीं दोन्ही रूपें ब्रह्मसत्तेनेंच सांपडतात. पुरुषासमोर आरसा आणिला ह्मणजे त्यांत तो आपणास पाहतो. तसा शुद्धसत्वामुळें आत्मप्रत्यय होतो. आरशावांचून आपलें रूप आपणास दिसत नाहीं तरी आरसा कांहीं स्वतःचें रूप नाहीं. आरशावांचून पुरुष असूं शकेल. पण पुरुषावांचून आरशांत पुरुषाचा आकार दिसणार नाहीं. तसा मायेंत तो पुरुष ब्रह्म सत्तेवांचून दिसूं शकत नाहीं. डोळे जें पाहत नाहींत, तें डोळ्यांचे सत्तेनें उपनेत्र पाहतें. तसें ब्रह्म सत्ता मात्र, व सर्वकर्तृत्व मायेचें आहे. याप्र-

माणें कर्तृत्व मायेकडे आहे व ती ईशसत्तेनें वागते, तरी आपल्याकडे विषमपण येत नाहीं, असें भगवान् ह्मणतात. सत्व, रज व तम या तीन गुणांचे कर्मविभागानुरूप, हे वर्ण प्रतिसृष्टिकाळीं ईश्वर उत्पन्न करितो. निवळ सत्वगुणेंकरून ब्राह्मण, सत्वरजमिश्रगुणेंकरून क्षत्रिय, निवळ रजोगुणेंकरून वैश्य, व निवळ तमोगुणेंकरून अति नीच शुद्र वर्ण असे वर्ण उत्पन्न केले. असे गुणांचे विभाग करून वर्ण केले. या गुणानुरूपच कर्म होतें व कर्मप्रमाणें फळ प्राप्त होतें, असा अनादि मायेचा प्रवाह चालू आहे. ह्मणून हे चारी वर्ण करूनही ईश्वर विषम नाहीं. ही माया, सृष्ट्युत्पत्तीचे पूर्वीं, ब्रह्मापासून उत्पन्न होते. सृष्टीचे स्थितिकाळीं त्याचे सत्तेनें भासते व प्रळयकाळीं पुनः त्याजमध्यें लीन होते. ईश्वराला उत्पत्तिही नाहीं व लयही नाहीं. ह्मणून त्याला अव्यय ह्मणतात. माया प्रगटली ह्मणजे तिन्ही गुण प्रगट होतात व गुणानुरूप वर्णही होतात. ह्मणून तो ते करूनही अकर्ता आहे, असें भगवान् ह्मणतात. "**जन्म कर्म च मे दिव्यम्**" या श्लोकापासून येथपर्यंत झालेल्या उपदेशाचें तात्पर्य काय हें येथें दिल्यानें फायदा होईल असें वाटतें. भगवंताचें जन्म आणि कर्म दिव्य आहे असें समजून जे त्याचें भजन करितील, ते त्याचे भावास पावतील. सुगुणभजनाविणें संसारसिंधु तरणें दुर्घट आहे. याकरितां भगवंतास अवतार घेऊन चरित्र करावें लागतें. असें केल्यानें ईश्वराची सदयता दिसून येते. भजनानुरूप फळ मिळतें, ह्मणून त्याजकडे वैषम्य ही येत नाहीं. ईश्वर सम व सदय आहे असें जाणून जो त्याचें भजन करितो, तो, ही समता सदयता पावून तद्रूप होतो.

भगवान् हेंच प्रकारांतरें पुढील श्लोकानें बोलतात.

**न मां कर्माणि लिंपंति न मे कर्मफले स्पृहा ।**
**इति मां योऽभिजानाति कर्मभिर्न स बध्यते ॥ १४ ॥**

**अर्थ.**—मला कर्माचें बंधन होत नाहीं व कर्माचे फळाची मला इच्छाही नाहीं. असें जो मला जाणतो तो कर्मानें बद्ध होत नाहीं.

**टीका.**—चार वर्णांची विषम सृष्टि करूनही आपले अंगीं विषमता नाहीं, ह्मणून आपण अकर्ता आहे, हें पूर्व श्लोकीं भगवान् बोलले. हें कर्म करूनही अकर्तृत्व राखण्याचें वर्म जीवकोटींतही आहे. परंतु अहंकर्तृत्वाचे व्याधीमुळें जीव कर्माचें फळ पावतात. ही अहंकाररूप उपाधि टाकून दिली ह्मणजे फळाची वार्ताच नाहींशी होईल. असा अहंकार जरी टाकिला, तरी अनादि अविद्याजनित वासना कायम असल्यामुळें फलेच्छा उत्पन्न होते व मग टाकलेला अहंकार आवश्य येऊन चिकटतो. ह्मणून कर्मफलाची अपेक्षा ज्यास नाहीं, तोच मोक्षास पात्र होय, व तोच कर्म करूनही सर्वत्र अलिप्त राहूं शकेल. विद्या ईश्वराची उपाधि आहे ह्मणून त्याला अहंकार अथवा कर्मफलेच्छा मुळींच नाहीं व या कारणानें त्याला कर्मबंध नाहीं. ह्मणून येथपर्यंत जीं लक्षणें सांगितलीं त्यांनीं भगवंत युक्त आहे, असें जाणून जो त्याचें जन्म व कर्म दिव्यत्वें पाहून त्याचे गुणांचें भजन करितो तो, तेच गुण पावून, त्यासारखाच कर्मे करून अलिप्त राहतो व अर्थात् त्यासारखाच बनतो.

निष्कामकर्म केल्यानें आत्मज्ञान होतें. नंतर सगुण अथवा निर्गुण उपासना केल्यानें तें ज्ञान पक्तेस पावतें. वेदाचीं तीन कांडें याच हेतूनें झालीं. कर्मकाण्ड कर्म सांगतें, उपासनाकाण्ड उपासना ह्मणजे भक्ति सांगतें व ज्ञानकाण्ड ज्ञान सांगतें. या तीन काण्डांची वेद एक साखळीच होय. मधली कडी ( भक्ति ) पहिल्या ( कर्म ) व तिसऱ्या ( ज्ञान ) या दोन्हीं कड्यांशीं गुंतलेली आहे. यावरून कर्माची सिद्धि ह्मणजे ज्ञानोत्पत्ति इच्या करितां भक्तीचा आश्रय पाहिजे, हें उघड दिसतें. सकामकर्म केल्यानें मनुष्य जन्ममरणाचे सपाट्यांत सांपडतो व निष्कामकर्मही ईश्वरीं न अर्पण केलें, तर तसेंच होतें. तें कर्म ईश्वरीं समर्पण करितांना तो ईश्वर वर सांगितलेल्या गुणांनीं युक्त आहे अशी भावना असली पाहिजे, ह्मणजे भावनेप्रमाणें ईश्वर फळ देतो. असें सांगून आतां कर्म करण्याविषयीं पुनः उपदेश करितात.

**एवं ज्ञात्वा कृतं कर्म पूर्वैरपि मुमुक्षुभिः ।**

**कुरु कर्मैव तस्मात्त्वं पूर्वैः पूर्वतरं कृतम् ॥ १५ ॥**

**अर्थ.**—असें जाणून पूर्वी होऊन गेलेल्या मुमुक्षु जनांनींही कर्म केलें. ह्मणून पूर्वीच्या लोकांनीं त्यांचेही पूर्वीपासून चालत आलेलें कर्म केलें तें तूंही कर.

**टीका.**—असें कर्म करणें व ईश्वरास समर्पण करणें, हाच प्रथम भागवत धर्म होय. याचे योगानें मुमुक्षूच्या चित्ताची शुद्धि होऊन तो ब्रह्मप्राप्तीस योग्य होतो. यापूर्वी सांगितल्याप्रमाणें ईश्वरास निर्दोष समजून त्यास कर्म समर्पण करणें यासच **भक्तियोग** ह्मणतात. हा ज्ञान-प्राप्तीचे पूर्वकालींचा भक्तियोग होय सर्व विश्व सुगुणब्रह्म होय, असा भक्तियोग ज्ञानोत्तरकालीं करण्याचा आहे. पूर्वीच्या शेंकडो लोकांनीं याच प्रमाणें भक्तियोग करून ते ज्ञानवान् झाले. तसें व्हावें, अशी ज्यांस इच्छा असेल त्यांनीं तसेंच कर्म करावें.

आतां **कर्म** कशास ह्मणावें व **अकर्म** ह्मणजे काय हें भगवान् सांगतात.

**किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिताः ।**

**तत्ते कर्म प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ॥ १६ ॥**

**अर्थ.**—खरोखर कर्म कसें व अकर्म कसें याविषयीं विचारी लोक देखील भ्रम पावले. तें कर्म तुला मी सांगतों. तें जाणल्यानें तूं अशुभ अशा बंधापासून सुटशील.

**कर्मणोह्यपि बोद्धव्यं बोद्धव्यं च विकर्मणः ।**

**अकर्मणश्च बोद्धव्यं गहना कर्मणो गतिः ॥ १७ ॥**

**अर्थ.**—कर्मही जाणलें पाहिजे, विकर्मही जाणलें पाहिजे, आणि अकर्मही जाणलें पाहिजे. कारण कर्माचें तत्व गहन आहे.

टीका.-वेदविहित कर्म करण्यास "कर्म" ह्मणावें, वेदांनीं निषेधिलेलें कर्म करण्यास "विकर्म" ह्मणावें, आणि वेदविहित कर्म न करणें यास "अकर्म" ह्मणावें. या तिन्ही प्रकारीं कर्मच घडतें. परंतु खरें तत्व वर सांगितल्याप्रमाणें आहे. विहित कर्मास विशेषत्वें फळें सांगितलीं नाहींत. तरी वर पितृलोक फल आहेच. "कर्म" ईश्वरास अर्पण न केल्यानें, व "विकर्म" आणि "अकर्म" हीं कर्में जातीचीं बंधक आहेत, ह्मणून कर्माची शक्ति गहन ह्मणजे खोल आहे, असें भगवान् ह्मणतात. जे ह्या कर्मरूपीं खोल पाण्यांत बुडतात ते सुटकेच्या भूमिकेस पावत नाहींत. फळ भोगून सूटणें हें सुटणें नव्हे. एकाद्याचे हातपाय बांधले असले-तर बंध तोडून सुटणें, तें खरें सुटणें होय. हातपाय कापून घेऊनही सुटण होतें, तें कोणते कामाचें? खोल पाण्यांत बुडालेला मनुष्य जीवा-सहित बाहेर निघाला, तर तो तरला ह्मणावा. नाहीं तर प्रेत होऊन वर तरून येतोच. ह्मणून खरें कर्मतत्व भगवान् आतां सांगतात.

कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मणि च कर्म यः ।
स बुद्धिमान्मनुष्येषु स युक्तः कृत्स्नकर्मकृत् ॥ १८ ॥

अर्थ-वेदोक्त विहित कर्म करूनही कर्मफळविरक्तीमुळें नें कर्म न केल्याप्रमाणें जो समजतो; व वेद विहित कर्म न करणेंही कर्मच आहे, असें जो समजतो, तो सर्व मनुष्यांत बुद्धिमान् होय व सर्व कर्में करूनही योगी होय.

टीका.-वेदोक्त कर्म विष्णुसमर्पणावांचून बंधक होतें. वेदांनीं निषेधिलेलें कर्म व अकर्म हीं तर बंधक आहेत हें पूर्वींच सांगितलें आहे.

कर्मसमर्पणानें फक्त क्रियमाणाचा बंधकपणा नाहींसा होतो. पण संचिताची वाट काय असा प्रश्न निघतो. याचें उत्तर असें कीं, अशा प्रकारें भागवतधर्म आचरण केला ह्मणजे सगुण ईश्वर प्रसन्न होऊन, श्रीगुरूचे

रूपानें येऊन अपरोक्षानुभव देतो. त्या ज्ञानाग्नीनें संचितकर्म जाळतां येतें. श्रीगुरुमुखें अपरोक्षज्ञान मिळाल्यावर कित्येक निर्गुण उपासना धरितात व कित्येक निर्गुणत्वें सगुणभक्तीचा आश्रय करितात. त्यांपैकीं निर्गुणोपासकांचा संचितकर्मनाश कसा होतो, तें भगवान् प्रथम सांगतात.

**यस्य सर्वे समारंभाः कामसंकल्पवर्जिताः ।**
**ज्ञानाग्निदग्धकर्माणं तमाहुः पंडितं बुधाः ॥ १९ ॥**

**अर्थ.**–ज्याचे सर्व उद्योग फलेच्छा रहित असतात व ज्याचीं सर्व कर्में ज्ञानाग्नीनें जळालेलीं असतात, त्यास ज्ञातेजन पंडित असें ह्मणतात.

**टीका.**–ज्ञानाग्नीनें आपलीं कर्में जो जाळून टाकितो त्यास **वसिष्ठादि** श्रेष्ठ ज्ञाते पंडित असें ह्मणतात. "**कर्मण्यकर्म यः पश्येत्**" कर्माचें ठायीं जो अकर्म पाहतो व ह्मणून ज्याचें क्रियमाण बंधक होत नाहीं, तो कर्मयोगी ह्मणावा. असा कर्मत्याग करून ज्ञान प्राप्त झाल्यावर, ज्ञानानें जो कर्म जाळतो तोच पंडित होय. विद्वत्तेच्या जोरावर पंडित ह्मणविणारे खरे पंडित नव्हत, हें या भगवद्वचनावरून उघड दिसतें. असा हा निर्गुणोपासक ज्ञानाग्नीनें संचित जाळतो व अकर्त्रात्मपणें क्रियमाणाचा विटाळ होऊं देत नाहीं. याचे सर्व समारंभ ह्मणजे देहनिर्वाहाचीं अगत्य कर्में देखील कामसंकल्पविवर्जित असतात, ह्मणजे निर्वाहाचीं काय तजवीज करावी वगैरे विचार नसतात. जेवायाला मिळालें तर खातो न मिळालें तर तसाच राहतो. खातां, जेवतां, हगतां, निजतां, बसतां, कोणतेही काळीं त्यास संकल्प नसतो. संकल्प इच्छेमुळें होतात. त्यास कोणतीच इच्छा नसते, तेव्हां संकल्प कोठून उद्भवणार? असा हा निर्गुणोपासक पक्कज्ञानी होय. ज्ञानी पुरुषास प्रारब्ध आहेच ह्मणून सर्व ज्ञान्यांची स्थिति एकसारखी नसणार, हें उघड आहे. आतां याहून निराळ्या स्थितीच्या ज्ञानी पुरुषाचीं लक्षणें भगवान् सांगतात.

**त्यक्त्वा कर्मफलासंगं नित्यतृप्तो निराश्रयः ।**
**कर्मण्यभिप्रवृत्तोपि नैव किंचित्करोति सः ॥ २० ॥**

**अर्थ.**—कर्मफल व अहंकर्तृत्व टाकून तो नेहमीं तृप्त व निराश्रित असतो व कर्माचे ठायीं जरी तो वर्तला तरी कांहीं करित नाहीं.

**टीका.**—असा ज्ञानी विषयसुखेच्छा व 'मी कर्त्ता' असा अहंकार टाकून सर्व प्रकारचीं कर्में करितो. ह्या मुळें त्यास क्रियमाणाचा लेप नसतो. तो नेहमीं आत्मसुखानें तृप्त असतो व आपण निराश्रित आहों असें समजतो; ह्मणजे तो आपणास अनंत असा आत्मा समजतो व आपलाच आश्रय सर्व जगास आहे असें समजतो, ह्मणून तो निर्वाहा-करितां कर्में करूनही कांहींच करित नाहीं असा असतो.

या पूर्वींच्या श्लोकांत देहनिर्वाहाची परवा न ठेवणारा ज्ञानी सांगितला. या श्लोकांत देह निर्वाहापुरतें कर्म करणारे ज्ञानी पुरुषाची स्थिति वर्णिली. हा आत्मसुखानें नेहमीं तृप्त असतो असें ह्मटलें आहे. तरी क्षुधाकालीं त्यास अन्नाची इच्छा होतेच. परंतु त्या इच्छेनें तो बद्ध होत नाहीं. असें पुढचे श्लोकांत दाखविलें आहे.

**निराशीर्यतचित्तात्मा त्यक्तसर्वपरिग्रहः ।**
**शारीरं केवलं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषं ॥ २१ ॥**

**अर्थ.**—ज्याच्या सर्व कामना गेल्या आहेत, ज्याचें चित्त आणि बुद्धि स्वाधीन झालीं आहेत, व ज्याणें स्त्रीपुत्रादि कुटुंबाचा त्याग केला आहे, अशा ज्ञानी पुरुषानें केवळ शरीररक्षणाकरितां केलेल्या कर्मानें त्यास बंध होत नाहीं.

**टीका.**—मातीच्या भिंतीस मातीनेंच लिंपतात. तसें कर्माचा देह कर्मानेंच वर्ततो. क्षुधा, तृषा यांच्या शांतीकरितां अन्न, उदक आवश्य पाहिजे. त्याचप्रमाणें शीतनिवारणार्थ वस्त्रही पाहिजे. क्षुधादिबाधेनें विकळ झाले वेळीं चित्त चंचल होतें व तें स्वरूपीं स्थिर राहत नाहीं.

याकरितां ज्ञानी पुरुष विषयवासना टाकून केवळ शरीरनिर्वाहाकरितां कर्म करितो. पण त्यापासून त्यास बंध प्राप्त होत नाहीं.

आतां कुटुंबवत्सल ज्ञानी पुरुषासही क्रियमाणाचा स्पर्श होत नाहीं, असें भगवान् सांगतात.

**यदृच्छालाभसंतुष्टो द्वंद्वातीतो विमत्सरः ।**
**समः सिद्धावसिद्धौ च कृत्वापि न निबध्यते ॥ २२ ॥**

**अर्थ.**—यत्न केल्यावांचून झालेल्या लाभानें जो संतुष्ट असतो, शीत, उष्ण, मान, अपमान वगैरे द्वंद्वास जो जुमानीत नाहीं, ज्याचा मत्सर नाहींसा झाला आहे व कर्माची सिद्धि व असिद्धि जो सारखीच मानतो, असा ज्ञानी पुरुष कर्म करूनही बद्ध होत नाहीं.

**टीका.**—ज्याचे डोक्यावर कुटुंबपोषणाची जबाबदारी आहे त्यानें मुख्यत्वें अयाचित राहिलें पाहिजे. कितीही मिळविलें तरी कुटुंबास पुरें पडत नाहीं, हा सर्वांस अनुभव आहेच. करितां जें अनायासें मिळेल, त्यांत संतुष्ट रहावें. लाभ झाला असतां संतोष व हानि झाली असतां खेद वाटूं देऊं नये. यदृच्छालाभानें संतुष्ट असावें असें पहिल्या चरणानें सांगून, लागलीच दुसरे चरणांत **द्वंद्वातीत** या शब्दानें लाभाचा संतोष मानूं नये, असा उपदेश आहे. यांत विरोध दिसतो, तो स्पष्टीकरणानें नाहींसा केला पाहिजे. पहिले चरणांतील संतोष, लाभाचा नव्हे. क्षुधा, तृषा व थंडी यांची पीडा झाली ह्मणजे चित्त अस्थिर होतें व आत्मसुखाचे अनुभवानें जो संतोष नेहमीं राहतो त्यास बाध येतो. या क्षुधादिपीडांच्या निवारणार्थ जें कांहीं मिळेल त्याचें सेवन केल्यानें, ज्ञानी पुरुषांस पुन्हां आत्मसंतुष्टता येते. यावरून पहिले चरणांतील लाभ आत्मसंतोषाचा होय, विषयप्राप्तीचा नव्हे. त्यानें सुखदुःख देणारे सर्व द्वंद्वांपासून मुक्त व निर्मत्सर असलें पाहिजे. अयाचित वृत्तीनें कुटुंबनिर्वाह होणार नाहीं, तर यत्न करून निर्वाहापुरती सामुग्री मिळविलीच पाहिजे.

तसा यत्न करूनही ज्ञानी पुरुष त्या कर्मानें बद्ध होत नाहीं हें दाखविण्याकरितां तिसऱ्या चरणांत भगवान् बोलतात कीं, कोणतेंही कर्म केलें व ज्या हेतूनें तें करण्यास आरंभ केला होता तो सिद्धीस गेला अथवा न गेला, तरी चित्तवृत्तीस सारखें समाधान असावें. असें समाधान राहण्यास प्रारब्धतत्वावर पूर्ण भरंवसा पाहिजे. कुटुंबवत्सल ज्ञानी पुरुषानें या श्लोकांत सांगितल्याप्रमाणें वर्तन ठेविल्यास, क्रियमाणाचा लेप न लागतां, तो मुक्त राहतो.

एथपर्यंत निरनिराळ्या स्थितींत असलेल्या निर्गुणोपासक ज्ञानी पुरुषांचें संचित कसें नासतें व क्रियमाणाचा लेप कां लागत नाहीं, हें भगवंतांनीं सांगितलें. आतां ज्ञानी सगुणभक्ताची स्थिति पुढील श्लोकांत दाखविली आहे.

**गतसंगस्य मुक्तस्य ज्ञानावस्थितचेतसः ।**
**यज्ञायाचरतः कर्म समग्रं प्रविलीयते ॥ २३ ॥**

**अर्थ.**–विषयाभिलाषरहित अशा अद्वैत ज्ञानाचे ठायीं, ज्याचें चित्त स्थिर आहे, असा ज्ञानी पुरुष सर्व कर्म **विष्णू**कारणें करितो, ह्मणून तें सर्व विशेषत्वें अकर्म होतें.

**टीका.**–निर्गुणोपासकांचें जें निर्गुणज्ञान तेंच सगुणोपासकाचें ज्ञान होय; फरक हाच कीं, सगुणोपासक आपलीं सर्व कर्में **यज्ञ** नामक **विष्णू**स समर्पण करितो. **श्रीविष्णू**कारणें सर्व कर्म करणें हाच **वैष्णव धर्म** होय. जिज्ञासुदर्शेत हाच **वैणष्व धर्म** आचरल्यानें कर्माचें अकर्म होतें, असें यापूर्वीं सांगितलेंच आहे. मग ज्ञान झाल्यावर तें बंधक होईल काय? कधींही नाहीं. असें असून निर्गुणोपासक सगुणभक्ति सोडून देतात व ज्ञानसिद्धीकरितां फार क्लेश पावतात. परंतु ज्ञानी भक्त, सर्व कर्में **श्रीविष्णू**स समर्पण केल्यानें, त्या कर्मीं लिप्त न होतां, अनायासें ज्ञानसिद्धीप्रत पावतो. असा या श्लोकांतील भावार्थ आहे, तो आपल्यास

काढिला पाहिजे. हा भावार्थ "**प्रविलीयते**" या शब्दापासून निघतो. "**लीयते**" एवढें ह्मटलें असतें, तरी कर्मनाशाचा बोध होताच. जिज्ञासुदशेंतही **विष्णूस** अर्पण केलेलें कर्म बंधक होत नाहीं, हें पूर्वींच स्पष्ट झालें आहे. पण ज्ञान प्राप्त झाल्यावर **विष्णूस** अर्पण केलेल्या कर्माचा प्रकर्षें विशेषत्वें नाश होतो, हें दाखविण्याकरितां "**प्रविलीयते**" असा शब्द योजिला आहे. हें "**प्रकर्षत्व विशेषत्व**" कशामुळें, याचा शोध केला पाहिजे. यापुढें बारावे अध्यायांत भगवान् सांगणार आहेत कीं, अव्यक्तोपासक ज्ञानी कर्मनाश करितांना फार कष्ट पावतात. कारण त्यांना तें काम त्यांचेच यत्नानें करावें लागतें. पण ज्ञानी सगुणभक्त ज्ञानोत्तरकालींही सगुणभगवंताचें भजन करितो, त्यामुळें सगुणकृपा होते व त्या कृपेचे साह्यानें त्याचा इंद्रियजय अनायासें होतो. निर्गुणोपासक आपल्याच यत्नांवर अवलंबून असतात. ते यत्न किल्येक प्रसंगीं सफल होत नाहींत. अशा रीतीनें ते धडपड करित "**ते प्राप्नुवंति मामेव**" ह्मणजे "**माझे स्वरूपास मिळतात**" एवढेंच भगवान् ह्मणतात. पण सगुण भक्तांसंबंधानें ते ह्मणतात कीं, "**तेषामहं समुद्धर्ता**" ह्मणजे "**त्यांचा उद्धार करणारा मी आहें.**" ज्ञानी भक्तांचे कर्मनाशाचें प्रकर्षत्व विशेषत्व हेंच होय. ज्ञानी भक्तास निर्गुणा-( आत्मा ) नुभव असतोच. त्या अनुभवें युक्त होऊन तो सर्व साकार सगुण जग भगवंताचे रूपानें पाहतो व श्रवणकीर्तनादि भक्तिही तशीच करितो. तेणेंकरून तो आपलें हित करितो एवढेंच नाहीं, तर तो जगदोद्धारास कारणीभूत होतो. याच हेतूनें "**लोकसंग्रहमेवापि संपश्यन्कर्तुमर्हसि**" असें तृतीयाध्यायांत भगवान् बोलले. **श्रीशुका**सारखे जीवन्मुक्त योग्यांनीं देखील हरिभक्ति धरिली, याचें कारण श्रीमद्भागवतांत त्यांनीं स्वतःच सांगितलें आहे तें असें:-**परिनिष्ठितोऽपिनैर्गुण्ये उत्तमश्लोकलीलया । गृहीतचेता राजर्षे आख्यानं यदधीतवान् ॥** "हे राजर्षे परीक्षिती, पूर्ण ज्ञानी झालों असतांही उत्तम श्लोक भगवान् याचे लीला-

गुणांनीं माझें चित्त हरण करून घेतलें ह्मणून मी माझा बाप व्यास याजपाशीं, ज्यांत भगवंताचीं चरित्रें वर्णन केलीं आहेत, असें श्रीमद्भागवत शिकलों.

हरिभक्तींत असणारा आनंद हरिभक्तांसच ठाऊक. तो लिहून दाखवितां येणार नाहीं.

आतां विष्णूस कर्म समर्पण करण्याची रीति आणि त्याचें फळ भगवान् पुढील श्लोकानें सांगतात.

**ब्रह्मार्पणं ब्रह्महविर्ब्रह्माग्नौ ब्रह्मणाहुतम् ।**
**ब्रह्मैव तेन गन्तव्यं ब्रह्मकर्मसमाधिना ॥ २४ ॥**

**अर्थ.**–अर्पण करणें, हविर्द्रव्य, अग्नि, होमकर्त्ता, हीं सर्व ब्रह्मरूपानें जो पाहतो, तो ब्रह्मरूपकर्माचे ठायीं समाधि प्राप्त होत्साता सगुणब्रह्मातेंच पावतो.

**टीका.**–सकळ सृष्टि ब्रह्माचेंच रूप आहे, असें जाणणें यास विज्ञान ह्मणतात. या समजुतीनें यज्ञकर्म करीत गेलें असतां, त्या कर्माचे ठायीं ब्रह्मसमाधि प्राप्त होते, व अखेरीस त्यास सगुणमोक्ष मिळतो. समाधि ह्मणजे चित्ताची एकाग्रता. निर्गुणज्ञानाशिवाय अशी समाधि बाणत नाहीं, हें सांगणें नको. ह्मणून अशा समाधीनंतर जें ब्रह्मपद प्राप्त होतें, ह्मणून भगवान् सांगतात, तें सगुणब्रह्मच होय, असें "**ब्रह्मैव तेन गंतव्यं**" यांतील "**एव**" शब्दानें उघड दिसतें. सर्व जग ब्रह्ममय पाहूं लागला ह्मणजे तो जीवन्मुक्तच झाला, मग त्यानें पावावयाचें असें काय उरलें ? निर्गुणब्रह्मप्राप्ति तर झालेलीच असते. तेव्हां तदनंतर पावण्याचें तें सगुणब्रह्मच होय.

आतां यापुढें निर्गुणलय ( ह्मणजे निर्गुणीं सर्व वृत्तींचा होम क-

र्णें ) कसा करितात तें भगवान् सांगणार आहेत. त्यापूर्वी कर्ममार्गाभिज्ञ लोक यज्ञ कसा करितात, तें अर्ध श्लोकानें सांगतात.

**दैवमेवापरे यज्ञं योगिनः पर्युपासते ।**
**ब्रह्माग्नावपरे यज्ञं यज्ञेनैवोपजुह्वति ॥ २५ ॥**

**अर्थ.**—कोणी कर्मयोगी देवतांच्या उद्देशानें यज्ञ करितात. व कोणी ब्रह्मरूप अग्नींत ब्रह्मरूप द्रव्याचाच यज्ञ करितात.

**टीका.**—हा ज्ञानमार्गाचा प्रसंग चालला आहे, यांत कर्ममार्गाचा संबंध कां आणिला, अशी शंका येते. तिचें निराकरण असें कीं, सगुणभक्त जो यज्ञ करितो तो आणि हा एकच. परंतु सगुणभक्त विष्णूकारणें करितो व हे कर्ममार्गी लोक तो देवतांकरितां करतात. कर्ममार्गी लोक देवताकिंकर असतात, तसा सगुणभक्त नसतो, हें या अर्धानें दाखविलें आहे. उत्तरार्धानें निर्गुणोपासकांचें यज्ञकौतुक वर्णन केलें आहे. तें निर्गुणब्रह्मच अग्नि आहे अशी भावना करून त्यांत सकळ मानसिक वृत्तींचा ते होम करितात. यमनियमसंपन्न असलेल्यांचे हातूनच हा यज्ञ होईल. इतरांस तो साध्य नाहीं. अशी यज्ञरूप समाधि साधेपर्यंतचें साधकाचें साधकत्व आधीं भगवान् सांगतात.

**श्रोत्रादीनींद्रियाण्यन्ये संयमाग्निषु जुह्वति ।**
**शब्दादीन्विषयानन्य इंद्रियाग्निषु जुह्वति ॥ २६ ॥**

**अर्थ.**—आणखी कोणी संयमरूप अग्नींत श्रोत्रादि इंद्रियांचा यज्ञ करितात, व कोणी इंद्रियरूप अग्नींत शब्दादि विषयांचा यज्ञ करितात.

**टीका.**—श्रोत्रादि पंचज्ञानेंद्रियें आपापला विषय मिळावा म्हणून इच्छा करितात, व ते विषय मिळविण्याचा निश्चय विषयनिष्ठ बुद्धि करिते. या विषयनिष्ठ बुद्धीचा आश्रय करून मन नानारूपांनीं विषयांची कल्पना करितें. अशी विषयनिष्ठ बुद्धि जेव्हां विवेकारूढ होते,

तेव्हां वैराग्य धरून मनास आवरतें. मन आवरलें ह्मणजे विषयांचें चिंतन बंद पडतें व इंद्रियवृत्ति विषयांकडे धांवत नाहींत. इंद्रियांस विषयांचें स्मरण होईल तरच इंद्रियांस इंद्रियपण असतें. नाहीं तर इंद्रियांचें इंद्रियत्व नाहींसें होतें. ह्मणजे संयमरूप अग्नींत इंद्रियें जळून जातात. या इंद्रियांचे संयमासच "**यम**" ह्मणतात.

येथेंच नियमही सुचविला आहे. तो असा कीं, सर्वथा विषयांचा त्याग केल्याशिवाय हा योग साधत नाहीं. ह्मणून असे योगी निर्जन प्रदेशीं कंदमुळें व फळें खाऊन राहतात. कारण असा नियम केल्याशिवाय इंद्रियांचा संयम होत नाहीं.

आतां, विषयेंद्रियसंयोगीं होमाची भावना करणारे योगी लोकांची योगस्थिति सांगतात. जे कुटुंबी लोक आहेत त्यांस वर सांगितलेल्या योग्याप्रमाणें सर्वसंगपरित्याग करितां येत नाहीं, ह्मणून श्लोकाचे उत्तरार्धांत सांगितलेला होम ते करितात. इंद्रियें आणि त्यांचे विषय यांचे संयोगीं रागद्वेष असतात. विषय गोड लागला ह्मणजे प्रीति उपजते व वाईट लागला ह्मणजे द्वेष उत्पन्न होतो. हे दोन्ही दोष नाहींसे करण्याचा यत्न ते करितात. तो असा कीं, इंद्रियांचे ठिकाणीं अग्नीची भावना करितात व विषय हविर्द्रव्य समजून त्याचा होम करितात. त्यामुळें रागद्वेषाचा स्पर्श त्यांस होत नाहीं.

एक विषयांचा त्याग करून ब्रह्मसमाधीचें साधन करितो व दुसरा भोग भोगून करितो. असे दोन प्रकारचे साधकांचीं साधनें सांगितलीं. असे उपाय केल्यानंतर ब्रह्मसमाधि साधते. तिचा प्रकार आतां भगवान् सांगतात.

**सर्वाणींद्रियकर्माणि प्राणकर्माणि चापरे ।**
**आत्मसंयमयोगाग्नौ जुह्वति ज्ञानदीपिते ॥ २७ ॥**

**अर्थ.**—कोणी ज्ञानाचे साधनानें पेटविलेल्या चित्तैकाग्रतारूप अ- ग्नींत सर्व इंद्रियांचे आणि प्राणांचे कर्मांचा होम करितात.

**टीका.**—चित्त हें शुद्धसत्वात्मक आहे. त्याचे वृत्तीनें सर्व वृत्ति स्फुरण पावतात व तिच्याच योगानें शरीर, इंद्रियें व प्राण यांस अ- स्तित्व आहे. नेत्रांवर आणि शरीरावर एकाच दिव्याचे तेज पडतें. परंतु नेत्रांची सर शरीरास येत नाहीं. शरीर आणि दीपज्योति या दोहींसही नेत्र पाहतात. परंतु ते नेत्र दीपावर स्थिर होतात, तेव्हां दीपाखेरीज आणखीं कांहीं दिसेनासें होतें. त्याचप्रमाणें आत्मप्रकाशें चित्तवृत्ति सर्व वृत्तींस जाणते. पण तीच चित्तवृत्ति आत्मस्वरूपीं स्थिरावली, ह्मणजे रज- तमस्फूर्ती नाहींशा होतात. चित्तवृत्ति चंचल झाल्याबरोबर प्राणांचें कर्म सुरू होतें. तेव्हां इंद्रियें विषय घेऊं लागतात. ही चित्तवृत्ति स्वरूपीं मुरली ह्मणजे प्राण स्थिर राहतात व इंद्रियांस त्यांचे विषयांचें स्फुरण होत नाहीं. एवंच इंद्रियें आणि प्राण ह्मणजे रजोगुण, व विषय ह्मणजे तमो- गुण त्या वेळेस स्फुरत नाहींत. चित्त, आत्मस्वरूपाखेरीज दुसरें कांहींच आठवीनासें झालें ह्मणजे त्यास **चित्तसंयम** ह्मणतात. या संयमास **पातं- जलादि योग** असें ह्मणतात. कारण या प्रसंगीं रजतमवृत्तींचा वियोग होऊन चित्त आणि चैतन्य यांचा योग होतो. अशा आत्मसंयमीं इंद्रियें आणि प्राण स्फुरत नाहींत, ह्मणून या आत्मसंयमयोगाग्नींत इंद्रियें आणि प्राण यांचीं कर्मे होमितात, असें भगवान् ह्मणतात. आहुति अग्नींत होमली ह्मणजे ती अग्निरूपच दिसते. त्याप्रमाणें आत्मसंयम झाला ह्मणजे मन ब्रह्मरूप होतें. त्या स्थितीस **उन्मनि** अथवा शुद्ध **तुरी- या** असें ह्मणतात. ही स्थिति जागृति नव्हे, कारण इंद्रियेंकर्मे राहतात; स्वप्नही नव्हे, कारण कल्पना नसतात; व सुषुप्तिही नव्हे, कारण स्वरूप- स्फूर्ति असते. अशी ही निर्विकल्पसमाधि **नारायणांनीं** यज्ञरूपानें वर्णन केली.

यापुढें आणखीही निरनिराळे यज्ञांचें विवरण भगवान् करितात.

**द्रव्ययज्ञास्तपोयज्ञा योगयज्ञास्तथापरे ।**
**स्वाध्यायज्ञानयज्ञाश्च यतयः संशितव्रताः ॥ २८ ॥**

**अर्थ.**–कोणी द्रव्ययज्ञ करितात, कोणी तपश्चर्यारूप यज्ञ करितात, कोणी योगाचा यज्ञ करितात, आणखी कोणी यति होऊन निग्रहशील व्रतानें वेदाध्ययन करून ज्ञानप्राप्तिरूप यज्ञ करितात.

**टीका.**–कोणी द्रव्यदानरूप यज्ञ करितात. द्रव्य या शब्दांत पैसा, धान्य, वस्त्र, भूमि, पशु वगैरे दानास योग्य वस्तूंचा समावेश होतो. हीं सर्व द्रव्यें सत्पात्राचे हस्तरूप अग्नींत यजमान गृहस्थ होमितो. यास **द्रव्ययज्ञ** ह्मणावें.

तपें अनेक प्रकारचीं आहेत. एक तप शितोष्ण सहन करणें, दुसरें विषयांचा भोग न घेणें, तिसरें विचाररूप तप ( विचार ह्मणजे ब्रह्मविचार, लौकिकी विचार नव्हे. ) होय. शेवटचेंच तप मुख्य तप होय. भृगुवल्लींत वरुणानें भृगूस तपेंकरून ब्रह्म जाण असा उपदेश केला आहे, तें हेंच तप होय व याच तपानें भृगु ब्रह्मज्ञ झाला. ब्रह्मविचारांत काळ घालविणें ही किल्ली होय. या किल्लीनें अविद्यारूप कवाड उघडलें जातें. जन्मजन्मीं सुकृतें केल्यानें हा विचार सुचतो, भलत्यास सुचत नाहीं. स्वहिताविषयीं विवेक हाच अग्नि, यास अद्वैत विचाराची आहुति देऊन तृप्त करणें, यास तपोयज्ञ ह्मणावें.

योग ह्मणजे षट्चक्रें भेदून ब्रह्मरंध्रास प्राण नेणें. यास **हठयोग** ह्मणतात. हा हठयोग साधून जे आत्मज्ञान पावतात ते मुक्त होतात. आत्मज्ञानाशिवाय अविद्यावरण नासत नाहीं, ह्मणून नुसता हठयोग करणारे मुक्ति पावत नाहींत. या हठयोगाचे संबंधानें पुढें आठव्या अध्यायांत भगवान् वर्णन करणार आहेत.

हा हठयोग आपल्यास साधावा अशी फार लोकांस इच्छा असते, असें माझे अनुभवास आलें आहे. ही समजूत फारच धोक्याची आहे, ह्मणून या बाबतींत दोन शब्द लिहिणें भाग पडतें. या हठयोगानें निरनिराळ्या प्रकारच्या सिद्धि ह्मणजे शक्ति प्राप्त होतात, ह्मणूनच तिकडे सर्वांचें लक्ष आहे असें मला तर निदान वाटतें. ऐहिक मोठेपणा मिळविण्याचा हाही एक मार्ग आहे व तो आह्मीं कां धरूं नये, असें कोणी ह्मणतील, तर त्यांना विनयपूर्वक एवढेंच सांगणें आहे कीं, प्राप्त करून घेण्याचे वस्तूचें महात्म्य जितकें जास्त असेल, त्याच मानानें त्याचें साधनही कठीण असतें. हठयोग अति कठीण आहे; तो करण्यास शरीर अगदीं चोख असलें पाहिजे, व तो करितांना पथ्यही फार जबरदस्त आहे. हीं दोन्हीही साधनें हल्लींचे काळांत दुर्लभच आहेत. असें असून आशेनें कोणी तो करील तर सापाचे डोक्यावरचा लाल मणि घेण्यास, बचावाचें कांहींच शस्त्र जवळ नसतां, जाण्यासारखें आहे. सिद्धींचा दाता ह्मणून हठयोगाची परमार्थांत कवडीइतकी किंमत नाहीं. कारण मुक्तीकरितां या शक्तींची जरूरी नाहीं, इतकेंच नाहीं तर उलट्या त्या अति घातक आहेत. मनाची चंचलता मोडण्यास हा एक जबरदस्त उपाय आहे हें खरें, परंतु तो फार भयंकर आहे. क्लोरोफॉर्म देऊन शस्त्रक्रिया केल्यानें मरण देणाऱ्या व्याधी टळतात. पण त्याशिवाय इलाज नाहीं, असा जेव्हां प्रसंग येतो, तेव्हां त्याचा उपयोग करितात, व तो भलतासलता करित नाहीं. प्रथम रोग्याची प्रकृति तो उपाय सहन करण्यासारखी आहे, अशी खात्री करून घेऊन, एखादा अनुभवी डाक्तर, दुसरे डाक्तराची मदत जवळ ठेवून, त्याचा उपयोग करितो. इतकी काळजी ठेवूनही अपघात झाल्याचें ऐकिवांत आहे. हा हठयोग अनेक योगरूप औषधींपैकीं क्लोरोफॉर्मच आहे बरें. भलत्यानें याच्या वाटेस जाऊं नये. अनिर्वाह पक्षीं एखादे मुमुक्षूस हा करणें भाग आहे, असें कोणा अनुभवी सद्गुरूस वाटलें, तर त्याचे जवळ राहून, त्याचे

आज्ञेप्रमाणें वागणूक ठेवून तो करतां येईल. नाहीं तर त्याचे आशेनें नागसर्पावर हात टाकून फुकट प्राणास मुकण्याची पाळी येईल, हें नीट लक्षांत ठेवावें, अशी सविनय प्रार्थना आहे. परमार्थ साधणें असेल तर हा एवढाच उपाय नाहीं. याच अध्यायांत निरनिराळ्या तऱ्हेचे इतर उपाय सांगितले आहेत. त्यांपैकीं जो साधेल तो करण्यास किंचित्‌ही हरकत नाहीं. आत्मसंयमयोगांत चित्तवृत्तींचा निरोध आहे व यांत प्राणांचा निरोध आहे, तोही जबरदस्तीनें; हा फरक लक्षांत न ठेविला तर दोन्हींचा घोंटाळा होण्याचा संभव आहे.

आतां स्वाध्यायज्ञानयज्ञाकडे वळूं. स्वाध्यायज्ञान ह्मणजे वेदार्थाचें ज्ञान. या ज्ञानाकरितां संन्यास पाहिजे. संन्यास ह्मणजे काम्य कर्म टाकणें हें पूर्वींच सांगितलें आहे. त्यांतल्या त्यांत चतुर्थाश्रम असला तर बरेंच, हें सांगणें नको. हें संन्यासव्रत कडकडीत ठेवून, कित्येक वेदभाष्यांचा अभ्यास करितात व आत्म्याचें ज्ञान पावतात. यापुढील श्लोकांत भगवान् प्राणायामयज्ञाचें वर्णन करितात.

**अपाने जुह्वति प्राणं प्राणेऽपानं तथापरे ।**
**प्राणापानगती रुद्ध्वा प्राणायामपरायणाः ॥ २९ ॥**

**अर्थ.**–प्राण आणि अपान या दोन वायूंची गति रोखून प्राणायाम करणारे लोक प्राणाचा अपानाचे ठायीं व अपानाचा प्राणाचे ठायीं यज्ञ करितात.

**टीका.**–वायूचे अधोवृत्तीस अपान ह्मणतात आणि उर्ध्व गतीस प्राण ह्मणतात. डावेकडील नाकपुडी दाबून उजवे नाकपुडीनें प्राण खालीं रेटून, प्राणाची ऊर्ध्वगति असते ती जबरीनें अपान गति करणें, यास **पूरक** ह्मणतात, व हाच अपानाचे ठायीं प्राणाचा होम होय. मग दोन्ही नाकपुड्या दाबून धरून, तो प्राण मूळाधारीं कांहीं वेळ आवरून ठेवितात, त्यास **कुंभक** ह्मणतात. असा कोंडून ठेवलेला प्राण, उजवी

नाकपुडी दाबून डावे नाकपुडीनें हळु हळु सोडितात. हा प्राणाचे ठायीं अपानाचा होम होय व यास **रेचक** ह्मणतात.

**अपरे नियताहाराः प्राणान्प्राणेषु जुह्वति ।**
**सर्वेऽप्येते यज्ञविदो यज्ञक्षपितकल्मषाः ॥ ३० ॥**

**अर्थ.**—कोणी आहाराचें नियमन करून, प्राणाचे ठायीं इंद्रियांचा होम करितात. हे सर्वही यज्ञवेत्ते असे निरनिराळे यज्ञ करून आपापले पातकांचा नाश करितात.

**टीका.**—कितीएक लोक आहार कमी करून इंद्रियें क्षीण करितात. त्यास इंद्रियांचा प्राणाचे ठायीं होम ह्मणतात. आहार कमी केला ह्मणजे प्राणवायूसही क्षीणता येते. त्या वेळीं इंद्रियांस विषयांची वासना नसते. इंद्रियांचा जय केल्याशिवाय परमार्थ होत नाहीं, हें पूर्वीं बहुत ठिकाणीं स्पष्ट झालें आहे. कितीही विवेक असला तरी वीर्यपुष्टि झाल्यास स्त्रीसंगहीन पुरुषास त्रास झाल्याशिवाय राहत नाहीं. ह्मणून कित्येक लोक वर सांगितलेला होम करितात.

**यज्ञशिष्टामृतभुजो यान्ति ब्रह्म सनातनम् ।**
**नायं लोकोऽस्त्ययज्ञस्य कुतोऽन्यः कुरुसत्तम ॥ ३१ ॥**

**अर्थ.**—यज्ञ करून राहिलेले अन्न जे भक्षण करितात, ते सनातन ब्रह्मातें पावतात. हे अर्जुना, यज्ञ न करणारास इहलोकच नाहीं मग परलोक कोठचा?

**टीका.**—निष्काम यज्ञ करून तो परमेश्वरास अर्पण केल्यास चित्तशुद्धि होऊन ब्रह्मप्राप्ति होते. ह्मणून असे यज्ञ करणारे लोक उत्तम होत, सकाम करणारे मध्यम, परंतु मुळींच यज्ञ न करणारे नीच लोक होत, त्यांस या श्लोकीं भगवंतानें निंदिलें आहे. असा मनुष्य या जन्मींही सुखी नसतो, कारण त्यास कोणीच बरें ह्मणत नाहीं. जिकडे तिकडे त्याची निंदाच होते, व अन्य जन्मीं तर तो सुखी असणारच नाहीं;

कारण पुण्याशिवाय सुखाची प्राप्ति नाहीं. ह्मणून मुळींच यज्ञ न करणाऱ्याहून सकाम करणारा भला ह्मणविला जातो. द्रव्यदान करणें हाही एक प्रकारचा यज्ञ आहे, असें यापूर्वीं वर्णन झालेंच आहे; ह्मणून धनवंतानें जपतप न करितां द्रव्यदान केलें तरी त्यास चांगली गति प्राप्त होते. पण दरिद्री असून जे सदाचारानें वागत नाहींत ते फारच निकृष्ट होत. त्यांत दरिद्री असून दुराचारी असला तर मग बोलणेंच नको. धनवंतानें जपतप केलें व द्रव्यदान जर केलें नाहीं, तर त्याचे जपतपाचाही कांहीं उपयोग होत नाहीं; कारण त्याचे पदरीं धन असूनही अन्नदान व दक्षिणा न दिल्यास यज्ञ सांग होत नाहीं. एवंच दरिद्री असून दुराचारी व श्रीमंत असून द्रव्यदान न करणारा अशा दोन्ही कोटींच्या मनुष्यांची या श्लोकीं निंदा केली आहे, व हे दोघेही अधोगतीस जातात. याविषयीं भगवान् व्यास यांची श्रीमहाभारतीं उक्ति आहे ती येथें दिल्यास अप्रासंगिक होणार नाहीं. **द्वावेवाप्सु प्रवेष्टव्यौ कंठे बध्वा दृढां शिलाम् । धनवंतमदातारं दरिद्रं चातपस्विनम् ॥**

**अर्थ.**—शठधनवंत व अतपस्वी दरिद्री या दोघांसही त्यांचे गळ्यांत दृढ शिळा बांधून पाण्यांत बुडवून टाकावे.

येथपर्यंत निरनिराळ्या प्रकारचे यज्ञ भगवंतांनीं वर्णन करून सांगितले. यांत कांहीं कर्मयज्ञ व कांहीं ज्ञानयज्ञ आहेत. त्यांत कर्मयज्ञ कर्मापासूनच झाले, हें जाणलें असतां उत्तम फळ मिळतें असें पुढील श्लोकीं सांगून, नंतर ज्ञानयज्ञ त्याहून श्रेष्ठ आहे असें भगवान् सांगतील.

**एवं बहुविधा यज्ञा वितता ब्रह्मणो मुखे ।**
**कर्मजान्विद्धि तान्सर्वानेवं ज्ञात्वा विमोक्ष्यसे ॥ ३२ ॥**

**अर्थ व टीका.**—याच प्रकारचे आणखी बहुत यज्ञ वेदांत सांगितले आहेत. परंतु ते सर्व कर्मजनित आहेत असें जाण. कर्मापासूनच यज्ञ आहेत असें समजलें, ह्मणजे आत्मा अकर्ता आहे, असें सहज वाटतें.

'अर्जुना, अद्याप तूं हें जाणत नाहींस. तें जाणलेंस ह्मणजे कर्मबंधनापासून मुक्त होऊन मोक्षातें पावशील. येथपर्यंत कर्मयज्ञ व ज्ञानयज्ञ मिसळून तुला सांगितले, आतां त्यांतील रहस्य मी तुला सांगतों' असें भगवान् ह्मणतात.

**श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः परंतप ।**

**सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते ॥ ३३ ॥**

**अर्थ.**–हे अर्जुना, द्रव्ययज्ञापेक्षां ज्ञानयज्ञ श्रेष्ठ होय, कारण सर्व कर्मांचा अंत ज्ञानांतच होतो.

**टीका.**–आज्यादिक हविर्द्रव्य ब्रह्मच आहे, असें न जाणतां बाह्य दृष्टीनें जे यज्ञ केले जातात, त्यांस द्रव्ययज्ञ ह्मणावें. ज्ञानदृष्टीनें हविर्द्रव्यें ब्रह्मरूप पाहून ब्रह्मनिष्ठ यज्ञ करितात, किंवा आत्मसंयमयोगाग्नींत सकलवृत्तींचा होम करितात. अशा यज्ञास **ज्ञानयज्ञ** ह्मणावें व ते द्रव्ययज्ञापेक्षां श्रेष्ठ होत. द्रव्ययज्ञ कर्मापासून उत्पन्न होतात व सर्व कर्में (संचित क्रियमाण) या ज्ञानांतच लय पावतात, ह्मणून हे ज्ञानयज्ञ कल्याणकारक होत. "**सर्वं कर्म**" शब्देंकरून क्रियमाण व "**अखिलं**" शब्देंकरून संचित असें या श्लोकांत सुचाविलें आहे.

ज्ञानाचें श्रेष्ठत्व भगवान् वर्णन करितात, त्याचा हेतु असा कीं, त्या ज्ञानाचे अपरोक्ष प्राप्तीकरितां अर्जुनानें शरण यावें, नंतर तें त्यास द्यावें. परंतु शरणागतीची रीति अर्जुनास अद्याप माहीत नव्हती, ह्मणून ती पुढील श्लोकानें भगवान् सांगतात.

**तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया ।**

**उपदेक्ष्यंति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्वदर्शिनः ॥ ३४ ॥**

**अर्थ.**–हे अर्जुना, तूं हें ध्यानांत ठेव कीं, तत्ववेत्ते ज्ञानी लोकांस नमस्कार केल्यानें, पुनःपुनः त्यांस प्रश्न केल्यानें व त्यांची सेवा केल्यानें या ज्ञानाचा तुला ते उपदेश करतील.

**टीका.**—या श्लोकानें भगवंतांनीं गुरुत्वलक्षण दर्शविलें आहे. खरा अनुताप होऊन शिष्य शरण आल्याशिवाय त्यास उपदेश करूं नये. कारण तसें न केलें, तर शिष्याचा अहंकार वाढतो व गुरूचें गुरुत्वासही न्यूनता येते. शिष्य धनवंत असला, तर त्यास वाटतें कीं, मजपासून धन मिळावें ह्मणून गुरु मला उपदेश करितो. एवंच ज्याचे जवळ जें असेल त्या संबंधानें त्याचा अहंकार वाढतो; व त्यामुळें उपदेशाचें कांहींच चीज न होतां, गुरूची व त्याचे ज्ञानाची विनाकारण विटंबना होते. याकरितां शिष्या आपण होऊन शरण आल्याशिवाय व तो उपदेशास योग्य असल्याशिवाय त्यास उपदेश करणें प्रशस्त नव्हे. एखादा मनुष्य उपदेशाचा अधिकारी असून मुमुक्षा नसल्यामुळें वायां जात आहे ह्मणून दया उत्पन्न झाली, तर त्याचे ठायीं मुमुक्षा उत्पन्न होण्याकरितां ज्ञानाची प्रशंसा करावी व संतांस शरण गेलें असतां तें मिळेल एवढें त्यास सांगावें. त्या शरणागतीचा प्रकार या श्लोकांत सांगितला आहे. यावरून स्पष्ट दिसतें कीं, मोक्षाविषयीं तीव्र उत्कंठा आहे अशी सर्व प्रकारें खात्री करून घेऊन मग उपदेश करावा.

आतां शिष्यानेंही भलत्यासलत्यापाशीं उपदेशाकरितां जाऊं नये, व कोणी दिला तरी तो घेऊं नये. अलीकडे उपदेश देणें हा पुष्कळांनीं पोटाचा धंदाच केला आहे. अशांच्या जवळदेखील जाऊं नये. कोणी श्रीमान् मनुष्य पाहिला कीं, आपला उपदेश घेऊन त्यानें शिष्य व्हावें, ह्मणून मध्यस्थ घालून खटपट करणारे गुरु माझे पाहण्यांत आले आहेत. खरे संत असतील त्यांचा उपदेश घ्यावा. गुरु शास्त्रज्ञ व अनुभविक असला पाहिजे. अनुभवी पुरुषाची हीच खूण आहे कीं, त्यास कोणतेही वस्तूची लालूच नसते. अशा निरपेक्ष गुरूचा उपदेश घेऊन त्याची मनोभावें सेवा केली असतां, उपदेशिलेलें ज्ञान लवकर फलद्रूप होतें. आतां अशा ज्ञानोपदेशाचें फळ काय हें भगवान् सांगतात.

**यज्ज्ञात्वा न पुनर्मोहमेवं यास्यसि पांडव ।**
**येन भूतान्यशेषेण द्रक्ष्यस्यात्मन्यथो मयि ॥ ३५ ॥**

**अर्थ.**—हे अर्जुना, हें ज्ञान प्राप्त झाल्यावर पुन्हा असा मोह तुला होणार नाहीं; आणि ब्रह्मादि स्थावरांत सर्व भूतें तूं आपल्या ठायीं तसेंच माझ्या ठायीं अभेदपणानें पाहशील.

**टीका.**—या श्लोकाचे पूर्वार्धीं व्यतिरेक ज्ञान व उत्तरार्धीं अन्वय ज्ञान सांगितलें आहे. **व्यतिरेक** आणि **अन्वय** अशीं ब्रह्मविद्येचीं रूपें आहेत. त्याचप्रमाणें **आवरण** आणि **विक्षेप** ह्मणून अविद्येचीं रूपें आहेत. आपणास आपण न जाणणें ह्मणजे देहादि इंद्रियांस आत्मा समजणें यास **आवरण** ह्मणतात. स्वप्रकाश आत्मा आपण आहों, असें जाणणें यास **व्यतिरेक** ह्मणतात. या ज्ञानानें आवरणाचा नाश होतो. देहआदिकरून सर्व विश्व आत्म्याचेंच रूप आहे, असें जाणणें यास **अन्वयज्ञान** ह्मणतात. या ज्ञानानें अविद्याविक्षेपाचा नाश होतो. व्यतिरेकाचा बोध झाल्याखेरीज अन्वय ज्ञान समजत नाहीं, ह्मणून पूर्वार्धांत प्रथम व्यतिरेकाचा उपदेश केला आहे. अन्वयज्ञानेंकरून पंच भूतें आणि त्यांचीं बनलेलीं सर्व ब्रह्मांडें आपल्या आत्मस्वरूपीं पाहतां येतात. या जड भूतांचा प्रत्यय आत्मसत्तेशिवाय होत नाहीं. हें "**सर्वाणींद्रियकर्माणि**" या श्लोकांत स्पष्ट करून दाखविलें आहे. तंतूवांचून पट, मातीवांचून घट, सोन्यावांचून अलंकार व दोरावांचून भ्रांतिकृत सर्प दिसत नाहीं, व असूं शकत नाहीं. एकाचे आश्रयानें दुसरें दिसतें, तेव्हां तें दुसरें मिथ्या होय. दोर दोराचकरितां असतो व त्या दोरांत साप नसूनही दोरांतच दिसतो. पण सर्व काळीं दोर दोरच होऊन असतो; त्याप्रमाणें सर्व ब्रह्मांडांची रचना आत्म्यांत आहे, परंतु तीं मिथ्या आहेत; कारण आत्म्याकरितांच तीं दिसतात. कालत्रयींही सर्व आत्माच आहे असें ज्ञान झालें ह्मणजे विक्षेपनाश होतो. विक्षेप ह्मणजे विपरीत भावना. वास्तविक सर्व जड जग भ्रांतिकृत देखावा आहे, असें जरी व्यतिरेक ह्मणजे केवळ स्वस्व-

रूपज्ञानानें समजलें, तरी पूर्व संस्कारांमुळें वारंवार विपरीत भावना होते. ती या अन्वययोगाचे अभ्यासानें हळू हळू नाहींशी होते. पण ही भावना खोटी आहे, हें समजण्याकारितां प्रथम आत्मस्वरूपाचें ज्ञान झालें पाहिजे. तें प्रत्यक्ष रीतीनें झाल्याखेरीज बहुधा कोणी अभ्यासास लागत नाहीं, ह्मणून एखाद्या समर्थ गुरूच्या कृपेनें तें प्रत्यक्ष ज्ञान करून घेतलें पाहिजे, ह्मणजे शब्दानें कधींही ज्या संशयांचें समाधान व्हावयाचें नाहीं, ते आपोआप नाहींसे होतात, हा साधारण नियम होय. यावरून असें समजूं नये कीं, अपरोक्ष आत्मज्ञानाशिवाय अभ्यास होतच नाहीं. ज्याचें पूर्व सुकृत जाडें असतें, त्याचा एकदम विश्वास पटून तो रस्ता धरतो व अखेरीस पूर्ण अपरोक्ष साक्षात्कार पावतो. त्यास सद्गुरु स्फूर्तिरूपानें मदत करितात. अस्तु.

भगवान् ह्मणतात याप्रमाणें सर्व भूतें आपणांमध्येंच आहेत असें अनुभवानें जाणलें, ह्मणजे ईश्वर आणि आपण अभेद आहों असें समजतें.

हें ऐकूनही भीष्मादिकांचे वधानें दोष लागेल असें अर्जुनास वाटतच होतें. ह्मणून देव पुन्हां सांगतात कीं,

**अपि चेदसि पापेभ्यः सर्वेभ्यः पापकृत्तमः ।**
**सर्वं ज्ञानप्लवेनैव वृजिनं संतरिष्यसि ॥ ३६ ॥**

**अर्थ.**—अर्जुना, जरी सर्व पाप्यांहून तूं पापी असलास, तरी तो पापसागर, तूं या ज्ञानरूप तारवाचेच आश्रयानें तरून जाशील.

**टीका.**—“ भीष्मादिकांचा वध करण्याचें काम अती ओंगळ आहे या समजुतीनें जरी तूं मोठा पापी होशील असें तुला वाटत असेल, तरी या ज्ञानापुढें त्या पापाची बिशाद तरी किती? अकर्त्रात्मत्वें तूं तीं कर्मे केलींस ह्मणजे त्या पापाचा तुझे नखास देखील स्पर्श होणार नाहीं, याकारितां क्रियमाणास तूं भिऊं नकोस, ” असें सांगून पुढील श्लोकांत अनंतजन्मसंचित पापें देखील या ज्ञानानें नाश पावतात असें भगवंत सांगतात.

**यथैधांसि समिद्धोऽग्निर्भस्मसात्कुरुतेऽर्जुन ।**

**ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात्कुरुते तथा ॥ ३७ ॥**

**अर्थ.**—हे अर्जुना, पेटविलेला अग्नि जसा ओलीं कोरडीं सर्व लांकडें जाळून भस्म करितो, तसा हा ज्ञानरूप अग्नि सर्व प्रकारचीं कर्में जाळून भस्म करितो.

**टीका.**—ज्ञानानें क्रियमाणाचा लेप होत नाहीं असें पूर्व श्लोकानें सांगितलें आहे व या श्लोकानें संचिताचा नाश सांगतात. पूर्व श्लोकीं "**ज्ञानप्लवेनैव**" यांतील "**एव**" शब्दें असें सुचविलें कीं, ज्ञानमार्ग स्वीकारिलेल्या साधकास ज्ञानाशिवाय अन्य उपाय करणें नको. तेंच आतां पुढील श्लोकानें भगवान् स्पष्ट करून सांगतात.

**न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।**

**तत्स्वयं योगसंसिद्धः कालेनात्मनि विंदति ॥ ३८ ॥**

**अर्थ.**—या जगांत ज्ञानासारखें दुसरें कांहींच पवित्र नाहीं. आपली योगसिद्धि झाली असतां फार कालानें, तें आपणच, असें जाणून आपणांनच तें सांपडतें.

**टीका.**—वेद आणि धर्मशास्त्रें, पवित्र करणारीं अशीं अनेक प्रायश्चित्तें बोलतात. पण ज्ञानासारखीं पवित्रकारक तीं नाहींत. हत्ती जळांत नेऊन घांसून घांसून साफ केला, तरी बाहेर आल्याबरोबर तो पुन्हां सोंडेनें डोक्यावर धूळ घेतो, कारण त्याचा तो स्वभावच होय. त्याप्रमाणें कर्मप्रायाश्चित्तानें पापाचा नाश होतो हें खरें, तथापि अनेकजन्मसंसिद्ध स्वभावामुळें चित्त पुन्हां पापाचरणाकडे वळतें; कारण कर्माकरितां प्रायश्चित्त घेतलें तर तेवढ्याच कर्माचा तें नाश करितें. तसें ज्ञान नव्हे. ज्ञान सर्व कर्मांचीं पाळेंमुळें खणून काढितें व मनाच्या अनादि खोडी मोडून, ब्रह्मसुखामृताची गोडी लावितें. तें नवीन खोडीही लागूं देत

नाहीं, ह्मणून ज्ञानासारखें पवित्र कांहीं नाहीं. गंगा पवित्र आहे खरी, पण ती पापाचाच नाश करिते व पुण्यरूपी शृंखला ज्यास्त बळकट करिते. क्रियमाण टाळण्याचें सामर्थ्य गंगेचें अंगीं नाहीं. त्याप्रमाणें ती संचितही जाळूं शकत नाहीं. एकाच जन्मींचे पापाचा ती नाश करिते. इतकेंही असून ती सर्वांजवळ तरी कोठें आहे. तसें हें ज्ञान नव्हे. जे तें प्राप्त करून घेऊं इच्छितील, त्यांचेजवळच तें आहे. त्यास शोधून काढण्यास कोठें दूर जाणें नको. राजा स्वप्नांत राज्यभ्रष्ट होतो, व पुन्हां राजा कधीं होईन ह्मणून तळमळ करित असतो. तद्वत् मनुष्याची स्थिति आहे. ज्ञान पवित्राहून पवित्र असून, चमत्कार हा कीं, तें जवळच आहे. इतकेंच नव्हे, तर तें स्वतः आपणच आहों, असें भगवान् "तत्स्वयं" ह्या शब्दानें सांगतात. आपण तें ज्ञान आहों खरें, तथापि तें अज्ञानामुळें दूर झालें आहे. हें ज्ञान कळालें, तरी अनादि अहंकारामुळें त्याची विस्मृति पडली कीं, पुन्हां अज्ञानानें गांठलेंच. ह्मणून त्या स्वरूपीं नेहमीं लक्ष ठेवण्याचा अभ्यास केला पाहिजे. हे अभ्यास दोन प्रकारचे आहेत. व्यतिरेक आणि अन्वय. देहावेगळें आपणांस.पाहणें यास व्यतिरेक ह्मणावें. व आपले देहासहित सर्व सृष्टि आपणच आहों, असें पाहणें यास अन्वय ह्मणावें. हे उभय प्रकारचे योग बहुत कालपर्यंत अभ्यासिले, ह्मणजे अज्ञानाचा नाश होतो व ज्ञान पूर्णपणें बाणतें. मग आत्म्याशिवाय कांहींच नाहीं, जिकडे तिकडे आत्माच आहे, असें वाटूं लागतें. चित्ताशिवाय आत्मानुभव नाहीं, असें पूर्वीं सांगितलेंच आहे. यावरून चित्त निराळें राहत असेल, अशी शंका कोणास येईल तर ती चुकी आहे. काष्ठावांचून अग्नि नाहीं. तथापि अग्नि दिसूं लागला ह्मणजे काष्ठच अग्निरूप होतें. तद्वत् चित्तानेंच आत्मा जाणिला जातो हें खरें; तरी तें चित्त त्यावेळीं तन्मय होतें. ह्मणजे **ज्ञाता ज्ञेय** आणि **ज्ञान** हे तिन्हीं प्रकार (त्रिपुटी) नाहींसे होऊन एकटा आत्माच प्रकाशित राहतो त्यास ज्ञान ह्मणावें.

एथपर्यंत ज्ञानाची प्रशंसा झाली. आतां या ज्ञानप्राप्तीचा अधिकार कोणास आहे हें भगवान् सांगतात.

**श्रद्धावांल्लभते ज्ञानं तत्परः संयतेन्द्रियः ।**
**ज्ञानं लब्ध्वा परां शांतिमचिरेणाधिगच्छति ॥ ३९ ॥**

**अर्थ.**–जो श्रद्धावंत आहे, ज्ञानाचे ठायीं ज्याची श्रद्धा आहे आणि ज्यानें इंद्रियनियमन केलें आहे, त्याला ज्ञान प्राप्त होतें. व तें प्राप्त झालें ह्मणजे उत्तम अशी शांति त्यास फार लवकर प्राप्त होते.

**टीका.**–गुरु आणि शास्त्र यांचे वचनावर ज्याचा पूर्ण विश्वास असतो, त्यास **श्रद्धावान्** असे ह्मणतात. अनुभवजन्यज्ञान प्राप्त होईपर्यंत वेदान्त शास्त्रावर भरंवसा नसेल, तर त्याचे हातून कांहींच साधन होणार नाहीं. वेदांतशास्त्रावर साधारण लोकांची अश्रद्धा असण्यास जबर कारणें आहेत, कारण प्रत्यक्षाविरुद्ध त्याचीं तत्त्वें आहेत. उदाहरणार्थ.—प्रपंच प्रत्यक्ष दिसत असून तो मिथ्या आहे असें वेदांतशास्त्र सांगतें. येथेंच बहुत लोकांचें घोडें अडतें. ह्मणून वेदांतशास्त्र व आपलें स्वतःचे अनुभवानें गुरु जें सांगतो, तें प्रथमतः जरी असंभवनीय वाटतें, तरी त्यावर विश्वास असला पाहिजे. ज्ञानासारखी दुसरी वस्तुच नाहीं ह्मणून सर्वांशीं त्याचें साम्य होईल असा एकही दृष्टांत देतां येत नाहीं. सर्व दृष्टांतांत कांहींना कांहीं तरी न्यून असणारच. त्याजवर कुतर्क काढित बसल्यानें अश्रद्धेस कारण होतें. अस्तु. वर सांगितल्याप्रमाणें श्रद्धा असून ज्ञानप्राप्तीकरितां तत्पर असलें पाहिजे ह्मणजे अभ्यास केला पाहिजे व इंद्रियें दमन करण्याची शक्ति पाहिजे. इतक्या गुणांनीं युक्त असलेला पुरुष सर्वांत श्रेष्ठ अशी शांति लवकर मिळवितो. शांति ठेवण्याचा किंचितही यत्न करण्याची जरूर राहत नाहीं, त्या शांतीस **पराशांति** ह्मणतात. ज्ञानास अधिकारी असणाऱ्या पुरुषांचें हें वर्णन झालें. आतां अनधिकाऱ्यांचें लक्षण **श्रीभगवान्** सांगतात.

**अज्ञश्चाश्रद्दधानश्च संशयात्मा विनश्यति ।**
**नायं लोकोऽस्ति न परो न सुखं संशयात्मनः ॥ ४० ॥**

**अर्थ.**–जो अज्ञानी आहे, ज्यास श्रद्धा नाहीं व ज्याचें मन सदा संशयी असतें, तो स्वार्थास मुकतो. संशयी मनुष्यास हा लोक नाहीं व परलोकही नाहीं. एकंदरींत त्यास सुख असें नसतें.

**टीका.**–ज्ञानास अनधिकारी लोकांचे तीन प्रकार आहेत. गुरूनें ज्ञानोपदेश केला असतांही स्वरूपस्थितीचा ज्यास बोध होत नाहीं त्यास "अज्ञ" ह्मणावें. योग्य चित्तशुद्धि नसल्यानें असें होतें. कोणास व्यतिरेक ज्ञान होऊन आत्मा कळतो. परंतु जडास चैतन्यावांचून भोक्तृत्व घडूं शकत नाहीं ह्मणून चैतन्य, जड सृष्टि कसें होऊं शकेल, अशी असंभावना उत्पन्न होऊन ते द्वैत मार्गाचें अवलंबन करितात त्यांस "**अश्रद्दधान**" असें ह्मटलें आहे. तिसरा अनधिकारी ज्याची संशयबुद्धि आहे तो आणि शास्त्र मानायाचें, परंतु त्यांत सांगितलेल्या गोष्टींविषयीं मनांत संशय असायाचा तो. देव कोणास दिसत नाहीं, स्वर्गनरक कोणी पाहिल्याबद्दल सांगत नाहीं, ह्मणून कशाचा देव व कशाचा स्वर्ग व नरक, शास्त्रांत कांहीं तरी लिहिलें आहे, असे कुतर्क ज्याच्या मनांत नेहमीं असतात, परंतु आपण नास्तिक ठरूं या भीतीनें वेदमार्गीं प्रवर्ततांनाही दिसतो, अशा पुरुषास **संशयात्मा** ह्मटलें आहे. अद्वैतज्ञानास अनधिकारी लोकांचे असे तीन प्रकार आहेत. पहिला अज्ञ यास समजतच नाहीं. दुसरा अश्रद्दधान यास समजून उमजत नाहीं. हे दोघेही निश्चय धरून गुरूजवळ राहिले तर काळेंकरून ते कृतार्थ होतील किंवा ज्ञानमार्गापासून च्यवले तरी काम्याचे मार्गे लागून इहलोक अथवा परलोक साधतील. परंतु हा बिचारा संशयात्मा दोहीकडूनही नागवला जातो. ह्मणून त्यास पहिल्यापासून वेगळें निवडून श्लोकाचे उत्तरार्धीं त्याचें वर्णन केलें आहे.

सुळावर जाणारे मनुष्याचे गळ्यांत खोबरें, खारका वगैरे खाद्यांच्या माळा घालतात व तो त्या खात असतो, परंतु अग्रभागीं रोंविलेला शूळ पाहून मरणाचे भीतीनें घाबरलेला असतो. तसें या पुरुषाचें आयुष्य असतें. विषयोपभोग तर घेत असतो, परंतु पदोपदीं मरणाचे भीतीनें घाबरत असतो. ह्मणून त्यास इहलोकीं सुख नाहीं व परलोकाविषयीं संशय असल्यामुळें दान, धर्म, यज्ञ मुळींच करीत नाहीं, त्यामुळें स्वर्गही नाहीं, अशी त्याची स्थिति असते.

वेदावर व शास्त्रावर विश्वास ठेवणारे लोकांसही संशय उत्पन्न होतात, पण ते वरप्रमाणें नसतात ह्मणून नाहींसे होतात. व ज्ञान प्राप्त होऊन ते लोक तरतात असें भगवान् पुढील श्लोकानें सांगतात.

**योगसन्यस्तकर्माणं ज्ञानसंच्छिन्नसंशयम् ।**
**आत्मवंतं न कर्माणि निबध्नंति धनंजय ॥ ४१ ॥**

**अर्थ.**—ईश्वराचे ठायीं कर्मार्पण करण्याचा योग जो करितो व ज्ञानप्राप्तीनें ज्याचे सर्व संशयांचा परिहार झाला आहे, अशा शुद्ध बुद्धीच्या मनुष्यानें केलेलीं कर्मे त्यास बंधक होत नाहींत.

**टीका.**—अनादि अज्ञानामुळें संशय उत्पन्न होतातच पण कर्मार्पणयोग केल्यानें ईश्वर प्रसन्न होऊन, त्याची बुद्धि अगदीं शुद्ध होते. मग त्यानें कोणतेंही आचरण केलें तरी तें ज्ञानामुळें बंधक होत नाहीं.

**तस्मादज्ञानसंभूतं हृत्स्थं ज्ञानासिनात्मनः ।**
**छित्वैनं संशयं योगमातिष्ठोत्तिष्ठ भारत ॥ ४२ ॥**

**अर्थ.**—ह्मणून, हे अर्जुना, अज्ञानापासून उत्पन्न झालेला तुझ्या हृदयांतील संशय ज्ञानरूप खड्गानें छाटून टाक आणि कर्मयोगाचा आश्रय कर. ऊठ ( युद्ध करण्याकरितां ).

**टीका.**–'मी मारणार व भीष्मादिक मरणार या संशयाचा नाश एका ज्ञानाचेच योगानें होणार आहे. करितां तें ज्ञान प्राप्त करून घेऊन यापूर्वी सांगितल्याप्रमाणें युद्ध करणें हा जो क्षत्रियांचा धर्म तो बेलाशक आचरण कर' असा भगवान् अर्जुनास उपदेश करितात.

चतुर्थाध्यायाची टीका येथें संपली. ती श्रीगोपाळकृष्णचरणीं अर्पण असो.



श्री.

# अध्याय ५ वा.

ॐ नमो भगवते वासुदेवाय.

चतुर्थाध्यायांत भगवानांनीं अर्जुनास सांगितलें कीं, "**योग-संन्यस्तकर्मा**" यास कर्मबंध होत नाहीं ह्मणून तूंही कर्मयोग कर. परंतु तृतीयाध्यायांत "**यस्त्वात्मरतिरेव स्यात्**" या श्लोकानें पक्कज्ञान्यास कर्म करण्याची जरूर नाहीं, असें भगवंतांनीं सांगितलें, तेंही अर्जुनास आठवत होतें. अर्जुनाचे मनांत युद्ध करणें नव्हतें व तें करणें न पडेल तर बरें होईल, ह्मणून पंचमाध्यायारंभीं अर्जुन ह्मणतो कीं,

**संन्यासं कर्मणां कृष्ण पुनर्योगं च शंससि ।**
**यच्छ्रेय एतयोरेकं तन्मे ब्रूहि सुनिश्चितम् ॥ १ ॥**

**अर्थ.**—हे कृष्णा, प्रथम कर्मत्यागाची प्रशंसा करून पुन्हां कर्मयोगाचीहि करितोस. या दोहोंमध्यें श्रेयस्कर कोणतें याचा निश्चय करून, तें एकच मला सांग.

**टीका.**—पक्कज्ञान्यास कर्मत्याग करणें रास्त आहे असें भगवान् बोलले, हें खरें. परंतु अर्जुन तर अद्यापि जिज्ञासुदशेंतच होता, ह्मणून त्यास कर्मयोग करण्यास भगवानांनीं सांगितलें, ही गोष्ट अर्जुनाचे लक्षांत आली नाहीं, असें भगवंतांनीं जाणलें. तथापि मोक्षप्राप्तीकरितां मुमुक्षु जनांस कर्मसंन्यास व कर्मयोग या दोहींचीही जरूर आहे, ह्मणून अर्जुनाचा प्रश्न वायफळ आहे असें न ह्मणतां, तसें उत्तर भगवान् देतात.

**संन्यासः कर्मयोगश्च निःश्रेयसकरावुभौ ।**
**तयोस्तु कर्मसंन्यासात्कर्मयोगो विशिष्यते ॥ २ ॥**

**अर्थ.**–कर्मसंन्यास आणि कर्मयोग हे दोन्हीही कल्याणकारक आहेत. पण या दोहोंत कर्मसंन्यासाहून कर्मयोग श्रेष्ठ होय.

**टीका.**–कर्मयोगानें चित्तशुद्धि होते, व कर्मसंन्यासानें मोक्ष प्राप्ति होते; ह्मणून हे दोन्हीही मोक्षप्राप्तीस कारणीभूत होत. पण कर्मसंन्यासाहून कर्मयोग श्रेष्ठ आहे, हें ऐकून अर्जुनास शंका आली कीं, मोक्षमार्गातील संन्यास ही, अखेरची पायरी आहे, हें सर्वसंमत आहे, त्याचे उलट भगवान् कसें बोलतात? हा अर्जुनाचा भाव जाणून भगवान् आतां कर्मयोगांतच संन्यास दाखवून तो श्रेष्ठ होय, अशी अर्जुनाची खातरी करितील.

**ज्ञेयः स नित्यसंन्यासी यो न द्वेष्टि न कांक्षति ।**
**निर्द्वंद्वो हि महाबाहो सुखं बंधात्प्रमुच्यते ॥ ३ ॥**

**अर्थ.**–जो द्वेष करीत नाहीं व इच्छाही करित नाहीं, तो नेहमीं संन्यासीच आहे असें जाणावें. हे अर्जुना, जो सुखदुःखादि द्वंद्वातीत असतो, तो बंधापासून अनायासें मुक्त होतो.

**टीका.**–जो पुरुष द्वंद्वरूपी सुखदुःखीं सारखा राहतो व चांगला पदार्थ मिळाला असतां, पुन्हां त्याची इच्छा करीत नाहीं, व वाईट पदार्थ मिळाला असतां हा मला नको ह्मणून त्याचा द्वेष करीत नाहीं, व सर्व कर्में ईश्वरास अर्पण करितो, तो बंधापासून मुक्त राहतो. कर्मबंध उत्पन्न न झाला तर तोच संन्यास होय. तेव्हां कर्मयोगांतच संन्यास साधतो; हें उघड झालें. याच भावानें कर्मसंन्यासाहून कर्मयोग श्रेष्ठ आहे, असें भगवान् बोलले; कारण आश्रमांतर न करितां गृहस्थाश्रमींच संन्यासाचें फळ मिळतें.

हें सर्व ऐकूनही युद्ध करणें न लागेल तर फार बरें, असें अर्जुनास वाटत होतें; व तदर्थ कांहीं युक्ति निवेल तर पहावी, ह्मणून विचार करितांना त्यास आठवलें कीं, **सांख्य** आणि **योग** हे निरनिराळे दोन मार्ग मोक्षाकरितां सांगितले आहेत; व दोहींपैकीं कोणताही एक मार्ग स्वीकारला, तरी मोक्ष मिळतो. तसा संन्यासानेंच किंवा कर्मयोगानेंच मोक्ष कां साधला जाऊं नये, असा प्रश्न करणार, तोंच भगवान् तें जाणून, त्याचें उत्तर देतात.

**सांख्ययोगौ पृथक्बालाः प्रवदंति न पंडिताः ।**
**एकमप्यास्थितः सम्यगुभयोर्विंदते फलम् ॥ ४ ॥**

**अर्थ.**—सांख्य आणि योग निरनिराळे आहेत असें अज्ञ लोक बोलतात; पण पंडित तसें ह्मणत नाहींत. दोहोंमधून एकाचा जरी उत्तम प्रकारें आश्रय केला, तरी दोहोंचेंही फळ प्राप्त होतें.

**यत्सांख्यैः प्राप्यते स्थानं तद्योगैरपि गम्यते ।**
**एकं सांख्यं च योगं च यः पश्यति स पश्यति ॥ ५ ॥**

**अर्थ.**—सांख्य आचरण करणाऱ्यांस जें स्थान प्राप्त होतें, तेंच योगाभ्यास करणाऱ्यास मिळतें, ह्मणून सांख्य आणि योग एकच होत असें जो पाहतो, तोच डोळस होय.

**टीका.**—देहांत असणारे तत्वांची मांडणी करून, त्यांचा विचार करून आत्मतत्व शोधून काढणें, यास सांख्यशास्त्र ह्मणतात. या योगाचें विवेचन तेराव्या अध्यायांत भगवान् करणार आहेत. चित्तवृत्तींचा निरोध करून आत्मतत्व जाणणें, यास योग असें ह्मणतात सांख्यविचारानें आत्मतत्व कळालें व तें आत्मतत्व सर्वत्र पाहण्याचा अभ्यास केला, ह्मणजे चित्ताची एकाग्रता होते व अष्टांग योग केल्यानेंही तेंच फल मिळतें; ह्मणून सांख्य आणि योग हे दोन्हीही एकच होत, असें बुद्धिमंत समजतात. द्वैत दृष्टीनें जे पाहतात, ते आंधळे होत,

असें भगवान् याचकरितां ह्मणतात. आपल्या गांवाबाहेर निघाल्यावर, दुसरे एखादे गांवास जाण्याचे दोन मार्ग असतात. त्यांतील कोणताही एक मार्ग धरून, न चुकतां गेलें, तर तेथेंच जाऊन पोंचूं. तसें आत्मतत्व समजल्यावर कोणी सम्यक् कृतीनें सांख्य व कोणी योग आचरतात. पण ते सर्व मोक्षासच पावतात. याप्रमाणें सांख्य व योगासंबंधानें अर्जुनाचे मतास भगवान् अनुमोदन देतात. पण कर्मयोग आणि संन्यास एकावेगळे एक स्वतंत्रपणें मोक्ष देऊं शकत नाहींत, असें पुढील श्लोकानें सांगतात.

**संन्यासस्तु महाबाहो दुःखमाप्तुमयोगतः ।**
**योगयुक्तो मुनिर्ब्रह्म न चिरेणाधिगच्छति ॥ ६ ॥**

अर्थ.–हे अर्जुना, कर्मयोगावांचून कर्मसंन्यास साधणें दुर्घर होय. कर्मयोगानें युक्त असा मुनि मोक्षपद फार लवकर पावतो.

टीका.–संन्यासाचे दोन प्रकार आहेत. एक शिखासूत्र टाकून स्वतंत्र आश्रम घेणें व दुसरा काम्यत्याग करणें. या दोहोंत, काम्यत्याग करून विहित कर्म करणें, हा श्रेष्ठ संन्यासधर्म होय. कारण, त्यांत विहित कर्म करणेंही घडतें; त्यामुळें कर्मत्यागाचा प्रत्यवाय येत नाहीं, व तेंच विष्णुसमर्पण केल्यानें चित्तशुद्धि होऊन, काम्य टाकण्याचें सामर्थ्य येतें. व त्याचप्रमाणें, काम्य टाकल्याखेरीज कर्मसमर्पणही होऊं शकत नाहीं. यावरून सिद्ध होतें कीं, काम्यत्याग ( संन्यास ) व कर्मयोग या दोहींची एकमेकांस मदत पाहिजे. ह्मणजे ते दोन्हीही एकदम चालूं ठेविले पाहिजेत. आतां, काम्यत्यागावांचून खरा कर्मयोग होऊं शकत नाहीं व खरा संन्यासाश्रमही होऊं शकत नाहीं. नुसतें डोकें बोडणें व जानवें तोडणें, यास संन्यास ह्मणतात काय? नाहीं, तर कामना नाहींशी करणें, यास संन्यास ह्मणतात. ह्मणून श्लोकाचे उत्तरार्धीं भगवान् ह्मणतात कीं, कर्मयोगही काम्यत्याग संन्यासावांचून

सिद्धयोग नव्हे. " **योगयुक्तो मुनिः** " इतकेच शब्द आहेत. यांत काम्यत्यागसंन्यास कोठून आणिला अशी शंका येईल, तर " **मुनि** " याचा अर्थ " विचारानें ज्यानें काम्यत्याग साधिला आहे असा मुनि " ह्मणून **वामनपंडितांनीं** केला आहे व तो बरोबर आहे. कारण चवथे चरणांत भगवान् ह्मणतात कीं, योगयुक्त मुनि ब्रह्म फार लौकर पावतो. नुसत्या कर्मयोगानें मोक्ष मिळत नाहीं. मोक्षास संन्यासच हेतु आहे. तेव्हां मुनि याचा अर्थ " **संन्यासी** " असा घेतलाच पाहिजे. नाहींतर संन्यासावांचून मोक्ष मिळतो, असा वेडगळपणाचा बोल बोलण्याचा भगवंताकडे दोष येतो.

या श्लोकत्रयावरून असें सिद्ध झालें कीं, कर्मयोग आणि संन्यास या दोन्हीही साधनांशिवाय मोक्षप्राप्ति नाहीं व हे एकमेकांचे साह्याशिवाय फलप्रद होत नाहींत. हें " **संन्यासस्तु** " यांतील " **तु** " शब्दानें स्पष्ट दिसतें. कोणी टीकाकार चवथ्या श्लोकांतील " **सांख्य** " या शब्दाचा अर्थ " **संन्यास** " व " **योग** " याचा अर्थ " **कर्मयोग** " असा करितात तो बरोबर आहे कीं नाहीं हें पाहूं. त्याच श्लोकाचे उत्तरार्धांत दोहोंपैकीं एकाचा आश्रय उत्तम प्रकारें केला असतां दोहींचेंही फल मिळतें, असें ह्मटलें आहे. तेव्हां नुसता कर्मयोग अथवा नुसता संन्यासधर्म आचरला असता, मोक्षप्राप्ति होते काय? होत नाहीं, हें त्यासही कबूल करावें लागतें. तेव्हां ते ह्मणतात कीं, प्रथम कर्मयोग एकटाच करून चित्तशुद्धि करून घ्यावी, व नंतर कर्मयोग टाकून संन्याससिद्धि पावून, दोहींचेंही फळ मोक्ष पावावें. यावरून " **एकमप्यास्थितः सम्यक्** " यास बोल लागतो. ह्मणून तो अर्थ बरोबर नाहीं, हें स्पष्ट सिद्ध झालें.

अशा योगयुक्त पुरुषाची स्थिति भगवान् या प्रसंगीं पुनः वर्णन करितात.

**योगयुक्तो विशुद्धात्मा विजितात्मा जितेंद्रियः ।**
**सर्वभूतात्मभुतात्मा कुर्वन्नपि न लिप्यते ॥ ७ ॥**

**अर्थ.**—योगयुक्त पुरुषाची बुद्धि शुद्ध असते. त्याचा देह आणि इंद्रियें त्याचे स्वाधीन राहतात. व सर्व देह, जीव, पंचभूतें यांचे समूहाचा आत्मा आपण आहों, असें तो पाहतो. ह्मणून कर्म करूनही तो अलिप्त असतो.

**टीका.**—सुखदुःखभोग जीवास होतात. तो जीव आपलेंच प्रतिबिंब आहे व त्याचा आत्माही आपणच आहों, असें तो समजतो; व ज्या उपाधियोगें जीवभाव उत्पन्न होतो, त्याचाही आत्मा आपणच आहों असें तो अनुभवितो. सूर्याचें प्रतिबिंब उदकांत दिसतें, तें तेजोरूप उदकच असतें. तसा जीवही आत्मस्वरूपच होय. अशा सर्वात्मभावें तो वर्ततो, ह्मणून कर्म करूनही तो त्यानें लिप्त होत नाहीं. अहंकाराचें स्फुरण न झाल्यामुळें विषयांचेंही त्यास स्फुरण होत नाहीं, व वासनात्याग केल्यामुळें, त्यास विषयभोगाची इच्छा होत नाहीं; ह्मणून त्यास "**जितेंद्रिय**" असें भगवान् ह्मणतात. त्याचीं इंद्रियें स्ववश असतात. याचें कारण असें कीं, त्याची बुद्धि शुद्ध झालेली असते व त्यामुळें त्याचा मनोजय झालेला असतो. आत्मा रथी, देह रथ, बुद्धि सारथी, इंद्रियें घोडीं, मन वागोरे व विषय रस्ते आहेत, असें श्रुतींत वर्णन आहे. आत्मा ( जीव ) रथी कांहींच करित नाहीं. तो स्वस्थ रथांत ह्मणजे देहांत असतो. परंतु सर्वांस सत्ता मात्र त्याची असते. बुद्धि बरेंवाईटाचा निश्चय करून इंद्रियांस मनाचे साह्यानें आवरून धरून, नीट रस्त्यानें वर्तविते. कोणतेही गोष्टीचा निश्चय करण्याचें काम बुद्धीकडे आहे. बुद्धि शुद्ध असली तरच उत्तम निश्चय होईल. तीच अशुद्ध असली तर वाईट होतो, हें सांगणें नको. प्रथम निश्चय झाल्याखेरीज कोणतेंही कार्य घडत नाहीं. ह्मणून

योगयुक्तास पहिल्यानें "**विशुद्धात्मा**" असें ह्मटलें आहे. कारण त्याची बुद्धि नुकसान निवेल अशा मार्गाकडे जाण्याचा निश्चयच करित नाहीं. परंतु आपण असें पाहतों कीं, गाडीवानाचा निश्चय अमुक एक रस्त्यानें जाण्याचा असूनही घोडे अगर बैल दुसरे रस्त्यानें ओढतात. अशा प्रसंगीं गाडीवान आपल्या शक्तीनें व दोराचे सह्यानें, त्यांस आवरून धरितो, व त्यांस आडमार्गानें जाऊं देत नाहीं. तसेंच बुद्धीचा निश्चय जरी चांगला असला, तरी कित्येक प्रसंगीं इंद्रियें अनावर होऊन घातक अशा विषयांकडे ओढ घेतात. पण बुद्धि जोरदार असली तर मनास ताणून धरिते व इंद्रियांस आवरते. तेच दोर अशा प्रसंगीं हातांतून सुटले, तर गाडी एखाद्या खड्यांत जाऊन पडते, व आंत बसणाऱ्या मालकास, गाडीवानास, घोड्यांस, दोरांस व सर्व सामानास इजा होऊन नुकसान होतें. तसें, मन मोकळें सुटलें व ताब्यांत न राहिलें, तर जीवात्मा, देह, इंद्रियें, मन या सर्वांची खराबी होते व हें सर्व नुकसान जीवात्म्यास सोसावें लागतें. ह्मणून योगयुक्त पुरुष "**विशुद्धात्मा**" असून "**विजितात्मा**" असतो, ह्मणजे त्यानें मन आपलें स्वाधीन ठेविलेलें असतें, व त्यामुळें "**जितेंद्रिय**" असतो, असें भगवान् ह्मणतात. आतां तो आपलें कर्तृत्व कसें पाहतो, हें भगवान् सांगतात.

**नैव किंचित्करोमीति युक्तो मन्येत तत्ववित् ।**
**पश्यन्शृण्वन्स्पृशन्जिघ्रन्नश्नन्गच्छन्स्वपन्श्वसन् ॥ ८ ॥**

**प्रलपन्विसृजन्गृण्हन्नुन्मिषन्निमिषन्नपि ।**
**इंद्रियाणींद्रियार्थेषु वर्तंत इति धारयन् ॥ ९ ॥**

**अर्थ**–कर्मयोगयुक्त तत्वज्ञ, पहातां, ऐकतां, स्पर्श करितां, वास घेतां, भक्षण करीत असतां, चालत असतां, निजला असतां, श्वासोच्छ्वास करीत असतां, बोलत असतां, मलमूत्रत्याग करीत असतां, ग्रहण करीत

असतां, नेत्र झांकतां उघडतां, आपण कांहींच करीत नाहीं, परंतु इंद्रियें आपआपले विषयांचे ठायीं वर्तन करितात, असें समजतो.

**टीका.**–जीवास जें दुःख भोगावें लागतें, तें सर्व कुबुद्धीच्या संगतीनें भोगावें लागतें. जीवात्मा पुरुष व बुद्धि त्याची गृहिणी होय. आपला नवरा सुखी असावा, असें नेहमीं बायकोस वाटतें. पण ती मूढ असली, तर ममतेनेंच, पण त्याचे प्रकृतीस अपाय होईल, असें अपथ्य-भोजन त्यास देते. तेणेंकरून प्रकृति बिघडून, त्या नवऱ्याचे हाल होतात. तोंच एखादा उत्तम वैद्य भेटून त्यानें तिची कानउघाडणी केली, तर ती शहाणी होऊन, नवऱ्यास भलतेंसलतें खाण्यास देत नाहीं, ह्मणजे त्याची प्रकृति उत्तम राहूं लागते व तो सुख पावतो. तद्वत् कुबुद्धीच्या योगानें जीवात्म्यास दुःख भोगावें लागतें. पण सत्संगवैद्य भेटला, तर तीच सुबुद्धि होते, व सत्संग व सच्छास्त्राचे साह्यानें जीवात्म्यास सुख देते.

मी आत्मा आहें व तो अकर्ता आहे, असें ज्यास कळलें, तो **तत्वज्ञ** ह्मणावा. असें ज्यास कळलें त्यास अहंकार कोठून असणार? यावरून इंद्रियांसहित आपण देह कर्ता आहे असें वाटतें, तोंपर्यंत अकर्ता असा जो आत्मा, त्याचें ज्ञान होत नाहीं, हें उघड झालें. भोंवळ असली ह्मणजे जमीन फिरते असें वाटतें. पण भोंवळ नाहींशी झाल्याबरोबर जमीन अचळ आहे, व भोंवंडी आपले डोळ्यांत होती असें कळतें. तद्वत् बुद्धींत अहंकार आहे तोंचपर्यंत "मी कर्ता" असें वाटतें. तो नाहींसा झाला ह्मणजे "**मी अकर्ता आहें**" असें सहज वाटतें. ह्मणून आपलें अकर्तृत्व ज्यास कळलें, असा तत्वज्ञ देहाचीं सर्व कर्में देहच करितो, असें तो नेहमीं पाहतो. अशी स्थिति राहण्यास "**मी आत्मा आहे**" अशी नेहमीं स्मृति राहिली पाहिजे. हें काम बुद्धीचें आहे. बुद्धि आत्मस्वरूपीं ठेविली असतांही, इंद्रियव्यापार आत्मसत्तेनें चालतात ह्मणून तत्वज्ञ हीं दोन्ही कामें एकदम करितो. व तीं करूनही,

अकर्ती राहतो. यापुढील दोन श्लोकांनीं साधकांची स्थिति वर्णन केली आहे.

**ब्रह्मण्याधाय कर्माणि संगंत्यक्त्वा करोति यः ।**
**लिप्यते न स पापेन पद्मपत्रमिवांभसा ॥ १० ॥**

**अर्थ.**—सगुणब्रह्माचे ठायीं कर्में समर्पण करून फलेच्छारहित जो पुरुष कर्म करितो, तो पाण्यांत असणाऱ्या कमळाप्रमाणें, पापेंकरून लिप्त होत नाहीं.

**टीका.**—साधक पापकर्में तर करीतच नाहीं, मग पापांनीं लिप्त होत नाहीं असें ह्मटलें याचा हेतु काय, हें समजलें पाहिजे. पाप ह्मणजे बद्ध करण्याची शक्ति. पुण्यकर्मदेखील सुवर्णाची बेडी आहे, हें पूर्वीं सांगितलेंच आहे. असें पुण्यकर्म साधक आचरीत असतां त्याचाही बंध होत नाहीं, असें "**पाप**" या शब्दानें सुचविलें आहे.

**कायेन मनसा बुद्ध्या केवलैरिंद्रियैरपि ।**
**योगिनः कर्म कुर्वंति संगं त्यक्त्वात्मशुद्धये ॥ ११ ॥**

**अर्थ.**—कर्मयोगी फलाभिलाष टाकून काया, मन व बुद्धि इहीं-करून व कर्माभिनिवेशित नव्हत अशा इंद्रियांहींकरून बुद्धीचे शुद्धीकारणें कर्म करितात.

**टीका.**—कर्मयोगी कायेंकरून स्नानसंध्यादि स्वधर्म करितो. मनें-करून भगवद्ध्यान करितो, भगवद्भजनानेंच मोक्ष होईल, असा बुद्धीनें निश्चय करितो, व केवळ इंद्रियांचीं कर्में करितो, ह्मणजे रजोगुणात्मक इंद्रियें वासनामय असतात, तीं निष्काम भगवदर्पणनिश्चयेंकरून वा-सनारहित करून, कर्में करितो. आणि सर्व कर्मफलापेक्षारहित हो-त्साता, तो आपले अंतःकरणशुद्धीकरितां भक्तियोग करितो.

ईश्वरीं कर्मसमर्पण केल्यानें बंध होत नाहीं. एवढेंच धरून, कि-

तंडवादी व पाखांडी लोक नेहमीं ह्मणतात कीं, बरेंवाईट सर्व कर्मे करण्यास कांहींच हरकत नाहीं. कारण "**कृष्णार्पण**" असें रोज संध्याकाळीं ह्मटलें ह्मणजे झालें. त्यांस भगवद्वाक्याची पूर्णपणें माहिती नाहीं, असेंच ह्मटलें पाहिजे. कारण, "**कृष्णार्पण**" असें नुसतें तोंडानें ह्मटलें ह्मणजे कार्य होत नाहीं, हें "**मयि सर्वाणि कर्माणि**" या तृतीयाध्यायांतील ३० वे श्लोकाचे टीकेंत स्पष्ट सांगितलें आहे. "**कर्म**" या शब्दानें वाटेल तें कर्म नव्हे, परंतु फक्त वेदविहित कर्मच होय, हें चतुर्थाध्यांतील १७ वा श्लोक, "**कर्मणोह्यपि बोद्धव्यं**" याचे टीकेंत स्पष्ट केलें आहे. या गोष्टींचें निराकरण एथें करण्याचा हेतु अशा लोकांस दुरुस्त करण्याचाच नाहीं, तर आपलें वेडेंविद्रें वर्तन भगवद्वाणीस अनुसरूनच आहे, असें बोलून भगवंताचे वाणीस बट्टा लावितात, तो रास्त नाहीं, हें दाखविण्याचा आहे. अस्तु.

कर्मे करितांना सर्व सारखेच दिसतात. परंतु,

**युक्तः कर्मफलं त्यक्त्वा शांतिमाप्नोति नैष्ठिकीम् ।**
**अयुक्तः कामकारेण फले सक्तो निबध्यते ॥ १२ ॥**

**अर्थ.**–योगी कर्मफळ टाकून कर्म करितो व भगवन्निष्ठ असतो, ह्मणून मोक्ष पावतो, व इतर जन कामनेमुळें फलासक्त होऊन बद्ध होतो. ज्ञानी पुरुषाचें अकर्तृत्व सांगत असतां तत्संबंधानें इतर गोष्टींचें ही वर्णन करितां करितां ग्रंथ एथवर आला. या स्थळीं एक क्लिष्ट संशय निघतो तो असा कीं, चिदात्मा अज्ञान्यांस कळत नाहीं व त्यामुळें त्यांचें अकर्तृत्व त्यांस कळत नाहीं, तथापि तो ( चिदात्मा ) अकर्ताच असतो. या न कळण्यानें, त्यास कर्तृत्व येत नाहीं. असें असून तो कर्मानें बद्ध कां व्हावा? या शंकेचें निरसन पुढील श्लोकांत भगवान् करणार आहेत, त्याजकडे सुज्ञ वाचकांचें विशेष लक्ष असावें.

सर्वकर्माणि मनसा संन्यस्यास्ते सुखं वशी ।
नवद्वारे पुरे देही नैव कुर्वन्न कारयन् ॥ १३ ॥

अर्थ.—इंद्रियनिग्रही पुरुष विवेकाच्या साह्यानें सर्व कर्मांचा संन्यास करून नऊ द्वारांचें जें देहरूप नगर आहे, त्यांत सुखानें राहून तो कांहीं करित नाहीं व करवितही नाहीं.

टीका.—सत्वाचे चार भेद आहेतः—अंतःकरण, चित्त, बुद्धि व मन. ज्या योगानें आत्मस्फुरण होतें तें अंतःकरण होय. तें आत्मसत्तेनें इतरां जडांस चेतवितें, ह्मणून त्यास चित्त ह्मणतात. ज्या योगें निश्चय होतो ती बुद्धि होय. संकल्पविकल्प करणारें मन होय. या सर्वांत अव्यय असें आत्मत्व अंतःकरणेंकरून ज्ञानी पुरुष अनुभवितो. आपणांस व जडांस चेतविणारें चित्त प्रारब्ध सरेपर्यंत कायमच असतें. तें सुषुप्तींत जसें अज्ञानीं लीन होतें, त्याप्रमाणें समाधिकाळीं ब्रह्मस्वरूपीं लय पावतें. संयमी पुरुष या चित्तासहित बुद्धि अकर्त्रात्मत्वीं योजितो, तेव्हां बुद्धीचा अंतःकरणांत लय होतो व तें चिन्मय होतें. यानंतर संकल्पविकल्पात्मक मन उरतें. त्याचे साह्यानें इंद्रियें पूर्वसंस्कारानुरूप विषयीं वर्ततात, पण बुद्धि अकर्त्रात्मत्वीं मिळून, या सर्वांसही ती वेगळेपणें पाहते. अशा रीतीनें वागणारा बुद्धिमंत पुरुष मनासहित इंद्रियें आणि विषय वेगळे टाकून, आपण अकर्ता आहे, असें बुद्धीनें समजतो व २ कानांचीं भोकें, २ डोळे, १ तोंड, १ गुदद्वार, १ शिश्न, व २ नाकपुड्या, हीं नवद्वारें ज्यांत आहेत, अशा देहांत सुखानें असतो. पण अशा रीतीनें मनास सपशेल मोकळें सोडीत नाहीं, तर वासनारहित बुद्धीनें त्यास विषयप्रीति धरूं देत नाहीं. यास दृष्टांतः—घोड्याच्या गळ्यांत दोरी बांधून ती दोरी आपले हातांत ठेवून, घोड्यास चरण्यास आपण मोकळें सोडतों, पण त्यास रानीं भटकूं देत नाहीं. असें करण्यांत घोडा व त्याचें नियमित फिरणें व चरणें याचे आपण साक्षी

होऊन असतो. त्याप्रमाणें ज्ञानी पुरुष मनासहित इंद्रियें व त्यांचें नियमित विषयग्रहण, यांचा साक्षी होऊन राहतो हें सिद्ध झालें. तरी पुरुषाच्याच सत्तेनें कर्मे घडतात, ह्मणून तो निदान तीं कर्में करवितो, असें ह्मणतां येईल. पण तसें तो करवित नाहीं, असें भगवान् सांगतात. सूर्यप्रकाशानें सर्व सृष्टींतील बरीवाईट कामें होतात, पण त्याजबद्दल सूर्य जबाबदार होत नाहीं, त्याप्रमाणें कर्म करविण्याचा आरोपही ज्ञानी पुरुषास लागत नाहीं. मग कर्म होतें तरी कसें, अशी शंका निघते. त्यास उत्तर असें कीं, चुंबकासन्निध लोह आलें ह्मणजे तें नाचूं लागतें. ही चुंबकाची सहज कला होय. चुंबक जातीनें नाचत नाहीं आणि नाचवीतही नाहीं. तसा ज्ञानी पुरुष कर्में करवित नाहीं. तीं प्रकृति-गुणेंकरून आपल्या आपण घडतात. अज्ञानी लोकांची बुद्धि ज्ञानी लोकांप्रमाणें आपलें अकर्तृत्व ओळखून निराळी राहत नाहीं, ह्मणून त्यांस कर्मबंध होतो. आतां जीवांचें कर्म ईश्वर करवितो, अशी साधारणपणें लोकांची समजूत आहे, ती चुकीची आहे हें पुढील श्लोकानें भगवान् स्पष्ट करून सांगतात.

**न कर्तृत्वं न कर्माणि लोकस्य सृजति प्रभुः ।**
**न कर्माणि फलसंयोगं स्वभावस्तु प्रवर्तते ॥१४ ॥**

अर्थ.—लोकांचें कर्तृत्व आणि कर्म ईश्वर उत्पन्न करित नाहीं. त्याचप्रमाणें कर्मांच्या फळप्राप्तीसही तो कारणीभूत नाहीं, तर त्यांच्या अविद्येमुळें तीं उत्पन्न होतात.

टीका.—ज्यास कर्म करितांना तें मीं करितों असें वाटतें, त्यास कर्म-फळ भोगितांना मी भोगतों असें वाटतें. आत्मज्ञानेंकरून हें सर्व मिथ्या आहे, असें जरी समजतें, तरी भोगकाळीं मीपण स्फुरतें याचें कारण हेंच होय. असेंच कर्म आणि कर्तृत्व या दोहींचें फळ, यथाकाळ वृक्षास फळ येतें, त्याप्रमाणें अपोआप मिळतें. यावरून ईश्वर अजागल-

स्तनवत् आहे, असें मूर्ख लोक ह्मणतील, ह्मणून तो आपल्यास "प्रभु" या शब्दें वर्णितो. प्रभु ह्मणजे समर्थ. या शब्दें तो असें सुचवितो कीं, सर्व पुरुषार्थ देण्यास तो समर्थ आहे. कर्म आणि फल यांचे संयोगीं अनर्थ होतो, तो जे त्यास भजत नाहींत त्यांसच होतो. फळाची इच्छा धरून जे कर्म करितात, ते आपले हातानें आपले पायांत बिडी घालून देतात; व जे त्यास अजागलस्तनवत् समजतात ते स्वतः तसेच बनतात. कारण "**ये यथा मां प्रपद्यंते तांस्तथैव भजाम्यहं**" असें भगवंत चतुर्थाध्यायांतच बोलून गेले आहेत. "तूं समर्थ आहेस, आह्मांस उत्तम बुद्धि दे," ह्मणून जे त्याची प्रार्थना करून सर्व कर्म त्यास समर्पण करितात, ते सन्मार्गास लागून त्यास सद्गति मिळते. जसा कोणी त्यास भजेल तसें तो त्यास फळ देतो, यामुळें त्यास विषम-पण लागत नाहीं. तथापि कर्म स्वतः जड आहे व त्याचा कर्ता जीव विस्मरणशील आहे, ह्मणून ईश्वर जीवांकडून कर्म भोगवितो व कर्मफळसंयोगही तोच घडवितो, असें होतें. यामुळें भगद्वाक्यास बाध आल्यासारखा दिसतो. पण सूक्ष्म दृष्टीनें विचार केला असतां, त्याचें निरसन होतें. सुपीक जमीन फळदाती होय. तिजमध्यें बीज पेरिलें असतां तें बीजच फळतें, जमीन कांहीं तें फळ निर्माण करित नाहीं. तथापि जमिनीवांचून बीज फळ देऊं शकत नाहीं. तद्वत् कर्में ईश्वरा-वांचून फळूं शकत नाहींत व ईश्वरशक्तीनें तीं फळपण पावतात. ईश्वर सर्वकर्मफलदाता व कर्मफलसंयोग कर्ता असूनही तत्वतः कर्मच फळतें. भूमि कोणास फळ देत नाहीं, तद्वत् ईश्वरत्वास वैषम्य लागत नाहीं. तथापि भूमीवांचून फळ मिळत नाहीं, तसें आपले-वांचून फळ मिळत नाहीं, हें दाखविण्याकरितां ईश्वर, "प्रभु" हें विशेषण आपल्यास लावून घेतो. एवंच कर्मानुरूप भोग होतो, ह्मणून कर्मफलसंयोग ईश्वराकडे लागत नाहीं व तो जीवांचें कर्तृत्व आणि कर्म उत्पन्न करित नाहीं, हें सिद्ध झालें. मग जीवांचे कर्माची प्रवृत्ति

कशी घडते असें ह्मणाल, तर " **स्वभावस्तु प्रवर्तते** " असें भगवान् सांगतात; ह्मणजे पूर्वसंस्कारानुरूप प्रवृत्ति होते. या विषयाचें स्पष्टीकरण दुसरे अध्यायांतील ५० वा श्लोक " **बुद्धियुक्तो जहातीह** " याचे टीकेंत केलें आहे, तें पहावें. हे संस्कार दोन प्रकारचे आहेत. एक " **नैसर्गिक** " व दुसरा " **सहज.** " सहज संस्कार प्रबळ झाला ह्मणजे तोच नैसर्गिक होतो. सत्संगें कोणी सन्मार्ग धरित नाहीं व दुराचरण करण्याचें टाकीत नाहीं. त्याचप्रमाणें दुष्टसंगें दुर्मार्ग धरित नाहीं व सन्मार्ग सोडित नाहीं. हीं दोन्हीही नैसर्गिक संस्कारांचीं लक्षणें होत. नदीच्या उगमाजवळ तिला जिकडे वळविलें तिकडे ती वळते. पण तीच थोर झाली ह्मणजे तिचा प्रवाह बदलणें फार कठीण होतें. तद्वत् जन्मांतरीं ज्यास प्रबळ सत्संगति असते तो दुष्टसंगानें सन्मार्गापासून वळत नाहीं, व जन्मांतरीं ज्यांस प्रबळ दुष्ट संगति होती, ते सत्संगानें देखील दुर्मार्ग सोडित नाहींत.

**नादत्ते कस्यचित्पापं न चैव सुकृतं विभुः ।**

**अज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यंति जंतवः ॥ १५ ॥**

**अर्थ.**—समर्थ असा परमेश्वर कोणाचें पाप घेत नाहीं व पुण्यही घेत नाहीं. अज्ञानानें ज्ञान वेष्टित असल्यामुळें जीव मोह पावतात.

**टीका.**—एका हातीं अपराध करवून दुसरा कौतुक पहातो तेव्हां तो अपराध, करविणाऱ्याचा होय. याप्रमाणें जनां हातीं भगवंत पाप करविता तर त्या पापाचा अधिकारी भगवंत होता. या भावें आपण कोणाचें पाप घेत नाहीं, असें भगवान् ह्मणतात. एथें कोणी ह्मणतील कीं, जनां हातीं सुकृत करवून तो त्यांस सद्गति देत नाहीं, यामुळें भगवंताकडे निर्दयत्व येतें. या शंकेचा परिहार असा कीं, ईश्वर जर सुकृत करवूं जाईल, तर त्याचें दयाळुत्व बिघडतें. माता लेंकरास माती खाऊं देत नाहीं ह्मणून तें रडतें व दुध पाजतांनाही रडतें. तद्वत् सुकृत

जबरदस्तीनें प्रभु करवील तर तत्काळ त्यांस दुःख होईल. तें दिल्यानें आपलें दयालुत्व बिघडेल ह्मणून तेंही प्रभु करित नाहीं. यानंतर दुसरा आक्षेप उत्पन्न होतो कीं, प्रभु पापफळ निवारण करित नाहीं, ह्मणून तो निर्दय दिसतो. पाप निवारण करण्यास गेलें, तरी पापकर्मी लोकांस दुःख वाटणारच, ह्मणून तो तेंही करित नाहीं. याउपर कोणी असें ह्मणतील कीं, पापकर्मीं कोणी आवडच धरूं नये, असें ईश्वर कां करीत नाहीं? याचें उत्तर इतकेंच कीं, अनादि प्रवाहाप्रमाणें जें घडण्याचें तें घडतें. हा प्रपंच वृक्ष उपजणार, राहणार व नासणार. हे सर्व मायेचे खेळ आहेत. त्या मायेमुळें ब्रह्मास ईश्वरत्व प्राप्त होतें ह्मणून ईश्वर मायेस मोडूं शकत नाहीं. आतां ब्रह्मानें तिला मोडावें तर तें निर्धर्म आहे. ह्मणून त्याचे हातून ती मोडली जात नाहीं. माया ही ब्रह्मबीजाचा अंकुर आहे. तो अंकुर, बीज नाहींसें झाल्याखेरीज कसा नासणार? ब्रह्म तर अविनाश आहे, ह्मणून हें सृष्टीचें रहाटगाडगें नेहमीं असेंच चालणार. तो प्रवाह बंद करण्याचें सामर्थ्य ईश्वरत्वीं अगर ब्रह्मरूपीं नाहीं. अस्तु. एकंदरींत समसदय असा जो ईश्वर तो कोणाचें पाप अगर पुण्य घेत नाहीं, व तसें न केल्यानें त्याचे समतेस व सदयतेस बाधही येत नाहीं, हें सिद्ध झालें.

असें जर आहे तर कर्तृत्व आणि कर्म कसें उपजतें, ही शंका येते. ती पूर्वश्लोकींच "**स्वभावस्तु प्रवर्तते**" यानें निवारण झाली. यावर अशी शंका निघते कीं, संसारचिखलांत मनच फसलें आहे, निष्कलंक अशा आत्म्यास त्याचा लेप नाहीं. संस्कार पहातां चित्तांत, विषयप्रवृत्ति इंद्रियांस; अशी स्थिती असतां जीवात्म्यास बंध कां घडावा? बरें, बंध घडतच नाहीं, तो मिथ्या आहे, तर फळसंबंध कां घडावा, अशी शंका येते. तिचें निराकरण उत्तरार्धानें केलें आहे. आत्म्याप्रमाणें जीवात्माही अकर्ता आहे, हें खरें आहे; पण बंध आणि मोक्ष बुद्धीच्या शिरावर आहेत. त्या बुद्धीस आत्मा कळून वासनेचा क्षय होत नाहीं,

तोंपर्यंत अज्ञानामुळें ती अकर्तृत्वाकडे वळत नाहीं. तेंच बुद्धीचें अज्ञान जाऊन तिला आत्मतत्व समजलें ह्मणजे कर्माचें बंधन नाहींसें होतें. आत्मा अकर्ता आणि कर्म मिथ्या हें कळणें, यासच परमज्ञान ह्मणावें. हें ज्ञान जीवांचे उलट समजुतीनें झांकलें गेल्यामुळें जीवांस भ्रम होऊन मी कर्ता असें ते मानितात. मागें सांगितल्याप्रमाणें (टीका, श्लोक ४९ अ०२ पहा.) भ्रम असतांनाही बुद्धि आत्म्यास स्पर्शलेलीच असते. तथापि भ्रमामुळें रजतमरूपीं इंद्रियांची प्रतीति होते. दोराचे ठायीं भ्रमानें सर्प दिसतो, तेव्हांही दृष्टि दोरास स्पर्शलेलीच असते. परंतु भ्रमानें दोराच्या खऱ्या स्वरूपाचें ज्ञान वेष्टिलें असतें. त्याप्रमाणेंच आपण अकर्ता ही ज्ञानदृष्टि असूनही जीव भ्रमामुळें आपणांस कर्ता असें मानितात.

आतां हें ज्ञानलक्षण भगवान् सांगतात.

**ज्ञानेन तु तदज्ञानं येषां नाशितमात्मनः ।**
**तेषामादित्यवज्ज्ञानं प्रकाशयति तत्परम् ॥ १६ ॥**

**अर्थ.**—ज्यांचें हें अज्ञान, आत्म्याचें ज्ञान झाल्यामुळें नाशास पावतें, त्यांचें तें उत्कृष्ट ज्ञान सूर्यासारखें आपणांस व दुसऱ्यांस प्रकाशित करितें.

**टीका.**—मिथ्या सर्पभासामुळें रज्जूवर दृष्टि असूनही त्याचें रज्जुपण दिसत नाहीं. रज्जु न कळणें हें सर्पभासाचें निमित्त होय. तो रज्जु न कळणें, हें अज्ञान, रज्जूचें ज्ञान झालें ह्मणजे नाश पावतें, अशा भावानें भगवान् हा श्लोक सांगतात. रज्जूवर दृष्टि पडली नाहीं तर सर्प दिसत नाहीं. एवंच, रज्जूस आयती दृष्टि स्पर्शली असूनही सर्पभ्रम होतो. तो भ्रम नाहींसा झाला, ह्मणजे हा रज्जुच सर्परूपानें दिसत होता असें कळतें. तद्वत् बुद्धि आत्म्यास नेहमीं स्पर्शलेलीच असते. पण भ्रमामुळें तो आत्मा रजतमरूप प्रपंच भासतो. तो

भ्रम जाऊन आत्मा कळला ह्मणजे त्याचे अज्ञानकाळीं तो आत्माच प्रपंचरूपानें दिसत होता, असें समजतें. ह्मणून अज्ञानानें आच्छादिलेलें ज्ञान त्याच ज्ञानानें नाश पावलें, ह्मणजे तें स्वप्रकाशज्ञानस्वरूप प्रगट होतें. तें आपणास दाखवून, आपल्याहून विलक्षण असें जें जड जग तेंही निराळेंसें दाखवितें. स्वप्रकाश सूर्यकिरण तद्विलक्षण मृगजलासही प्रकाशित करतात. तद्वत् ज्ञानरूप आत्मा स्वप्रकाश असून या मिथ्या जगासही तो प्रकाशितो, हें दाखविण्याकरितां 'आदित्यवत्' असें श्लोकांत ह्मटलें आहे. असें असून कित्येक लोक गैरसमजुतीनें आत्मा तेजोरूप आहे, असें यावरून समजून नेत्रांत असणारें तेज लक्षितात.

वर सांगितलेलें ज्ञान प्राप्त झाल्यावर त्याचें ध्यान न केलें तर तें जतन होत नाहीं. जो असें ध्यान करितो, त्यास काय फळ मिळतें, हें भगवान् आतां सांगतात.

**तद्बुद्धयस्तदात्मानस्तन्निष्ठास्तत्परायणाः ।**
**गच्छन्त्यपुनरावृत्तिं ज्ञाननिर्धूतकल्मषाः ॥ १७ ॥**

**अर्थ.**–त्याच ज्ञानीं ज्यांची बुद्धि असते, ज्यांचें चित्तही त्याच ज्ञानाचे ठायीं लीन असतें, ज्यांची निष्ठाही त्याच ज्ञानाचे ठायीं असते, आणि त्याच ज्ञानाचा जे आश्रय करितात, त्यांचे पातकांचा नाश होऊन, जेथें पुनरावृत्ति नाहीं, अशा पदास ते पावतात.

**टीका.**–"**तद्बुद्धयः**" या पदानें मनन आणि निदिध्यासन सुचविलें आहे. गुरुमुखानें श्रवण घडलें ह्मणजे नानायुक्तींनीं त्याचें चिंतन करण्यास मनन ह्मणतात. या मननानें सत्यासत्याचा निश्चय होतो. मग त्याच निश्चयीं क्षणोक्षणीं मनाची योजना केली पाहिजे. या क्रियेस निदिध्यासन ह्मणतात. हीं दोन्ही कामें बुद्धीचींच होत. "**तदात्मानः**" या पदेंकरून साक्षात्कार सुचविला आहे. व्यतिरेक

आणि अन्वय या दोन मननिदिध्यासनाच्या रीती आहेत. आत्मा सत्य व जड प्रपंच असत्य, अशा पाहण्यास व्यतिरेक ह्मणतात. व सर्व जड प्रपंचाभास आत्मस्वरूपच होय, असें पाहण्यास अन्वय ह्मणतात. या दोन्ही तऱ्हांनीं मननिदिध्यासन केलें, ह्मणजे चित्त तदाकार बनतें. बुद्धि आणि चित्त तदाकार झालीं ह्मणजे आत्मतत्व बाणलें असें समजावें व त्यास "**तन्निष्ठता**" असें ह्मणतात. आत्मज्ञानच तारक आहे, असा विश्वास असल्याखेरीज, वर सांगितल्याप्रमाणें श्रवण, मनन व निदिध्यासन घडत नाहीं. ह्मणून "**तत्परायणाः**" या पदानें तसा विश्वास पाहिजे हें सुचविलें आहे. अशा रीतीनें योग परिपक्व झाला ह्मणजे जन्मजन्मांतरींचे पापपुण्याचा (संचिताचा) नाश होतो, व क्रियमाणाचा लोप होत नाहीं, हें "**ज्ञाननिर्धूतकल्मषाः**" या पदेंकरून सुचविलें आहे. याप्रमाणें कर्मनाश झाला ह्मणजे मोक्षपद प्राप्त होतें, असें भगवान् सांगतात. पण प्रारब्धभोग सरेपर्यंत देह धरून राहणें भागच आहे. तोंपर्यंत, असा पक्व ज्ञानी कसा वागतो हें आतां भगवान् सांगतात.

**विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि ।**
**शुनि चैव श्वपाके च पंडिताः समदर्शिनः ॥ २८ ॥**

**अर्थ.**–विद्येंकरून आणि विनयेंकरून संपन्न असा ब्राह्मण, गाय, हत्ती, श्वान आणि चांडाळ, या सर्वांस ज्ञानी पुरुष समदृष्टीनें पाहतात.

**टीका.**–ज्या बुद्धीनें तत्वदृष्ट्या सर्वच ब्रह्मरूप पहावें त्याच बुद्धीनें तारतम्यदृष्ट्या उत्तमाधमपणही जाणावें. याचा स्पष्टार्थ असा कीं, सर्वांस समदृष्टीनें पहावें, पण वागणूक तारतम्यानें ठेवावी. ब्रह्म सर्वत्र सम आहे, असें पाहणें यास ज्ञान ह्मणावें व वर्तणें हें कर्म होय. ह्मणून वागणूक यथायोग्य ठेवावी. कान, नाक, तोंड, देहच

होत. ह्मणून तोंडांत घालण्याचा घास नाकांत घातला तर चालेल काय? तसें आत्मनिष्ठानें दृष्टि तेवढी सम ठेवावी, पण वर्तन यथायोग्यच ठेविलें पाहिजे. पाषाणाचाच देव व पाषाणाचीच पायरी असते, पण जोडा पायरीवर ठेवावा लागतो व मस्तक देवाचे पायावर ठेविलें पाहिजे. पितळेचीच पिकदाणी असते व संध्यापात्रही पितळेचें असतें, ह्मणून संध्यापात्रांत थुंकून पिकदाणींत संध्या करावी काय? एवंच, सम पाहणें हेंच अपरोक्ष ज्ञान होय. वर्तन यथायोग्यच ठेविलें पाहिजे. हें स्पष्ट दर्शविण्याकरितां भगवान् "**पण्डिताः समदर्शिनः**" असें ह्मणतात. असे समदर्शी पंडित जिवंतच मुक्त असतात, असें भगवान् सांगतात.

**इहैव तैर्जितः सर्गो येषां साम्ये स्थितं मनः ।**
**निर्दोषं हि समं ब्रह्म तस्माद्ब्रह्मणि ते स्थिताः ॥ १९ ॥**

**अर्थ.**—ज्यांचें मन समत्वाचे ठायीं स्थित झालें आहे, ते जिवंत असतांनाच जन्ममरणास जिंकतात. कारण, सम आणि निर्दोष अशा ब्रह्माचे ठायीं ते स्थित असतात.

**टीका.**—पूर्व श्लोकीं जें समदर्शन वर्णन केलें तीच ब्रह्मस्थिति होय. त्या स्थितींत राहिलें ह्मणजे जडब्रह्मैक्य होतें, व तेणेंकरून जन्ममरणबाधेपासून मुक्तता होते. यावरून जडभ्रमच सर्ग होय, असें भगवान् सुचवितात. यावरून ज्यास जडब्रह्मैक्य ह्मणजे अन्वयज्ञान बाणलें नाहीं, त्यास पुनर्जन्म आहे, असें स्पष्ट दिसतें. निर्दोष आणि सम ब्रह्म ह्मणजे निर्दय नव्हे आणि विषम नव्हे असें सगुणब्रह्म; याचे ठायीं जे स्थित असतात त्यांसच समदृष्टि प्राप्त होणार. कारण "**ये यथा मां प्रपद्यंते तांस्तथैव भजाम्यहं**" असें भगवंतांनीं यापूर्वीच सांगितलें आहे. ईश्वर कोणाचें कर्तृत्व अथवा कर्म उत्पन्न करीत नाहीं व कोणाचें पाप अथवा पुण्यही घेत नाहीं, परंतु अज्ञानानें जीव मोह पावून कर्मफलें भोगतात, या श्लोकाचाच विस्तार येथपर्यंत आला

आहे, व त्या विषयाची या श्लोकानें समाप्ति झाली. या पूर्वापर संबंधावरून, या श्लोकांत सांगितलेलें ब्रह्म सगुणब्रह्मच होय असें स्पष्ट दिसतें. असें असूनही निर्गुणपर टीकाकार या श्लोकांतील "ब्रह्म" या शब्दाचा अर्थ "**निर्गुण ब्रह्म**" असा करितात, ते सुखें करोत. याउपर सगुणभक्तीनें जीवन्मुक्ति पावलेल्या ज्ञानी पुरुषांचीं लक्षणें भगवान् सांगतात.

**न प्रहृष्येत् प्रियं प्राप्य नोद्विजेत्प्राप्य चाप्रियम् ।**
**स्थिरबुद्धिरसंमूढो ब्रह्मविद्ब्रह्मणि स्थितः ॥ २० ॥**

**अर्थ.**—तो प्रिय पदार्थ मिळाल्यानें हर्ष पावत नाहीं व अप्रिय-प्राप्तीनें उद्विग्न होत नाहीं. कारण ब्रह्म जाणून त्याचे ठायीं तो राहतो ह्मणून त्याची बुद्धि स्थिर झालेली असते व त्याचे अज्ञानाचा नाश झालेला असतो.

**टीका.**—ज्याची विषयवासना नाहींशी झाली, त्यास प्रियाप्रिय पदार्थांपासून हर्षविषाद कोठून उत्पन्न होणार बरें? प्रारब्ध असेपर्यंत पूर्वसंस्कारानुरूप त्याचें शरीर वर्ततें. पण त्याची बुद्धि ब्रह्माचे ठायीं स्थिर असल्यामुळें, तिला हर्षविषाद वाटत नाहींत. हें ऐकून अर्जुनास वाटलें कीं, अशा प्रकारें आपली बुद्धि कशी स्थिर होईल? हें जाणून भगवान् पुढील श्लोक बोलतात.

**बाह्यस्पर्शेष्वसक्तात्मा विन्दत्यात्मनि यत्सुखम् ।**
**स ब्रह्मयोगयुक्तात्मा सुखमक्षय्यमश्नुते ॥ २१ ॥**

**अर्थ.**—विषयेंद्रियसंयोगानें जें सुख मिळतें, तें आत्म्याचे ठायीं मिळतें. ह्मणून विषयांचे ठायीं अनासक्ति ठेवणारा ब्रह्मसमाधियुक्त योगी अक्षय्य सुखाचा अनुभव घेतो.

**टीका.**—विषयेंद्रियसंयोगानें सुख होतें हें खरें, पण अंतीं वियोग-

दुःख ठेवल्यासारखें आहे. हें जाणून मुमुक्षु जन विषयांसंबंधानें विरक्त असतात. जोंपर्यंत समाधिसुखानुभव होत नाहीं, तोंपर्यंत बुद्धीनें कितीही उपदेश केला तरी, मन आत्मस्वरूपाकडे वळत नाहीं व वारंवार विषयांकडे तें ओढ घेतें. पण निश्चयात्मक बुद्धीनें मनास आत्मस्वरूपीं जबरदस्तीनें ढकलिलें पाहिजे. त्या दोघांची गांठ पडून एकवार तज्जनित सुखाचा चटका झोंबला कीं, मग ढकलून दिलें तरी तें मन विषयांकडे जात नाहीं. ऋतु प्राप्त झालेली नवोढा कन्या लहानपणापासून आपले मातुश्रीजवळ निजत असते व त्याच सुखांत ती गर्क असते. ऋतु प्राप्त झाल्यावर मातुश्री तीस नवऱ्याचे कोठडींत जाण्यास सांगते. पण ती तसें करण्यास काचकुच करित असते, तरी मातुश्रीस तिचें तें करणें अज्ञानाचें आहे असें माहित असतें ह्मणून जबरदस्तीनें तिला ती नवऱ्याचे कोठडींत ढकलून देतें; तरी ती संयोग करण्यास नाखुषच असते. पण एकदां संयोग झाला ह्मणजे नवऱ्याचे खोलींत जा असें पुन्हां मातुश्रीनें ह्मणण्याचें कारणच पडत नाहीं. दुसरे दिवशीं ती पाण्याचा तांब्या घेऊन नीट खोलीची वाट धरिते. तद्वत्च मनाची स्थिति होते. एकवार आत्मस्वरूपीं तें लीन झालें, ह्मणजे बुद्धीची टोंचणी त्यास लागत नाहीं. आपोआप तें तिकडे वळतें. विषयांत जें सुख असतें, तें आत्मसुखच होय. हें जरी खरें आहे, तथापि त्या सुखांत दुःख असतें. ह्मणून शहाणे लोक त्यांचा त्याग करून केवळ सुखाचाच उपभोग घेतात, असें आतां भगवान् सांगतात.

**ये हि संस्पर्शजा भोगा दुःखयोनय एव ते ।**
**आद्यंतवंतः कौंतेय न तेषु रमते बुधः ॥ २२ ॥**

अर्थ.—हे अर्जुना, विषयजन्य भोग दुःखाचीं जन्मस्थानेंच होत. त्यांस आदि आहे व अंतही आहे. ह्मणून ज्ञानी पुरुष त्यांत आनंद मानित नाहींत

टीका.—विषय भोगापूर्वी व नंतरही दुःख देणारे असतात. भोग होण्यापूर्वी उत्कट इच्छेनें तळमळ होते व झाल्यानंतर वियोगजन्य दुःख होतें. विचार कायम आहे तोंपर्यंत सर्व ठीक राहील. परंतु एकदां कामनेचा सपाट्याचा वारा सुटला कीं, मग विवेकदीप मालवतो व मनुष्य भोगप्राप्तीचा उपाय करूं लागतो. त्यांत आडकाठी आली ह्मणजे क्रोध उद्भवतो व मग सर्वच गोंधळ उडतो. ह्मणून भोगत्याग घडणें अति दुस्तर आहे, असें अर्जुनास वाटून, तो देवाकडे पाहूं लागला. तेव्हां देव ह्मणतात कीं,

**शक्नोतीहैव यः सोढुं प्राक्शरीरविमोक्षणात् ।**
**कामक्रोधोद्भवं वेगं स युक्तः स सुखी नरः ॥ २३ ॥**

अर्थ.—देह पडेपर्यंत या लोकींच जो कामक्रोधाचा वेग सहन करूं शकतो, त्यालाच योगी ह्मणावें व तोच सुखी प्राणी समजावा.

टीका.—विषयवासना टाकण्याचा निश्चय कामक्रोधाचे सपाट्यापुढें टिकत नाहीं. यास विचाराशिवाय दुसरा उपाय नाहीं. या कामरूप रानडुकरास दुरूनच विचाररूप भाला टोंचावा पण तो इतका जोरदार असतो कीं, भाल्याचा घाव सोसूनही पुन्हां मुसांडीचा मार करितो. जोरानें भाला मारिला ह्मणजे तो पाठीच्या बाहेर फुटून निवतो व तो मृतप्रायच होतो. पण आपल्याजवळ आत्मरूप अमृतानें भरलेला प्याला असतो तो हिसकावून घेऊन पिऊन टाकण्याकारितां, तो एक निकराची मुसांडी मारितो. तीस भिऊन जर तो त्याला घेऊं दिला, तर तो पुन्हां सजीव होऊन आपला नाश करितो. या निकराचे वेळीं, धैर्य धरून, तें अमृत आपणच प्यालों, तर त्याचे मुसांडीनें आपणास कांहींएक इजा न होतां, आपण बचावतों व तो क्षीणबल होऊन मरतो. कामक्रोध हे स्वतः अचेतन आहेत. त्यांस आपलें मन जीववितें. विवेक आणि वैराग्य हींच

त्यांचे नाशाचीं बळकट शस्त्रें होत. या शस्त्रांच्या घायेंकरून ते क्षीणबल झाले, ह्मणजे अखेरचा एक जंगी मारा करितात. तो सहन केला पाहिजे. त्या वेळेस मात्र धीर सोडतां कामा नये. जो अशा वेळीं धीर धरील, तोच जीवन्मुक्तीचें सुख भोगील. विचारानें धीर न निघेल, तर आत्मस्वरूपाचा आश्रय करावा. अशा रीतीनें जो वागतो, त्याचा मुक्तिप्रसंग पुढील श्लोकांत वर्णिला आहे.

**योऽतःसुखोऽतरारामस्तथांतर्ज्योतिरेव यः ।**
**स योगी ब्रह्मनिर्वाणं ब्रह्मभूतोऽधिगच्छति ॥ २४ ॥**

**अर्थ.**–जो अंतरींच सुख आणि विश्रांति पावतो, तसेंच ज्याच्या अंतरींच विज्ञान असतें, तोच ब्रह्म होत्साता निर्वाण मोक्षास पावतो.

**टीका.**–बाह्य विषयांची आसक्ति टाकून ज्याचें चित्त अंतर्मुख झालें त्यालाच "**अंतःसुख**" ह्मणावें. असाच पुरुष कामक्रोधादिकांचे वेग सोसूं शकेल, आणि त्यालाच आत्मसुखाचा लाभ होईल. जो असा अंतर्यामींच रमतो त्याला "**अंतराराम**" ह्मणावें. तो सर्व विषयांसहित आपला इंद्रियग्राम ब्रह्मदृष्टीनेंच पाहतो. पटीं जसा तंतु असतो, त्याप्रमाणें सर्व जड प्रपंचांत आत्माच आहे असें समजून तो स्वरूपींच रममाण होतो. अंतरींच त्याला सुख असतें व तो अंतरींच रमतो, या बोलण्यानें द्वैत उत्पन्न होतें; तें टाळण्याकरितां, दुसऱ्या चरणानें भगवान् ह्मणतात कीं, तो स्वतः अंतर्ज्योतिच बनून राहतो. ज्योति ह्मणजे प्रकाश. ती प्रकाश व अंधकार या दोहींसही प्रकाशिते. सूर्यानें अलंकार प्रकाशिले जातात तरी सुवर्णावांचून आकार दिसूं शकत नाहींत. अलंकार निबिड अंधकारांत जरी असले, तरी चांचपल्यानें ते कळून येतात. पण आधीं हातास सोनेंच लागतें. यावरून सिद्ध होतें कीं, सूर्यावांचून अलंकार राहूं शकतात, पण सोन्यास सोडून ते राहूं शकत नाहींत. सोनेंच नग धरितें

व दाखवितें, ह्मणून सोनेंच अलंकाराची ज्योति होय. याचप्रमाणें आत्मा सर्व जगताची ज्योति समजावी. ह्मणून "अंतर्ज्योति" शब्दानें तो पुरुष आत्माच असतो, असें होतें, व त्यासच ब्रह्मभूत असें ह्मणावें. तो ब्रह्मच असतो असें ह्मटल्यावर त्यास देह असूं नये; कारण ब्रह्म निर्गुण आहे, आणि यास तर त्रिगुणात्मक देह असतो. ह्मणून याचें स्पष्टीकरण करण्याकरितां,भगवान् ह्मणतात कीं, "ब्रह्मनिर्वाणमधिगच्छति" ह्मणजे प्रारब्ध सरतांच देहांतीं तो निर्वाण पावतो. कारण त्याचें जरी बिंबाशीं ऐक्य झालें असलें, तरी प्रारब्धभोगकाळीं पुन्हां त्यास जीवभाव ( प्रतिबिंबभाव ) उत्पन्न होतो. त्याची अविद्या गेलेली असते, परंतु त्याची बुद्धि उरते. व तीमध्यें, पोत्यांत खाण्यास तयार केलेले तांदुळ भरून ठेविल्याप्रमाणें, इंद्रियें भरलीं असतात. ते तांदूळ खाण्याचे उपयोगी पडतात, पण पेरले असतां उगवत नाहींत. तद्वत् ज्ञान्याचीं इंद्रियें प्रारब्धभोगापुरतीं असतात. पण पुनर्जन्मास कारणीभूत होत नाहींत, ह्मणून देहांतीं त्यास निर्वाणप्राप्ति होते.

**लभंते ब्रह्मनिर्वाणमृषयः क्षीणकल्मषाः ।**
**छिन्नद्वैधा यतात्मानः सर्वभूतहिते रताः ॥ २५ ॥**

**अर्थ.**–ज्यांचीं कर्मे नाशाप्रत पावलीं आहेत, ज्यांचें द्वैत तुटलें आहे, ज्यांचें मन आवरलें गेलें आहे, व जे प्राणिमात्रांचे हिताकरितां झटतात, अशा अनुभवी पुरुषांस ब्रह्मनिर्वाण प्राप्त होतें.

**कामक्रोधवियुक्तानां यतीनां यतचेतसाम् ।**
**अभितो ब्रह्मनिर्वाणं वर्तते विदितात्मनाम् ॥ २६ ॥**

**अर्थ.**–जे कामक्रोधरहित झाले, ज्यांची कर्मी आसक्ति राहिली नाहीं, ज्यांचे चित्ताचा संयम झाला, व ज्यांना आत्म्याचें तत्व समजलें, त्यांना जिवंत असतांना व मेल्यावरही ब्रह्मनिर्वाण मिळतें.

**टीका.**—यापूर्वीच्या तीन श्लोकांचा यांत उपसंहार केला आहे. अन्वयसमाधियोग ज्यास बाणला, त्यास सर्व जगच ब्रह्मरूप होतें. मग निर्वाणाकरितां त्यास देहावसानाची अवधि नको, असें भगवान् या श्लोकानें ह्मणतात.

एथें कोणी अशी शंका घेतात कीं, अशा जीवन्मुक्त पुरुषांस कामक्रोधांचा उद्भव होतच नाहीं. हें त्यांचें बोलणें वायफळ दिसतें. कारण चित्त पाण्याप्रमाणें नीच भूमीस जाणारच. त्यास आंवरून धरावें असें " **यतचित्त** " या शब्दानें दर्शविलें आहे. त्रिगुणात्मक देह आहे तोंपर्यंत, ते गुण वेळोवेळीं आपला अंमल बजाविणारच. पण हा त्यास वश होत नाहीं व धैर्य धरून त्यांचे वेग सोसतो. यांतच त्याचा मुक्तपणा आहे. एथपर्यंत ज्ञान प्राप्त झालेल्या पुरुषास अभ्यासानें मुक्तिपद मिळतें असें भगवंतांनीं सांगितलें. आतां, ज्ञान नसूनही मोक्षापेक्षेनें जे मनोजयाचें साधन करितात, तेही ज्ञान पावून मुक्त होतात, असें भगवान् पुढील दोन श्लोकांनीं सांगतात.

**स्पर्शान्कृत्वा बहिर्बाह्यांश्चक्षुश्चैवांतरे भ्रुवोः ।**
**प्राणापानौ समौ कृत्वा नासाभ्यंतरचारिणौ ॥ २७ ॥**

**यतेंद्रियमनोबुद्धिर्मुनिर्मोक्षपरायणः ।**
**विगतेच्छाभयक्रोधो यः सदा मुक्त एव सः ॥ २८ ॥**

**अर्थ.**—बाह्य विषयांचे स्पर्श दूर करून, दोन्ही भोंवयांचे मध्यभागीं दृष्टि लावून प्राण आणि अपान हे दोन्ही नाकाचे आंत सारखे चालूं ठेवून, जो मोक्षपरायण मुनि इंद्रियें, मन आणि बुद्धि, नीट आवरून धरितो, व ज्याची इच्छा, भय आणि क्रोध हे गेले आहेत, तो सर्वदा मुक्तच राहतो.

**टीका.**—विषयसमुदाय सर्व बाहेरच असतो, पण त्यांची आठ-

वण आंत घोटाळा करिते. ती आठवण बाहेर घालवावी व दोन्ही भोंवयांचे मध्यभागीं जो कपाळाचा भाग असतो, तेथें दृष्टि स्थिर करावी, ह्मणजे मनाचें चिंतन थांबतें. परंतु मन प्राणाधीन आहे, ह्मणून नाकांतच प्राण अपान चालतील तोंपर्यंतच मन स्थिर राहील. एथें प्राणायाम तर सांगितला नाहीं ह्मणून मूळाधारी कुंभक धरून दृष्टि वरप्रमाणें लावावी पण मनाचें शोधन झाल्याखेरीज तें थारणार नाहीं, ह्मणून इच्छा, भय व क्रोध टाकले पाहिजेत. अशीं साधनें केलीं असतां, आत्म्याचें ज्ञान होऊन तो मुक्त होणार यांत संशय नाहीं, असें भगवान् पुढील श्लोकांत सांगतील.

लक्षवादी लोक उफराटी बुबुळें करून, उत्पन्न होणारे तेजासच ब्रह्म समजून, आपणांस कृतकृत्य मानितात पण ही समजूत चुकीची आहे ब्रह्म इंद्रियगोचर नाहीं. तें अतींद्रिय आहे, असें श्रुति सांगते. ज्याचे डोळेच काढून टाकिले आहेत, अशास हें तेज दिसेल काय ? नाहीं. यावरून तें तेज इंद्रियगोचर नाहीं, हें उघड दिसतें. हे लक्षवादी लोक, या व पुढील श्लोकाचा आधार आपले मतास आहे, असें मूर्खपणानें समजतात.

**भोक्तारं यज्ञतपसां सर्वलोकमहेश्वरम् ।**
**सुहृदं सर्वभूतानां ज्ञात्वा मां शांतिमृच्छति ॥ २९ ॥**

**अर्थ.**–सर्व यज्ञ आणि तपें यांचा भोक्ता, सर्व लोकांचा देवाधिदेव, सकल प्राणिमात्राचा सुहृद आत्मा, असा जो मी, त्या मातें जाणून, तो मोक्ष पावतो.

**टीका.**–आपला आत्मा सर्वांस अति प्रिय असतो. देहासच हा आत्मा समजल्यानें तो व तत्संबंधी लोक प्रिय वाटतात. पण आत्म्याचें खरें रूप समजल्यावर, ही समजूत राहत नाहीं, व आपला

आत्मा सर्व जगताचा आत्मा आहे, असें कळतें. तोच आत्मा आपण आहों, असें भगवान् सांगतात. ह्मणून सर्व भूतांचा सुहृद ह्मणजे आत्मा, व सर्व तपांचा व यज्ञांचा भोक्ता व सर्वांत श्रेष्ठ देव भगवंत आहे, असें जाणून पूर्वश्लोकोक्त यत्नशील मनुष्य शांतीप्रत पावतो.

अशी पंचमाध्यायाची टीका एथवर झाली ती त्याच देवदेवास समर्पण असो.



श्री.

# अध्याय ६ वा.

ॐ नमो भगवते वासुदेवाय.

पंचमाध्यायारंभीं, अर्जुनानें श्रीकृष्णास प्रश्न केला कीं, संन्यास आणि कर्मयोग या दोहोंमधून श्रेयस्कर असेल तें एकच सांगावें. त्या प्रश्नास भगवान् उत्तर देते झाले कीं, मुमुक्षूस दोन्हीही श्रेयस्कर आहेत, पण संन्यासाहून कर्मयोग श्रेष्ठ होय. कारण संन्यासांत कर्मयोगाचीं लक्षणें नाहींत, परंतु कर्मयोग केल्यानें कर्मसंन्यासही साधतो. त्यानंतर इच्छाद्वेषवर्जित व द्वंद्वरहित जो राहूं शकतो, तो संन्यासीच होय असें सांगून, तत्संबंधानें अर्जुनास झालेल्या सर्व शंकांचें निवारणही भगवंतांनीं केलें. त्यापुढें, कर्मयोग केल्यानें ब्रह्मप्राप्ति अति सत्वर होते, व तो योग करणारा पुरुष ज्ञानदृष्ट्या अकर्ताही असतो, असें सांगितलें. यासंबंधानें आपलेंही अकर्तृत्व भगवंतांनीं वर्णन केलें. परंतु इतकें सर्व ऐकूनही, कर्मयोग्यास कर्मींच संन्यास साधतो, हें वर्म अर्जुनास समजावें तसें समजलें नाहीं, ह्मणून भगवान् तेंच पुन्हां षष्ठाध्यायारंभीं सांगतात.

**अनाश्रितः कर्मफलं कार्यं कर्म करोति यः ।**
**स संन्यासी च योगी च न निरग्निर्न चाक्रियः ॥ १ ॥**

**अर्थ.**—कर्मफलाचा आश्रय टाकून, जो विहित कर्मैं करितो, तोच संन्यासी व तोच कर्मयोगी होय. तो निरग्नि नव्हे अथवा आक्रियही नव्हे.

टीका.–कर्मफळाची इच्छा न धरणें यासच कर्मत्याग ह्मणावें. ह्मणून निष्काम कर्म करणारा कर्मयोगी संन्यासीच होय. आश्रम संन्यास नसतांही कर्मयोग्यास संन्यास साधतो, असें भगवंत या श्लोकीं सांगतात. संन्यासाश्रम घेतलेल्या संन्याश्यास अग्निसाध्य कर्म, शास्त्रानें सांगितलें नाहीं; ह्मणून त्यास निरग्निसंन्यास असें ह्मणावें. मनांत कोणतेंही प्रकारचा काम नसेल, तर असा निरग्निसंन्यास श्रेष्ठ आहे, हें कोणीही नाकबूल करणार नाहीं. परंतु काम्यत्यागाशिवाय नुसता आश्रम केवळ सोंगच आहे. कारण तो ना धड संन्यासी ना कर्मयोगी. अशा प्रकारचा ढोंगी संन्यासी हा कर्मयोगी नव्हे, असें " **न निरग्निः** " या पदेंकरून भगवान् सुचवितात व तो " **अक्रिय** " ही नव्हे, असेंही भगवान् ह्मणतात. आतां " **अक्रिय** " याचे अर्थाकडे वळूं. ज्यानें काम्यत्याग करून संन्यासाश्रम घेतला, त्यास शास्त्रानें नित्य विहितकर्मे करण्याची माफी दिली आहे, ह्मणजे तीं न केल्यानें त्यास प्रत्यवायदोष लागत नाहीं. पण काम्य टाकूनही गृहस्थाश्रमी मनुष्यानें विहितकर्म केलें नाहीं, तर त्यास दोष आहेच. काम्यत्यागरूप संन्यासामुळें तो त्याचा दोष परिहरिला जात नाहीं. असा गृहस्थाश्रमी अक्रियही तो कर्मयोगी नव्हे, असें " **न चाक्रियः** " या पदेंकरून भगवान् सुचवितात, कारण असा अक्रिय, संन्यासीही नव्हे व कर्मयोगीही होत नाहीं.

यावरून सिद्ध होतें कीं, काम्य टाकून निष्काम नित्यविहित कर्मे करील तोच संन्यासी व कर्मयोगी होय.

कर्मयोग व संन्यास हे दोन वेगवेगळाले मार्ग असून एकाच वेळेस कसे करितां येतील, अशी शंका अर्जुनास आतां उत्पन्न झाली, तिचें निरसन भगवान् करितात.

**यं संन्यासमिति प्राहुर्योगं तं विद्धि पाण्डव ।**
**न ह्यसंन्यस्तसंकल्पो योगी भवति कश्चन ॥ २ ॥**

**अर्थ.**—हे अर्जुना, ज्याला संन्यास ह्मणतात तो योगच होय, कारण ज्यानें आपल्या संकल्पाचा त्याग केला नाहीं, तो योगी होऊं शकत नाहीं.

**टीका.**—जोंपर्यंत मनांत कामना असते तोंपर्यंत फळांचे संकल्प नाहींसे होत नाहींत. तसे संकल्प होत असतील, तर तो कर्मयोगी नव्हे. काम्यत्यागानेंच फलसंकल्पांचा त्याग होतो. असा काम्यत्यागरूप संन्यास असून, निःसंग नित्यकर्म केल्यानें कर्मयोग सिद्ध होतो. अन्न-निष्पत्तीविण भोजन होत नाहीं, तसें काम्यत्यागावांचून निष्कामकर्म घडत नाहीं; आणि भोजनाची अपेक्षा झाल्यावांचून अन्ननिष्पत्ति होत नाहीं, तसें निष्काम कर्मयोग करण्याची इच्छा असल्यावांचून काम्य-त्याग घडत नाहीं. ह्मणूनच काम्यत्याग करूनही निष्काम विहित कर्म न करणारा अक्रिय, मागील श्लोकीं भगवंतांनीं निंदिला. अन्न तयार करून भोजन न करणारा अभागी, तो होय. एवंच काम्यत्याग-संन्यास व कर्मयोग भिन्न दिसतात, तरी एकमेकावांचून ते घडूं शकत नाहींत, ह्मणून ते दोन्हीही एकच होत, हें सिद्ध झालें. आतां हा कर्मयोग कोठपर्यंत करावा लागतो, हें भगवान् उत्तर श्लोकानें सांगतात.

**आरुरुक्षोर्मुनेर्योगं कर्म कारणमुच्यते ।**
**योगारूढस्य तस्यैव शमः कारणमुच्यते ॥ ३ ॥**

**अर्थ.**—योग प्राप्त करून घेऊं इच्छिणाऱ्या मननशील पुरुषास कर्म साधनीभूत आहे, असें ह्मणतात. आणि योगारूढ झाल्यावर ज्ञान परि-पक्व होण्यास शम ह्मणजे चित्ताचें समाधान, हें साधन होय. असें ह्मणतात.

**टीका.**—योगारूढ झाला नाहीं त्यास "आरुरुक्षु" असें ह्मण-तात. असा आरुरुक्षु गुरुमुखानें श्रवण करून, जो मननाकडे लागला आहे, त्याला कर्मच केलें पाहिजे. तें केल्यानें चित्त शुद्ध होऊन, तो योगारूढ

होतो. गुरुमुखें श्रवण घडतांच चित्तास विषयासक्ति असूनही जो कर्म टाकतो, तो शब्दज्ञानी बनतो व ज्ञानाभिमानी होतो. याकरितां कर्म केलेंच पाहिजे. जडचैतन्यविवेकानें आत्मतत्व कळलें, तरी चित्त तद्रूप होण्याकरितां, निष्काम कर्मयोग करणें अगदीं आवश्यक आहे. निष्काम कर्म करण्याची पक्की संवय लागली ह्मणजे तो योगारूढ झाला, असें समजावें. योगारूढ झाल्याचें चिन्ह हेंच कीं, शम ह्मणजे चित्ताचें समाधान राहूं लागलें पाहिजे. यासच समाधि ह्मणतात. ही समाधि चित्तचैतन्यसंयोगावांचून होत नाहीं. जड वृत्तींचा वियोग झाला ह्मणजे चित्तचैतन्यसंयोग आयताच आहे. जडवृत्ति कामामुळें उत्पन्न होतात. निष्काम चित्त झालें ह्मणजे अर्थात् जडवृत्ति उत्पन्न होत नाहींत. एवढ्याकरितां चित्ताचें समाधान राहीपर्यंत कर्मयोग केलाच पाहिजे. तदनंतर असें समाधान नेहमीं कायम ठेवण्याचा यत्न केला पाहिजे. असा यत्न केल्यानें समाधि बाणते व ती बाणली ह्मणजे, त्या स्थितीस **जीवन्मुक्ति** ह्मणतात. या समाधि दोन प्रकारच्या आहेत. पहिली **निर्विकल्प** ह्मणजे व्यतिरेक व दुसरी **सविकल्प** ह्मणजे अन्वयसमाधि होय. यांचें स्पष्टीकरण यापूर्वी केलेंच आहे.

आतां योगी योगारूढ झाला असें केव्हां समजावें हें भगवान् सांगतात.

**यदा हि नेंद्रियार्थेषु न कर्मस्वनुषज्जते ।**
**सर्वसंकल्पसंन्यासी योगारूढस्तदोच्यते ॥ ४ ॥**

**अर्थ.**—जेव्हां इंद्रियांचे अर्थ ह्मणजे विषय, आणि तत्प्रीत्यर्थ कर्म करणें, या दोहोंचेही ठायीं त्याची आसक्ति न राहिल्यामुळें सर्व संकल्पाचा तो त्याग करितो, तेव्हां तो योगी योगारूढ झाला, असें समजावें.

**टीका.**—विषय आणि तत्प्रीत्यर्थ खटपट, या दोहोंचीही आसक्ति टाकली, तरी, मन सूक्ष्म वासनेमुळें त्यांचें चिंतन

ह्मणून सर्व संकल्प नाहींसे होईपर्यंत योगारूढ झाला, असें ह्मणवत नाहीं. असा योगारूढ झाल्यावरही पुन्हां तेथून घसरण्याची भीति असते. ह्मणून शम ह्मणजे समाधीचा अभ्यास केला पाहिजे, व ती यत्नांवांचून राहूं लागली, ह्मणजे तो पक्का ज्ञानी बनला. मातीच्या घागरींत पाणी घातलें तर थोडा काळपर्यंत पाणी राहील, पण हळू हळू तें झिरपून जाऊन, घागर रिकामी होते. तीच घागर भाजून पक्की झाली, ह्मणजे तींतील पाणी न झिरपतां कायम राहतें. तद्वत् तावून तपावून ज्ञानी पक्का झाला ह्मणजे त्याचें ज्ञान नाहींसें होण्याची भीति राहत नाहीं. तरीही त्याला नेहमीं जपून असलेंच पाहिजे. उंच देवळाच्या कळसावर जाऊन बसलेला मनुष्य झोंप घेऊं ह्मणेल तर चालत नाहीं. अस्तु; संकल्पविकल्प हे सर्व मनाचे खेळ आहेत, ह्मणून ते आवरले पाहिजेत, असें आतां भगवान् सांगतात.

उद्धरेदात्मनात्मानं नात्मानमवसादयेत् ।
आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मनः ॥ ५ ॥

**अर्थ.**—आपल्या बुद्धीनें आपल्या मनास आपण उद्धारिलें पाहिजे, अधोगतीस जाऊं देऊं नये. मनच आपला मित्र होय व मनच आपला शत्रु होय.

**टीका.**—मन बुद्धीचे आधीन आहे, ह्मणून मनास बुद्धीनेंच आवरलें पाहिजे. ती बुद्धि विवेकारूढ नसली, ह्मणजे मन मूर्ख बनून विषयकामना धरितें, व वासनाकूपांत जाऊन पडतें. असें जरी वासनाकूपांत तें जाऊन पडलें, तरी त्याची दोरी बुद्धीच्या हातांत असते. आपणास सुख असावें, असा बुद्धीचा सहज स्वभाव आहे. येथें आपण ह्मणजे सुखदुःख भोगणारा चिदंश जीव समजावा. ज्या गोष्टींत सुख वाटतें, त्यांतच बुद्धि मनास घालिते; व ज्यांत दुःख आहे, त्यांतून मनास बाहेर काढिते. विषयांतच सुख आहे, असें जोंपर्यंत बुद्धीस वाटतें, तोंच-

पर्यंत बुद्धि मनास वासनाप्रवाहीं घालिते. पण सत्संग मिळून विषय तितका दुःखरूप व सुख फक्त परमार्थांत आहे असें समजल्यावर, बुद्धि मनास विषयांकडून काढून ब्रह्मचिंतनाकडे लाविते. ब्रह्मानुभवाविना विषयवासना जात नाहीं तथापि बुद्धि मनास विषयांत पडूं देत नाहीं. क्षुधार्ताचे समोर मिष्टान्न आलें, म्हणजे त्याचें मन लाळ घेटूं लागतें. परंतु त्यांत विष आहे, असें समजल्याबरोबर बुद्धि तें त्यास खाऊं देत नाहीं. तद्वत् विषयसंगें नरक व गर्भवास प्राप्त होतो. असें समजल्यावर, बुद्धि विषयांचा हव्यास धरित नाहीं; परमार्थाची आवड धरिते. म्हणून बुद्धीकरून मन उद्धरावें, असें भगवान् श्लोकाचे प्रथमचरणीं सांगतात, व दुसरे चरणीं म्हणतात कीं, तें दुःखसागरांत बुडूं देऊं नये. उत्तरार्थ स्पष्टच आहे.

**बंधुरात्मात्मनस्तस्य येनात्मैवात्मना जितः ।**
**अनात्मनस्तु शत्रुत्वे वर्तेतात्मैव शत्रुवत् ॥ ६ ॥**

**अर्थ व टीका.**–ज्यानें आपल्या बुद्धीनें मन जिंकिलें, तें मन त्याचा मित्र होतें, म्हणजे ज्या बुद्धीस आत्मा कळतो ती आत्मयोगीं वळतें. मग तिनें मनास आवरलें, म्हणजे तें विषयवासनेनें खवळत नाहीं. परंतु ज्यास आत्मा कळला नाहीं, त्याचें मन त्यास आपला महिमा शत्रुत्वें कसा दाखवितें हें सर्वांस माहीत आहेच. आतां, तें मन मित्रत्वें कसें वर्ततें, हें पुढील श्लोकानें भगवान् सांगतात.

**जितात्मनः प्रशांतस्य परमात्मा समाहितः ।**
**शीतोष्णसुखदुःखेषु तथा मानापमानयोः ॥ ७ ॥**

**अर्थ व टीका.**–ज्याचें मन स्ववश झालें आहे व जो अत्यंत शांत असतो, तो शीत आणि उष्ण, तसेंच मान आणि अपमान भोगीत असतां, आत्मस्वरूपीं स्थिर राहतो; कामक्रोधरहित जो असतो, तो शांत

असतो, व ज्याची बुद्धि विवेकारूढ झालेली असते, तो बुद्धिबळानें मनास आवरतो, व त्यास विषयचिंतन करूं देत नाहीं; ह्मणजे बुद्धिसहित तें मन आत्मस्वरूपीं लीन राहतें.

**ज्ञानविज्ञानतृप्तात्मा कूटस्थो विजितेंद्रियः ।**
**युक्त इत्युच्यते योगी समलोष्टाश्मकांचनः ॥ ८ ॥**

**अर्थ.**–ज्याची बुद्धि ज्ञानानें आणि विज्ञानानें तृप्त झाली आहे, जो निर्विकार असतो, व ज्यानें आपलीं इंद्रियें जिंकिलीं आहेत, अशा पुरुषास "**योगयुक्त**" असें ह्मणावें. अशा योग्यास मातीचें ढेंकूळ, दगड, आणि सोनें सारखींच असतात.

**टीका.**–व्यतिरेकबोध ह्मणजे ज्ञान व अन्वयबोध ह्मणजे विज्ञान. या दोन्ही समाधि ज्यास बाणल्या आहेत त्याचीच बुद्धि अन्यचिंतन न करितां, आत्मस्वरूपीं तृप्त राहील. तेव्हां त्याचे वासनेचा बीमोड झाला असें समजावें. व्यतिरेकज्ञानीं ज्याची बुद्धि तृप्त असते, व विज्ञानीं स्थिर राहते, त्यास **कूटस्थ** असें ह्मणतात. कूटस्थ याचा येथें निर्विकार असा अर्थ आहे. इंद्रियें रज आणि विषय तम, यांचे संगतीनें बुद्धीस विकार होतो. तीच शुद्धसत्व स्वरूपाकार झाली ह्मणजे निर्विकार होते, असें "**विजितेंद्रियः**" या पदानें सुचविलें आहे. ज्ञानविज्ञानतृप्त, आणि कूटस्थ हीं दोन लक्षणें गुप्त असतात, तीं ज्याचीं त्यासच ठाऊक असतात. परंतु तिसरें लक्षण जितेंद्रियत्व मात्र दुसऱ्यास दिसून पडतें. तेवढ्यावरून त्यास योगयुक्त ह्मणावें तर, कित्येक ढोंगी लोकही जितेंद्रियत्व दाखवितात, व योगीही प्रारब्धभोगीं, इंद्रियें विषयीं वर्तवितांना दिसतो; ह्मणून खरा योगी निवडून काढण्याची खूण चतुर्थ चरणानें "**समलोष्टाश्मकांचनः**" असें बोलून भगवान् दाखवितात.

व्यतिरेक आणि अन्वय या दोन्हींपैकीं कोणतीही एक समाधि बाणली तरी, तो योगारूढ नव्हे काय? व दोन्हींतून एक जरी बाणली

तरी, योगारूढ होत असेल, तर अशा दोन प्रकारच्या योग्यांत श्रेष्ठ कोण, असा प्रश्न करण्याचें अर्जुनाचे मनांत आलें. तें जाणून देव पुढील श्लोक बोलतात.

**सुहृन्मित्रार्युदासीनमध्यस्थद्वेष्यबंधुषु ।**

**साधुष्वपि च पापेषु समबुद्धिर्विशिष्यते ॥ ९ ॥**

**अर्थ.**–सुहृद्, मित्र, शत्रु, उदासीन, मध्यस्थ, द्वेष्य, सोयरे, साधु व पापी या सर्वांचे ठायीं ज्याची समबुद्धि असते, तो श्रेष्ठ होय.

**टीका.**–व्यतिरेकानें चित्तवृत्तिनिरोध करून निर्गुणसमाधि साधली, तरी या विचित्र सृष्टींतील द्वैतभावना जात नाहीं, ह्मणून ज्यास अन्वयसमाधि बाणली आहे, असा योगी त्याहून श्रेष्ठ आहे, असा या श्लोकांतील भाव आहे.

ज्याचें हृदय आपले ठायीं स्वभावतःच चांगलें असतें, त्यास सुहृद् ह्मणावें; जसें मायबाप वगैरे. स्नेहबुद्धीनें हित करणाऱ्यास मित्र ह्मणावें. सर्वदा वाईट करण्यास तयार असतो तो वैरी होय. जो मित्रही नाहीं आणि वैरीही नाहीं, त्यास उदासीन ह्मणावें. आपला व आपले वैऱ्याचा मित्र असतो, त्यास मध्यस्थ ह्मणावें. आपला घात करण्यास तयार असतो, त्यास द्वेष्य ह्मणावें. बंधु ह्मणजे सोयरे. साधु ह्मणजे सन्मार्गरत पुरुष. ज्याची बुद्धि नेहमीं कुकर्मीं रत असते त्यास पापी ह्मणावें. अशा सर्व विषम स्वभावाचे मनुष्यांचे ठिकाणीं ज्याची बुद्धि सम असते, तोच अन्वयसमाधिनिष्ठ समजावा; व तो व्यतिरेकसमाधिनिष्ठापेक्षां श्रेष्ठ होय. चित्तचैतन्ययोग बाणण्याकरितां अष्टांग योग कसा करावा हें भगवान् आतां सांगतात.

**योगी युंजीत सततमात्मानं रहसि स्थितः ।**

**एकाकी यतचित्तात्मा निराशीरपरिग्रहः ॥ १० ॥**

**अर्थ.**—योग्यानें एकांत स्थळीं एकटें बसून, चित्त आणि देह यांचा संयम करून, सर्व प्रकारच्या इच्छा व गुंता टाकून, मनास योगीं योजावें.

**टीका.**—या श्लोकानें अष्टांगांपैकीं यमनियम सुचविले आहेत. यम ह्मणजे मुख्यत्वें इंद्रियांचें आवरणें हें होय. इंद्रियें आवरल्याशिवाय चित्ताचा संयम होत नाहीं, हें यापूर्वींच सांगितलें आहे. एकांतवास आणि एकटें असणें, हा नियम होय. नुसत्या यमनियमानें कार्य होत नाहीं. कारण धनदारादिकांचा आशापाश असला, तर चित्त स्थिर रहावयाचें नाहीं, ह्मणून "**निराशीरपरिग्रहः**" असलें पाहिजे, असें भगवान् ह्मणतात. आतां आसन कसें असावें तें सांगतात.

**शुचौ देशे प्रतिष्ठाप्य स्थिरमासनमात्मनः ।**
**नात्युच्छ्रितं नातिनीचं चैलाजिनकुशोत्तरम् ॥ ११ ॥**

**अर्थ.**—स्वच्छ स्थानीं आपलें स्थिर आसन मांडावें. तें फार उंच नसावें व फार नीचही नसावें. प्रथम दर्भ, दर्भावर व्याघ्रचर्म किंवा मृगचर्म व चर्मावर वस्त्र घालून आसन तयार करावें.

**तत्रैकाग्रं मनः कृत्वा यतचित्तेंद्रियक्रियः ।**
**उपविश्यासने युंज्याद्योगमात्मविशुद्धये ॥ १२ ॥**

**अर्थ.**—अशा आसनावर बसून एकाग्र मन करावें, व चित्त आणि इंद्रियें यांच्या क्रियांचें नियमन करून बुद्धीच्या शुद्ध्यर्थ योगाचा अभ्यास करावा.

**टीका.**—मनाची एकाग्रता करावी असें ह्मणून प्राणायाम सुचविला आहे. प्राणायामाच्या आवृत्ति केल्या ह्मणजे चित्तसंयम होतो व मनाचे संकल्प बंद पडतात. असें असून, पुनः चित्त आणि इंद्रियांच्या वृत्ति आवरून योग योजावा, असें भगवान् ह्मणतात, तो योग

कोणता? कर्मयोग ह्मणावा, तर त्यास स्त्री, ऋत्विजादिकांचा संग लागतो. पण येथें " अपरिग्रहः " असें ह्मटलें आहे, यावरून तो कर्मयोग नव्हे. हठयोग ह्मणावा, तर त्यानें वासनाभंग होत नाहीं, कारण देह अजरामर व्हावा, याकरितां हठयोग करितात. स्त्रीपुत्रादिकांचा पाश हठयोगी ठेवीत नाहींत, तरी स्वतःचे देहाचा पाश त्यांस असतो. ह्मणून हठयोगही येथें लागूं पडत नाहीं. बुद्धीचे शुद्धीकारितां योग योजावा, असें श्रीकृष्ण ह्मणतात. तेव्हां योगशब्दानें भगवंताचे सगुण मूर्तीचें ध्यान करावें असें स्पष्ट दिसतें. आत्मस्वरूपाचा योग करावा, असें कोणी ह्मणतील, तर तें बोलणें मुळींच साजत नाहीं. कारण शुद्धबुद्धि झाल्यावर आत्मा स्फुरतो व येथें तर बुद्धीच्या शुद्धीकरितां योग योजावा असें भगवान् ह्मणतात. तेव्हां आत्मस्वरूपाचा योग सांगितला नाहीं, हें उघड दिसतें. एवंच, योगशब्दें सगुणध्यान असाच अर्थ करणें योग्य होय. अशुद्ध बुद्धीस योग मुळींच घडत नाहीं व एथें तर भगवान् योग करण्यास सांगतात, तेव्हां ही दुसरी शुद्धि कोठून आणिली, असें कोणी ह्मणतील, तर त्यास उत्तर असें कीं, तांदूळ धुवून अति निर्मळ करावे लागतात, तद्वत् कर्मयोगें शुद्ध झालेले बुद्धीस आत्मानात्मविचार गुरुमुखानें ऐकून कळूं लागतो; पण ती योगारूढ होण्याकारितां तिला अति शुद्ध करावी, अशा हेतूनें सगुणध्यान सांगितलें आहे. चित्तवृत्तींचा निरोध अथवा सर्वात्मबोध बाणेपर्यंत जो अभ्यास करावा लागतो, त्याचा शोध केला असतां धारणेचें रूप समजेल. सत्ववृत्तींत आत्मा स्फुरून ती वृत्तिही त्या स्वरूपातें स्फुरूं लागली व तिच्यांत जडानें बिलकुल स्फुरण नसलें, ह्मणजे तिला धारणा ह्मणावी. अशी धारणा निश्चळ झाली, ह्मणजे तीच समाधि बनते. एवंच, आसनीं बसून योग योजावा ह्मणून या श्लोकांत सांगितलें आहे, तो सगुणध्यानयोग होय. ध्यान सगुणाचें व धारणा निर्गुणाची असते. याप्रमाणें सगुणध्यान साध्य झालें, तरी त्यांत द्वैत असतेंच. कारण मूर्तींत निरानिराळे अवयव

असतात. ह्मणून निर्गुणधारणा धरणें आवश्यक आहे. ही निर्गुण-धारणा धरणें एकाएकी साधत नाहीं, ह्मणून मूर्तीचे ध्यानांत निरनिराळ्या अवयवांचें ध्यान करावें लागतें तें टाकून एकाच वस्तूकडे लक्ष लावण्याचा अभ्यास केला पाहिजे. तो पुढील श्लोकांत भगवान् सांगतात. त्याप्रमाणें स्वनासाग्रनिरीक्षण करून, चित्त एके ठिकाणीं थारूं लागलें, ह्मणजे निर्गुणधारणा सहज धरितां येते. ती धारणा कशी धरावी, हें त्याही पुढील श्लोकांत सांगितलें आहे.

**समं कायशिरोग्रीवं धारयन्नचलं स्थिरः ।**
**संप्रेक्ष्य नासिकाग्रं स्वं दिशश्चानवलोकयन् ॥ १३ ॥**

**अर्थ.**–देह, मस्तक, आणि मान नीट आणि निश्चल ठेवून दिशांकडे न पाहतां, आपले नाकाचे शेंड्यावर दृष्टि ठेवावी.

**टीका.**–असा अभ्यास केल्यानें मनाचा संयम होतो. व तो झाला ह्मणजे निर्गुणस्वरूपधारणा धरावयाची. ती कशी धरावी, हें भगवान् यापुढील श्लोकानें सांगतात.

**प्रशांतात्मा विगतभीर्ब्रह्मचारिव्रते स्थितः ।**
**मनः संयम्य मच्चित्तो युक्त आसीत मत्परः ॥ १४ ॥**

**अर्थ.**–ज्याची बुद्धि शांतीप्रत पावली आहे, ज्याचें भय गेलें आहे, व योगसाधनाला लागणारे नियम ज्यानें पाळले आहेत असा साधक, मन आवरून मत्पर होऊन माझें स्मरण करित होत्साता, स्वरूपीं स्थिर होतो.

**टीका**–'पूर्वोक्त रीतीनें मनाचा संयम करून "**मत्पर**" ह्मणजे मीच मोक्षदाता असा निश्चय धरून "**मच्चित्त**" व्हावें, ह्मणजे माझें स्मरण चालूं ठेवावें; तेणेंकरून असा भक्त स्वरूपीं स्थिर होईल' ह्मणून भगवान् सांगतात. "**प्रशांतात्मा**" ह्मणजे पूर्वोक्त रीतीनें सगुण-

ध्यान करून ज्याची बुद्धि शांतीप्रत पावली आहे तो होय. " विगतभीः " ह्मणजे भगवंतावर अवलंबून राहिल्यामुळें योगास येणारे विघ्नांची ज्यास भीति राहिली नाहीं असा भक्त होय. आणि " ब्रह्मचारिव्रते स्थितः " याचा अर्थ असा कीं, योगास अनुकूल तेवढें ग्रहण करून प्रतिकूल तेवढें सर्व ज्यानें टाकलें आहे तो होय.

या श्लोकीं धारणा सांगितली तीच कायम राहिली तर तिला समाधि ह्मणतात. लय आणि विक्षेप यांचे योगानें सामाधिभंग होतो. लय ह्मणजे निद्रा व विक्षेप ह्मणजे कल्पना. निद्रालस्यांचे परिहाराकारणें युक्ताहारविहारादि नियम पुढें सांगणार आहेत. विक्षेपास उपाय प्रत्याहार. हाही अष्टांगयोगाचें एक अंग होय. पूर्वजन्मीं पुष्कळ साधनें ज्यास घडलीं आहेत, अशा योगभ्रष्टास विनाकष्ट योग बाणतो, व जो आत्मज्ञ असून सगुणभक्त असतो, तोही विक्षेपापासून अनायासें मुक्त राहतो. सगुणभक्तास प्रत्याहाराची खटपट नको ह्मणून तो येथें सांगितला नाहीं. पुढें याच अध्यायीं योगभ्रष्टाचे प्रकरणांत प्रत्यहाराचें वर्णन होईल.

**युञ्जन्नेवं सदात्मानं योगी नियतमानसः ।**
**शांतिं निर्वाणपरमां मत्संस्थामधिगच्छति ॥ १५ ॥**

**अर्थ.**—याप्रमाणें जो योगी आपलें चित्त सर्वकाल योजून मन आवरून धरितो, तो, ज्या शांतीस " **निर्वाण** " ह्मणतात, अशी मज आधीन असलेली उत्कृष्ट शांति पावतो.

**टीका.**—निर्वाण ह्मणजे कैवल्य. या कैवल्य शब्दानें निर्गुण निर्धर्म ब्रह्मप्राप्ति सुचविली आहे. या स्थितींत सर्व प्रकारच्या ऊर्मी नष्ट होऊन **मी** आणि तूं हा भेद मुळींच स्फुरत नाहीं. असा अनुभव ज्यास बाणला, त्यास सहजशांतिवैभव प्राप्त होतें. त्यालाच **जीवन्मुक्त** असें ह्मणतात.

पूर्व श्लोकीं लयामुळें समाधिभंग होतो तो न होण्याचें साधन भगवान् यापुढें सांगतात.

**नात्यश्नस्तु योगोऽस्ति न चैकांतमनश्नतः ।**
**न चातिस्वप्नशीलस्य जाग्रतो नैव चार्जुन ॥ १६ ॥**

**युक्ताहारविहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु ।**
**युक्तस्वप्नावबोधस्य योगो भवति दुःखहा ॥ १७ ॥**

**अर्थ.**–जो फार खातो किंवा मुळींच खात नाहीं, आणि जो फार झोंप घेतो किंवा मुळींच घेत नाहीं, त्याचे हातून योग होणें नाहीं. जो योग्य आहारविहार करितो, जो योग्य रीतीनें कर्म करितो, व ज्याचीं निद्राजागरण परिमित असतात, त्याचा योग दुःखनाशक होतो.

**टीका.**–पोटाचे कोणतेही भागीं बोट रुतत नाहीं, असा अति भोजनानें जो तुडुंब फुगतो, तो पोटावर हात फिरवून फिरवून वारंवार ढेंकर देण्याच्या खटपटींत राहतो. त्याचें चित्त स्वरूपाकडे कसें लागावें बरें ? साप उंदीर खाऊन जसा जड होतो, तशी त्याची स्थिति होते. जो मुळींच खात नाहीं त्याचे पोटांत अग्नीचा भडका चाललला असतो. त्या बिचाऱ्यास एकांत कोठून रुचणार? सर्व लक्ष जेवणाकडे असणार. एथें " **योग** " आणि " **एकांत** " शब्दें-करून व्यतिरेक आणि अन्वय या दोन्ही योगांची सूचना केली आहे. एका सुवर्णीं नाना अलंकारांचा अंत दिसतो, तसा एका चित्स्वरूपीं नाना जडांचा अंत दिसतो त्यास **एकांत** ह्मणावें. हा विलास व्यतिरेक योगीं नसतो. त्यांत एकांत असून त्याचा अनुभव नसतो, ह्मणून " **योग** " आणि " **एकांत** " या दोन शब्दांनीं दोन्ही योग एथें दर्शविले आहेत. पुष्कळ चेष्टा करणाऱ्यासही योग होत नाहीं, कारण त्याचें लक्ष तिकडेच वाहवतें. जो अतिशय झोंप घेतो व अतिशय

जागतो, ते दोघेही जड होतात. ह्मणून या सर्वांस योग दुःसाध्य होतो, असें भगवान् सांगतात.

आतां युक्त आहार ह्मणजे काय याचा विचार करूं. योगास अनकूळ असा, ज्याचा जितका आहार असेल, त्यास **युक्ताहार** ह्मणावें-याची यत्ता नेमून सांगतां येणार नाहीं. जेणेंकरून योगीं उल्हासानें चित्त स्थिर राहील, इतका आहार केला ह्मणजे तो युक्त समजावा. याचा विचार ज्याचा त्यानें केला पाहिजे. ज्या देशीं जो आहार पचेल व जो आपल्यास खाण्याची संवय असेल तो सेवन करावा. अन्न टाकून निंबाचे पानांचा गोळा करून कोणी खाईल, तर हगवण लागेल यात शंका नाहीं. शरीर पर्णाहार सोशील, तर अन्न खाण्याची कोणीही जरूर ठेवूं नये. एवंच, आपले शरिरास अनुकूळ असें अन्न योग्य प्रमाणानें खावें. विहारही याचप्रमाणें युक्त पाहिजे. फार विहार केल्यानें थकवा येऊन झोंप येऊं लागते. व मुळींच न केला, तर शरिरास जडत्व येऊन तोच प्रकार घडतो. ज्याला फिरणें आवडत नाहीं ह्मणून एके ठिकाणीं बसण्याची संवय असेल, त्यास विहार करण्याची मुळींच जरूर नाहीं. कर्म ह्मणजे विहितकर्म; तेंही बेतानेंच केलें पाहिजे. संध्या मुळींच केली नाहीं, तर गृहस्थाश्रमी लोकांस प्रत्यवाय आहे, ह्मणून ती व जीं इतर कर्में सांगितलीं आहेत तीं बेतानें करावीं. हा नियम गायत्रीचे जपास लागू नाहीं. कारण पुष्कळ जप केल्यानें स्वरूपस्थिति स्फुरूं लागते. जप हा भगवंताची विभूति होय. "**यज्ञानां जपयज्ञोऽस्मि**" असें विभूतियोगांत भगवान् सागणार आहेत. विहित कर्मांत प्रपंचनिर्वाहाचे कर्माचाही समावेश होतो. तहीं नियत असलें पाहिजे. केवळ निर्वाहापुरताच उद्योग केला पाहिजे. याचप्रमाणें निद्रा आणि जागरण बेतानेंच ठेविलीं पाहिजेत, ह्मणजे योगी दुःखापासून मुक्त राहतो.

यदा विनियतं चित्तमात्मन्येवावतिष्ठते ।
निस्पृहः सर्वकामेभ्यो युक्त इत्युच्यते तदा ॥ १८ ॥

अर्थ.–जेव्हां उक्त प्रकारें नियत केलेलें चित्त आत्मस्वरूपीं स्थिर होतें व जेव्हां सर्व कामनांपासून पुरुष मुक्त राहतो, तेव्हां त्यास योगी ह्मणावें.

टीका.–वर सांगितल्याप्रमाणें नियमानें वागलें ह्मणजे चित्ताचें नियमन होतें व तें मग आत्मस्वरूपीं थारतें. जोंवर चित्त याप्रमाणें चिन्मय असतें, तोंवरच समाधि राहते. थोडी जरी विस्मृति पडली, तरी समाधिभंग होतो. याचें कारण शोधूं गेलें असतां दिसून येईल कीं, वैराग्य असावें तसें नसलें ह्मणजे समाधिभंग होतो. सृष्टींतील कोणतेही पदार्थाची इच्छा नसली तर त्यांचें चिंतन कधींही होणार नाहीं. मग अर्थातच चित्त स्वरूपीं स्थिर राहील. याच भावानें "निस्पृहः सर्वकामेभ्यः" असा झाल्याखेरीज त्यास योगी ह्मणतां येत नाहीं असें भगवान् ह्मणतात. आत्मस्वरूपापासून मन ढळून दुसरीकडे जाणें, यास विक्षेप ह्मणतात. तो, सर्व कामना टाकून दिली ह्मणजे होत नाहीं. यावरून विक्षेपाचा नाश करण्यास वैराग्यच साधन होय, हें उघड आहे. विक्षेप ह्मणजे जड पदार्थाची कल्पना करणें होय. ही कल्पना स्वप्नांत व जागृतींत असते. विक्षेप आणि लय नसले ह्मणजे ती समाधिच होय, असें यापूर्वीं सांगितलें आहे. यावरून स्पष्ट सिद्ध होतें कीं, ही समाध्यवस्था, जागृति, स्वप्न, आणि सुषुप्ति या तिन्ही अवस्थांहून निराळी चवथी अवस्था आहे; तीस "तुर्या" ह्मणतात. हिचे दोन प्रकार आहेत. एक **शबलतुर्या** व दुसरी **शुद्धतुर्या**. शबलतुर्या ह्मणजे अन्वयसमाधि व **शुद्धतुर्या** ह्मणजे व्यतिरेक निर्गुणसमाधि होय. याप्रमाणें लय आणि विक्षेपपरिहाराचीं साधनें भगवंतांनीं सांगितलीं, व समाधिलक्षणही स्पष्ट केलें. आतां चित्त

चंचळ कां होतें व कोणत्या उपायानें, तें कसें, निश्चळ होतें, हें उपमारूपानें भगवान् स्पष्ट करून दाखवितात.

**यथा दीपो निवातस्थो नेंगते सोपमा स्मृता ।**
**योगिनो यतचित्तस्य युंजतो योगमात्मनः ॥ १९ ॥**

**अर्थ.**–निर्वात ठिकाणीं दिवा हलत नाहीं, तसा योगी आपल्या चित्तवृत्तींचा निरोध करून, त्या चित्तास आत्मसमाधियोगीं योजितो.

**टीका.**–ज्या स्थळीं वारा चंचळ नसतो, त्यास निर्वात स्थळ ह्मणतात. अशा स्थळीं दीप ठेविला असतां तो हलत नाहीं, स्थिर असतो. तद्वत् वासनारूप वारा आत्मस्वरूपीं नसतो. त्या ठिकाणीं चित्तरूप दिवा स्थिर राहतो, असें या दृष्टांतानें दाखविलें आहे. वैराग्यबळानें चित्त आवरून धरिलें, ह्मणजे त्यास वासनासमीर लागत नाहीं. असा अभ्यास करणाऱ्यास समाधि बाणते. हे दोन्ही उपाय अर्जुनास अद्यापि माहित नव्हते, ह्मणून त्यानें पुढें प्रश्न केला आहे. त्याचे उत्तरीं हींच साधनें भगवान् सांगणार आहेत. अस्तु; ज्या आकाशीं वाऱ्यामुळें दिवा सकंप असतो, त्याच आकाशीं वारा नाहींसा झाला ह्मणजे तो स्थिर होतो. त्याप्रमाणें ज्या स्वरूपीं वासनेमुळें चित्त भ्रमत होतें, त्याच स्वरूपीं वासना नाहींशी झाली ह्मणजे तें स्थिर होतें.

या सुखानुभवाचें वर्णन पुढील दोन श्लोकांनीं केलें आहे.

**यत्रोपरमते चित्तं निरुद्धं योगसेवया ।**
**यत्र चैवात्मनात्मानं पश्यन्नात्मनि तुष्यति ॥ २० ॥**
**सुखमात्यंतिकं यत्तद्बुद्धिग्राह्यमतींद्रियम् ।**
**वेत्ति यत्र न चैवायं स्थितश्चलति तत्वतः ॥ २१ ॥**

**अर्थ.**–योगाभ्यासानें चित्तवृत्तींचा निरोध करून चित्त या अव-

स्थेंत शांतीप्रत पावतें. व आत्म्याचे योगानें आत्म्यास पाहून आत्म्याचे ठायींच या अवस्थेंत तें संतुष्ट असतें.

याच अवस्थेंत राहून, जें इंद्रियांस प्राप्त नाहीं, व केवळ बुद्धीनेंच ग्रहण केलें जातें, असें अत्यंत सुख योगी अनुभवितो. व त्या स्वरूपापासून तो कधीं चळत नाहीं.

टीका.—जडवृत्तींचें स्मरण नाहींसें झालें ह्मणजे चित्ताचा निरोध झाला असें समजावें. मग तें चित्त आत्मस्वरूपीं तदाकार होऊन लीन होतें व संतुष्ट राहतें. दोराकरितांच दोरांत भुजंग दिसतो व त्या दोराचे योगानेंच दोर दिसला ह्मणजे भुजंग दिसेनासा होतो. या भावानें भगवान् ह्मणतात कीं, देहादि जड प्रपंच आत्म्याकरितांच भासतो, त्या आत्म्यामुळेंच आत्मा दिसतो व जड प्रपंचाभास नाहींसा होऊन आत्म्याचेच ठिकाणीं चित्त संतुष्ट राहतें व आत्यंतिक ह्मणजे अत्यंत सुख पावतें. अंत अतिक्रमून असतें ते अत्यंत होय; ह्मणजे अनंत असा स्पष्टार्थ होतो. विषयवृत्तींचें सुख अंतवंत असतें. पण आत्मसुख अनंत असतें. ह्मणून आत्मा सुखस्वरूप होय. त्या आत्म्यास विसरल्यानें वासना उत्पन्न होऊन चित्त गडबडूं लागतें; तें वैराग्य आणि अभ्यास यांचे योगानें स्थिर झालें, ह्मणजे त्यास हें अनंत सुख मिळतें. अशा सुखाचा अनुभव झाल्यावर योगी त्या आत्मस्वरूपापासून कधींही ढळत नाहीं. आत्माच विषय होय, व विषयापासून सुख मिळतें तें आत्मसुखच होय. पण विषयभ्रमामुळें ते आत्मस्वरूप न पाहतां, भ्रमजनित अज्ञानदृष्टीनें विषयरूपच पाहिले, ह्मणजे त्यापासून होणारे दुःखाचें आत्मसुखांत मिश्रण होतें. यास उदाहरण दिल्यानें तें स्पष्ट समजेल. फुलाचा हार भ्रमामुळें सर्प आहे असें वाटतें; तरी त्याचा सुगंध लोपत नाहीं, त्याचें सुख होतेंच. पण तो सर्प आहे असें समजल्यानें, भीतीमुळें दुःखही होतें. अशी भ्रांति असेपर्यंत तें सुख दुःखमिश्रित असतें. भ्रांति गेल्याबरोबर दुःख

नाहींसें होऊन सुगंधाचें निवळ सुख मिळतें. तद्वत् विषय आत्मस्वरूप दिसूं लागल्याबरोबर, भ्रमजनित दुःखाचा नाश होऊन, निवळ आत्मसुख मिळतें. विषयांचा आकार डोळ्यानें दिसल्याखेरीज राहणार नाहीं, पण ते आत्मस्वरूप आहेत, असा बुद्धीनें निश्चय केला पाहिजे. असें आत्मसुखामृत मिळाल्यावर विषयकांजीची कोणी इच्छा करील काय? ह्मणून भगवान् ह्मणतात कीं,

**यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः ।**
**यस्मिन् स्थितो न दुःखेन गुरुणापि विचाल्यते ॥ २२ ॥**

**अर्थ.**—हें स्वात्मसुख प्राप्त झाल्यावर त्याहून दुसरा कोणताही लाभ मोठा वाटत नाहीं. या स्थितींत मनुष्य असला, ह्मणजे कितीही मोठें दुःख झालें, तरी तो डगत नाहीं.

आतां, या योगशब्दाची भगवान् व्याख्या करितात.

**तं विद्याद्दुःखसंयोगवियोगं योगसंज्ञितम् ।**
**स निश्चयेन योक्तव्यो योगो निर्विण्णचेतसा ॥ २३ ॥**

**अर्थ.**—दुःखसंयोगाचे वियोगास **योग** ह्मणतात, असें जाणावें अंतःकरण विरक्त करून निश्चयानें याचा अभ्यास करावा.

**टीका.**—चित्ताचा आणि चैतन्याचा योग आयताच आहे, कारण चैतन्यानेंच चित्तास सचेतना आहे. रज्जु असून तो सर्प आहे, असें भ्रमामुळें दिसतें, तेंव्हां दृष्टि रज्जूस धरूनच असते, कारण रज्जूचा आणि दृष्टीचा संयोग झाल्याखेरीज रज्जु अथवा भ्रमजनित सर्पाकार दिसत नाहीं. भ्रमामुळें सर्प दिसतो, तो भ्रम गेल्याबरोबर नाहींसा होतो; कारण तो खोटाच असतो. तद्वत् अंतर्यामीं चित्तचैतन्यसंयोग कायमचा आहे. पण त्यावर आणखी बाहेरून जडदुःखवृत्तींचा संयोग झाल्यामुळें सुख देणारा चित्तचैतन्यसंयोग झाकून

जातो, व संसारदुःख अनुभवास येतें. त्याच जडदुःखवृत्तींच्या संयोगाचा वियोग झाला, ह्मणजे चित्तचैतन्यसंयोग आपोआप उघडा पडून अनुभवास येतो. या जड वृत्तींचा निरोध करण्यासच "**योग**" असें शेषावतार **पतंजलि** ह्मणतो. पांतजलसूत्र– "**योगश्चित्तवृत्तिनिरोधः**". आत्मस्वरूपें चित्त सचेतन होऊन इतर जडांस चेतवितें. ही त्याची पराक्वृत्ति होय. तेंच उलटून आपल्या प्रकाशकाकडे पाहूं लागलें, ह्मणजे त्यास त्याची प्रत्यग्वृत्ति ह्मणतात. एकाच वस्तूवर दृष्टि राहिली, ह्मणजे ती तद्रूप होते, तिला दुसरें कांहीं दिसत नाहीं, हें बहुतेकांचे अनुभवास येतें. त्याप्रमाणें चित्ताची प्रत्यग्वृत्ति होऊन, तें एकट्या आत्म्याकडे पाहूं लागलें, ह्मणजे इतर वस्तूंचें विस्मरण होऊन चित्त तद्रूप बनतें; व आत्मा केवळ सुखस्वरूप आहे, ह्मणून चित्तही तसेंच बनतें. त्या आत्मस्वरूपापासून निघून, रज इंद्रियें व तम विषय याजकडे तें वळलें कीं, दुःखरूप वृत्ति उठूं लागतात. एवंच जडवृत्तिसंयोगच दुःख होय. त्याचा वियोग झाला, ह्मणजे चित्तचैतन्ययोग अनुभवास येतो; त्यासच **योग** ह्मणावें. असा योग प्राप्त करून घेण्याकरितां वैराग्याची जरूर आहे. ह्मणून वैराग्याचा आश्रय करून त्याचा अभ्यास दृढ निश्चयानें करावा, असें भगवान् सांगतात.

अष्टांगयोगाचीं आठ अंगें आहेत. त्यांपैकीं यम, नियम, आसन, प्राणायाम, ध्यान, धारणा आणि समाधि अशीं सात अंगें यापूर्वीं सांगितलीं. आतां राहिललें आठवें अंग "**प्रत्याहार**" भगवान् वर्णन करून सांगतात.

**संकल्पप्रभवान्कामांस्त्यक्त्वा सर्वानशेषतः ।**
**मनसैवेंद्रियग्रामं विनियम्य समंततः ॥ २४ ॥**

**शनैः शनैरुपरमेद् बुद्ध्या धृतिगृहीतया ।**
**आत्मसंस्थं मनः कृत्वा न किंचिदपि चिंतयेत् ॥ २५ ॥**

**अर्थ.**—संकल्पांपासून उत्पन्न होणारे सर्व काम सर्वस्वी टाकून देऊन, मनेंकरून इंद्रियसमुदाय चहूंकडून आवरून धरावा; व बुद्धीनें स्वरूपधारणा धरून हळू हळू उपरमाप्रत पावून, मन आत्मस्वरूपीं स्थिर करावें, व कशाचेंही चिंतन करूं नये.

**टीका.**—मन विषयांचें चिंतन केल्याखेरीज राहत नाहीं, तरी तें बुद्धीनें आवरून आत्मस्वरूपीं लावावें. परंतु त्या बुद्धीसच विषयकामना असली, तर ती मनास कां आवरील? ह्मणून धारणेनें बुद्धीस वश करावें. जो पदार्थ बुद्धीचे ओळखीचा नाहीं, तो तिचे धारणेंत येत नाहीं; ह्मणून त्या बुद्धीस आत्मा गुरुमुखानें कळला पाहिजे. आत्मा कळला, ह्मणजे त्याची धारणा बुद्धीनें धरावी ह्मणजे ती हळू हळू शांतता पावते. मग मन स्वरूपीं योजावें व कांहीं चिंतन करूं नये. इतकेंही करून मन कांहींना कांहीं तरी विषयचिंतन करीलच, ह्मणून भगवान् ह्मणतात कीं,

**यतो यतो निश्चरति मनश्चंचलमस्थिरम् ।**
**ततस्ततो नियम्यैतदात्मन्येव वशं नयेत् ॥ २६ ॥**

**अर्थ.**—अस्थिर आणि चंचल असें मन ज्या ज्या विषयांकडे जाईल त्या त्या विषयांपासून त्यास फिरवून त्याची योजना आत्म्याचे ठायीं करावी.

**टीका.**—आत्मप्रकाशावांचून कल्पना उठत नाहीं, ह्मणून ज्या ज्या विषयांकडे मन धांवेल, तेथेंच त्यास आत्मस्वरूपीं योजावें. असें केल्यानें तें वश होईल व जडवृत्तींचें चिंतन करणार नाहीं, ह्मणजे आत्मसुखाचा लाभ होईल.

**प्रशांतमनसं ह्येनं योगिनं सुखमुत्तमम् ।**
**उपैति शांतरजसं ब्रह्मभूतमकल्मषम् ॥ २७ ॥**

**अर्थ.**—याप्रमाणें ज्या योग्याचें मन शांत झालें आहे त्यास विषयेंद्रियसंयोगरहित व ब्रह्मभूत असें उत्तम सुख मिळतें.

**टीका.**—प्रकर्षेंकरून ज्याचें मन शांत झालें आहे त्यास "**प्रशांतमनस्**" ह्मणावें. अशा योग्यास आंत्यतिक सुख मिळतें. तें सुख दोन लक्षणांनीं या श्लोकीं वर्णिलें आहे. रज ह्मणजे इंद्रियें. इंद्रियगण ज्या सुखीं दिसत नाहीं, अशा सुखास "**शांतरजसुख**" ह्मणावें. इंद्रियें नाहींत तेव्हां अर्थात् विषयही नाहींत, हें उघडच आहे. ह्मणजे विषयेंद्रियवृत्तिवियोगानें जें सुख मिळतें, तेंच "**शांतरजसुख**" होय. दुसरें लक्षण "**ब्रह्मभूतमकल्मषं**" हें होय. "**अकल्मषं**" ह्मणजे ज्या सुखीं जडवृत्तिरूपें दुःखकल्मष नाहीं तें "**ब्रह्मभूतं**" ह्मणजे निवळ सत्ववृत्तीचें सुख होय. ज्या ठिकाणीं रजतमांचा स्पर्श नाहीं, ती सत्ववृत्ति ब्रह्ममयच होते. ह्मणून त्या सुखास "**ब्रह्मभूतं**" असें विशेषण दिलें आहे.

**युंजन्नेवं सदात्मानं योगी विगतकल्मषः ।**
**सुखेन ब्रह्मसंस्पर्शमत्यंतं सुखमश्नुते ॥ २८ ॥**

**अर्थ.**—असा योगी वासनारहित होऊन, आपलें मन सर्वदा योगाचें ठायीं योजितो, व ब्रह्मस्पर्शजनित आत्यंतिक सुख अनायासें अनुभवितो.

**टीका.**—सकळ पातकांचें बीज वासना होय. ती नाहींशी झाली ह्मणजे अनायासें मन स्वरूपीं स्थिर होतें, वृत्तिनिरोध करण्याची त्यास खटपट करावी लागत नाहीं. असा हा **निर्विकल्पयोग** येथपर्यंत भगवंतांनीं वर्णन केला. योगाचे व्यतिरेक आणि अन्वय असे दोन प्रकार आहेत. आधीं उदक ओळखून, मग सर्व तरंगांत तें लक्षिलें पाहिजे.

त्याप्रमाणें आधीं व्यतिरेकज्ञानानें निवळ आत्मस्वरूप ओळखून, नंतर तें चराचरीं पाहिलें पाहिजे. ह्मणून हा व्यतिरेकसमाधियोग प्रथम येथपर्यंत सांगून, आतां यापुढें अन्वयसमाधियोग भगवान् सांगणार आहेत. अन्वयसमाधियोग बाणल्याखेरीज खरें अद्वैत बाणलें असें कधींही ह्मणतां येणार नाहीं. निर्विकल्पसमाधि असेपर्यंत अद्वैत राहील. पण डोळे उघडल्याबरोबर द्वैत हात जोडून पुढें तयारच असतें. ह्मणून अद्वैत बाणण्यास अन्वययोगाची आवश्यकता आहे. तो पुढील श्लोकानें सांगितला आहे.

**सर्वभूतस्थमात्मानं सर्वभूतानि चात्मनि ।**
**ईक्षते योगयुक्तात्मा सर्वत्र समदर्शनः ॥ २९ ॥**

**अर्थ.**—अन्वययोगीं ज्याची बुद्धि स्थिर झाली आहे, अशा योग्याची सर्वत्र समदृष्टि असते, व तो सर्वभूतीं आत्म्यास व सर्व भूतांना आत्म्याचे ठायीं पाहतो.

**टीका.**—श्लोकार्थ इतकाच आहे; पण यांत फार गहन भाव आहे. विषम सृष्टींत समब्रह्म पाहणें, हें केवळ युक्तिगम्य आहे. हे शब्द बोलतांना द्वैत दिसतें, पण त्यांचे अंतर्भागीं अद्वैतच आहे. तसेंच जग द्वैतरूपी दिसतें, तथापि तें सर्व अद्वैतरूप आहे. पातळ व थिजलेलें तूप दृष्टीस निराळेंसें वाटतें, तथापि जिभेस एकच वाटतें. आत्मा सर्वभूतीं आहे, असें ह्मणतां, आत्मा आणि भूतें भिन्न दिसतात. त्याचप्रमाणें सर्व भूतें आत्म्यांत आहेत, असें ह्मणतां द्वैत दिसतें. ह्मणून सर्व घटीं आकाश व आकाशांत सर्व घट, या दृष्टांतानें घट आणि आकाश या दोहोंस ऐक्य घडत नाहीं. एवढ्याकरितां हा दृष्टांत अयुक्त आहे. योग्य दृष्टांत असा कीं, जळ, तरगांत असतें. त्याप्रमाणें आत्मा चराचरीं आहे. जळांत जशा लहरी असतात, तद्वत् आत्म्यांत चराचर राहतात. प्रलय जळांत गारा सांपडतात, तेव्हां त्या गारा त्या पाण्याहून विलक्षण असतात; तरी त्या

गाराही उदकच असतात. उदकाच्या गारा होऊनही तें उदक विकार पावत नाहीं. तसा चराचरांचा सर्व पसारा निर्गुणब्रह्मच आहे, पण तें, चराचर होऊनही विकार पावत नाहीं. प्रलयजलास अंत नसतो. त्या जळांत गाराही अनंत असतात. तेव्हां सर्व गारांमध्यें जें जळ असतें, त्याच जळांत त्या गारा असतात. या न्यायानें चराचरीं आत्मा व आत्म्यांत चराचर पाहणें, यास अन्वययोग ह्मणतात. हा अभ्यासानें बाणला ह्मणजे द्वैत बियाकरितां देखील राहत नाहीं. अशा योगाचें लक्षण श्लोकाचें उत्तरार्धांत सांगितलें आहे.

उत्तरार्ध.- "**ईक्षते योगयुक्तात्मा सर्वत्र समदर्शनः**" अशा योगीं ज्याचें चित्त युक्त आहे, त्यास "**योगयुक्तात्मा**" असें ह्मणावें. येथें "**योग**" शब्दें आत्मा आणि भूतांचा संयोग असें जाणावें. त्या योगीं दृष्टि पडली, ह्मणजे तरंगांत जल व जलांत तरंग दिसतात. पण वास्तविक दोन्ही जलरूप असतात. त्याप्रमाणें आत्मा व भूतें यांचा योग आयताच आहे. त्या योगीं दृष्टि गेली असतां विषयभावनेनें चित्त विकळ होतें. परंतु चराचर, आत्म्याचेंच रूप आहेत, व आत्म्यांत ते व त्यांत आत्मा आहे अशी बुद्धीनें दृढ भावना केली ह्मणजे तेंच चित्त सुख पावतें. अशा योगीं ज्याचें चित्त युक्त आहे त्यास "**योगयुक्तात्मा**" ह्मटलें आहे. अशा योग्याचे चित्तावर, सर्व व्यवहार करित असतांही, आत्मत्वाचा ठसा असतो ह्मणून तो जिवंतपणींच मुक्त असतो. यावरून असें समजूं नये कीं, एकट्या निर्विकल्प योगानें मुक्ति होत नाहीं. मुक्तीस कारण चित्तनाश आहे, तो या योगानेंही होतो. पण जीवन्मुक्ति मात्र अन्वययोग बाणल्याशिवाय मिळत नाहीं, एवढेंच समजावें. पक्क निर्विकल्पयोगी प्रारब्धभोगाचे वेळीं द्वैतभावनेनें घाबरा होईल पण देह पडल्यावर त्यास कैवल्य प्राप्त होणारच. अन्वययोग बाणून जीवन्मुक्तपद प्राप्त झाल्यावर प्रारब्ध भो-

गतेवेळीं देखील त्यांस द्वैतभावना होत नाहीं. ह्मणून तो जितांच मुक्त होतो; त्याम मरणाची वाट पाहणें नको.

अशा जीवन्मुक्ताचें वैभव भगवान् यापुढील दोन श्लोकांनीं सांगतात.

यो मां पश्यति सर्वत्र सर्वं च मयि पश्यति ।
तस्याहं न प्रणश्यामि स च मे न प्रणश्यति ॥ ३० ॥

**अर्थ.**—जो सर्वां ठायीं मला पाहतो व माझ्या ठायीं सर्व पाहतो, त्याला मी नाहींसा होत नाहीं व मला तो नाहींसा होत नाहीं.

**टीका.**—चराचरीं भगवंतास व भगवंताचे ठायीं चराचरांस जो पाहूं लागला, ह्मणजे या योगाचा आरंभ मात्र केला, परंतु योगारूढ झाला नाहीं, त्याचा योग भ्रंश होत नाहीं. कारण भगवंत मग त्याला अंतर देत नाहीं व तो भगवंतास सोडित नाहीं. पूर्वश्लोकीं सर्वत्र आत्मा पाहण्याचा योग सांगितला. या श्लोकीं तोच आत्मा सगुण परमात्मा होय, असें जाणून, त्यास सर्वां भूतीं पाहण्याचा भक्तियोग वर्णिला आहे. आत्मा सर्वत्र पाहणें व आत्म्यांत सर्व पाहणें, ही निर्गुणउपासना पूर्व श्लोकीं सांगितली. या श्लोकीं सगुण भगवंतास सर्वां भूतीं पाहणें व भगवंतांत सर्व भूतें पाहणें, हा भक्तियोग, ह्मणजे सगुणउपासना, सांगितली आहे. अशी उपासना करणारे भक्तांचा भगवान् पाठराखा असतो, ह्मणून त्याची योगसिद्धि अनायासें होते.

सर्वभूतस्थितं यो मां भजत्येकत्वमास्थितः ।
सर्वथा वर्तमानोऽपि स योगी मयि वर्तते ॥ ३१ ॥

**अर्थ.**—जो अभेदभावानें राहून सर्वभूतस्थ जो मी, त्या मला भजतो, तो सर्वदा प्रपंचीं वर्तत असला, तरी माझेच ठायीं वर्तत असतो.

**टीका.**—जो ईश्वर सर्व जगत् कल्पून त्यांत राहिला आहे, तो

आपला आत्माच आहे, असें व्यतिरेकानें ज्यास कळलें, त्याला भगवंत सर्वांहून प्रिय असतो, यांत शंका ती कोणती ? कारण आत्म्याहून प्रिय अशी दुसरी वस्तुच नाहीं, हें मागें सिद्ध करून दाखविलेंच आहे. सर्व चराचर भगवंताचें रूप आहे अशा एकत्वभावानें तो सर्वात्मभक्ति करितो, ह्मणून प्रारब्धानें प्रपंचीं वर्तत असला, तरी भगवंताचे ठायींच तो वर्ततो हें उघड आहे. प्रपंच आणि परमार्थ हे एकमेकांविरुद्ध आहेत असें असून, भगवद्भक्त प्रपंचीं वर्तूनही परमार्थच करित असतो, हें बोलणें कोणास आश्चर्यकारक वाटेल, परंतु भगवद्भक्तिरूप अमृत जो पितो, त्यास प्रपंचरूप विष खाण्यानें काय बाधा होईल बरें ? अशी भगवद्भक्ति करून जो भूतदया ठेवील, तो योगी सर्वांत श्रेष्ठ होय, असें भगवंत आतां सांगतात.

**आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति योऽर्जुन ।**
**सुखं वा यदि वा दुःखं स योगी परमो मतः ॥ ३२ ॥**

अर्थ.—हे अर्जुना, आपल्या सुखदुःखाप्रमाणेंच सर्व भूतांचें सुखदुःख जो पाहतो, तो योगी मला अति मान्य आहे.

टीका.—सर्वभूतीं दया असणें, हें श्रेष्ठत्वाचें लक्षण आहे, असें भगवान् सांगतात. ब्रह्मसुखानें आपल्याच ठिकाणीं तर्र होऊन राहणाऱ्या ज्ञानी पुरुषांपेक्षां आपल्या पूर्व अनुभवाची आठवण ठेवून, जो सर्वभूतीं दया ठेवील, तो श्रेष्ठ होय, हें कोणीही नाकबूल करणार नाहीं. क्षुधा, तृष्णा उत्पन्न झाली ह्मणजे आपला प्राण कासावीस होतो तसाच दुसऱ्याचाही होत असेल, असें जाणून सर्वभूतीं दया ठेवील व त्यांची क्षुधा, तृष्णा निवारणार्थ अन्नोदक देईल, तोच मनुष्य होय. याचप्रमाणें आपल्यावरून सर्व प्राणिमात्रांचें दुःख ओळखून ऐहिक व पारलौकिक सुख त्यांस होईल असें वागणें ज्ञानी पुरुषास तर अति आवश्य आहे. पूर्वपुण्यानें ज्यांस संपत्ति अनुकूल असेल त्यांनीं द्रव्यद्वारा व कायावाचा-

मनेंकरून, व इतरांनीं फक्त कायावाचामनेंकरून आपल्या अनुकूलतेचे मानानें सर्व प्राणिमात्रांस मदत करून त्यांस सुख दिलें असतां, तेणेंकरून भगवंत सुखी होतो; कारण सर्व प्राणिमात्रांचे ठायीं भगवंत असतोच. सर्व साधारण लोकांनीं याप्रमाणें वर्तन ठेविलें पाहिजे. पण ज्ञानी पुरुषाचें कर्तव्य इतकें करून संपत नाहीं. सर्व दुःखांचें मूळ अज्ञान आहे. तें नाहींसें करून ज्ञानसुख देणें, हें ज्ञानी पुरुषाचें विशेष कर्तव्य आहे. या सर्व प्रकारें जो ज्ञानी आपलें कर्तव्य बजावितो, तो आपणास अति मान्य आहे असें भगवान् सांगतात. हें ऐकून अर्जुन प्रश्न करितो

**योऽयं योगस्त्वया प्रोक्तः साम्येन मधुसूदन ।**
**एतस्याहं न पश्यामि चंचलत्वात् स्थितिंस्थिराम् ॥ ३३ ॥**

**चंचलं हि मनः कृष्ण प्रमाथि बलवद्दृढम् ।**
**तस्याहं निग्रहं मन्ये वायोरिव सुदुष्करम् ॥ ३४ ॥**

**अर्थ.**—हे कृष्णा, स्वतःचे दृष्टांतानें सर्व जाणावें असा योग त्वां सांगितला खरा, पण मनाचे चंचळपणामुळें तो स्थिर झाला असें दिसत नाहीं. हें मन फारच चंचळ आहे, इंद्रियांस विक्षेप करणारें आहे, बलवान आहे, व याची मिठी जबरदस्त आहे. अशा मनाचा निग्रह करणें वाऱ्याची मोट बांधण्यासारखें दुःसाध्य आहे.

या अर्जुनाचे प्रश्नास भगवान् उत्तर देतात.

**असंशयं महाबाहो मनो दुर्निग्रहं चलम् ।**
**अभ्यासेन तु कौंतेय वैराग्येण च गृह्यते ॥ ३५ ॥**

**अर्थ.**—हे अर्जुना, या चपल मनाचा निग्रह करणें अति दुष्कर आहे, यांत संशय नाहीं. परंतु अभ्यासानें आणि वैराग्यानें तें स्वाधीन ठेवितां येतें.

टीका.—आत्मत्व करून स्वरूपीं मन लावणें यास " अभ्यास " असें येथें ह्मटलें आहे. असा अभ्यास वैराग्याचें बळ असल्यावांचून होत नाहीं. सुख आत्म्यापासूनच मिळतें व विषयांपासून सुखदुःखाची खिचडी मिळते, हें वाचकांस समजलेंच आहे. खऱ्या सुखाचें ज्ञान नसल्यामुळें मन विषयांकडे धांव घेतें. तहान लागली व स्वच्छ पाणी कोठें मिळत नाहींसें झालें, तर गढूळ पाणीच आपण पितों. तद्वत् आपली विषयासक्ति होय. खऱ्या स्वरूपाचें ज्ञान झाल्यावरही बळकट संवयीमुळें मन पुन्हां तिकडे जातें. त्याचे ठायीं विवेकानें विषयांचें वैराग्य उत्पन्न करावें, ह्मणजे तें त्यांची हांव सोडून आत्मस्वरूपीं वळतें.

असंयतात्मना योगो दुष्प्राप इति मे मतिः ।
वश्यात्मना तु यतता शक्योऽवाप्तुमुपायतः ॥ ३६ ॥

अर्थ.—मनोनिग्रह नसणारे पुरुषास योग दुर्लभ आहे, असें माझें मत आहे. पण ज्यानें आपलें मन वश केलें आहे, त्यानें प्रयत्नानें वर सांगितलेले उपाय केले तर त्यास तो प्राप्त होणें शक्य आहे.

हें ऐकून योगसिद्धि करावी असें अर्जुनास वाटूं लागलें, पण यास बराच काळ लागणार व मध्येंच गाडा मोडला तर कसें होईल, असा संशय उत्पन्न होऊन अर्जुन प्रश्न करितो.

अयतिः श्रद्धयोपेतो योगाच्चलितमानसः ।
अप्राप्य योगसंसिद्धिं कां गतिं कृष्ण गच्छति ॥ ३७ ॥

कच्चिन्नोभयविभ्रष्टश्छिन्नाभ्रमिव नश्यति ।
अप्रतिष्ठो महाबाहो विमूढो ब्रह्मणः पथि ॥ ३८ ॥

एतन्मे संशयं कृष्ण छेत्तुमर्हस्यशेषतः ।
त्वदन्यः संशयस्यास्य छेत्ता न ह्युपपद्यते ॥ ३९ ॥

**अर्थ व टीका.**—हे कृष्णा, आत्मा कळून मोक्षश्रद्धा उपजली, परंतु यत्न केला नाहीं, अथवा योगास आरंभ करून ज्याचें मन तेथून चळलें, त्यास योगसिद्धि होत नाहीं. अशा पुरुषाची कशी गति होते ? ॥ ३७ ॥ हे महाबाहो कृष्णा, ब्रह्मप्राप्तीच्या उद्योगास लागल्यामुळें त्यानें काम्य टाकून दिलें असतें, ह्मणून त्यास स्वर्ग मिळत नाहीं, व योगसाधनापासून चळला ह्मणून त्यास ब्रह्मपदही मिळत नाहीं. एवंच तो दोहींकडून नासला असें होतें काय ? मला वाटतें, फुटलेल्या अभ्राप्रमाणें याची दशा होते. ॥ ३८ ॥ हे कृष्णा, हा माझा संशय त्वां फेडला पाहिजे, कारण त्याची निवृत्ति करणारा तुजवांचून दुसरा कोणीही नाहीं. या अर्जुनाचे महत्वाच्या प्रश्नांचें भगवान् उत्तर देतात.

**पार्थ नैवेह नामुत्र विनाशस्तस्य विद्यते ।**
**नहि कल्याणकृत्कश्चिद्दुर्गतिं तात गच्छति ॥ ४० ॥**

**अर्थ.**—हे पार्था, त्यास इहलोकीं, त्याचप्रमाणें परलोकींही विनाश नाहीं. बापा, शुभकर्म करणारा दुर्गतीस कधींही जाणार नाहीं.

**टीका.**—संतसंगति मिळून मोक्षाची नुसती इच्छा ज्यास उत्पन्न झाली तोही दुर्गति पावत नाहीं, मग मोक्षमार्गीं जो प्रवर्तला, त्यास ती कशी होणार बरें ? येथें "**बापा**" ह्या शब्दानें अर्जुनास संबोधिलें आहे. असें सर्व गीतेंत कोठेंही त्यास आळविलें नाहीं. यावरून हा श्लोक अति कळवळ्यानें भगवंत बोलले, असें स्पष्ट दिसतें.

यानंतर योगभ्रष्ट पुरुषास कोणती गति प्राप्त होते, तें भगवान् अर्जुनास सांगतात.

**प्राप्य पुण्यकृतांल्लोकानुषित्वा शाश्वतीः समाः ।**
**शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोऽभिजायते ॥ ४१ ॥**

**अर्थ.**—पुण्य करणारे लोकांस जो लोक प्राप्त होतो, तो योगभ-

ष्टास मिळतो. तेथें पुष्कळ काळपर्यंत तो सुख भोगून, पवित्र अशा श्रीमानाच्या घरीं पुनः जन्म घेतो.

टीका.–अश्वमेधादि यज्ञ करून, अगणित पुण्य झालें, म्हणजे उत्तम लोक प्राप्त होतो तोच योगभ्रष्टास मरणानंतर मिळतो. व तेथें तो फार काळपर्यंत राहून, पुनः पवित्र अशा श्रीमानाच्या घरीं जन्मतो. यावरून ऐहिक आणि पारलौकिक अशीं दोन्हीं सुखें त्यास मिळतात. योगभ्रष्ट दोन प्रकारें होतात. कित्येक पुरुष आत्मज्ञान झाल्यावर संगदोषामुळें पुनः विषयासक्त होऊन योगापासून भ्रष्ट होतात, व कित्येक योगाचा यत्न करित असतां, तो पूर्ण न होतां, मरतात. या दोहोंपैकीं अर्जुनानें ज्याविषयीं प्रश्न केला, तो पहिले प्रकारचा योगभ्रष्ट होय. ज्ञान होऊनही पुनः मूर्ख बनून तो विषयासक्त होतो. देहावसानीं जशी वासना असेल, त्याप्रमाणें जन्म होतो, हें भगवान् पुढें अष्टमाध्यायांत सांगणार आहेत. पहिले प्रकारचा योगभ्रष्ट याची विषयवासना कायम असल्यामुळें, तो पवित्र श्रीमंताचे घराण्यांत जन्म घेतो, व तेथें यथान्याय सर्व विषयोपभोग घेतो. व त्यानंतर त्यास पूर्वबुद्धिसंयोग होऊन अपुरा राहिलेला योग तो पुढें चालवितो. आतां विरक्ति असूनही मरणामुळें ज्याचा योग पूर्ण झाला नाहीं, असा दुसरे प्रकारचा योगभ्रष्टही, पुण्यलोकीं शाश्वत काळपर्यंत राहून, पुनः जन्म घेतो. त्याचा प्रकार पुढील श्लोकांत सांगितला आहे.

**अथवा योगिनामेव कुले भवति धीमताम् ।**
**एतद्धि दुर्लभतरं लोके जन्म यदीदृशम् ।। ४२ ।।**

**अर्थ.**–अथवा बुद्धिमंत अशा योग्याचे कुलांत तो जन्म पावतो. अशा प्रकारें जन्म होणें, या लोकीं मोठी दुर्लभ गोष्ट आहे.

**टीका.**–वर सांगितलेला दुसरे प्रकारचा योगभ्रष्ट योग्याचेच कुळांत जन्म घेतो, कारण त्यास मरतांना विषयासक्ति नसते. श्लो-

काचे उत्तरार्धीं योगभ्रष्टाचे अशा प्रकारचे जन्मांना मोठेपणा दाखविला आहे. याप्रमाणें जन्म पावून योगभ्रष्ट पुरुष काय करितो हें पुढच्या श्लोकीं भगवान् सांगतात.

**तत्र तं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदेहिकम्।**
**यतते च ततो भूयः संसिद्धौ कुरुनंदन ॥ ४३ ॥**

**अर्थ.**—हे अर्जुना, अशा जन्मीं पूर्वदेहीं संपादिलेल्या बुद्धिसंस्काराची त्यास प्राप्ति होते. आणि तेथपासून पुनः तो मोक्षोपाय करितो.

**टीका.**—पूर्वजन्मीं असलेली मुमुक्षा सत्संगादि शिक्षेवांचून त्याचे बुद्धीस या जन्मीं स्फुरूं लागते. जसें जसें त्याचें वय वाढत जातें, तशी तशी त्याची बुद्धि वाढत जाते; व त्याच मानानें पूर्व संस्कारही त्याचे बुद्धींत उमटत जातात. अशा योगभ्रष्ट जन्मीं कित्येकांस बाळपणीं, कित्येकांस तरुणपणीं व कित्येकांस वृद्धापकाळीं हा पौर्वदेहिकबुद्धिसंयोग मिळतो. हें पूर्व कर्मावर अवलंबून असतें. नंतर सत्संग मिळून, तो आत्मयोगाचा आरंभ करितो. "**सत्संग**" या शब्दांत संताचा संग व त्यांनीं केलेल्या ग्रंथांचा संग या दोहींचाही समावेश होतो. हा त्याचा योग भगवंतानें जतन करून ठेविला असतो, तो त्यास जशाचा तसा विनाआयास प्राप्त होतो. कोणास संत भेटून ते त्यास ज्ञान देतात, कोणास ईश्वरच गुरुरूपानें भेटून तें देतो व कोणास स्फूर्तिरूपानेंच सद्गुरु ज्ञान देतात. यासंबंधानें अमुकच एक नियम आहे, असें सांगतां येत नाहीं. इतकें खरें आहे कीं, कोणते तरी मार्गानें ईश्वर त्याचें पौर्वदेहिक ज्ञान त्यास देतो. तदनंतर तो मुक्तीकरितां जारीनें यत्न सुरू ठेवितो व हळू हळू योगसिद्धि पावतो.

**पूर्वाभ्यासेन तेनैव ह्रियते ह्यवशोऽपि सः ।**
**जिज्ञासुरपि योगस्य शब्दब्रह्मातिवर्तते ॥ ४४ ॥**

**अर्थ.**—असा योगी स्वहित विसरला असला, तरी पूर्वाभ्यासामुळें, तो अभ्यासींच वर्ततो, आत्मयोगाचा जिज्ञासु देखील कर्मी न प्रवर्ततां एकदम योगींच प्रवर्ततो.

**टीका.**—विषयवासना उरल्यामुळें स्वहिताकडे जरी अशा योगभ्रष्टाचें लक्ष नसलें, तरी त्याची बुद्धि त्यास मोक्षमार्गाकडे नेते. त्याचें पूर्वाभ्यासरूप कर्म त्याचे बुद्धींत संस्काररूपानें असतेंच. ह्मणून कर्मयोग करून चित्तशुद्धीचे खटपटींत न पडतां, तो एकदम योगींच प्रवृत्त होतो. ज्ञानच तारक आहे असें ज्यास वाटतें, त्याचें चित्त पूर्व जन्मांतरींच शुद्ध झालें आहे, असें समजावें. हें स्पष्ट समजावें या हेतूनें भगवान् उत्तरार्धांत ह्मणतात कीं, “ **जिज्ञासुरपि योगस्य शब्दब्रह्माति वर्तते.** ” ज्यास आत्मानात्म विचार कळला, त्याला योग करणें, एवढेंच मुक्तीचें साधन करण्याचें राहिलें असतें. ह्मणून तदनंतर तो योग कसा करावा, हें समजण्याची त्यास इच्छा असते अशा पुरुषास “ **आत्मजिज्ञासु** ” असें ह्मणतात. व आत्मा कळण्याची ज्यास इच्छा असते त्यास “ **आत्मतत्त्वजिज्ञासु** ” ह्मणतात. या दोहोंपैकीं उत्तरार्धांत सांगितलेला जिज्ञासु पहिले प्रकारचा होय कारण “ **योगाच्चलितमानसः** ” ह्मणजे योगापासून भ्रष्ट झालेल्या पुरुषाची गति काय होते, असा अर्जुनाचा प्रश्न होता. यावरून तो आत्मजिज्ञासु होय, हें उघड आहे. असा जिज्ञासु देखील शब्दब्रह्म ह्मणजे वेद यातें अतिक्रमितो; ह्मणजे कर्मी न प्रवर्ततां, एकदम योगच करण्यास लागतो. मग जो पूर्व जन्मींच योग करूं लागला होता, तो या जन्मीं योगींच प्रवर्तेल यांत शंका नाहीं. शुचिष्मंत अशा श्रीमंताचे घरीं तो जन्म घेतो, यावरून शंका येते कीं, तोही कर्मी सादर राहील, तर तसें नाहीं.

तो ब्रह्म जाणून लोकसंग्रहाकरितां कर्म करील असें भगवंत सुचवितात.

पूर्वाभ्यासानें अशा योगभ्रष्टाची बुद्धि त्यास ज्ञानमार्गी ओढून नेते. असें आहे, तर मग त्यास यत्न कां केला पाहिजे? शुद्ध वस्त्रही बहु कालानें मलीन होतें, तसें पूर्व जन्मीं शुद्ध झालेलें योगभ्रष्टाचें चित्त मलीन झालें पाहिजे व त्यास चित्तशुद्धीकरितां कर्म केलें पाहिजे. असें असतां भगवान् त्याचे उलट सांगतात हें कसें? असे दोन संशय ह्या ठिकाणीं उद्भवतात. त्यांचें निरसन पुढील श्लोकानें केलें आहे.

**प्रयत्नाद्यतमानस्तु योगी संशुद्धकिल्बिषः ।**
**अनेकजन्मसंसिद्धस्ततो याति परां गतिम् ॥ ४५ ॥**

**अर्थ.**—प्रयत्नानें श्रम करून अभ्यास करणारा योगी पापापासून मुक्त होऊन, अनेक जन्मपर्यंत साधन करून मिळविलेल्या ज्ञानाची सिद्धि पावून मोक्ष पावतो.

**टीका.**—प्रयत्नावांचून मोक्ष मिळत नाहीं. योगभ्रष्टाचा पूर्वाभ्यास त्यास बळेंच ज्ञानमार्गाकडे ओढून नेतो, याचा अर्थ इतकाच कीं, त्यास कर्म करण्याची इच्छा न होतां, तो थेट ज्ञानाकडे जातो. पूर्वी जितका अभ्यास झाला असतो, तितका आयासावांचून त्यास प्राप्त होतो व त्यापुढें त्यास यत्न करावाच लागतो. पण चित्ताचा संयम करण्यास त्यास इतरांसारिखे श्रम करावे लागत नाहींत. आतां, पूर्वजन्मीं चित्त शुद्ध झालें असलें, तरी बहुत काळ लोटल्यामुळें त्यास पुन्हां कर्मयोग कां करावा लागत नाहीं, या दुसऱ्या शंकेचें निरसन " **अनेकजन्मसंसिद्धः** " व " **संशुद्धकिल्बिषः** " या दोन वचनांनीं केलें आहे. अनेक जन्म निष्काम कर्म आचरण केलें असतां ब्रह्मजिज्ञासा उपजते. ब्रह्मजिज्ञासा उपजते तेव्हांच चित्तशुद्धि झाली, असें समजावें. परंतु तो योगभ्रष्ट झाला, ह्मणून त्याचे चित्तास पुन्हां मळ लागला असें ह्मणतां येईल.

तथापि विषयच गोड वाटणें हा जो बुद्धीवर अनादि मळ चढला असतो, तसा हा मळ नव्हे. लोखंडाचें अंगीं कठिणता आणि कालिमा असते. हे गुण त्यास परिस लागल्याबरोबर नाहींसे होतात व तें सोनें होतें. तसा अनादिविषयवासनामळ निष्काम कर्म भगवदर्पण केल्यानें नाहींसा होतो व चित्त सोन्याप्रमाणें शुद्ध होतें. सोनें धुळीनें मळालें तरी हात लावल्याबरोबर तें स्वच्छ होतें. तद्वत् निष्काम कर्म करून शुद्ध झालेल्या चित्तावर थोडासा मळ बसला, तरी तो नाहींसा करण्यास श्रम करण्याची जरूर नसते. बुद्धीचा अनादि मळ गेला ह्मणजे ती "शुद्धकिल्बिषा" ह्मणावी. तीच योगानें संशुद्ध ह्मणजे अति निर्मळ होऊन मोक्षप्राप्ति होते. याप्रमाणें दोन्हीही संशयांचा परिहार करून, योग सर्वांहून थोर आहे, असें सांगून, भगवान् अर्जुनास योगी होण्याविषयीं उपदेश करितात.

तपस्विभ्योऽधिको योगी ज्ञानिभ्योऽपि मतोऽधिकः ।
कर्मिभ्यश्चाधिको योगी तस्माद्योगी भवार्जुन ॥ ४६ ॥

**अर्थ.**—तपस्वी, ज्ञानी, व कर्मांची आसक्ति धरणारे, या सर्वांहूनही योगी श्रेष्ठ होय. ह्मणून, हे अर्जुना, तूं योगी हो.

**टीका.**—तपें केल्यानें थोर पदवी मिळते. पण हें फळ नश्वर असतें. कोणी कर्में करून नानादेवतांचें यजन करितात ते देवतांचे लोकांस जातात. पण तेही नश्वरच आहेत, ह्मणून या दोहोंहूनही योगी श्रेष्ठ होय; कारण त्यास नित्य असें मोक्षपद मिळतें. कोणी असें ह्मणतील कीं, आह्मी सकाम कर्म टाकून निष्काम कर्मच करूं, तर निष्काम कर्माचें फळ फक्त आत्मज्ञान आहे. तें झाल्यावरही चित्त निश्चळ करण्याकरितां योग केलाच पाहिजे. करितां 'तूं योगी हो' असा भगवान् अर्जुनास उपदेश करितात. कित्येक ज्ञानाभिमानी लोक असें ह्मणतात कीं, दिसणारें जड जग आत्माच आहे, एवढें समजलें ह्मणजे

झालें, योगाची कांहीं जरूर नाहीं. पण हें त्यांचें मत केवळ घातक आहे. केवळ शब्दानें वस्तुप्राप्तीचें कार्य होत नाहीं, त्या वस्तूचे प्रत्यक्ष प्राप्तीनें कार्य होतें. सर्व विषय आत्माच आहे असें कळलें, तरी अनादि संस्कारांमुळें त्यांचा विषयपणा मनावर राहतो. तो जाण्याकरितां अभ्यास पाहिजे. तंबाखू खाण्याची एखाद्यास फार दिवसांची संवय असते. ती खाणें वाईट आहे, असें त्यास कळलें, तरी ती एकदम टाकून देणें होत नाहीं. ती संवय हळू हळूच घालवावी लागते. तद्वत् अनादि विषयासक्ति, योगाभ्यासावांचून जात नाहीं. ती नाहींशी झाल्याखेरीज विषय आत्मस्वरूप कसे दिसतील बरें? यासंबंधानें जितकें लिहावें तितकें थोडेंच होईल, ह्मणून याचा विचार करणें सुज्ञ वाचकांवर सोंपवून, पुढील श्लोकाकडे वळूं.

**योगिनामपि सर्वेषां मद्गतेनांतरात्मना ।**
**श्रद्धावान्भजते यो मां स मे युक्ततमो मतः ॥ ४७ ॥**

**अर्थ.**—सर्व योग्यांमध्यें जो माझ्या ठायीं अंतःकरण ठेऊन श्रद्धापूर्वक माझें भजन करितो, तो सर्वांहून मला अधिक मान्य आहे.

**टीका.**—पूर्व श्लोकीं योगी सर्वांहून श्रेष्ठ आहे असें सांगितलें. या श्लोकीं भगवान् ह्मणतात कीं, अशा सर्व योग्यांत सगुणभक्त योगी श्रेष्ठ होय. योगी तितके युक्तच ह्मटले पाहिजेत. कारण त्यांचें चित्त आत्मस्वरूपीं योजिलेलें असतें. अशा रीतीनें आत्मस्वरूपीं युक्त असून जे सगुणभक्ति करितात ते युक्ततम होत. याप्रमाणें या अध्यायांतीं सगुणभक्तीचें श्रेष्ठत्व सांगून तिचेंच विशद विवेचन पुढील अध्यायांत भगवंत करणार आहेत.

अशी ही षष्ठाध्यायाची झालेली टीका भगवच्चरणीं अर्पण असो.



श्री.

# अध्याय ७ वा.

## ॐ नमो भगवते वासुदेवाय.

सहाव्या अध्यायाचे अंतीं भगवंत बोलले कीं, आत्मतत्वें जाण-णाऱ्या योगयुक्तापेक्षां योगयुक्त सगुणभक्त श्रेष्ठ होय. तो सगुण ईश्वर कोण, त्याचें रूप काय, हें समजण्याची अर्जुनास इच्छा झाली, ती जाणून भगवान् गोपाळकृष्ण ती माहिती या अध्यायांत देतात.

**मय्यासक्तमनाः पार्थ योगं युंजन्मदाश्रयः ।**
**असंशयं समग्रं मां यथा ज्ञास्यसि तच्छृणु ॥ १ ॥**

**अर्थ.**—माझ्या ठायीं मनाची आसक्ति ठेवून माझाच आश्रय करून योग करीत असतां, ज्या रीतीनें तूं मला निःसंशयानें व पूर्णपणें जाणशील तें ऐक.

टीका.—सर्व चराचर निर्गुण ब्रह्म आहे, असें पाहणें, या योगास **सर्वात्मयोग** ह्मणतात. अशा सर्वात्मयोगीं चित्त योजिलें असतां मायाभासरूप आकारवंत जग दिसतें तें सर्व सगुण ईश्वराचें रूपच आहे, असें समजणें, यास **सगुणभक्ति** ह्मणतात. सर्वत्र ब्रह्म पाहणें हा सर्वात्म-योग साधला ह्मणजे झालें, त्यावर आणखी सगुणभक्तीचा खटाटोप कां करावा, याचें कारण असें कीं, योग करीत असतांना सगुणभक्ति करित असलें तर केलेल्या योगाचा ठसा मनावर कायम राहतो. योगाशि-वाय सगुणभक्ति होऊं शकत नाहीं, कारण निर्गुणज्ञान झाल्याखेरीज

सगुणज्ञान होत नाहीं ही अनुभवसिद्ध गोष्ट आहे. आत्मज्ञान झाल्या-वर कोणी सगुणभक्तीचा आदर करित नाहींत. त्यांचा योग सिद्धीस जाणें त्यांचेच प्रयत्नावर अवलंबून असतें, ह्मणून त्यांस फार क्लेश होतात. पण ज्ञानी सगुणभक्ताचा योग, सगुणाचा आश्रय असल्यामुळें अनायासें सिद्धीस जातो. ह्मणून 'जेणेंकरून सर्व आकारवंत जग माझें सगुण-रूपच आहे असें जाणशील तो भक्तियोग तुला मी सांगतों', असें भगवान् ह्मणतात.

**ज्ञानं तेऽहं सविज्ञानमिदं वक्ष्याम्यशेषतः ।**

**यज्ज्ञात्वा नेह भूयोन्यज्ज्ञातव्यमवशिष्यते ॥ २ ॥**

**अर्थ.**—तें विज्ञानासहित ज्ञान मी तुला पूर्णपणें सांगतों. हें जाण-ल्यावर, या लोकीं जाणण्यासारखें दुसरें कांहींच उरत नाहीं.

**टीका.**—निव्वळ निर्गुणाचें ज्ञान, ज्यास व्यतिरेक ह्मणतात, तें "**ज्ञान**" होय. त्या एका निर्गुणांत अनेक चराचर व अनेक चराच-रांत तें एकच निर्गुण पाहणें, या विशेष ज्ञानास "**विज्ञान**" ह्मणतात. असें हें ज्ञान विज्ञान पावून पुष्कळ मुमुक्षुजन मुक्त झाले, परंतु समग्रत्वें सगुणभजन त्यांस घडलें नाहीं. ते सर्वज्ञ खरे, तथापि सर्व आका-रवंत जग ईश्वराच्या सगुणमूर्तीच आहेत हें त्यांनीं जाणणें बाकी राहिलें होतें. तें शेष ज्ञान आतां भगवान् सांगणार आहेत. निर्गुणोपासक सर्वत्र ब्रह्मच आहे असें पाहतात, पण आकारवंत जग मायाभास ह्मणून तें नाहींच असें तें समजतात. तत्वदृष्ट्या तें नाहीं हें खरें, परंतु जोंपर्यंत तत्वदृष्टि होत नाहीं, तोंपर्यंत सामान्य दृष्टिच असते, तशा दृष्टीस मायाभास प्रत्यक्ष दिसतोच. तो क्लेश दिल्याशिवाय रहात नाहीं. निर्गुणोपासनेंत हें उणेंपण आहे, तें सगुणोपासनेंत भरून निघतें.

**मनुष्याणां सहस्रेषु कश्चिद्यतति सिद्धये ।**

**यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्ति तत्वतः ॥ ३ ॥**

**अर्थ.**–हजारो मनुष्यांत एखादा मनुष्य आत्मज्ञानसिद्धीकरितां यत्न करितो. व असा यत्न करून सिद्ध झालेल्यांतून एखादाच मला तत्वदृष्टीनें जाणतो.

**टीका.**–ज्ञानाची पायरी कर्मयोगावरची आहे, कारण कर्मयोग करून चित्तशुद्धि झाल्यावर आत्मबोध होतो व असा आत्मबोध झाल्यावर सर्व जग सगुण ब्रह्म आहे असें पाहतां येतें. म्हणून आत्मबोधाहून सगुणभक्ति पलीकडची पायरी आहे, असें "**मां वेत्ति तत्वतः**" या पदांनीं दर्शविलें आहे. चित्तशुद्धीविना जसें ज्ञान होत नाहीं, तसें तत्वज्ञानावांचून सगुण भगवंतास जाणतां येत नाहीं, असें भगवान् सांगतात. यावरून सगुणभजनाचें श्रेष्ठत्व व्यक्त होतें. आतां सर्व विश्व सगुण भगवंतच आहे या गोष्टीचें रहस्य भगवान् सांगतात.

**भूमिरापो नलो वायुः खं मनो बुद्धिरेव च ।**
**अहंकार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा ॥ ४ ॥**

**अर्थ.**–पृथ्वी, पाणी, अग्नि, वायु, आकाश, मन, बुद्धि आणि अहंकार अशा आठ प्रकारें माझी प्रकृति भेद पावली आहे.

**टीका.**–हे आठही प्रकार मिळून एका भगवंताची माया होय. सोन्याचे निरनिराळे अलंकार होतात, पण त्या सर्वांत निर्विकार सोनेंच असतें. सूर्यकिरणांपासून मृगजळाचे कल्लोळ उठतात ते सर्व किरणच असतात. त्याप्रमाणें सर्व जगदाकृति भगवत्स्वरूपच होय, व ज्या शक्तीच्या योगानें तें जगत् भासतें ती भगवंताची माया होय. सुवर्णाच्या शक्तीनें अलंकार दिसतात व सूर्यकिरणांच्या शक्तीनें मृगजळ दिसतें. तद्वत् भगवन्मायेमुळें जड जग भासमान आहे. या मायेच्या आठ भेदांपासूनच तेवीस प्रकारच्या विकृति उत्पन्न झाल्या आहेत. पृथिव्यादि पांच भूतांतच शब्दस्पर्शादि पंच विषयांचा समावेश आहे. त्याचप्रमाणें अहंकारांत दहाही इंद्रियांचा समावेश आहे. कारण 'मी

पाहतों, मी बोलतों' वगैरे इंद्रियविकार, अहंकारापासूनच होतात. याप्रमाणें २१ तत्वसंख्येची गणना झाली, त्यांत मन आणि बुद्धि मिळविली ह्मणजे २३ होतात. अशा २३ प्रकारें ही भगवंताची माया विकृति पावली आहे. २४ वें तत्व अव्यक्त तत्व होय तें पुढील श्लोकांत सांगितलें आहे. तें क्षेत्रज्ञाकडे लागतें, व त्यास **पराप्रकृति** ह्मणतात. एवंच ही नवविधा प्रकृति २४ तत्वें दाखविते. सर्व क्षेत्रांत हींच तत्वें असतात व याच तत्वांचीं ब्रह्मांडें झालीं आहेत.

**अपरेयमितस्त्वन्यां प्रकृतिं विद्धि मे पराम् ।**
**जीवभूतां महाबाहो ययेदं धार्यते जगत् ॥ ५ ॥**

**अर्थ.**–पूर्वश्लोकीं सांगितलेली प्रकृति **अपरा** ह्मणजे कनिष्ठ होय, हिच्याहून श्रेष्ठ अशी **परा** ह्मणून प्रकृति आहे, ती तूं जाण. ही प्रकृति चैतन्यात्मक आहे, व हिनेंच सर्व जग धारण केलें आहे.

**टीका.**–हीच पराप्रकृति जीव पावली आहे, ह्मणून तिला "**जीवभूता**" असें ह्मटलें आहे. हें दृष्टांतानें स्पष्ट केलें पाहिजे. घागर ह्मणजे "**अपरा**" प्रकृति समजूं. त्यांतील पाणी "**परा**" होय. त्यांत सूर्याचा प्रकाश पडतो तो चित्प्रकाश होय. नुसत्या जळांत प्रकाश नसतो, पण सूर्याच्या तेजामुळें तें प्रकाशित होतें व तेंच तेज घटासही प्रकाशित करितें. तद्वत् शुद्धसत्व हेंच "**परा**" प्रकृतीचें रूप समजावें. त्यांत चैतन्यप्रतिबिंब पडतें, तो जीव होय. तो जीवही पराप्रकृतीच होते. ह्मणून त्या प्रकृतीस "**जीवभूता**" ह्मटलें आहे. जें चैतन्य पराप्रकृतीस प्रकाशित करितें, तेंच अपरा प्रकृतिरूप क्षेत्रासही प्रकाशित करितें. इतक्यानें या जीवाचें स्वरूप स्पष्ट कळेल असें वाटत नाहीं. तरी तूर्त ती जिज्ञासा थोपवून ठेविली पाहिजे. १५ व्या अध्यायांत भगवान् यासंबंधानें उपदेश करणार आहेत, तेव्हां तें स्पष्टपणें कळेल. तूर्त आपणांस एवढेंच समजण्याचें आहे कीं, जिच्यापासून

जीवभाव उत्पन्न होतो ती पराप्रकृति होय. या पराप्रकृतीनें जगाची कल्पना करून, तें धरिलें जातें, असें भगवान् चतुर्थ चरणीं सांगतात. त्याचा आतां विचार करूं. सर्व जड जग अपराप्रकृति होय. तें पराप्रकृतीनें कसें धरिलें जातें याचा खुलासा केला पाहिजे. स्वप्नांत आपण आपले मनानें एखादे नगराची कल्पना करितों. त्यास आधार मनच असतें. तसें अपारप्रकृतिरूप सर्व जगत् ईश्वरपराप्रकृतीनें कल्पितो व तें तिचेच साधनानें तो धारण करितो. ईश्वराच्या शुद्धसत्व प्रकृतीपासून त्रिगुणात्मक सृष्टि उत्पन्न होते. तीच अपराप्रकृति होय यावरूनही अपराच त्रिगुण होते असें दिसतें. तेव्हां या अठ प्रकारांत त्रिगुण कसे कसे विभागिले आहेत हें सांगणें जरूर आहे. सर्व पंचभूतें तमोगुण होत, इंद्रियसमुदाय रजोगुण होय, व मन आणि बुद्धि मिश्र सत्त्वगुण होत. यांतील आठवा अहंकार राहिला. तो स्थितिपरत्वें तीन प्रकारचा असतो. पांचभौतिक, शरीरसंबंधी तामस अहंकार होय, इंद्रियसंबंधी राजस अहंकार होय आणि मन आणि बुद्धि या सत्वसृष्टिसंबंधी सत्वाहंकार होय. गुरुकृपेनें ही त्रिगुणसृष्टि अनात्मत्वें निवेदून ज्या सत्वानें आत्मानुभव होतो तीच परा प्रकृति होय. ईश्वर या पराप्रकृतीनें अपराप्रकृतीस कल्पून साक्षित्वानें तिला धारण करितो. असें साक्षित्व आहे तोंपर्यंतच कल्पिलेला पदार्थ दिसतो, ह्मणून सर्व विश्व साक्षित्वांत आहे. निर्गुणब्रह्मीं साक्षित्व नाहीं, ह्मणून परेच्या ठायीं साक्षित्व स्थापिलें जातें. स्वप्नांत नगराची कल्पना आपण करितों. तें नगर मनाचें साक्षित्व आहे तोंवर भासतें. तेंच साक्षित्व गाढ झोंपेंत नाहींसें झालें, ह्मणजे नगराभास नाहींसा होतो. तद्वत् जगदाभास ईश्वराचे साक्षित्वावर अवलंबून आहे व तें साक्षित्व पराप्रकृतीमुळें आहे. ह्मणून पराप्रकृतीचे योगानें ईश्वर जगत् धारण करितो असें ह्मटलें आहे.

परेवांचून अपरेचें स्फुरण होत नाहीं; तसें अंतःकरणावांचून इंद्रि-

यांचें स्फुरण होत नाहीं. ह्मणून आपले देहांत अंतःकरण हेंच पराप्रकृति आहे. हें ज्या अव्यक्त तत्वाचा अंश आहे, ती पराप्रकृति ईश्वरोपाधि होय व अंतःकरणरूप पराप्रकृति जीवोपाधि होय. ह्मणून जीवास चिदंश असें ह्मटलें आहे.

**एतद्योनीनि भूतानि सर्वाणीत्युपधारय ।**

**अहं कृत्स्नस्य जगतः प्रभवः प्रलयस्तथा ॥ ६ ॥**

**अर्थ.**–ही पराप्रकृति सर्व भूतांचें उत्पत्तिस्थान आहे असें जाण. मी सर्व जगाचा उत्पत्तिकर्ता आणि संहारकर्ता आहें.

**टीका**–हीं चराचर भूतें या प्रकृतीपासून झालीं असें तूं अनुभवें-करून जाण ह्मणून भगवान् अर्जुनास सांगतात. "**इति**" या शब्दानें असें सुचविलें आहे कीं, ईश्वरानें जसें जग कल्पिलें आहे तसें आपण कल्पून, "**उपधारय**" ह्मणजे मनानें धरावें. यावरून "**इति उपधारय**" या दोन शब्दांनीं अनुभवजन्य ज्ञान करून घेण्याचा उपदेश केला आहे असें दिसतें. अपराप्रकृति कल्पना होय. व ती कल्पना पराप्रकृति करिते. यावरून कार्यकारणरूप सर्व खेळ या दोन प्रकृतींचा आहे, असें पूर्वार्धानें सिद्ध होतें, ईश्वरास ठिकाणच राहत नाहीं, ह्मणून उत्तरार्धानें भगवान् ह्मणतात कीं, सकल जगाची उत्पत्ति,अंतीं संहार व मध्यें स्थिति, हें आपणच आहे. सुवर्णांत जसे नग, तसें भगवंताचे निर्गुण रूपांत जग आहे. नगाची उत्पत्ति सोन्यापासून होते व ते मोडले ह्मणजे सोन्यांतच लीन होतात. तद्वत् सर्व जग निर्गुणापासून उत्पन्न होतें व अंतीं त्यांतच लय पावतें. श्लोकांत फक्त उत्पत्ति आणि संहार इतकेंच भगवान् बोलले आहेत. परंतु दोहोंमध्यें स्थितिकाल आहेच. याप्रमाणें सर्व त्रिगुणसृष्टि आपणच निर्गुण झाला आहे असें भगवान् बोलतात. पण हें निर्गुण अधिष्ठान मात्र आहे. विकार आणि आकार हे सर्व प्रकृतीचे खेळ आहेत. यावरून देखील प्रकृतिच विश्व

करिते व धरिते अशी शंका उत्पन्न होते. हिचें निरसन "तथा" शब्दानें केलें आहे. तें असें कीं, सृष्टि, स्थिति आणि संहार हे सर्व ईश्वर आपल्या कल्पनेनें जसा आपण होतो "तथा" ह्मणजे तसाच प्रकृति भास दाखविते. यावरून निर्गुणच सर्व जग बनतें व प्रकृति त्याचा भास दाखविते ह्मणून ती त्याची शक्ति होय असें सुचविलें आहे. जो दुसऱ्यास वर्तवितो तो त्या दुसऱ्याचा धनी होय, ह्मणून प्रकृतीचा धनी पुरुष होय. कारण पुरुषाच्या सत्तेकरून प्रकृति विश्वाभास दाखविते. असें जरी आहे तरी निर्गुण सत्तामात्र तिच्याहून वेगळें राहतें. सुवर्णावांचून अलंकार कळत नाहीं, तसा निर्गुणावांचून प्रपंचाचा भास होत नाहीं. सोनें निरनिराळे अलंकार होऊनही त्यास त्यांचा विकार होऊं नये अशी त्याचे अंगीं शक्ति असते. पण ती शक्तिही सुवर्णाचेच आधारावर असते. ती शक्ति सुवर्णाचे आश्रयानें असते, पण आहे अशी दिसत नाहीं. विचार केला असतां तिचा बाध होतो; कारण अशी शक्ति नसती तर सोनें विकार पावलें असतें. सुवर्णावांचून शक्ति अनुभवास येती तर तिचे अंगीं सत्ता आहे असें ह्मणतां आलें असतें. सुवर्णांत जशी ही शक्ति असते, तशी माया ही निर्गुण ब्रह्मीं शक्ति आहे. तिच्या साह्यानें सगुण ईश्वर साकार जग बनतो. सुवर्णांतील शक्तीचें जसें सुवर्ण धनी आहे, तसेंच निर्गुण ब्रह्म मायेचा धनी आहे. ह्मणून ईश्वरपण निर्गुणासच येतें. असा सगुण ईश्वर निर्गुणत्वेंच असतो व तोच निर्गुणत्वें सृष्टि, स्थिति आणि संहार स्वतः होतो. निर्गुणीं ईश्वरत्व आलें, तेव्हां मायेपासून उत्पन्न झालेल्या त्रिगुणांस अनायासें मिथ्यात्व प्राप्त झालें, तथापि मायाभासगुणीं निर्गुणत्व आलें असें ह्मणतां येत नाहीं. तरी सृष्टि, स्थिति आणि संहार हे मायेचे भासणारे तिन्ही प्रकार सगुणाचींच रूपें आहेत; कारण ईश्वराच्या शक्ति अपरा आणि परा, तोच ईश्वर आहे असें विचाराअंतीं कळून येतें. कार्य आणि कारण वेगळीं करितां येत नाहींत, त्याचप्रमाणें कोणत्याही वस्तूपासून त्याची शक्तिही वेगळी करितां येत

नाहीं. सुवर्णाची शक्ति सुवर्णापासून वेगळी करितां येत नाहीं व जो जो कलंकार होतो तो तो सोन्याचाच आकार असतो. तसें पराअपरा प्रकृतिविकार, निर्विकार ईश्वरच होतो. अशा प्रकारें बनलेले विश्वास निर्गुण ह्मणतां येत नाहीं, ह्मणून तें सगुण ईश्वराचें स्वरूप आहे असें ह्मणणें भाग पडतें. हें दाखविण्याकरितांच "तथा" शब्दाची योजना भगवंतानें या श्लोकीं केली आहे. ती प्रकृतिच सगुण ईश्वर आहे असें ह्मणावें, तर ती निर्गुणावांचून सांपडत नाहीं. जेथें सत्ता असते तेथेंच धनीपण मानिलें पाहिजे. याकरितां निर्गुणींच ईश्वरत्व दिसतें असें ह्मटल्यावेरीज इलाज नाहीं. प्रकृतीवांचून निर्गुणास ईश्वरपण येत नाहीं, तरी निर्गुण तिच्यावांचून असूं शकतें. पण त्या निर्गुणावांचून प्रकृतीची खुण दिसत नाहीं ह्मणून जरी तिच्यामुळें निर्गुणास ईश्वरपण येतें, तरी जें निर्गुण तेंच ईश्वरत्व पावतें. या सर्व कारणांकरितां भासणारें सर्व विश्व ईश्वराचेंच स्वरूप आहे, मायेचें रूप नव्हे, हें सिद्ध झालें. ह्मणून सृष्टि, स्थिति आणि संहार व अपरा परा प्रकृतींचे सर्व खेळ, सगुण ईश्वरच होय. एवंच "सर्वं खल्विदं ब्रह्म" असा सर्वात्मयोग करित असतां वरप्रमाणें खूण बाणेल तर मायाभासही सगुणत्वें भजतां येईल. यावरून निर्गुणत्वीं सर्वात्मयोग व सगुणत्वीं भक्तियोग असे दोन्हीही एके समयींच करितां येतात असेंही सिद्ध झालें. या अध्यायाचे पहिले श्लोकांत "मला समग्रत्वें जाणशील असें ज्ञान तुला मी सांगतों," असें जें भगवान् बोलले तें हेंच ज्ञान होय.

**मत्तः परतरं नान्यत्किंचिदस्ति धनंजय ।**

**मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव ॥ ७ ॥**

**अर्थ.**—हे अर्जुना, माझ्यापलीकडे दुसरें कांहींच नाहीं. सुतामध्यें मणी ओंवितात त्याप्रमाणें सर्व जग मजमध्यें आहे.

**टीका.**—कारण खरें व कार्य मिथ्या, असें दाखविण्याकरितां

जितके दृष्टांत दिले जातात ते सर्व या मिथ्या जगतांतलेच असतात. ह्मणून दृष्टांतांतील कारणही मिथ्याच होय. जसें दोरावर अज्ञानामुळें मिथ्या सर्पाचा भास होतो; तो भास अज्ञान नाहींसें झाल्याबरोबर नाहींसा होऊन खरी वस्तु दोर दिसतो. पण या दृष्टांतांतील दोराचा विचार केल्याबरोबर तोही मिथ्या भास आहे व त्याहीपलीकडे ब्रह्म आहे असें कळतें. असेंच ब्रह्माचे पलीकडेही कांहीं असेल काय? अशी कोणास शंका येईल, तर त्याचा निकाल या श्लोकांत केला आहे कीं, ब्रह्माचे पलीकडे कांहीं नाहीं, तें अनंत आहे व त्याजमध्येंच सर्व जगत् आहे असें दृष्टांतानें स्पष्ट केलें आहे. यामागील श्लोकानें सर्वच भगवद्रूप आहे असें सांगितल्यामुळें सेव्यसेवकभाव अगदीं उडाला होता, तो या श्लोकांतील दृष्टांतानें सुचविला आहे. मण्यास जसा सूत्राचा आश्रय असतो, तसा जगतास भगवंताचा आश्रय आहे. यावरून भगवंत श्रेष्ठ आहे व जगत् त्याचे सेवक आहेत असें सुचविलें आहे. आतां या श्लोकावरूनही अशी शंका उत्पन्न होते कीं, एका भगवंतावांचून बाकी सर्व सारखेच आहेत कीं काय? तसे असतील तर कोणी कोणास पूज्य मानण्याची जरूर उरली नाहीं. हा संशय नाहींसा करण्याकरितां भगवंत आपल्या विभूति सांगतात कीं, जेथें जें उत्तम असेल तें भगवंताचेंच स्वरूप समजून त्यास पूज्य मानावें.

**रसोऽहमप्सु कौन्तेय प्रभास्मि शशिसूर्ययोः ।**
**प्रणवः सर्ववेदेषु शब्दः खे पौरुषं नृषु ॥ ८ ॥**

**अर्थ.**—हे अर्जुना, उदकामध्यें मी रस आहें, सूर्यचंद्रांत असलेली प्रभा मी आहें, सर्व वेदांत प्रणव मी आहें, आकाशामध्यें शब्द मी आहें आणि पुरुषांमध्यें पराक्रम असतो तो मी आहे.

**पुण्यो गंधः पृथिव्यां च तेजश्चास्मि विभावसौ ।**
**जीवनं सर्वभूतेषु तपश्चास्मि तपस्विषु ॥ ९ ॥**

**अर्थ.**—पृथ्वीमध्यें सुगंध आहे तो मी, अग्नींत तेज असतें तें मी,

सर्व भूतांचे ठायीं जीवन असतें तें मी, व तपस्व्यांमध्यें तप असतें तें मी होय.

**बीजं मां सर्वभूतानां विद्धि पार्थ सनातनम् ।**
**बुद्धिर्बुद्धिमतामस्मि तेजस्तेजस्विनामहम् ॥ १० ॥**

**अर्थ.**–हे पार्था, सर्व भूतांचें सनातन बीज मी आहें हें जाण. बुद्धिमतांची बुद्धि मी व तेजस्वायांचें तेज मी आहें.

**टीका.**–सर्व भूतांचें बीज ब्रह्म होय. पण तें इतर बीजांप्रमाणें नासणारें नाहीं असें "**सनातनं**" शब्दानें सुचविलें आहे.

**बलं बलवतामस्मि कामरागविवर्जितम् ।**
**धर्माविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि भरतर्षभ ॥ ११ ॥**

**अर्थ.**–बलवान् पुरुषांचे अंगीं कामक्रोधरहित जें बळ असतें तें मीच आहें आणि प्राणिमात्रांचे ठायीं शास्त्रास विरुद्ध नाहीं असा काम ह्मणजे विषय मीच आहें.

**टीका.**–ईश्वर सर्वसम आहे. त्यास उत्तमाधम ही निवडानिवड कां असावी ही शंका एथें उत्पन्न होते. तिचें समाधान हेंच कीं, त्रिगुणचक्रांत लोकांचें मन भ्रमतें ह्मणून गुणानुरूप तें फळ पावतात हें १४ वे अध्यायांत स्पष्ट होणार आहे. धर्मास अविरुद्ध असा काम सत्वगुणयोगें शुद्ध असतो, ह्मणून त्यायोगानें उत्तम लोक मिळतो. रजोगुणानें मध्यम व तमोगुणानें अधोलोक मिळतो. हे सर्वही गुण सम असा ईश्वरच झाला असून, त्यापासून विचित्र फळें कां असावीं याचें उत्तर असें कीं, एकाच वस्तूचे अनेक प्रकार होतात. ते सर्व समान धर्मांचेच असले पाहिजेत असा नियम नाहीं. लोखंडाचीच किकरी त्याच्या बेडीस तोडिते. हें सर्व विषमत्व प्रकृतीकडे आहे. ईश्वर समच आहे.

**ये चैव सात्त्विका भावा राजसास्तामसाश्च ये ।**
**मत्त एवेति तान् विद्धि न त्वहं तेषु ते मयि ॥ १२ ॥**

**अर्थ.**—हे जे सात्विक, राजस आणि तामस त्रिगुणात्मक भाव आहेत, ते सर्व मजपासूनच झाले आहेत असें जाण. ते मजमध्यें आहेत पण मी त्यांत नाहीं.

**टीका.**—" मजमध्यें त्रिगुण आहेत पण मी त्यांत नाहीं " असें भगवान् बोलले तें कूटासारिखें आहे, ह्मणून दृष्टांतानें त्याचें स्पष्टीकरण केल्याशिवाय त्याचा बोध होणार नाहीं. भ्रमामुळें मिथ्या सर्प ज्या रज्जूपासून उत्पन्न होतो, तो रज्जु त्या सर्पांत नसतो; कारण तो नसतोच. पण रज्जु मात्र सर्पाचें अधिष्ठान असतो. तसें निर्गुणावांचून हे त्रिगुण असूं शकत नाहींत, पण त्यांत निर्गुण नाहीं; कारण ते भ्रमजन्य असल्यामुळें मिथ्या आहेत. यामुळें विभूतींत भगवंताची सर्वात्मस्थिति कायम राहूनही त्यांस गुणकर्मानुरूप विषयफळें मिळतात असें हें अपूर्व तत्व न जाणणें हेंही या गुणभावेंकरूनच घडतें असें आतां भगवान् सांगतात.

**त्रिभिर्गुणमयैर्भावैरेभिः सर्वमिदं जगत् ।**
**मोहितं नाभिजानाति मामेभ्यः परमव्ययम् ॥ १३ ॥**

**अर्थ.**—या तिन्ही गुणांनीं युक्त अशा भावामुळें हें सर्व जगत् मोहास पावून या गुणांच्याही पलीकडे असणाऱ्या नाशरहित अशा मला ते जाणत नाहींत.

**टीका.**—या तीन गुणांपैकीं सत्वगुणही रजतममिश्रित असल्यामुळें तोही गर्भवासास कारण होतो. चित्त व मन हीं सत्वगुणात्मक होत. इंद्रियें रजोगुणात्मक व देह तमोगुणात्मक होत. या सर्वांचें अहंकारीं एकपण होतें. तोच मोह ह्मणजे अविवेक होय. या सर्वांहून आत्मद्रष्टा वेगळा आहे, हें न जाणल्यामुळें जीवास मोह होतो-

भगवद्भक्त अशा या तिन्ही गुणांस तरून जातात. याचें कारण आतां भगवंत सांगतात.

**दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया ।**
**मामेव ये प्रपद्यंते मायामेतां तरंति ते ॥ १४ ॥**

**अर्थ.**–मी जो देव त्या माझीही त्रिगुणात्मक मायाशक्ति फार दुस्तर आहे. जे मला अनन्यभावानें भजतात, तेच या मायेंत तरून जातात.

**टीका.**–माया ह्मणजे काय? " **मा** " ह्मणजे नाहीं, " **या** " ह्मणजे जें नसून भासतें तें. मृगजळ वस्तुतः नसतें, पण नाहीं ह्मणावें तर आहेसें दिसतें. याप्रमाणें " **मा** " आणि " या " दोन अक्षरांचा भाव आहे. ह्मणून या त्रिगुणात्मक शक्तीस **माया** असें नांव दिलें आहे. मध्यान्ह टळतां किरणांत मृगजळ दिसत नाहीं. त्याप्रमाणें स्थितिकाळ संपतां ही माया निर्गुणीं लय पावते, तेव्हां ती नाहीं असें ह्मणावें, तर प्रतिदिनीं मध्यान्ह काळीं मृगजळ प्रगट होतें, त्याप्रमाणें प्रतिसृष्टिकाळीं ही मायाही प्रगट होते. किरणांस इच्छा नसूनही मध्यान्ह काळ आल्याबरोबर मृगजळ आपोआप उत्पन्न होतें. तद्वत् सृष्टिकाळ आल्याबरोबर निर्गुणीं इच्छा नसतांही माया उत्पन्न होते व तिच्यामुळें निर्गुणास सगुण ईश्वरत्व येतें व त्रिगुण प्रगट होतात. हे त्रिगुण कार्यरूपानें मायाच होत ह्मणून ते मिथ्या होत. दोरास संस्कृत भाषेंत **गुण** असें ह्मणतात. दोरांनीं प्राणी बांधले जातात, तसें सत्व, रज आणि तम हे जीवास बंधन करितात, ह्मणून त्यांस त्रिगुण असें ह्मटलें आहे. अशी ही गुणमयी मायानदी तरण्यास अति दुस्तर आहे. ही खरी असती व दिसती तर नावा घालून तरतां आली असती, किंवा प्रलयकाळच्या सूर्यानें शुष्क होती तर पायवाट होऊन प्राणी तिच्या

पलीकडे गेले असते. तसें कांहींच नाहीं. हिची तऱ्हाच अजब आहे धरूं गेलें तर ही सांपडत नाहीं, पण धरूं जाणारा मात्र अधिकच तिच्या फाशांत सांपडतो. हिच्यांत जो बुडाला त्यास आपण बुडालों असें वाटत नाहीं व मी तरलों असें जो बोलतो, तोही बुडालेलाच दिसतो. सत्यलोकापर्यंत जे चढले तेही तींत बुडाले असल्यामुळें ते शेवाळून पुन्हां घसरतात. वासनेचा वारा जोरदार झाला ह्मणजे कामनेचे कल्लोळ उठूं लागतात व अहंकाराचे प्रबळ धारेंत जीव सांपडतात. मग माया-नदींत असलेले कामक्रोध बुभुक्षित मासे त्यांस गिळूं पाहतात व लोभनक्र त्यांस बळकट मिठी मारून बसतो. इतक्यांत मदमत्सर भुजंग त्यांचे अंगांस वेष्टून दंश करूं लागतात व विषयझोंडू लागतो. तेव्हां या दुःखापासून तारणाऱ्या भगवंताचें नांव वाचेस येत नाहीं. ही मायानदी तरण्यास भगवद्भक्ति करणें, हा एकच उपाय आहे, असें "**मामेव ये प्रपद्यंते**" या चरणानें सांगितलें आहे. या चरणांतील "**एव**" शब्देंकरून भगवंतावांचून कोणी तारक नाहीं असें सुचविलें आहे. कारण माया ही भगवंताची शक्ति होय. तिच्यापासून सोडविण्यास दुसरा कोण समर्थ होईल बरें? भगवंत हा सर्वश्रेष्ठ राजा होय, व इतर देवता त्याचे हुकुमानें वागणारे अधिकारी होत. ह्मणून त्यांचे अंगीं भगवच्छक्ति टाळण्याचें सामर्थ्य नाहीं. भगवद्भजनाचे अंगीं असें सामर्थ्य असूनही लोक तें करित नाहींत याचें कारण उत्तर श्लोकांत सांगितलें आहे.

**न मां दुष्कृतिनो मूढाः प्रपद्यंते नराधमाः ।**
**माययापहृतज्ञाना आसुरं भावमाश्रिताः ॥ १५ ॥**

**अर्थ.**—जे दुराचारी, मूर्ख व अधम मनुष्य आहेत, त्यांचें ज्ञान मायेमुळें नाहींसें होऊन, ते आसुरभावाचा आश्रय धरितात, ह्मणून ते माझें भजन करित नाहींत.

**टीका.**—सर्व लोक ईश्वरभजन करिते तर तरते. पण ते तसें वागणार कोठून? भगवंताचें नाम तारक आहे असें ऐकून व जाणूनही कोणी तें उच्चारित नाहींत. यास कारण त्यांचें पाप होय. पाप ह्मणजे वाईट कर्मांचे संस्कार. पुष्कळ काळाचे सांठलेले असे कर्मसंस्कार बुद्धींत असल्यावर ते तशींच कर्मैं करण्यास प्रवृत्त करतील. हे वाईट संस्कार उलट ह्मणजे चांगल्या संस्कारांनीं नाहींसे झाल्याखेरीज भगवद्भजनाचा उत्तम मार्ग गोड वाटत नाहीं. भगवद्भजनाचें फळ मोक्ष होय. तो मोक्ष विषयांचे पलीकडे आहे. ह्मणून ज्यांस विषय आवडतात त्यांस भगवद्भजन कसें आवडणार? ते नेहमीं काम्य कर्मांकडेच वळणार याचें कारण माया. या मायेनें त्यांचें ज्ञान ह्मणजे सदसद्विवेक नाहींसा होतो. देहच आपण आहों असें सर्व लोक समजतात. वस्तुतः आपण देहाहून निराळे आहों. कारण मृत शवांत आपण कोठें असतों? हें उघड दिसत असूनही देह आपण नव्हे व ती असद्वस्तु आहे असा विचार मनांत न येणें ही मायेची कर्तबगारी होय. देह आपण आहों असें मानिल्यानें आपण विषयांचे फाशांत सांपडतों, ज्यांना भगवद्भजन घडत नाहीं अशा लोकांचे तीन प्रकार आहेत असें या श्लोकांत सांगितलें आहे. एक दुराचारी, दुसरे मूर्ख व तिसरे नराधम. दुराचाऱ्यांस वाईट कर्मांचीच गोडी असते ह्मणून ते ईश्वरभजनीं तत्पर होत नाहींत. मूर्खांस समजत नाहीं ह्मणून ते भजन करीत नाहींत. यांहून श्रेष्ठ ह्मणजे वेदशास्त्र जाणत असूनही काम्यकर्मांकडेसच ज्यांची धांव असते असे पढतमूर्ख होत. यांसच नराधम असें ह्मटलें आहे.

**चतुर्विधा भजंते मां जनाः सुकृतिनोऽर्जुन।**
**आर्तो जिज्ञासुरर्थार्थी ज्ञानी च भरतर्षभ ॥ १६ ॥**

**अर्थ.**—हे अर्जुना, पुण्यवंत जन मला भजतात ते चार प्रकारचे असतात. आर्त, जिज्ञासु, अर्थार्थी व ज्ञानी.

**टीका.**–या चहूंपैकीं आर्त आणि अर्थार्थी हे सकाम भजन करितात, व जिज्ञासु आणि ज्ञानी निष्काम भजन करितात. सकाम भजन करणारे देखील सुकृतिच होत, कारण पुण्यावांचून ईश्वराचें भजन घडतच नाहीं. पोट दुखूं लागलें किंवा दुसरे व्याधीनें शरिरास क्लेश होऊं लागले, ह्मणजे देवाची प्रार्थना करितात कीं, देवा, हे क्लेश नाहींसे कर. अशा लोकांस आर्त ह्मटलें आहे. आत्मतत्व समजावें या इच्छेनें ईश्वराचें भजन करितात, त्यांस **जिज्ञासु** ह्मणावें. विषयांचें साधन धन आहे. त्याची इच्छा करणाऱ्यांस **अर्थार्थी** ह्मणावें. व अपरोक्षानुभवसंपन्न पुरुषांस **ज्ञानी** ह्मणावें. भगवंत मोक्षामृताचा देणारा आहे. असें असून जे कोणी काम्यफलकांजी मागतील त्यांस तो तेंच देतो; कारण तो कल्पवृक्षस्वभाव आहे. कांजी मागण्याकरितां जरी ते भगवंतापाशीं गेले, तरी त्यांस त्याची ओळख होते, व कालांतरानें त्यांस अमृत लाभही होतो. ह्मणून हे सकामभजन करणारेही पुण्यवंत होत. सर्वत्र ब्रह्म आहे, मग भगवंताचेंच भजन कां करावें, वाटेल त्याचें भजन कां करूं नये, असें ह्मणणारे मूर्खच होत. कारण सर्वत्र सम दृष्टि राहत नाहीं ती होण्याकरितांच भगवंताचें भजन केलें पाहिजे. ब्रह्म सर्वत्र सम आहे. परंतु उपाधिभेदें विषमत्व असतें. ईश्वराची उपाधि शुद्धसत्व असल्यामुळें तो नित्यमुक्त आहे. व जीवांची उपाधि त्रिगुण आहे ह्मणून ते बद्ध असतात. बद्धानें बद्धाचीच प्रार्थना केली असतां तो त्यास सोडवील काय? नाहीं, कारण तो मोकळा असेल तर दुसऱ्यास सोडवीलना? लोखंडाची बेडी लोखंडाचेच शस्त्रानें तुटते. या न्यायानें ईश्वर नित्यमुक्त असल्यानें बंधमुक्त करण्यास तोच समर्थ आहे ह्मणून त्याचेंच भजन केलें असतां द्वैतनाश होतो.

**तेषां ज्ञानी नित्ययुक्त एकभक्तिर्विशिष्यते ।**

**प्रियो हि ज्ञानिनोऽत्यर्थमहं स च मम प्रियः ॥ १७ ॥**

**अर्थ.**–या चौघांत नित्ययुक्त आणि ऐक्यभक्ति करणारा ज्ञानी श्रेष्ठ होय. मी ज्ञान्यास अतिप्रिय असतों व मलाही तो प्रिय असतो.

**टीका.**–भक्ति ह्मणजे आवडी. अशी अखंड भक्ति ज्यास आहे तो **एकभक्त** ह्मणावा. भगवंताची अखंड आवडी ज्यास असते तोच भगवद्भक्त होय. सर्वात्मक बोध झालेल्या निर्गुणोपासकास त्रिविध दृश्याभास भगवत्स्वरूप आहे, हें वर्म कळत नाहीं. नित्ययुक्तत्व दोन प्रकारचें आहे. एक स्मृतियुक्त व दुसरें प्रीतियुक्त. एथें सांगितलेला नित्ययुक्त, प्रीतियुक्त नित्ययुक्त होय. आत्मा सर्वांहून प्रिय आहे हें यापूर्वी सिद्ध करून दाखविलें आहे. गृहपुत्रदारादिक आपणाकरितां प्रिय आहेत. आपलें कल्याण इच्छूनच शहाणा मनुष्य ईश्वराचें भजन करितो. मूर्खदेखील प्रयोजनावांचून कोणास भजत नाहीं. यावरून उघड दिसतें कीं, ईश्वराहून आपली आवडी विशेष आहे. ह्मणून खरी भक्ति भेदकरून घडत नाहीं. आपला आत्मा तोच ईश्वर अशी अभेद भक्ति जो करील तोच खरा भक्त होय. भक्त असल्याखेरीज नित्ययुक्तपण घडत नाहीं. ज्या वेळीं देवाचें स्मरण नाहीं, तेव्हां आपलीच प्रीति असते. तसेंच आपली प्रीति असते तेव्हां देवाची नसते. ह्मणून आवडीनें देवाचें स्मरण जेव्हां घडेल तेव्हांच तो मनुष्य भक्तियुक्त ह्मणतां येईल. ज्ञानी आणि भक्त केव्हांही अयुक्त नसतो. ह्मणून या चौघांत नित्ययुक्त ज्ञानी श्रेष्ठ आहे असें भगवान् ह्मणतात. निर्निमित्त आपल्यास प्रिय असणारा आपला आत्मा भगवंतच होय, अशा अनुभवानें त्यास नित्ययुक्तत्व प्राप्त होतें. हें नित्ययुक्तत्व ज्ञानी भक्तासच घडूं शकतें. नुसते ज्ञान्यास घडत नाहीं. केवळ निर्गुणींच तो आसक्त असल्यामुळें त्यास भक्त ह्मणतां येत नाहीं. त्यास अखंड स्मृति राहूं शकेल तर त्यासही नित्ययुक्त ह्मणतां येईल. परंतु अशी स्मृति त्यास राहूं शकत नाहीं. निर्गुणोपासक पक्का योगी झाला तरी त्याचा प्रारब्धाचा देह उरलाच असतो, ह्मणून त्यास कधींनाकधीं तरी विस्म-

रण पडेलच. झोंप लागल्यावर त्यांस आत्मस्मृति कोठून राहणार? प्रारब्धभोगाचे वेळेसही त्यास घडीभर तरी विस्मृति होईलच. तेव्हां अर्थात् त्याचें नित्ययुक्तत्व बिघडतें. परंतु ज्ञानी भक्ताची गोष्ट अशी नसते. एथें अशी शंका निघते कीं, ज्ञानी सगुण भक्ताचीही भक्ति प्रारब्धभोगाचे वेळीं व झोंपेचे वेळीं खंड पावते. पण त्यांचें हें ह्मणणें गैरसमजुतीचें आहे. स्मृतीनें आणि प्रीतीनें असें दोन तऱ्हेनें नित्ययुक्तत्व घडतें असें या श्लोकाचे टीकेचे आरंभींच सांगितलें आहे. एथें भक्तिप्रसंग आहे ह्मणून प्रीतीचा संबंध आहे. विस्मरणानें स्मृति बिघडते तशी प्रीति बिघडत नाहीं. जोंवर अप्रीतीचें उठाण होत नाहीं तोंवर प्रीति बिघडली असें ह्मणवत नाहीं. अप्रीति होणें हाच प्रीतीचा खंड होय. त्याप्रमाणें स्मृतीची विस्मृति होणें हा स्मृतीचा खंड होय. ज्यास प्रीति आहे त्याला विस्मृति झाली तरी विस्मृतीनें अप्रीति झाली असें घडत नाहीं. ह्मणून या प्रकरणीं नित्ययुक्त ह्मणजे ज्या नित्यप्रीतियुक्त सगुण भक्तास आत्मत्वें भजन घडतें तोच होय हें सिद्ध झालें. ह्मणूनच त्यास **एकभक्तियुक्त** असें ह्मटलें आहे. कारण समग्र चराचर सगुण भगवंतच होय व तोच आपला आत्मा होय अशा समजुतीनें तो सर्व काळ त्यास प्रिय असतो. अशा भक्तीनें जो युक्त असतो त्यासच नित्ययुक्त ह्मणावें आणि ह्मणूनच तो भगवंतांनीं श्रेष्ठ मानिला आहे. आर्त, जिज्ञासु व अर्थार्थी यांस आत्मत्व कळलें नसतें ह्मणून त्यांचेकडून ही भक्ति होऊं शकत नाहीं. ज्ञान्याचे हातूनच ती भक्ति होऊं शकते. व ती जो करितो तो भगवंतास अत्यंत प्रिय होतो, यांत नवल तें कोणतें बरें? यावरून बाकीचे तिघे आपल्यास प्रिय नाहींत असें समजूं नये ह्मणून भगवंत यापुढचा श्लोक बोलतात.

**उदाराः सर्व एवैते ज्ञानी त्वात्मैव मे मतम् ।**
**आस्थितः स हि युक्तात्मा मामेवानुत्तमां गतिम् ॥ १८ ॥**

**अर्थ.**–हे सर्वच थोर होत, पण ज्ञानी माझा आत्माच होय, असें मी मानितों, कारण तो युक्तात्मा असून मलाच सर्वांत उत्तम अशी गति मानून माझा आश्रय करितो.

**टीका.**–भगवंताचें भजन करणारे हे चौघेही थोर होत. कारण सर्वांहून त्यास थोर मानून त्याचें भजन ते करूं लागले. त्यांत कोणी सकाम असतात, तरी अल्प काळांतच ते निष्काम होऊन ज्ञान पावतात, व ज्ञानसिद्धि होऊन मुक्त होतात. आर्त गजेंद्र नक्रानें धरिला तेव्हां त्यानें भगवंताचा धावा केला. त्यास दुःखांतून सोडवून त्याचा त्यानें उद्धार केला. बाळध्रुव पदप्राप्तीकरितां भगवंतास शरण गेला, त्याला ध्रुवपद दिलें, व त्यानंतर त्यास मोक्षच होणार. गोपिका भगवंतास विषयासक्तीनें भजल्या. त्यांची कामना पूर्ण करून त्यांस अखेर मोक्षच दिला. अशीं अनेक उदाहरणें इतिहासांत आहेत. याकरितां भगवंतास सकाम भजणारे देखील भाग्यवंतच समजले पाहिजेत. एवंच आर्त, जिज्ञासु आणि अर्थार्थी हे तिघेही थोरच होत, पण ज्ञानी भक्ताची सर त्यांस नाहीं. ज्ञानी भक्त प्रारब्धामुळें लोकांसारखाच वर्ततांना दिसतो, ह्मणून त्याची थोरवी सर्वांस कळत नाहीं. याकरितां भगवंत याविषयीं आपलें मत सांगतात कीं, ज्ञानी केवळ आपला आत्माच होय. याचें कारण त्याची देहात्मता जाऊन त्याचें चित्त नेहमीं आत्मस्वरूपीं युक्त असतें. ह्मणूनच त्यास "**युक्तात्मा**" असें ह्मटलें आहे. "**युक्तात्मा**" हा शब्द ज्ञानी निर्गुणोपासकासही लागू पडतो, ह्मणून तोच येथें वर्णिला आहे, अशी समजूत होईल. ह्मणून "**मामेव आस्थितः**" अशीं पदें घातलीं आहेत, कीं युक्तात्मा असूनही सगुणाचें भजन तो करितो. यावरून समग्रत्वें सगुणाचें भगवद्भावानें भजन करणारा ज्ञानी भक्त बाकीचे तिघांहून श्रेष्ठ आहे असें भगवंत बोलले हें सिद्ध होतें. या ज्ञानी भक्ताचें श्रेष्ठत्व भगवान् श्लोकाचे चतुर्थ चरणांत सांगतात कीं, "**मामेवानुत्तमां गतिं.**" या "**मामेव**" पदेंकरून, सगुण भगवंतासच तो भजतो

असा अर्थ प्रथम दर्शनीं दिसतो, पण तो अर्थ एथें घेतां येत नाहीं. कारण बाकीचे तिघेही इतरदेवताभजन न करितां एकट्या भगवंतासच भजतात. तेव्हां या अर्थानें ज्ञानी भक्तांस कांहींच विशेषत्व येत नाहीं. खरा अर्थ असा कीं, तो भगवंताकरितांच भगवंतास भजतो. ह्मणजे निर्निमित्त भजतो; कारण तो कृतार्थ झाला असल्यामुळें त्यास मोक्षाची अपेक्षा नसते. मोक्षाकरितां जे ईश्वरास भजतात ते ईश्वरभक्त नव्हत, मोक्षभक्त होत. हा अर्थ स्पष्ट दिसत नव्हता ह्मणून "**अनुत्तमां गतिं**" असें ह्मटलें आहे; ह्मणजे भगवंतासच तो सर्वोत्तम गति समजतो. मोक्षाकरितांच तोंड वासणाऱ्या निर्गुणोपासकांस याची सर कशी होणार? अगांतुक ब्राह्मण आणि आदरानें आमंत्रण देऊन बोलाविलेला ब्राह्मण या दोघांस भोजन एकच मिळतें, पण दोघांस सन्मान सारखा नसतो. त्याप्रमाणें निर्गुणोपासकापेक्षां ज्ञानी भक्त अधिक सन्माननीय होय. ज्ञान होऊनही सगुणभक्ति दुर्लभ आहे, हें उत्तर श्लोकानें भगवंत सांगतात.

**बहूनां जन्मनामंते ज्ञानवान्मां प्रपद्यते।**
**वासुदेवः सर्वमिति स महात्मा सुदुर्लभः ॥ १९ ॥**

**अर्थ.**—बहुत जन्मांनंतर ज्ञानवान् सर्वच वासुदेव आहे अशी माझी सगुणभक्ति करूं लागतो. असा माहात्मा फारच दुर्लभ होय.

**टीका.**—शेंकडो जन्मपर्यंत पुण्य केल्यानें ज्ञान व्हावें अशी इच्छा उत्पन्न होते. नंतर शेंकडो जन्मपर्यंत ज्ञानसाधन केल्यावर तें त्यास प्राप्त होऊन तो सर्व सगुण विश्व भगवत्स्वरूपच आहे असें जाणून भगवंताची तशी भक्ति करूं लागतो. सर्वां भूतीं सगुण भगवंतच आहे असें अनुभवानें जाणणारा पुरुष फार विरळा. या भक्तानें कांहींच वर्ज्य राहत नाहीं; सर्वच भगवत्स्वरूप आहे असें वाणतें. निर्गुणोपासक "**सर्वं खलु ब्रह्मैव**" असें ह्मणतो. व सगुणोपासक "**वासुदेवः सर्वमिति**" ह्मणतो. निर्गुण आणि सगुणब्रह्म यांसच जगत्कारणत्व आहे. इतर

देवता कार्यरूपी होत. ह्मणून भजन करणें ते एकट्या सगुण भगवंता-चेंच करावें. कारण निर्गुण निर्धर्म आहे. वेदशास्त्रपुराण भगवंताचेंच भजन करावें ह्मणून सांगत असतां, इतर देवतांचें भजन लोक कां करि-तात याचें कारण आतां भगवंत सांगतात.

**कामैस्तैस्तैर्हृतज्ञाना प्रपद्यंतेऽन्यदेवताः ।**

**तं तं नियममास्थाय प्रकृत्या नियताः स्वया ॥ २० ॥**

**अर्थ.**-निरनिराळ्या कामनांनीं ज्यांचें ज्ञान हरण करून घेतलें आहे असे लोक अन्य देवतांना आपल्या प्रकृत्यनुरूप त्यांच्या भजन नियमाचा आश्रय करून भजतात.

**टीका.**-वेद आणि शास्त्रें यांच्या श्रवणपठनानें जे पुण्यवंत असतात त्यांस ज्ञान प्राप्त होतें. पण जे पापी असतात त्यांस कांहीं एक फायदा नाहीं. ह्मणून ते भगवंताचें भजन करीत नाहींत. पाऊस सर्व ठिकाणीं सारखाच पडतो, पण उखर भूमीवर त्याचा कांहींच उप-योग होत नाहीं. तसें वेदशास्त्रपारंगत होऊनही ते भलत्या मार्गास लागतात. याचें कारण असें कीं, पूर्व संस्कारांमुळें त्यांचे मनाची धांव विषयोपभोगाकडे असते; ह्मणून खऱ्या ज्ञानाकडे त्यांची बुद्धि न वळतां काम्यकर्म करण्याची पद्धत मात्र नीट अवगत करून घेऊन तीं करण्यास ते प्रवृत्त होतात. या ठिकाणीं अशी शंका उत्पन्न होते कीं, भगवं-ताचें भजन श्रेष्ठ आहे तर तेंच करण्याविषयीं तो सर्व जनांस कां लावि-त नाहीं? तिचें समाधान उत्तर श्लोकीं केलें आहे.

**यो यो यां यां तनुं भक्तः श्रद्धयार्चितुमिच्छति ।**

**तस्य तस्याचलां श्रद्धां तामेव विदधाम्यहम् ॥ २१ ॥**

**अर्थ.**-जो जो मनुष्य ज्या ज्या देवतेच्या ठायीं भक्ति ठेऊन

श्रद्धेनें आराधना करूं इच्छितो, त्या त्या देवतेच्या ठायीं त्याची श्रद्धा मी स्थिर करितों.

**टीका.**–देवतांतरें सर्व भगवंताचींच शरीरें होत. परंतु ज्या देवतेच्या ठायीं त्याची भक्ति असेल तिचेच ठायीं त्याची श्रद्धा भगवंत स्थिर करितो. भगवंत कल्पवृक्षस्वभाव आहे, ह्मणून त्यास जें कोणी मागेल तेंच तो त्यास देतो. सम भगवंत विषम फल कसा देईल? फल कर्मानुरूप आहे हें पंचमाध्यायांत सांगितलेंच आहे. बरेंवाईट फळ प्रारब्धानेंच मिळतें. पण मूर्ख लोक तें समजत नाहींत, ह्मणून ह्मसोबा, सटवाई वगैरेस भजतात. चांगलें झालें ह्मणजे देवानें केलें ह्मणतात व त्यांची श्रद्धा जास्त बळकट होते; व वाईट झालें ह्मणजे कपाळावर हात ठेवितात. या मूर्खपणास कोणी काय करावें?

**स तया श्रद्धयायुक्तस्तस्याराधनमीहते ।**
**लभते च ततः कामान्मयैव विहितान्हितान् ॥ २२ ॥**

**अर्थ.**–अशा श्रद्धेनें युक्त होत्साता तो त्या देवतेचें आराधन करितो आणि मीच निर्मिलेलें फळ त्या देवतेपासून तो पावतो.

**टीका.**–गोपींनीं कृष्णप्राप्तीकरितां कात्यायनी देवीची आराधना केली. अखेरीस स्वतः कृष्णानींच येऊन त्यांस वर दिला व मागाहून त्यांस आपल्या विरहाचें दुःख दिलें. या आख्यानावरून भगवंतांनीं हेंच तत्व स्पष्ट करून दाखविलें; पण तें फळ अंतवंत आहे ह्मणून त्यांस विरहजन्य दुःख प्राप्त झालें. हेंच भगवान् पुढील श्लोकांत सांगतात.

**अंतवत्तु फलं तेषां तद्भवत्यल्पमेधसाम् ।**
**देवान्देवयजो यांति मद्भक्ता यांति मामपि ॥ २३ ॥**

**अर्थ.**–पण अशा अल्पबुद्धि मनुष्यांस जें फळ मिळतें तें नाश पावणारें असतें. देवतांचे भक्त देवतांस जाऊन मिळतात व माझे भक्त मला येऊन मिळतात.

**टीका.**–देवतांस भजणारे लोक अल्पबुद्धीचे असतात. त्यांना जें फळ मिळतें तें भगवंतच देतो. देवतांचें यजन करणाऱ्यास त्यांचीच प्राप्ति होते व भगवंताचे भक्त त्यासच जाऊन मिळतात. ह्मणून प्रगल्भ बुद्धीचे मनुष्य भगवंताचें भजन करितात, व मूर्ख लोक देवतांचें भजन करितात. हात, पाय, नाक, डोळे हे एकाच शरिराचे भाग होत. पण डोळ्यांचें काम हात करूं शकत नाहींत. मोक्ष सत्वशुद्धि झाल्याशिवाय होत नाहीं; ती होण्याकरितां शुद्धसत्वोपाधि सगुण भगवंताचेंच भजन केलें पाहिजे. देवताभजन करणारे लोक हें जाणत नाहींत, ह्मणून त्यांना अल्पबुद्धीचे लोक असें ह्मटलें आहे.

आतां देवतांचे देहाप्रमाणेंच भगवंताचा अवतारदेह असतो. तेव्हां भगवंतासच श्रेष्ठत्व कां असावें या शंकेचें निराकरण भगवान् करितात.

**अव्यक्तं व्यक्तिमापन्नं मन्यंते मामबुद्धयः ।**
**परं भावमजानन्तो ममाव्ययमनुत्तमम् ॥ २४ ॥**

**अर्थ.**–मी जो अव्यक्त निराकार तो शरीर पावलों ह्मणून बुद्धिहीन लोक मला इतरांप्रमाणेंच समजतात. ते माझा नित्य आणि अत्युत्तम प्रभाव जाणत नाहींत.

**टीका.**–ज्या मायेंकरून आपण ब्रह्मच आहोंत असा अनुभव राहतो, ती शुद्धसत्वरूपिणी माया होय. तिला अधिष्ठून भगवंत देह धारण करितो ह्मणून तो नित्यमुक्त असतो. परंतु जीवांचे देह त्रिगुणात्मक मायेंकरून बनलेले असतात, ह्मणून अवतारदेह आणि जीवदेह सारखे नाहींत. हा नित्यमुक्ततेचा उत्तम प्रभाव ज्ञानहीन लोक जाणत नाहींत ह्मणून ते अवतारदेहांस आपल्या देहाप्रमाणेंच समजतात. मुक्तता आणि बद्धता हे दोन्हीही कल्पनेचेच खेळ होत. आपण ब्रह्म आहों अशी कल्पना केली ह्मणजे ती कल्पना मुक्ति देते, व आपण देह

आहों अशी कल्पना संसारबंधांत घालिते. या दोन्हीही कल्पनाच होत, ह्मणून त्या सारख्याच आहेत काय? गांवच्या भिकाऱ्याप्रमाणेंच राजाचें शरीर असतें, ह्मणून राजा आणि भिकारी सारखा होईल काय? राजाचें अंगीं भिकाऱ्याचें दारिद्य हरण करण्याची शक्ति असते. तशीच जीवांचें संसारदुःख हरण करण्याची शक्ति भगवंताचे अंगीं आहे. या प्रभावास मूढ लोक जाणत नाहींत ह्मणून भगवंताचे अवतारदेह व इतर देह ते सारखे मानितात असें भगवान् सांगतात.

**नाहं प्रकाशः सर्वस्य योगमायासमावृतः ।**
**मूढोऽयं नाभिजानाति लोको मामजमव्ययम् ॥ २५ ॥**

अर्थ.–योगमायेनें मी झांकला गेलों आहे ह्मणून मी सर्वांना प्रगट दिसत नाहीं. मी अज अव्यय असा आहे हें हे मूढ लोक जाणत नाहींत.

टीका.–ज्या सामर्थ्यानें जगांत भगवंताचा वास आहे त्याच सामर्थ्यानें तो अवताररूपीं असतो. पण अविद्येमुळें अंध झालेल्या जनदृष्टीस तो अज अव्यय आहे असें दिसत नाहीं. हीच त्यांची अविद्या नाहींशी झाली ह्मणजे त्यांस ज्ञानदृष्टि येते व तिनें ते भगवंतास जाणूं शकतात.

**वेदाहं समतीतानि वर्तमानानि चार्जुन ।**
**भविष्याणि च भूतानि मां तु वेद न कश्चन ॥ २६ ॥**

अर्थ.–हे अर्जुना, मागें होऊन गेलेलीं, हल्लीं आहेत तीं व पुढें होणारीं सर्व भूतें मी जाणतों, पण मला कोणी जाणत नाहीं.

टीका.–भगवंत सर्वज्ञ आहे व जीवगण अज्ञ आहे असें या श्लोकानें दर्शविलें आहे. जीवगणाचे अज्ञानाचें कारण पुढील श्लोकांत सांगितलें आहे.

**इच्छाद्वेषसमुत्थेन द्वंद्वमोहेन भारत ।**
**सर्वभूतानि संमोहं सर्गे यांति परंतप ॥ २७ ॥**

**अर्थ.**–अर्जुना, इच्छा आणि द्वेष यांपासून उत्पन्न होणाऱ्या सुख-दुःखरूप द्वंद्वामुळें या देहीं त्यांचें मन भ्रांत झालें आहे.

**टीका.**–मनुष्य जन्मल्याबरोबर मी देह अशी त्यास भ्रांति पडते याचें कारण पूर्वजन्मींचा द्वंद्वमोह होय. आवडी आणि अनावडी यामुळें कर्म होतें. तें भोगण्याकरितां देहांतर घडतें. अशा देहीं आपण कोण हें तो जाणत नाहीं, मग तो दुसऱ्यास काय जाणील? एवं आपण सर्वज्ञ आणि अविद्योपाधि जीव अज्ञ असें एथपर्यंत भगवंतांनीं वर्णन करून सांगितलें. असे अज्ञ जीवही भगवद्भजनेंकरून सर्वज्ञ होतात. ती भजन-रीति पुढल्या श्लोकीं व्यक्त केली आहे.

**येषां त्वंतगतं पापं जनानां पुण्यकर्मणाम् ।**
**ते द्वंद्वमोहनिर्मुक्ता भजंते मां दृढव्रताः ॥ २८ ॥**

**अर्थ.**–पुण्य कर्म आचरल्यानें ज्यांचीं पातकें नष्ट झालीं आहेत असे लोक सुखदुःखादिकांच्या मोहापासून मुक्त होऊन दृढ निश्चयानें मला भजतात.

**टीका.**–ज्याच्या पदरीं पापाचें गाठोडें आहे ते भगवंतास भजत नाहींत असें यापूर्वीं सांगितलेंच आहे. पापाचा क्षय पुण्य कर्म केल्या-शिवाय होत नाहीं. तो झाला ह्मणजे मनुष्य भगवंतास भजूं लागतो. असें भजन निश्चयानें सारखें चाललें ह्मणजे सुखदुःखरूपी मोहाचा नाश होतो व चित्त शुद्ध होऊन त्यास ज्ञान प्राप्त होतें. तदनंतरही ज्ञानयुक्तभक्ति करून ते मुक्त होतात. हेंच भगवंत यापुढें सांगणार आहेत.

**जरामरणमोक्षाय मामाश्रित्य यतंति ये ।**
**ते ब्रह्म तद्विदुः कृत्स्नमध्यात्मं कर्म चाखिलम् ॥ २९ ॥**

**अर्थ.**–म्हातारपण आणि मृत्यु यांपासून सुटण्याकरितां जे माझा

आश्रय करून यत्न करितात ते ब्रह्म जाणतात. सर्व अध्यात्म जाणतात, आणि सर्व कर्म जाणतात.

टीका.–अविद्येपासून मुक्त होण्याची इच्छा उत्पन्न होणें या दशेस जिज्ञासुदशा ह्मणतात. अशी जिज्ञासा जरामरणांचें दुःख वाटूं लागल्यावांचून होत नाहीं. जन्मभर जरी सुख वाटलें तरी ह्मातारपणीं दुःख आठवतेंच कित्येक भाग्यवंतांस त्याचा अनुभव झाला नाहीं, तरी मरणाचें दुःख कोणासच चुकत नाहीं. मरणकालीं दुःख होऊन जिज्ञासा उत्पन्न झाली तरी काय उपयोग? कांहीं नाहीं. मेल्यावर पूर्वकर्मामुळें पुनः देह मिळाला कीं, "ये रे माझ्या मागल्या" या ह्मणीप्रमाणें मनुष्य पुन्हां मोहानें पूर्ववत् मूर्ख बनतो. याकरितां जिज्ञासा लवकरच उत्पन्न झाली पाहिजे. अस्तु, पुण्यकर्माचरणानें पापाचा नाश होऊन भगवद्भजनानें जिज्ञासा उत्पन्न झाली ह्मणजे यत्नांतीं ईशप्रसादानेंच त्यास ब्रह्मविद्या प्राप्त होते व तो ब्रह्म जाणतो. हें जाणण्याचे दोन प्रकार आहेत. एक केवळ ब्रह्माचें ज्ञान ह्मणजे व्यतिरेकज्ञान व दुसरें "कृत्स्नं" ह्मणजे सर्व ब्रह्म असें अन्वयज्ञान. तो अध्यात्मही जाणतो आणि कर्मही जाणतो असें भगवान् ह्मणतात. आणखीही जें तो जाणतो तें पुढील श्लोकांत सांगितलें आहे.

**साधिभूताधिदैवं मां साधियज्ञं च ये विदुः ।**
**प्रयाणकालेऽपि च मां ते विदुर्युक्तचेतसः ॥ ३० ॥**

अर्थ.–ते अधिभूतांसहित अधिदैवास व अधियज्ञासहित अधिदैवास जाणतात, व प्रयाणकालाच्या ठायीं देखील माझे ठायीं चित्त ठेवून ते मला जाणतात.

टीका.–अधिभूत ह्मणजे नश्वर दृश्य, अधिदैव ह्मणजे जीवपुरुष, आणि अधियज्ञ ह्मणजे सर्वसाक्षी ईश्वर असा अर्थ आहे. यांपैकीं या पुरुषास जाणावयाचें तें, अधिभूत नश्वर जडासहित व अधियज्ञ ईश्वरा-

सहित जाणावें असें भगवान् सांगतात. या तीन शब्दांचा वरप्रमाणें इतर टीकाकारांनीं अर्थ केला नाहीं. मागील श्लोकांतील ब्रह्म, अध्यात्म, कर्म आणि ह्या श्लोकांतील अधिभूत, अधिदैवत आणि अधियज्ञ या शब्दांचे अर्थ पुढील अध्यायांत भगवान् स्पष्ट करणार आहेत. परंतु या श्लोकाची टीका करण्याकरितां तूर्त या श्लोकांतील तिन्ही शब्दांचा संक्षिप्त अर्थ वर दर्शविला आहे. अधिभूतासहित अधिदैवत जाणणें ह्मणजे नश्वर देह ज्यांत पुरुष ( जीव ) निद्रित असतो, त्यासह जीवाचें स्वरूप जाणणें होय. त्याचप्रमाणें अधियज्ञ म्हणजे ईश्वर, ज्याचें प्रतिबिंब जीव आहे, त्यासहित जीवाचें स्वरूप जाणण्यास साधियज्ञ अधिदैव समजावें. असा या "स" कारामुळें अर्थबोध होतो. जडनिषेधावांचून जीवाचें स्वरूप कळत नाहीं, आणि ईश्वरबिंबावांचूनही प्रतिबिंबाचें ( जीवाचें ) स्वरूप कळत नाहीं. हें दाखविण्याकरितां "**साधिभूताधिदैवं साधियज्ञं च विदुः**" असें भगवान् बोलतात. जे त्याला अशा रीतीनें जाणतात तेच प्रयाणकालीं त्याला जाणतात, असें उत्तरार्धीं ह्मटलें आहे. "**विदुः**" याचा अर्थ "स्मरतात" असा कित्येक टीकाकारांनीं केला आहे. कोणतीही गोष्ट जाणल्याशिवाय तिचें स्मरण होत नाहीं हें खरें आहे. तथापि विस्मरणही, जी गोष्ट जाणली, तिचेंच होतें. ह्मणून येथें विसरतात असा अर्थ कां घेऊं नये असा सहज अपवाद येतो. यावरून "जाणणें" याचा अर्थ "**स्मरणें**" असा करणें ह्मणजे व्यर्थ जीव कासावीस करणें होय. आहे तसा शब्द वाखाणिला असतां योग्य अर्थ जर होत असेल, तर ही ओढाताण किमर्थ पाहिजे ? अस्तु. एथें जो मोक्ष सांगितला आहे तो निर्गुणमोक्ष होय, असें कोणी ह्मणतात. पण तसें होऊं शकत नाहीं. प्रयाणकालीं निर्गुणोपासक केवळ ब्रह्मरूपच उरतो. त्या स्थितींत मुक्तिसुखाचा अनुभव नाहीं; आणि श्लोकांत तर भगवान् ह्मणतात कीं, प्रयाणकालीं ते जाणतात. यावरून सगुण मोक्षच सिद्ध होतो.

"प्रयाणकालेऽपि" याचा अर्थ "प्रयाणकाले सत्यपि" असा घेतला ह्मणजे सर्व नीट जुळतें. या "अपि" शब्देंकरून निर्गुणमोक्षांत जाणणें नाहीं असें सुचवून, भक्त त्याला मुक्तींतही जाणतात असें भगवंत दर्शवितात. यावरून तर सगुणमोक्ष स्पष्ट सिद्ध होतो. या अध्यायांत सगुणभक्तीचेंच वर्णन केलें आहे व अखेरही त्यांतच झाली आहे.

याप्रमाणें सातव्या आध्यायाची टीका पूर्ण संपूर्ण झाली ती भगवच्चरणीं अर्पण असो.



श्री.

# अध्याय ८ वा.

ॐ नमो भगवते वासुदेवाय.

भगवंताचे भक्त ब्रह्मास सात प्रकारें जाणतात, असें मागील अध्यायाच्या शेवटल्या दोन श्लोकांत सांगितलें. त्यावरून तीं सात प्रकारचीं लक्षणें समजून घेण्याकरितां आतां अर्जुन प्रश्न करील, त्या सर्वांचें सविस्तर उत्तर देऊन भगवंत अर्जुनास अपरोक्षब्रह्मानुभव देतील.

**किं तद्ब्रह्म किमध्यात्मं किं कर्म पुरुषोत्तम ।**
**अधिभूतं च किं प्रोक्तमधिदैवं किमुच्यते ॥ १ ॥**
**अधियज्ञ कथं कोऽत्र देहेऽस्मिन्मधुसूदन ।**
**प्रयाणकाले च कथं ज्ञेयोऽसि नियतात्मभिः ॥ २ ॥**

**अर्थ.**—हे कृष्णा, हें केवळ ब्रह्म व सर्व ब्रह्म कसें, अध्यात्म ह्मणजे काय, व कर्म ह्मणजे काय; अधिभूत कशाला ह्मणावें व अधिदैव कशाला ह्मणावें हें सांग. या देहांत अधियज्ञ कोण व कसा व ज्यांनीं चित्ताचें नियमन केलें आहे असे लोक प्रयाणकालीं तुला कसें जाणतात, हें सर्व सांग.

**टीका.**—"**अधियज्ञ या देहांत कोण व कसा**" आणि "**प्रयाणकाळीं तुला कसें जाणतात**" हीं दोन शंकेचीं स्थळें आहेत. अधियज्ञ देहांत असतो व प्रयाणकालीं भक्त आपल्यास जाणतात असें भगवान् बोलले नसून अर्जुनाचा प्रश्न वरप्रमाणें कसा झाला, अशा शंका उत्पन्न होतात. त्यांचें समाधान असें कीं, अर्जुनास कागदोपत्रीं उपदेश केला

नाहीं; तर समक्षासमक्ष बोलून केला. बोलतांना नेत्र-व हस्त यांनी भगवंतांनीं केले त्यावरून अर्जुनाची समजूत वरप्रमाणें झाली ह्मणून त्यानें तसा प्रश्न केला.

या प्रश्नांचें उत्तर यापुढें भगवान् देतात.

अक्षरं ब्रह्म परमं स्वभावोऽध्यात्ममुच्यते ।
भूतभावोद्भवकरो विसर्गः कर्मसंज्ञितः ॥ ३ ॥

**अर्थ.**–ब्रह्म अक्षर आहे व परम आहे. अध्यात्म ह्मणजे स्वभाव, भूतें आणि त्यांचा भाव ज्यामुळें उत्पन्न होतो तो विसर्ग, त्यासच कर्म असें ह्मटलें आहे.

**टीका.**–अर्जुनानें सात प्रश्न केले त्यांतील पहिला प्रश्न ब्रह्म काय, याचें उत्तर, भगवान् देतात कीं, ब्रह्म अक्षर आहे व परम आहे. जें नश्वर नव्हे तें अक्षर होय. जड सृष्टि नश्वर आहे. हा जड भाग निषेधिला असतां जें शिल्लक राहतें तेंच अक्षरब्रह्म होय. तें शब्दाच्या पलीकडे आहे. शब्द तेथें जाऊं शकत नाहीं. बुद्धीनेंच तें जाणतां येतें ह्मणून तें ब्रह्म ह्मणजे आत्मा अनिर्वाच्य आहे असें ह्मणतात. क्षरभागाचा निषेध केला असतां अक्षरब्रह्म कळतें. याप्रमाणें क्षराक्षरांचा विचार करणें यास व्यतिरेक ह्मणतात. या विचारानें अर्जुनास आत्मानुभव झाला. शब्दांनीं सांगितल्याबरोबर अनुभव होण्यास शिष्याची पात्रता पाहिजे किंवा गुरु समर्थ पाहिजे. या दोन्हीही गोष्टी अर्जुन शिष्य आणि कृष्ण गुरु यांचे ठायीं पूर्ण होत्या. तेव्हां अर्जुनास आत्मसाक्षात्कार झाला याचें नवल नाहीं. या बोधानें निखळ ब्रह्माचें स्वरूप कळून, आपण कोण हें अर्जुनास समजलें; व त्यामुळें अविद्येचें आवरण नाहींसें झालें. एवढ्यानें अद्वैतबोध टिकत नाहीं, कारण जड भागाचा भास इंद्रियविकार उत्पन्न करितो व द्वैत भासवितो. या अविद्येचे प्रकारास विक्षेप ह्मणतात. तो नाहींसा झाल्या-

खेरिज पूर्णाद्वैत बिंबत नाहीं. सोनेंच अलंकाररूपानें दिसतें, तसें ब्रह्मच सृष्टिरूपें दिसतें अशी पक्की समजूत बुद्धीनें घेतली ह्मणजे विक्षेपाचा नाश होतो. अशा बोधास अन्वयबोध ह्मणतात. तो "**परमं ब्रह्म**" या शब्दांनीं केला आहे. कारणामुळें कार्य उत्पन्न होतें, ह्मणून कार्याहून कारण परम ह्मणजे श्रेष्ठ होय. ब्रह्म हें कारण आहे व सकळ सृष्टि त्याचें कार्य आहे. तंतूचें कार्य पट, मातीचें कार्य घट व सोन्याचें कार्य अलंकार होत. या सर्व कार्यांत कारण आहे, त्याप्रमाणें सर्व जड सृष्टींत अक्षर असें ब्रह्म आहे. पासोडी पाहिल्याबरोबर ही पासोडी नव्हे, परम असा तंतुच आहे, अशी समजूत झाली ह्मणजे पासोडी आणि तंतु हें द्वैत राहत नाहीं. त्याप्रमाणें सर्व जड सृष्टि परमब्रह्मच आहे अशी समजूत बाणली ह्मणजे सर्वच ब्रह्मरूप वाटूं लागतें, तेव्हां पूर्ण अद्वैत बाणलें असें समजावें. अशा अन्वयबोधाचा उपदेश "**परमं ब्रह्म**" या शब्दांनीं भगवंतानीं अर्जुनास केला आहे.

दुसरा प्रश्न अध्यात्म ह्मणजे काय याचें उत्तर "**स्वभाव**" असें दिलें आहे. स्वभाव ह्मणजे आपला भाव. परम शब्दानें कार्य तितकें कारणच होय असा अद्वैतबोध केला, तोच अध्यात्मशब्दानें दृढ केला आहे. हें जड जग, आपलेंच ह्मणजे आत्म्याचेंच कार्य आहे असा "**स्वभाव**" याचा अर्थ आहे. जड जग सर्व ब्रह्म आहे असें आपण पाहूं लागलों तरी आपण निराळे, व जडजगब्रह्म निराळें असें द्वैत राहील, ह्मणून ब्रह्म आपणच आहों व जडजग आपलाच भाव ह्मणजे कार्य आहे, हें समजण्याकरितां "**अध्यात्म**" शब्दाची योजना भगवंतांनीं केली आहे. याप्रमाणें पहिल्या प्रश्नाचें उत्तर, ब्रह्म दोन प्रकारांनीं सांगून दिलें व दुसऱ्या प्रश्नाचे उत्तरानें तेंच दृढ केलें. हें चित्स्वरूप जग आत्माच होय अशा अनुभवास अध्यात्म ह्मणतात. जडीं चैतन्याचें स्फुरण होणें यास जडब्रह्मैक्य ह्मणतां येईल, परंतु अशा अनुभवानें आपण निराळे राहूं, ह्मणून आपणच सर्व आहों असा अनुभव झाला पाहिजे.

हे दोन्हीही अनुभव स्पष्ट दाखविण्याकरितां "परम" आणि "अध्यात्म" या दोन शब्दांची योजना केली आहे.

आतां कर्म ह्मणजे काय याचा विचार करूं. भूतें ह्मणजे पंचभूतें व त्यांचे भाव ह्मणजे भूतांश देह होत; यांचा उद्भव ह्मणजे कारण. या कारणासही जें निर्माण करितें त्यास विसर्ग असें ह्मटलें आहे. यांत फार गहन भाव आहे. या विसर्गास कर्म ह्मटलें तेंच ब्रह्म होय असें जाणावें, कारण सर्व ब्रह्म आहे हें पूर्वींच सांगितलें आहे. या ब्रह्मांतच सर्व कर्म आटतें, व कर्मही ब्रह्मच आहे असें वाटतें; कारण कार्य तितकें शेवटीं कारणींच मिळतें. आतां "**विसर्ग**" आणि "**उद्भव**" यांचा अर्थ एकच दिसतो, तेव्हां "**उद्भवास उद्भव करितो**" असें यावरून होतें. हें बोलणें असंबद्ध आहे व भगवान् असें बोलणार नाहींत, ह्मणून विसर्ग शब्दाचा खरा अर्थ शोधून काढला पाहिजे. देह आणि भूतें यांचे उपजण्याचे कारणासच विसर्ग ह्मटलें आहे. यावरून विसर्ग ह्मणजे जगाचें निमित्त कारण जो सृष्टिकाळ तो होय. घागर तयार होण्यास माती आणि कुंभार हीं दोन कारणें असतात. त्यांत कुंभार निमित्त कारण व घटांत सर्वत्र असणारी माती उपादान कारण होय. तसा विसर्ग निमित्त कारण व ब्रह्म उपादान कारण होय. अनादिसृष्टिकाळ प्राप्त झाला ह्मणजे "**काळ**" प्रथम प्रगट होतो, व महत्तत्वादि कारणें उपजतात. त्या महदादिकांपासून पंचभूतें उत्पन्न होतात; व त्यांपासून भूतांश देह उत्पन्न होतात. या देहांसच भाव ह्मटलें आहे. यावरून उद्भव शब्दानें महदादिक सुचविले आहेत. या उद्भवास ह्मणजे महदादिकांस सृष्टिकाळ उत्पन्न करितो ह्मणून त्यास विसर्ग ह्मणावें. या विसर्गासच कर्म ह्मटलें आहे. कारण सर्व कर्म सृष्टिकाळांत संपतें; ह्मणजे जीव कर्मानुसार देह धारण करितात व त्याप्रमाणें पुढें कर्मही करूं लागतात. एवंच कर्म विसर्गापर्यंत गेलें. या विसर्गांतच जीव, काळ, ईश्वर,

कर्तृत्व या सर्वांचा समावेश होतो, तें कर्म ( विसर्ग ) ब्रह्माचे टायीं पाहिलें म्हणजे किरणांत जसें मृगजळ असतें तसें तें वाटतें, व किरणच मृगजळरूपानें भासतें, तसें ब्रह्मच सृष्टिरूपानें भासत आहे अशी खात्री होते. याप्रमाणें अर्जुनाच्या तीन प्रश्नांचीं उत्तरें भगवंतांनीं दिलीं. पुढल्या श्लोकीं आणखी तीन प्रश्नांचीं उत्तरें दिलीं आहेत.

**अधिभूतं क्षरो भावः पुरुषश्चाधिदैवतम् ।**
**अधियज्ञोऽहमेवात्र देहे देहभृतां वर ॥ ४ ॥**

**अर्थ.**–हे मनुष्यश्रेष्ठ अर्जुना, सर्व भूतांत जो नश्वर भाव असतो त्यास अधिभूत म्हणावें आणि अधिदैवत म्हणजे पुरुष होय. या देहाचे ठायीं असणारा अधियज्ञ म्हणजे विष्णु मीच होय.

**टीका.**–" **अक्षरं ब्रह्म** " हें सांगितल्यानेंच जड सृष्टीचा भाव नश्वर असतो असें पूर्वीच अर्जुनास कळलें होतें, मग पुनः तेंच सांगण्याचें प्रयोजन काय, हें सातवे अध्यायाचे अखेरचे श्लोकांतील " **साधिभूताधिदैवं मां साधियज्ञं च ये विदुः** " या अर्धावरून कळेल. त्या अर्धांत देव असें बोलले कीं, अधिभूतांसहित अधिदैव जाणावें. अधिदैव अधियज्ञाचा प्रतिबिंबांश ह्मणून अधिभूतांहून धर्मानें विलक्षण नाहीं, हें येथें सुचविलें आहे. हेंच पुढें " **द्वाविमौ पुरुषौ लोके** " या श्लोकानें भगवान् स्पष्ट करून सांगणार आहेत. ब्रह्माप्रमाणेंच प्रतिबिंबांश पुरुष अक्षर आहे, शरिराप्रमाणें नश्वर नाहीं, असें दुसऱ्या अध्यायांतही थोडक्यात सांगितलें आहे, तें वाचकांच्या लक्षांत असेल. एथें नुसतें " **क्षर** " न ह्मणतां " **क्षरभाव** " असें म्हटलें आहे, यांत मोठा गहन अर्थ आहे. तो असा कीं, भूतांचा भासमात्र भाव नश्वर आहे; वस्तुतः तें ब्रह्मच होत. तमाशांतील नाच्या पोऱ्या स्त्रीवेषानें लुगड्याचा पदर डोक्यावर घेऊन, खोटा स्त्रीभाव दाखवितो. तोच स्त्रीवेष टाकून पुरुषभाव दाखविल्याबरोबर तो नाहींसा होतो. पाण्याचेच तरंग होतात, पण त्याचा

भाव ह्मणजे आकार नश्वर असतो; पाण्यास नश्वर ह्मणतां येत नाहीं याच अर्थानें अधिभूतांस क्षरभाव असें ह्मटलें आहे. या क्षरभावास-हित अधिदैवास जाणावें असें सप्तमाध्यायांतीं सांगितलें आहे. एवंच व्यापक असें जें अक्षर ब्रह्म त्याचाच भाव नश्वर अधिभूत होय. यासच नवद्वार पुरदेह ह्मणतात व सकळ इंद्रियांचीं दैवतें अधिष्ठून जो जीव देहांत वास करितो त्यास अधिदैव असें ह्मणतात; कारण तो सकळ इंद्रियांना जीववितो. जीव नाहींसा झाला ह्मणजे इंद्रियांचे देव कांहीं करूं शकत नाहींत. तो देह मग शवरूप होतो. ह्मणून सर्वांना जीवविणारा एकटा जीव होय. तो नष्ट झाला ह्मणजे देहास व्यापून असलेलें ब्रह्म शवाचा नश्वर भाव दाखवितें. यावरून सर्वव्यापक ब्रह्म, देहीं असूनही कांहीं करित नाहीं; अधिदैव जीवच देहास जीववितो. याप्रमाणें चवथ्या आणि पांचव्या प्रश्नांचें उत्तराचा खुलासा झाला. आतां "**अधियज्ञोऽहमेवात्र**" याकडे वळूं.

अधियज्ञ ह्मणजे सगुण ईश्वर. "सर्व जगतांत जसा तो आहे तसाच तुझ्या देहांत आहे व तो मीच आहें" असें भगवान् अर्जुनास सांगतात. अर्जुनाच्या देहांत तो जसा आहे तसा सर्व देहीं नाहीं हें दाखविण्याकरितां "**देहभृतां वर**" असें अर्जुनास संबोधिलें आहे. यामुळें फक्त अर्जुनासच याप्रमाणें गौरविलें असें नाहीं, तर सर्व भक्तांस गौरविलें असें समजावें. ईश्वर सर्वांच्या हृदयांत असून, भक्तांसच कां प्रसन्न असावा बरें? कल्पवृक्षाखालीं बसून कोणी मिठावांचून कष्टानें जेवित असला, तरी मागितल्याशिवाय त्यास मीठ मिळत नाहीं. भगवंत कल्पवृक्षस्वभाव आहे, असें वारंवार सांगण्यांत आलें आहे. तो जरी सर्व देहांत आहे, तरी जो कोणी "**विषयवासना नको. देवा, तुझी भक्ति दे**" अशी त्याची प्रार्थना करील त्यास देव ती देईल; व तोच देहधाऱ्यांमध्यें श्रेष्ठ होय. एथपर्यंत अर्जुनानें केलेल्या सहा प्रश्नांचीं उत्तरें दिलीं. सातव्या प्रश्नाचें उत्तर पुढील श्लोकांत दिलें आहे.

**अंतकाले च मामेव स्मरन्मुक्त्वा कलेवरम् ।**
**यः प्रयाति स मद्भावं याति नास्त्यत्र संशयः ॥ ५ ॥**

**अर्थ.**—अंतकाळीं जो माझेंच स्मरण करित देह सोडून जातो, तो माझ्या भावातें पावतो, यांत शंका नाहीं.

**टीका.**— "**प्रयाणकालेऽपि च मां ते विदुः**" याचा अर्थ अर्जुनास समजला नाहीं. ह्मणून त्यानें प्रश्न केला कीं "**भक्त प्रयाणकालीं तुला कसें जाणतात?**" त्याचें उत्तर हें आहे कीं, देह सोडतांना जे भगवत्स्मरण करितात, ते सगुण मोक्षच पावतात; ह्मणजे सगुण भगवद्रूप नित्यमुक्त होतात. ते निर्गुण मोक्ष पावत नाहींत, हें "**नास्त्यत्रसंशयः**" या पदेंकरून सुचविलें आहे.

**यं यं वापि स्मरन्भावं त्यजत्यन्ते कलेवरम् ।**
**तं तमेवैति कौंतेय सदा तद्भावभावितः ॥ ६ ॥**

**अर्थ.**—ज्या भावाचें नेहमीं चिंतन घडतें, त्याच भावाचें स्मरण अंतकाळीं देह सोडितांना होतें; व त्याच भावाप्रत तो मनुष्य पावतो.

**टीका.**—ज्ञानी असो अथवा अज्ञानी असो, मरणकाळीं त्यास जें आठवतें तेंच रूप त्यास मिळतें, असा अनादिप्रवाह चालत आलेला आहे. यांत कधींही अंतर पडणार नाहीं. ह्मणून भगवत्स्वरूपाची आठवण देहावसानीं झाली तर तो मनुष्य त्या स्वरूपास पावतोच. यावरून पूर्वश्लोकीं "**मद्भाव**" ह्मणून भगवंत बोलिले त्याचा अर्थ भगवंताचें सगुण स्वरूप असा होतो. ज्याला ज्या मोक्षाची अगर देवतेची अपेक्षा असेल त्याला दुसऱ्या मोक्षाची अथवा देवतेची देहावसानीं आठवण झाली, तर त्याचे इच्छेविरुद्ध त्यास कदाचित् गति मिळेल, अशी शंका न यावी ह्मणून भगवान् ह्मणतात कीं, जो ज्या भावानें नेहमीं चिंतन करील त्यास तो भाव अंतीं आठवेल, दुसरा आठवणार नाहीं.

**तस्मात्सर्वेषु कालेषु मामनुस्मर युध्य च ।**
**मय्यर्पितमनोबुद्धिर्मामेवैष्यस्यसंशयः ॥ ७ ॥**

**अर्थ.**—ह्मणून सर्व काळीं माझे ठिकाणीं मन आणि बुद्धि ठेवून माझें स्मरण ठेव आणि युद्ध कर.

**टीका.**—ज्ञानेंकरून मुक्ति मिळते; व त्या मुक्तींतही भजनसुख मिळतें. देहावसानीं सगुण भगवंताचें स्मरण झालें, तर सगुण मोक्ष मिळून ही स्थिति प्राप्त होते. स्मरणास कारणीभूत प्रीति आहे व ज्याची प्रीति असते, त्याची अंतीं स्मृति होऊन तीच गति प्राप्त होते. याकरितां सर्व काळीं प्रीतीनें माझें स्मरण करित जा असें भगवान् या श्लोकीं सांगतात. भगवंताचे स्मरणास सर्व काळ योग्य आहे. भगवंताची भक्ति नऊ प्रकारची आहे:—श्लोक—**श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनम् । अर्चनं वंदनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम् ॥ अर्थ.**—श्रवण, कीर्तन, स्मरण, पादसेवन, अर्चन, वंदन, दास्य, सख्य आणि आत्मनिवेदन. यांपैकीं कोणतीही भक्ति स्मरणावांचून घडूं शकत नाहीं, ह्मणून ही भक्ति सर्व भक्तींचें जीवन होय. मग या नवांत हिचाही समावेश कां केला, असें कोणी ह्मणेल, तर त्यास उत्तर असें आहे कीं, तुपाचेच केलेले पदार्थ जेवणांत असले, तरी तूप म्हणून निराळें वाढलेंच पाहिजे. तद्वत् ही भक्ति नवांत दाखविली आहे. सतत स्मरणानें जिवंतपणींच किडयाचा भिंगोटा होतो, असें आपण पाहतों. तेव्हां मेल्यावर स्मरणाप्रमाणें गति मिळेल याची शंका कां असावी ? ज्ञानी भक्त निर्गुणत्वेंच सगुणचिंतन करितो, यामुळें त्याचें अंतःकरण निर्गुणस्वरूप बनतें व देह जिवंतपणींच सगुणरूप बनतो. हें ऐकून अर्जुन कृष्णरूप झाला व निजानंदीं गुंग बनला. परंतु त्याचें प्रारब्ध अद्यापि सरणें होतें. कौरववध व राज्योपभोग त्यास घडणें होता, हें सर्वसाक्षी भगवंत जाणत होता, ह्मणून युद्ध करण्याविषयीं त्यास आज्ञा केली. गुरूची आज्ञा सच्छिष्यास मान्यच असते. त्याप्रमाणें अर्जुनासही युद्ध करावें असें वाटलें. परंतु मनांत दुःखित झाला कीं, युद्धाचे गडबडींत स्मरणभक्ती-

चा लाभ अंतरेल. हें भगवंतांनीं जाणून उत्तरार्धीतील उपदेश केला कीं, "**मन आणि बुद्धि माझे ठिकाणीं ठेऊन युद्ध कर, ह्मणजे मलाच पावशील यांत संशय नाहीं.**" एकली बुद्धि अर्पण केली असतां मनाचेंही अर्पण होतेंच. मग दोहींचेंही अर्पण कर असें भगवंत कां बोलले अशी शंका सहज उद्भवते. तिचें निवारण करणें भाग आहे. कोणतेंही कर्म करित असतांना मनास त्याचें एकट्याचें स्मरण असतें; बाकी गोष्टींचें त्या वेळेस त्यास विस्मरण होतें, हा त्याचा सहज धर्म आहे. कर्मांत मन गढलें म्हणजे ज्या हेतूनें तें कर्म आरंभिलें असतें त्याचीही मनास आठवण नसते. परंतु तो हेतु कर्म करिते वेळेस जरी स्फुरत नाहीं, तरी त्याचा संस्कार गुप्त रूपानें बुद्धींत त्या वेळीं असतोच. ज्या गोष्टींत सुख आहे, असा निश्चय बुद्धि करिते, त्याव्यतिरिक्त इतर कामें करण्याकडे जरी मनास लाविलें, तरी तें काम संपल्याबरोबर जेथें बुद्धीचा निश्चय असतो तेथेंच येऊन तें चिकटतें. युद्धाचे वेळीं मन तिकडे गेलें तरी बुद्धीच्या आशयांत तें असतेंच. हें अर्जुनास कळून त्याचा खेद नाहींसा व्हावा या हेतूनें बुद्धि आणि मन दोन्ही अर्पण करून यद्ध कर असें भगवंत बोलले. आपला साह्यकारी ह्मणून ज्यावर आपला भरंवसा असतो, त्याचेंच स्मरण संकटकाळीं होतें. सर्व संकटांहून मरणसंकट अति कठिण आहे. त्या वेळीं ज्याचा भगवच्चरणीं दृढ भरंवसा असेल, तो त्यास स्मरेल याविषयीं शंकाच नाहीं व ज्याचें स्मरण अंतकाळीं होईल त्या भावास तो मनुष्य जातो, हें यापूर्वींच सांगितलें आहे; ह्मणून सर्व काळ भगवंताचें स्मरण ठेवण्याची संवय अगत्य असावी. याप्रमाणें बुद्धीचा निश्चय असल्यावर मनास स्मरण होणारच. ज्ञानाशिवाय मुक्ति नाहीं, तेव्हां नुसत्या स्मरणानें मुक्ति नाहीं, हें उघड आहे. ह्मणून मुक्तिदायक स्मरण कोणतें हें आतां भगवान् सांगतात.

**अभ्यासयोगयुक्तेन चेतसा नान्यगामिना ।**
**परमं पुरुषं दिव्यं याति पार्थानुचिंतयन् ॥ ८ ॥**

**अर्थ.**—आपलें चित्त दुसरे कोणतेही ठिकाणीं जाऊं न देतां अभ्यासाचे साधनानें योगयुक्त करून दिव्य अशा परम पुरुषाचें चिंतन केलें असतां त्याच्याच स्वरूपास तो पावतो.

**टीका.**—चित्तास आत्मस्वरूपीं योजण्याचा जो अभ्यास त्यास **अभ्यासयोग** ह्मणतात. ज्ञानी सगुणभक्तानें आपलें चित्त याप्रमाणें स्वरूपीं योजून परम पुरुष जो सगुण भगवंत त्याचें ध्यान करावें. ज्या ज्या विषयांचें स्मरण ज्ञान्यास होतें, त्या त्या ठिकाणीं प्रथम दर्शनीं चिदात्मतत्वाचें स्फुरण होतें. परंतु अविद्यासंस्कार सर्वांशीं नष्ट झाला नसेल तर ती स्मृति कायम राहत नाहीं. याकरितां योगयुक्त होऊन साकार सगुण भगवंताचें ध्यान करावें. कारण इतर साकार वस्तूंप्रमाणें साकार परम पुरुष अविद्याकृत नसतो; निर्दोष चित्स्वरूपरूप असल्यामुळें तो नित्यमुक्त असतो. चराचर हीं चित्स्वरूप आहेत. परंतु जीव त्यांस जडरूप मानितात. साकार सगुण स्वरूप तसें नाहीं. त्याचें ध्यान केल्यानें निर्गुणाचाच प्रत्यय होतो. आकार दिसतो तो ज्ञानानें सगुण ईश्वररूप पाहतां येतो. ज्या अनुभवानें युक्त होत्साता ईश्वर आपलें शरीर ह्मणजे सर्व विश्व याची कल्पना करितो, त्याच अनुभवानें ध्यान केलें ह्मणजे त्यास सगुणसाक्षात्कारध्यान ह्मणावें. ज्यास ज्ञान नाहीं त्याचेकडून असें ध्यान घडूं शकत नाहीं. याप्रमाणें साकारसगुणध्यान करित असतां देह टाकला तर तो परम पुरुष जो **वैकुंठनाथ विष्णु** त्याप्रत पावतो.

**कविं पुराणमनुशासितारमणोरणीयांसमनुस्मरेद्यः ।**
**सर्वस्य धातारमचिंत्यरूपमादित्यवर्णं तमसः परस्तात् ॥ ९ ॥**

**अर्थ.**—सर्वज्ञ, अनादि, सर्व जगाचा शास्ता, सूक्ष्मांपेक्षांही अति सूक्ष्म, सर्व जगताचें धारण करणारा, ज्याचें रूप अचिंत्य आहे असा,

आदित्यवर्ण आणि जो तमाचे पलीकडे आहे अशा सगुण भगवंताचें जो स्मरण करील ( तो त्यास पोंचेल. )

टीका.—पूर्व श्लोकीं जो दिव्य परम पुरुष बोलिला त्याचें वर्णन या श्लोकीं केलें आहे. कवि ह्मणजे सर्वज्ञ; ह्मणजे ज्याचें ज्ञान स्वतः-सिद्ध असतें तो होय. या सगुण भगवंतापासूनच ब्रह्मदेवास प्रथम ज्ञान मिळून तेंच परंपरेनें या जगांत मिळत आलें आहे. हा "कवि" शब्द निर्गुणाकडे लागत नाहीं. यावरून हें सगुण भगवंताचें वर्णन आहे असें स्पष्ट सिद्ध होतें व याहीपुढील विशेषणांनीं तेंच सिद्ध होत आहे. **पुराण** ह्मणजे पुरातन. हा शब्द निर्गुण व सगुण या दोहोंसही लागू पडतो. अनुशासिता ह्मणजे कर्मानुरूप शासन करणारा. असें शासन करण्यास कर्म साक्षित्व पाहिजे ह्मणून सगुणत्व सिद्ध होतें. अशा सगुण भगवंताचें देहांतीं चिंतन घडल्यानें सगुण मोक्ष मिळतो. यावरून हें सगुणमोक्षप्रकरण आहे हें उघड सिद्ध होतें. आतां अनुशास्ता ह्मटल्यानें जीवास आणि ईश्वरास निराळेंपण येऊं पाहतें. त्याचा परि-हार केला पाहिजे. जीव आणि ईश्वर यांत मूळचें ऐक्य आहे, पण भोगापुरतें द्वैत असतें, असें वेद बोलतात. सूर्य निरनिराळ्या पाण्यांत प्रतिबिंबला ह्मणजे निरनिराळीं प्रतिबिंबें होतात, त्याप्रमाणें ईश्वर प्रति-बिंबरूपानें निरनिराळे देहीं असतो, त्यास "**जीव**" अशी संज्ञा आहे. तो जीव कर्मानुरूप सुखदुःख भोगतो व ईश्वर तें त्याजकडून भोगवितो. आतां हा परम पुरुष सूक्ष्मांहूनही सूक्ष्म आहे असें ह्मटलें आहे. तो अनंत असून सूक्ष्मांहूनही सूक्ष्म कसा आहे हें पाहूं, पर्वत किती मोठा असतो तरी आरशांत त्याचें प्रतिबिंब किती लहान असतें बरें? यावरून सिद्ध होतें कीं, उपाधीचे मानानें तो वाटेल तितका सूक्ष्म होऊं शकतो ह्मणून त्यास सूक्ष्मांहून सूक्ष्म ह्मटलें आहे. "**सर्वस्य धाता**" ह्मणजे तो सर्व ब्रह्मांडांचें धारण करणारा होय. त्याचेच आधारावर अनंत ब्रह्मांडें

राहिलीं आहेत, ह्मणून तो थोराहूनही थोर आहे. यासंबंधानें श्रुतीचा आधार आहे. ती अशी "अणोरणीयान्महतोमहीयान्." असा तो अनंत आहे ह्मणून तो अचिंत्य आहे. तो आदित्यवर्ण आहे, ह्मणजे सूर्यासारखा त्याचा वर्ण आहे. यावरून सगुणत्वच सिद्ध होतें. "तमसः परस्तात्" ह्मणजे अज्ञानाचे पलीकडे तो आहे. ह्या शब्दानें एवढेंच सिद्ध होतें असें नाहीं, तर त्याचें साकारत्वही दिसून येतें. तम ह्मणजे पंचभूतें. या पंचभूतांचे सर्व स्थावरजंगम देह झाले आहेत. अशा देहांहून ज्याचा देह विलक्षण आहे तो व विद्या ज्याची उपाधि आहे अशा आदिनारायणाचे अवतारदेहांचें ध्यान करावें असें या श्लोकांत सांगितलें आहे. आदित्यवर्ण असा सगुण भगवंत याचें ध्यान करावें, असें सांगितलें आहे, तेव्हां कृष्णरूपाचें ध्यान कसें करावें, अशी कोणी पोरकट शंका घेतात. त्यांस उत्तर असें कीं, आदित्यवर्ण या शब्दानें तेजस्वी रूप एवढेंच दाखविलें आहे. असें असून रंगाची क्लिष्ट कल्पना घेतली तरी ती बाधक होत नाहीं. एकाच वस्तूचीं पुष्कळ लक्षणें असतात. त्यांतील एकच लक्षण बोलून त्या वस्तूचें निदर्शन करण्याची रीत आहे. त्यास "उपलक्षण" ह्मणतात. तसें आदित्यवर्ण हें उपलक्षण आहे. सर्व अवतारदेह सगुण भगवंताचीं रूपेंच होत. मग तीं निरनिराळ्या प्रकारचीं असलीं ह्मणून काय बाध येतो? ब्राह्मण तितके श्रेष्ठ होत. त्यांत एखादा ब्राह्मण गौरवर्ण ह्मणून वर्णिला ह्मणजे कृष्णवर्ण ब्राह्मण श्रेष्ठ नाहीं असें होत नाहीं. तद्वत् अवतारदेह सगुण भगवंताचेच देह आहेत. ते रूपानें निरनिराळे आहेत ह्मणून ते देह तो नव्हे असें ह्मणतां येईल काय? याप्रमाणें मागील श्लोकांत निर्दिष्ट केलेल्या परम पुरुषाचें वर्णन या श्लोकांत केलें आहे. देहांतीं अशा परम पुरुषाचें युक्त प्रकारें जो स्मरण करील, तो त्याचें सारूप्य पावेल असें पूर्व श्लोकीं सांगितलें आहे. एथपर्यंत सगुण मुक्तीचें प्रकरण झालें. आतां कांहीं लोक गुरुजवळ राहून शास्त्राभ्यास न करितां केवळ संतकृपेनें ज्ञान पावून निर्गुणोपा-

सना अथवा सगुणभक्ति करून मुक्ति पावतात. पण असे कित्येक लोक हे दोन्ही मार्ग टाकून हठयोगाकडे वळतात. त्यांचें मुक्तिप्रकरण पुढील श्लोकापासून सुरू केलें आहे.

**प्रायणकाले मनसाचलेन भक्त्या युक्तो योगबलेन चैव ।**
**भ्रुवोर्मध्ये प्राणमावेश्य सम्यक् स तं परं पुरुषमुपैति दिव्यम्॥१०॥**

**अर्थ.**-जो मरणसमयीं निश्चळ मन करून भक्तीनें युक्त होत्साता योगाचे बळानें दोन्ही भोंवयांचे मध्यभागीं योग्य प्रकारें प्राणास स्थिर करितो, तो दिव्य अशा परम पुरुषाप्रत पावतो.

**टीका.**-आपणांस उत्तम गति होवो अशी जी आपली प्रीति, तिला एथें भक्ति असें ह्मटलें आहे. हठयोगशास्त्रांत दोन्ही भोंवयांचे मधल्या भागास द्विदळ आज्ञाचक्र ह्मणतात. या ठिकाणीं हठयोगी प्राणास कोंडितो. "योगबलेन" या शब्दान असें सुचविलें आहे कीं, पंचभूतांचीं पांच चक्रें भेदून सहाव्या आज्ञाचक्रांत तो प्राण आणितो. हठयोगशास्त्राप्रमाणें गुह्य द्वारावर मूळधारचक्र चार दळांचें आहे. यांत पृथ्वीतत्व देहाचा आधार होऊन असतें. याचा भेद करून षड्दळ स्वाधिष्ठानचक्र जलतत्वाचें स्थान आहे, त्या ठिकाणीं प्राणास आणितो. त्याचा भेद करून नाभिकमळीं मणिपूरचक्र दहा दळांचें आहे त्या ठिकाणीं प्राणास आणितो. तेथें अग्नितत्व असतें. त्याचा भेद करून हृदयांत अनाहतचक्र द्वादश दळांचें आहे. तेथें वायुतत्व असतें, त्या ठिकाणीं प्राणास आणितो. त्याचा भेद करून कंठस्थानीं विशुद्धचक्र सोळा दळांचें असतें, तेथें आकाशतत्व आहे, त्या ठिकाणीं प्राणास आणितो. त्याचा भेद करून भोंवयांत आज्ञाचक्रीं प्राणास घालितो. तेथें केवळ मनतत्व असतें. त्या ठिकाणीं मनास स्थिर करून ब्रह्मरंध्र भेदून प्राणास बाहेर घालवून देतो. अशा प्रकारें ज्याचें प्राणोत्क्रमण होतें तो दिव्य पुरुषातें पावतो. ज्ञान होऊन ज्यांनीं अभ्यास

टाकिजे त्यांस हा कष्टसाध्य योग करावा लागतो. आज्ञाचक्रीं प्राण नेल्यावर मग तो त्यास ब्रह्मरंध्रभेद करण्याकरितां मस्तकीं नेऊन ठेवितो, असें येथून तिसऱ्या श्लोकांत भगवान् सांगतील. अशा मनुष्यास सगुणभक्ति नसल्यानें तो निर्गुण मोक्ष पावतो, व तोही ब्रह्मदेवाबरोबर पावतो. तोंपर्यंत तो सत्यलोकीं राहतो. आतां हा दिव्य पुरुष कसा हें पुढील श्लोकांत सांगितलें आहे.

**यदक्षरं वेदविदो वदन्ति विशंति यद्यतयो वीतरागाः ।**
**यदिच्छंतो ब्रह्मचर्यं चरंति तत्ते पदं संग्रहेण प्रवक्ष्ये ॥ ११ ॥**

**अर्थ.**–वेद जाणणारे ज्यास "**अक्षर**" **असें** ह्मणतात, ज्यांत वैराग्यशील यति प्रवेश करितात, ज्याची इच्छा करून ब्रह्मचर्य आचरण करितात, तें स्थान प्राणाचा अवरोध करून कसें पावतात, हें मी आतां सांगतों.

**टीका.**– "**वेदवेदांत जाणणारे ज्यास अक्षर ह्मणतात**" या ह्मणण्यानें या योग्यास शास्त्रज्ञान नसतें असें दर्शविलें आहे. यत्न करणारे वैराग्यशील पुरुष ज्या स्वरूपीं प्रवेश करितात, त्या स्वरूपीं हाही पावतो, पण कालांतरानें, असा दुसऱ्या चरणांतील भाव आहे. व ज्याचे प्राप्तीकरितां ब्रह्मचर्य ह्मणजे गुरुगृहीं वास करितात असें तिसऱ्या चरणांत ह्मटलें आहे, यावरून या योग्यास तो वास नसतो असें दर्शविलें आहे. "**संग्रहेण**" ह्मणजे प्राणायामक्रमेंकरून प्राणांचें संग्रहण ह्मणजे अवरोध करून पदप्राप्तीचा उपाय ते करितात, असें सुचविलें आहे. "**संग्रहेण**" याचा "**संक्षेपेंकरून**" असा अर्थ कित्येक लोक करितात तो बरोबर नाहीं कारण सर्व गीताच संक्षेपानें सांगितली आहे. मग एथेंच असें ह्मणण्याचें कारण दिसत नाहीं. शिवाय संक्षेपानें सांगतों असें भगवान् बोलले नसते तर कांहीं उणें पडलें असतें काय? एवंच "**संग्रहेण ह्मणजे प्राणांचें संग्रहण करून**" असाच अर्थ उक्त होय. आतां

हठयोगधारणेनें आज्ञाचक्रापर्यंत ते प्राण नेतात असें यापूर्वी सांगितलें, पण त्याचा क्रम सांगितला नव्हता, तो व त्यानंतर ते काय करितात हें आतां भगवान् सांगणार आहेत.

**सर्वद्वाराणि संयम्य मनो हृदि निरुध्य च ।**
**मूर्ध्न्याधायात्मनः प्राणमास्थितो योगधारणाम् ॥ १२ ॥**
**ओमित्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन्मामनुस्मरन् ।**
**यः प्रयाति त्यजन्देहं स याति परमां गतिम् ॥ १३ ॥**

**अर्थ.**—जो सर्व द्वारांचा निरोध करून, मनास हृदयाचे ठायीं स्थिर करून व मस्तकीं प्राण ठेवून योगधारणा धरितो आणि ब्रह्मवाचक ॐ या एकाक्षराचा उच्चार करित प्राणायाम करून याप्रमाणें प्राण आवरून माझें स्मरण करीत जो देह सोडतो, तो उत्तम गतीस जातो.

**टीका.**—मनुष्यदेहास नऊ द्वारें आहेत. तीं सर्व हठयोगी कोंडतो. तें असें कीं, गुदद्वारीं एका पायाची टांच देऊन तें दाबून धरितो, व दुसऱ्या पायाचे टांचेनें शिश्न दाबून धरितो. हातांचे दोन आंगठे दोन कानांत घालितो. दोन तर्जन्यांनीं दोन्ही डोळे दाबून धरितो. दोन्ही मध्यांगुलींनीं नाकपुड्या दाबून धरितो व दोन्ही ओठ अनामिकांनीं आणि कनिष्ठिकांनीं दाबून धरितो, व मन हृदयांत आवरून धरितो. तसें न केलें तर प्राण हृदयाचे वर चढत नाहीं. याप्रमाणें द्वारें दाबून प्राण आज्ञाचक्रीं नेतो. आज्ञाचक्राचा भेद करून मस्तकाचे ठायीं सहस्रदळ कमळ उलटें असतें त्यांत प्राणांस नेऊन सोडतो. व भगवत्स्मरण करित, कोंडलेला प्राण टाळूवर असलेल्या सूक्ष्म अशा ब्रह्मरंध्रावाटे तो सोडितो व देहत्याग करितो, ह्मणजे त्यास परमगति मिळते.

“**ओमित्येकाक्षरं ब्रह्म**” असें ह्मणून भगवंतानें आपले नामस्मरणाचा महिमा एथें दर्शविला आहे. एकाक्षर ॐ हें ब्रह्मवाचक आहे

त्याचप्रमाणें वेदांत **कृष्ण, अनंत** व **नारायण** अशीं दोन अक्षरी, तीन अक्षरी व चार अक्षरी हीं नांवें सांगितलीं आहेत. एकट्या ॐ चेंच महत्व सांगणें असतें तर नुसतें "**अक्षरं ब्रह्म**" असें एथें ह्मटलें असतें. "**एकाक्षरं ब्रह्म**" असें ह्मटल्यानें अक्षरस्वरूप ब्रह्म एवढेंच नाहीं असें सुचविलें आहे. ॐ हें भगवन्नाम नाहीं असें कोणी ह्मणेल तर तें चुकीचें आहे, कारण १७ वे अध्यायांत सगुण ब्रह्म तीन नांवांनीं वर्णिलें आहे. त्यांत ॐ हें एक नांव आहे असें सांगितलें आहे. तो श्लोक असाः— "**ॐ तत्सदिति निर्देशो ब्रह्मणः स्त्रिविधः स्मृतः**" अस्तु. ॐकारानें प्रणायामाची सूचना केली आहे. पूरक १६ ॐकारांनीं, रेचक ३२ ॐकारांनीं व कुंभक ६४ ॐकारांनीं होतो. हें नुसतें प्रमाण आहे. या प्रमाणानें अभ्यास करून तो जास्त वाढवितात. हा प्राणायाम कसा करावा याविषयीं चवथ्या अध्यायांत माहिती दिली आहे.

कित्येक टीकाकार एथें असे अर्थ करितात कीं. तो योगी ॐ अक्षराचा जप करित प्राण सोडितो हें बोलणें अगदीं चुकीचें आहे, कारण मस्तकीं प्राण नेल्यावर चारी वाचा बंद होतात, तेव्हां उच्चार कशानें होणार? यावरून ॐ या अक्षरानें प्राणायामच सुचविला आहे, असें ह्मटलें पाहिजे.

याप्रमाणें ब्रह्मरंध्र भेदून गेलेला योगी पुन्हां जन्मास येत नाहीं; पण त्यास तत्काळ मुक्तिही नाहीं. कारण त्याचें ज्ञान पक्क झालेलें नसतें, ह्मणून तो सत्यलोकास जातो. तेथून ब्रह्मदेवाबरोबर त्यास मुक्ति मिळते. हें यापुढें चवथ्या श्लोकीं भगवान् सांगणार आहेत. तें लागलीच सांगितलें असतें, पण हठयोगावांचून मोक्ष मिळत नाहीं आणि तो तर अतिशय कष्टाचा आहे अशा शंकेनें अर्जुनाचें मन दुःखित होईल ह्मणून त्याचें समाधान रहावें याकरितां भगवान् त्याची आधीं खातरी करितात कीं,

मुक्तीस हठयोगाची जरूर नाहीं; सुलभ अशा भक्तिमार्गानें भगवत्प्राप्ति सहज होते. यासंबंधांत भगवान् तीन श्लोक बोलतात.

**अनन्यचेताः सततं यो मां स्मरति नित्यशः ।**
**तस्याहं सुलभः पार्थ नित्ययुक्तस्य योगिनः ॥ १४ ॥**

**अर्थ.**—हे अर्जुना, अनन्यचित्तेंकरून जो नित्य माझें स्मरण करितो, अशा नित्ययुक्त योग्यास फार सुलभ रीतीनें माझी प्राप्ति होते.

**टीका.**—जडभाग सर्व आत्माच आहे, निराळा नाहीं, असा ज्याचे चित्तास बोध असतो त्यास **अनन्यचेता** म्हणावें. असा निर्गुणज्ञानी सगुण भगवंताचे चरणीं अनुरक्त राहील तर त्यास भगवत्प्राप्ति सहज होते. त्याला ही हठयोगाची कष्टप्रद खटपट करणें नको, कारण तो नित्ययुक्त नेहमीं भगवच्चरणीं प्रीति ठेवून मुक्तीचे सुखाचा अनुभव घेतो. "**सतत**" शब्दानें असें अनन्यचित्त अखंड राहिलें पाहिजे, असें सुचविलें आहे. यामागें सगुणभक्तीचा प्रकार सांगितलाच आहे. म्हणून एथें त्यासंबंधानें विस्तार करण्याची जरूर नाहीं. असा ज्ञानी आणि सगुण भक्त जिवंत असतांनाच मुक्तीचे सोहळे भोगितो, परंतु मधून मधून त्यास प्रारब्धभोग भोगावयास लागतो. प्रारब्धरूपी देह पडल्यावर पुन्हां त्यास जन्ममरणाचें तोंड पहावें लागत नाहीं, असें पुढील श्लोकानें सांगितलें आहे.

**मामुपेत्य पुनर्जन्म दुःखालयमशाश्वतम् ।**
**नाप्नुवन्ति महात्मानः संसिद्धिं परमां गताः ॥ १५ ॥**

**अर्थ.**—सगुण मोक्ष पावलेले व निर्गुण मोक्ष पावलेले महात्मे अशाश्वत आणि सर्व दुःखांचें घर, असा पुनर्जन्म पावत नाहींत.

**टीका.**—"**मामुपेत्य**" यांतील "**उप**" म्हणजे समीप या शब्दानें सगुण मोक्षाचा भाव दर्शविला आहे. व "**संसिद्धिं परमां गताः**"

म्हणजे उत्तम सिद्धीतें पावलेले. असें म्हणून निर्गुण मोक्ष सुचविला आहे. एवंच सगुण भगवंतास पावलेले म्हणजे सगुणमोक्ष पावलेले व संसिद्धि पावलेले म्हणजे निर्गुणमोक्ष पावलेले दोन्ही प्रकारचे योगी हठयोग्यांहून श्रेष्ठ होत असा या श्लोकानें भाव दर्शविला आहे. "मां" म्हणजे निर्गुणातें असें कोणी म्हणतील, तर तें त्यांचें म्हणणें बरोबर नाहीं. कारण निर्गुणीं दूरत्व अथवा समीपत्व स्फुरत नाहीं यावरून "मामुपेत्य" म्हणजे सगुण भगवंतास पावून असाच अर्थ सिद्ध होतो. आतां इतर देवतांचे उपासकांसही शाश्वत गति नाहीं असें भगवंत सांगतात.

**आब्रह्मभुवनाल्लोकाः पुनरावर्तिनोऽर्जुन ।**
**मामुपेत्य तु कौंतेय पुनर्जन्म न विद्यते ॥ १६ ॥**

**अर्थ.**—हे अर्जुना, ब्रह्मलोकापर्यंत सर्व लोकांस पुनरावृत्ति आहे, परंतु मला जो येऊन मिळतो त्यास पुनर्जन्म नाहीं.

**टीका.**—सत्यलोकादि सर्व लोक नश्वर आहेत असें अर्जुनानें ऐकिलें, तेव्हां त्यास शंका आली कीं, वैकुंठही यासारखा नश्वर असेल. ह्मणून भगवान् विशेषेंकरून सांगतात कीं, वैकुंठ प्राप्त झालेल्यास पुनर्जन्म कधींच होत नाहीं कारण वैकुंठ म्हणजे भगवंताचें स्वरूपच होय. इतर देवता आपापल्या लोकांचे आपण धनी आहोंत, असें मानितात, म्हणून ते लोक नश्वर आहेत. परंतु सगुण भगवंत वैकुंठ आपणच आहों असें समजतो, म्हणून तो शाश्वत आहे. म्हणजे वैकुंठ आणि भगवंत निराळे नाहींत. भगवत्स्वरूपासच वैकुंठ असें नांव आहे. वैकुंठ दोन प्रकारचे आहेत. एकास ज्ञानी भक्त जातात, तेथून ते पुन्हां जन्मास येत नाहींत. ज्ञान नसतांही जबर सगुणभजन केल्यानें अंतकाळीं ज्यांस सगुणस्मरण होतें ते दुसरे प्रकारचे वैकुंठास जातात. त्यांचे अज्ञानाचा नाश झाला नसल्यामुळें ते प्रसंगोपात्त पुनर्जन्म पावतात. जयविजय याच वैकुंठाहून शापामुळें च्युत झाले. असे दोन प्रकारचे वैकुंठ आहेत, हें

पुराणावरून सिद्ध होतें. मुक्तांचें वैकुंठ म्हणजे भगवत्स्वरूपच होय. म्हणून तेथून कोणीही परतत नाहीं, असें भगवान् खात्रीनें सांगतात. आतां जो हठयोगी मस्तकीं प्राण नेऊन ठेवितो म्हणून सांगितलें त्याची पुढें काय गति होते, हें उत्तर श्लोकानें दर्शविलें आहे.

**सहस्रयुगपर्यंतमहर्यद्ब्रह्मणो विदुः ।**
**रात्रिं युगसहस्रांतां तेऽहोरात्रविदो जनाः ॥ १७ ॥**

**अर्थ.**–सहस्र युगें झालीं म्हणजे ब्रह्मदेवाचा एक दिवस होतो, व त्यानंतर तितकाच काळ गेला म्हणजे त्याची एक रात्र होते. असे दिवस आणि अशा रात्री ते हठयोगी जाणतात.

**टीका.**–चारी युगें गेलीं म्हणजे त्यास युग म्हणतात. अशा सहस्र युगांचा एक दिवस आणि तितक्याच काळाची एक रात्र, अशीं ब्रह्मदेवाचीं शंभर वर्षें होईपर्यंत ब्रह्मरंध्र भेदून ज्यांचें प्राणोत्क्रमण झालें असतें असे हठयोगी सत्यलोकीं वास करितात व ब्रह्मदेवाबरोबर मुक्त होतात. इतका काळपर्यंत त्यांस मोक्षाची वाट पहात बसावें लागतें. ज्ञानप्राप्ति झाल्याबरोबर ज्ञानसिद्धीचा यत्न करणें टाकून हठयोगाकडे गेल्याचें हें फळ कीं इतका काळ बोटावर मोजीत त्यांस रहावें लागतें. यापेक्षां सहाव्या अध्यायांत सांगितलेला योगभ्रष्ट फार बरा कीं एक जन्म जरी वांया गेला तरी पुन्हां दुसरे जन्मीं तो अभ्यास करून मुक्ति मिळवितो. असो; सत्यलोकीं सूर्य नाहीं तेव्हां तेथें दिवस आणि रात्र कशी जाणतां येते, हें उत्तर श्लोकीं भगवान् सांगतात.

**अव्यक्ताद्व्यक्तयः सर्वाः प्रभवंत्यहरागमे ।**
**रात्र्यागमे प्रलीयंते तत्रैवाव्यक्तसंज्ञके ॥ १८ ॥**

**अर्थ.**–प्रकृतीपासून भूतांची उत्पत्ति झाली म्हणजे ब्रह्मदेवाचा

दिवस सुरू होतो. व त्याच अव्यक्तांत भूतांचा लय झाला ह्मणजे ती त्याची रात्र होते.

टीका.–वर सांगितलेली भूतांची उत्पत्ति आणि लय ह्मणजे ब्रह्मदेवाची दिनसृष्टि आणि दिनप्रलय होत. प्रकृति स्वतः व्यक्तिरहित असून तिच्यापासून भूतांची व्यक्ति होते, त्यास सृष्टि ह्मणतात. आतां प्रलयाचें संक्षिप्त वर्णन देऊं. ब्रह्मदेवाचे रात्रीचा ह्मणजे प्रलयसमय आला ह्मणजे १०० वर्षेंपर्यंत पर्जन्यवृष्टि बंद होते. सूर्य अतिशय तीक्ष्ण होऊन सर्व रस शोषून टाकतो. त्यामुळें अन्नोत्पत्ति बंद होऊन सर्व प्राणी नाशास पावतात. त्यांत शेषाचे सहस्र मुखांतून विषाचा अग्नि निघून स्वर्गापर्यंत सर्व जाळून टाकतो. मग हत्तीचे सोंडेसारखा १०० वर्षेंपर्यंत सतत पाऊस पडतो, व समुद्रही आपली मर्यादा सोडतो. त्यामुळें स्वर्ग, मृत्यु, पाताळ हे तिन्ही लोक जलमय होतात. याप्रमाणें सृष्टि जेथून उत्पन्न होते त्यांतच लय पावते. मग पुन्हां ब्रम्ह्याचा दिवस आला ह्मणजे सृष्टीची उत्पत्ति होते. या प्रलयास दैनंदिन प्रलय ह्मणतात. महाप्रलयाचे वेळेस प्रकृति ही ब्रह्मीं लय पावते व महासृष्टिकाळीं ती पुन्हां उदय पावते अशी ब्रह्मदेवाचे दिवस आणि रात्रीची खूण सांगितली. याचप्रमाणें सृष्टि आणि प्रलय वारंवार होतो असें भगवान् सांगतात.

**भूतग्रामः स एवायं भूत्वा भूत्वा प्रलीयते ।**
**रात्र्यागमेऽवशः पार्थ प्रभवत्यहरागमे ॥ १९ ॥**

**अर्थ आणि टीका.**–याप्रमाणें हा भूतांचा समूह उत्पन्न होतो व पुन्हां लय पावतो. ब्रह्मदेवाचे रात्रीचा समय आला ह्मणजे तो परतंत्र लय होऊन पावतो व दिवस आला ह्मणजे पुन्हां उत्पन्न होतो. असा प्रवाह सारखा चालू असतो. हें ऐकून अर्जुनास वाटलें कीं, ईश्व-

रच सर्व विश्व होतो, तर विश्वाबरोबर ईश्वरासही नाश असला पाहिजे. या शंकेचा परिहार पुढील श्लोकानें केला आहे.

**परस्तस्मात्तु भावोऽन्योऽव्यक्तो व्यक्तात्सनातनः ।**
**यः सर्वेषु भूतेषु नश्यत्सु न विनश्यति ॥ २० ॥**

**अर्थ.**—पूर्वी सांगितलेल्या व्यक्त भूतग्रामाचा जो भाव ह्मणजे स्वभाव असतो, त्याहून सनातन अशा अव्यक्ताचा भाव निराळा आहे. नाश पावणाऱ्या भूतांत तो अव्यक्तभाव राहूनही नाश पावत नाहीं.

**टीका.**—पूर्वी जें अव्यक्त मायातत्व सांगितलें त्याहून सनातन असें अव्यक्ततत्व निराळें आहे. त्याचे अंगीं सत्ता आहे व माया सत्ताहीन आहे. मायेपासून सृष्टि उत्पन्न होते, ह्मणून माया सृष्टीचें कारण होय व सृष्टि कार्य होये. कारणासच सत्ता नाहीं, मग कार्यास कोठून असणार ? ब्रह्म मायेचें कारण आहे, पण तें मायाप्रवाहीं पडत नाहीं. माया मिथ्या आहे व ब्रह्म सत्य आहे. तेव्हां सत्य वस्तु मिथ्या रूप कसें धरील ? खऱ्या रज्जूवर खोट्या सर्पाचा भास होतो, म्हणून रज्जु कधीं सर्प झाला आहे काय? याकरितां सत्तामात्र अव्यक्ततत्व ह्मणजे चैतन्य सत्ताहीन अव्यक्ततत्वाहून निराळें आहे. परंतु सत्तेवांचून सत्ताहीन शून्यवत् आहे. म्हणून विश्वास ब्रम्ह्माचे सत्तेचा आधार असतो. नश्वर विश्व नाश पावतें तरी त्यास आधारभूत ब्रह्मभाव कायम राहतो. सत्तास्वरूपास भाव म्हणावें व सत्ताहीन जो भाग त्यास अभाव म्हणावें. माया शब्दाचा अर्थ सुचविला आहे कीं, जें नाहीं तें नसूनही दिसतें. याकरितां जें दिसतें परंतु विचाराअंतीं नाहींसें वाटतें तोच अभाव समजावा. सोन्यांत अलंकार दिसतो, पण विचारदृष्ट्या तें सोनेंच आहे. सोनें आहे म्हणून अलंकार दिसतो, तद्वत् ब्रह्माची सत्ता म्हणजे भाव आहे म्हणून मायारूप विश्व दिसतें. परंतु वास्तविक तें ब्रह्मच आहे. सोन्याचा अलंकार आटला म्हणजे अलंकार नाहींसा होऊ-

न सोनेंच राहतें. तद्वत् प्रलयाचे मुशींत विश्व आटलें म्हणजे निवळ ब्रह्म राहतें. सोन्यांत अलंकार होण्याची शक्ति आहे ती अव्यक्त असते. तिच्या योगानें अलंकार होतात ते नश्वर असतात. तसें ब्रह्माचे अंगीं विश्व होण्याची शक्ति असते, ती माया होय. तिच्यामुळें ब्रह्म विश्व बनतें, पण तें विश्व नश्वर असतें. दुधाचें दही झालें म्हणजे दुग्धत्व नासतें, तसें अलंकार झाल्यामुळें सुवर्णाचें सुवर्णत्व नासत नाहीं. त्याप्रमाणें विश्व नासलें तरी ब्रह्म नासत नाहीं. तें नित्य असतें. एवंच ब्रह्मीं असणारी माया अव्यक्त असते तो अभाव होय. तिच्यापरतें जें सनातन अव्यक्ततत्व ब्रह्म आहे, तो भाव होय. कार्यरूपी माया नाश पावली तरी त्यास सत्ताभूत असणारा ब्रह्मभाव नासत नाहीं.

**अव्यक्तोऽक्षर इत्युक्तस्तमाहुः परमां गतिम् ।**
**यं प्राप्य न निवर्तंते तद्धाम परमं मम ॥ २१ ॥**

**अर्थ.**—असा जो अव्यक्त आणि अक्षय भाव त्यालाच परम गति ह्मणतात. ही गति पावल्यावर पुनरावृत्ति नाहीं. हाच अक्षरभाव माझें धाम ह्मणजे वैकुंठ होय.

**टीका.**— पूर्वश्लोकीं जो सत्तास्वरूप भाव सांगितला, त्याचा प्रभाव या श्लोकीं वर्णिला आहे. ज्याला व्यक्ति नाहीं तें अव्यक्त होय. जी व्यक्ति दिसते, ती सर्व माया होय. ती मायाही त्या अव्यक्तावांचून असूं शकत नाहीं, म्हणून या अव्यक्ताचा जो अक्षर भाव तोच सर्व व्यक्ति होतो असें ह्मणतात. परंतु पुन्हां उलट विचार करून पाहिलें असतां, असें कळतें कीं, तो भाव त्या व्यक्तींत सत्तामात्रच असतो, व आकार विकार सर्व मायेचे असतात हा अक्षर भाव मायेच्या क्षर भावाहून निराळा असतो ह्मणूनच विश्व नासतें. तसें नसतें तर विश्वाचा कधींही नाश झाला नसता याकरितां या सनातन अव्यक्ताचा भाव अक्षर आहे असें ह्मटलें आहे. या अक्षर भावालाच **"परमा गतिः"** अशी संज्ञा आहे. कारण या

गतीस पावल्यावर पुनरावृत्ति नाहीं आणि ह्मणूनच तिला मुक्ति असें ह्मणतात. ही मुक्ति चार प्रकारची आहे: सायुज्य, सारूप्य, सालोक्य आणि सामीप्य. ही सायुज्यमुक्ति ह्मणजे निर्गुणमोक्ष **"परमा गतिः"** या शब्दांनीं दर्शविली आहे व **"तद्धाम परमं मम"** या चरणानें सगुणमोक्ष दर्शविला आहे. धाम म्हणजे घर. 'वर सांगितलेला अक्षर भाव हेंच माझें घर ह्मणजे वैकुंठ होय' असें भगवान् सांगतात. यावरून वैकुंठ ह्मणजे एकाद्या घरासारिखें किंवा गांवासारखें कांहीं आहे, अशी जी सर्वसामान्य समजूत असते ती नाहींशी होईल. रजतमरहित जें सत्व त्यास शुद्धसत्व ह्मणतात हें यापूर्वीं दुसऱ्या अध्यायांत खुलाशानें सांगितलेंच आहे. या शुद्धसत्वस्थितींतच निर्गुण ब्रह्माचें स्फुरण राहतें व हीच अखंड स्थिति सगुणभगवंताचें स्वरूप होय, ह्मणून सगुणमोक्ष ह्मणजे ही स्थिति प्राप्त होणें हेंच होय. या स्थितींत असतां स्थितीचा अनुभव कायम असतो, तसा निर्गुणमोक्षांत नसतो. ह्मणून सगुणमोक्ष निर्गुणमोक्षाहून श्रेष्ठ होय असें या गीतेंत भगवंत वारंवार सांगतात. वस्तुस्थिति वस्तु सोडून निराळी नसते, या भावानें सगुण भगवंताची जी शुद्धसत्वस्थिति ( वैकुंठ ) ती आपणच आहे असें भगवान् म्हणतात. निराकार सगुण व साकार सगुण यांत मुळींच भेद नाहीं, कारण त्यांची स्थिति एकच शुद्धसत्वस्थिति असते. म्हणून अंतकाळीं साकारसगुणध्यान घडलें, तर तो पुरुष तसाच आकार पावतो व अर्थात् तीच स्थिति पावतो, म्हणजे नित्यमुक्तता पावतो. हा सगुणमोक्ष निर्गुणोपासकांस मिळत नाहीं हें पुढच्या श्लोकीं व्यक्त करून दाखविलें आहे.

**पुरुषः स परः पार्थ भक्त्या लभ्यस्त्वनन्यया।**
**यस्यांतःस्थानि भूतानि येन सर्वमिदं ततम् ॥ २२ ॥**

**अर्थ.**—ज्यामध्यें सर्व भूतें राहतात व ज्यानें सर्व जगत् व्यापिलें आहे, असा उत्कृष्ट पुरुष अनन्यभक्तीनेंच प्राप्त होतो.

टीका.–आत्म्याहून दुसरें कांहींच कोणास प्रिय नाहीं. तोच आत्मा सर्व सगुणविश्व आहे, असें ज्ञानदृष्टीनें पाहून आत्मत्वानें सगुणाचें भजन केलें, तरच हा उत्तम पुरुष म्हणजे वैकुंठनाथ याची प्राप्ति होते. या गीतेंत भक्ति शब्द सगुणोपासनासूचक आहे. साध्या भक्तीनें मोक्ष नाहीं, हें सुचविण्याकरितां एथें "अनन्य" असा शब्द घातला आहे. या अनन्य शब्दानें अभेदभक्तीचा बोध होतो, व अभेदभक्ति ज्ञानावांचून होत नाहीं. या अनन्यभक्तीचें स्वरूप उत्तरार्धीं वर्णिलें आहे. त्याचें विवरण यापूर्वीं पुष्कळ वेळां झालें आहे, म्हणून त्याचा पुनरुच्चार करण्याची जरूर दिसत नाहीं.

या श्लोकापर्यंत चालत आलेला विषय हठयोगाचे संबंधानेंच भगवान् सांगत आले आहेत, हें मागें उलटून पाहिलें असतां समजेल. यापुढें तेंच हठयोगाचें प्रकरण चालविलें आहे.

**यत्र काले त्वनावृत्तिमावृत्तिं चैव योगिनः ।**
**प्रयाता यांति तं कालं वक्ष्यामि भरतर्षभ ॥ २३ ॥**

**अर्थ.**–हे अर्जुना, ज्या मार्गानें व ज्या काळीं ते हठयोगी देहत्याग करून गेले असतां परतत नाहींत अथवा परततात तो काल व मार्ग तुला सांगतो.

टीका.–षट्चक्रांचा भेद करून हठयोगी आपला प्राण मस्तकीं नेऊन ठेवितात व ब्रह्मरंध्र भेदून सोडून देऊन ब्रह्मलोकास जातात, व तेथें सहस्र युगपर्यंत ब्रह्मदेवाबरोबर राहतात असें यापूर्वी सांगितलेंच आहे. आतां कोणत्या काळीं देह सोडून गेले असतां कोणत्या मार्गानें जातात व पुन्हां जन्मास येत नाहींत व कोणत्या काळीं कोणत्या मार्गानें गेले असतां पुन्हां जन्मास येतात हें भगवान् सांगतात.

**अग्निर्ज्योतिरहः शुक्लः षण्मासा उत्तरायणम् ।**
**तत्र प्रयाता गच्छन्ति ब्रह्म ब्रह्मविदो जनाः ॥ २४ ॥**

**अर्थ.**—उत्तरायणांतील सहा महिन्यांत ज्ञानी हठयोगी ब्रह्मरंध्र भेदून गेला असतां अग्नि, ज्योति, आणि दिवस, शुक्लपक्ष, सहा महिने आणि उत्तरायण या देवता त्यास भेटून ते त्यास ब्रह्मलोकास पोंचवितात.

**टीका.**—उत्तरायण हा देवांचा दिवस आहे ह्मणून अग्नि, ज्योतिर्देवता व मूर्तिमंत दिवस, शुक्लपक्ष, सहा महिने व उत्तरायण त्या योग्यास भेटून ते त्यास ब्रह्मलोकास पोंचवितात. या सहा महिन्यांत ब्रह्मलोकाचा मार्ग खुला असतो. या मार्गांत असणाऱ्या देवता प्रकाशरूप असतात. याप्रमाणें उत्तरायणीं ज्या ज्ञानी हठयोग्याचें प्रयाण होतें, तो ब्रह्मलोकास जातो व ब्रह्मदेवास कल्पाचे अखेरीस मोक्ष होतो, त्याच वेळेस यालाही तो मिळतो. ब्रह्मवेत्त्याचे प्राण देहाबाहेर जात नाहींत असें ब्रह्मनिर्वाणाचें लक्षण श्रुति बोलतात. असें असून येथें भगवान् विरुद्ध वाणी बोलतात. यावरून असें सुचविलें आहे कीं, या हठयोग्याचें प्रयाण मुक्तिरूप ब्रह्मनिर्वाण नव्हे. सद्यःमुक्ति मिळण्यास उत्तरायणाची जरूर नाहीं असें श्रुति म्हणतात. म्हणून उत्तरायणीं गेलेल्या योग्यास क्रममुक्ति मिळते हें उघड दिसतें, व हा प्रसंग अपक्वज्ञानी हठयोग्याचा आहे, हेंही स्पष्ट सिद्ध होतें; कारण पक्वज्ञान्यास तावडतोब मुक्ति मिळते. त्यास नाकतोंड दाबण्याची जरूर नाहीं.

**धूमो रात्रिस्तथा कृष्णः षण्मासा दक्षिणायनम् ।**
**तत्र चांद्रमसं ज्योतिर्योगी प्राप्य निवर्तते ॥ २५ ॥**

**अर्थ.**—दक्षिणायनांत जो अपक्वज्ञानी हठयोगी प्रयाण करितो त्यास मार्गांत धूर, रात्र, कृष्णपक्ष, सहा महिने व दक्षिणायन यांच्या अभिमानी देवता भेटून ते त्यास उत्तम लोकास पोंचवितात. तेथें चंद्रकलामृत सेवून कांहीं काळपर्यंत राहतात व पुन्हां गर्भवास पावतात.

**टीका.**—या श्लोकांतील "**योगी**" शब्दाचा "**कर्मयोगी**"

असा कोणी टीकाकार अर्थ करितात. कर्मयोगी अपक्वज्ञानी उत्तम लोकास जाऊन पुन्हां गर्भवासास येतो असें सहावे अध्यायांत सांगितलें आहे हें खरें, परंतु दक्षिणायनांत गेला असतां त्याला ही गति प्राप्त होते असें कोठेंही सांगितलेलें नाहीं. कोणत्याही अयनांत तो मरण पावला तरी त्यास तीच गति मिळते. व एथें तर स्पष्ट दक्षिणायनांत प्रयाण करणाऱ्यास ही गति सांगितली आहे. ज्ञानहीन कर्मयोग्यास उत्तरायणीं प्रयाण झालें असतां अपुनरावृत्ति सांगितली असती तर दक्षणायनीं प्रयाण झालें असतां त्यास पुनरावृत्ति होते हा अर्थ साधता. पण तसें कांहींच नाहीं, याकरितां हा अर्थ वायफळ आहे. म्हणून या श्लोकींही अपक्वज्ञानी हठयोग्यांचे प्रयाणाचें वर्णन आहे हें सिद्ध होतें.

**शुक्लकृष्णे गती ह्येते जगतः शाश्वते मते ।**

**एकया यात्यनावृत्तिमन्ययाऽऽवर्तते पुनः ॥ २६ ॥**

**अर्थ.**–शुक्ल आणि कृष्ण या जगाच्या अनादि गति आहेत हें मला संमत आहे. एकानें पुनरावृत्ति होत नाहीं व दुसऱ्यानें होते.

**टीका.**– शुक्ल म्हणजे प्रकाशरूप उत्तरायण व कृष्ण म्हणजे तमोरूप दक्षिणायन अशा दोन गति आहेत. उत्तरायणांत प्रयाण झालें तर पुनरावृत्ति होत नाहीं, व दक्षिणायनांत झाल्यानें पुनरावृत्ति होते, पण पुन्हां तो अपुनरावृत्ति पावतो. योगभ्रष्ट पुनर्जन्म पावतो. सहावे अध्यायांतीं त्याचें वर्णन करितांना तसा जन्म येणें दुर्लभ ह्मणून त्याचें श्रेष्ठत्व सांगितलें आहे. त्याचप्रमाणें दक्षिणायनांत प्रयाण केलेला योगी जरी परततो तरी योगभ्रष्टाप्रमाणें पुन्हां पूर्वयोग करून तो अपुनरावृत्ति पावतो. ह्मणून तीही संमत आहे असें "मते" या शब्दानें सुचविलें आहे. या दोन्ही गति संमत आहेत असें

ऐकून अर्जुनास मोह उत्पन्न झाला, तो उत्तर श्लोकानें भगवान् परिहारितात.

**नैते सृती पार्थ जानन्योगी मुह्यति कश्चन ।**
**तस्मात्सर्वेषु कालेषु योगयुक्तो भवार्जुन ॥ २७ ॥**

**अर्थ.**—हे अर्जुना, या दोन्ही गति जाणूनही योगी मोह पावत नाहींत. याकरितां सर्व काळीं तूं योगयुक्त रहा.

**टीका.**—जे स्वरूपीं चित्त योजितात ते ब्रह्मदेवाचे दिवस आणि रात्री कशाकरितां मोजित बसतील बरें ? काम्यकर्म करणाऱ्या कर्मयोग्यांस प्राप्त होणाऱ्या गतीहून या गति श्रेष्ठ आहेत, असा भगवानाचे बोलण्याचा भाव आहे. ज्ञाननिष्ठांच्या सद्योमुक्तीवरून ह्या गति ओंवाळून टाकण्यासारख्या आहेत. दुष्काळानें पीडलेला मनुष्य कांदाभाकरीवर उडी मारील, परंतु शाल्यन्न ज्यास मिळतें तो तिकडे ढुंकूनही पाहत नाहीं. त्याप्रमाणें योग्याला तूर्तातूर्त मोक्षामृत मिळत असल्यावर त्याकरितां लाळ घोटीत सहस्र युगपर्यंत तो ब्रह्मलोकीं बसेल काय? ह्मणून योगी ह्या गतीस भुलत नाहींत. याकरितां सर्व काळ योगयुक्त रहावें असा भगवान् या श्लोकानें उत्तेजक उपदेश करितात.

**वेदेषु यज्ञेषु तपस्सु चैव दानेषु यत्पुण्यफलं प्रदिष्टम् ।**
**अत्येति तत्सर्वमिदं विदित्वा योगी परं स्थानमुपैति चाद्यम् ॥२८॥**

**अर्थ.**—वेदांपासून, यज्ञांपासून, तपांपासून व दानापासून जें जें फल मिळतें ह्मणून सांगितलें आहे तें सर्व जाणून योगी त्यांचें अतिक्रमण करून निर्गुण अथवा सगुण मोक्ष पावतो.

**टीका.**—ज्या हठयोग्यांस ब्रह्मज्ञान झालें असतें ते उत्तरायणांत प्रयाण करतील तर अपुनरावृत्तीप्रत पावतात, व दक्षिणायनांत प्रयाण

करतील तर पुनरावृत्ति पावतात पण पुन्हां त्यांस अपुनरावृत्ति मिळते; कारण त्यांस ज्ञान झालें असतें असें यापूर्वी सांगितलें आहे. गुरुमुखानें भेदाचा निषेध होऊन अद्वैत ब्रह्म कळणें हाच वेदशब्दाचा अर्थही आहे. "वेदयंतीति वेदाः" ह्मणजे जे जाणवितात ते वेद होत. या अर्थावरून वेद या शब्दानें हे पूर्वोक्त मार्ग ज्यांस माहीत आहेत ते ब्रह्मवेत्ते, ते मार्ग, व त्या गति सुचविल्या आहेत. योगी वेद, यज्ञ, तप, दान यांचे ठायीं जें जें फळ आहे तें सर्व अतिक्रमून या लोकीं मुख्य स्थान पावतो, तेव्हां ब्रह्ममय चित्त करणारा हा योगी होय. तो योग असा असतो कीं, जेथें परावाचाही राहूं शकत नाहीं आणि वेद तर परेच्या अलीकडेच राहतात; ह्मणून या योग्याला सद्योमुक्ति प्राप्त असते. पण हठयोगी जरी ब्रह्म जाणतात तरी त्यांना क्रममुक्ति मिळते, कारण त्यांना वेदवाणीपरता असा अनुभव नसतो. याकरितां त्यांचें ज्ञान आणि त्यांची गति वेदांच्या वेदांतच राहतात, कारण अनुभवानें त्यांच्या वृत्ति नाहींशा झाल्या नसतात. त्यांची गति वेद नुसते सांगतात, ती त्यांस मिळणें फारच लांब असतें. पण योग्याची स्थिति वेदांच्याही पलीकडे असते. ह्मणून हा योगी वेदांत जें जें सांगितलें आहे त्या सर्वांचें अतिक्रमण करून मुक्ति पावतो. आतां ही मुक्ति कशी हें चतुर्थ चरणांत सांगितलें आहे: "**योगी परं स्थानमुपैति चाद्यम्.**" यावरून निर्गुण आणि सगुण असे दोन्ही मोक्ष सुचविले आहेत. "**परं**" शब्दें निर्गुण मोक्ष दाखविला आहे व योगी सगुणभक्त असला तर त्यास "**स्थानमुपैति चाद्यम्**" असें बोलून सगुण मोक्षाची प्राप्ति सांगितली आहे. सर्वांहून प्रथम प्रकट होतो त्यास आद्य ह्मणावें. तोच सगुण सर्वेश्वर वैकुंठरूपेंकरून सगुणभक्तांचें मुक्त स्थान झाला आहे. "**आद्यस्थानं च उपैति**" असा येथें अन्वय घेतला पाहिजे. याचा अर्थ असा

होतो कीं, आद्यस्थानातेंही पावतो. या भगवद्रूप वैकुंठीं सत्वरूपें भक्त स्वानंदाचा अखंड अनुभव घेतात. "उप" व "आद्य" हे दोन्ही शब्द निर्गुणाकडे लागत नाहींत, ह्मणून सगुणमोक्ष सिद्ध झाला.

याप्रमाणें अष्टमाध्यायाची टीका ईशकृपेनें पूर्ण झाली, ती त्याचे चरणीं अर्पण असो.



श्री.

# अध्याय ९ वा.

ॐ नमो भगवते वासुदेवाय.

अष्टमाध्यायांत अर्जुनास ब्रह्मोपदेश केला. त्यांत व्यतिरेक व अन्वय या दोहोंचाही बोध करून दिला. एवढ्याच अनुभवानें मुमुक्षु कृतार्थ होतात. पण अर्जुन भक्तिसुखाचा भुकेला होता. नुसतें सगुण साकार भजन करणाऱ्यांहून अनुभवी निर्गुणोपासक श्रेष्ठ आहे. त्याहीपरीस ज्ञानी सगुणभक्त श्रेष्ठ आहे. तो कोणत्या विशेष गुणामुळें तसा श्रेष्ठ होतो, हें या नवमाध्यायांत भगवान् सांगतात.

**इदं तु ते गुह्यतमं प्रवक्ष्याम्यनसूयवे ।**
**ज्ञानं विज्ञानसहितं यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ॥ १ ॥**

अर्थ.–तूं निर्दोष आहेस, ह्मणून गुह्याहून गुह्य असें जें विज्ञान-सहित ज्ञान तें तुला मी सांगतों. तें जाणलें ह्मणजे तूं अविद्येपासून मुक्त होशील.

**टीका.**–"**अनसूयवे**" या शब्दानें भगवंतास नसता दोष देऊन लोक दोषी होतात, तसा अर्जुन दोषी नाहीं असें सुचविलें आहे. सातव्या अध्यायांत ज्ञान आणि विज्ञान सांगितलें तेंच सांगतों ह्मणून आतां भगवान् ह्मणतात. याचा अर्थ काय ह्मणून वाचक सहज घोटाळ्यांत पडतील. त्याचें स्पष्टीकरण असें आहे कीं, सातव्या अध्यायापर्यंत अर्जुनास फक्त शब्दज्ञान सांगितलें. अष्टमाध्यायारंभीं '**किं तद्ब्रह्म**" असा प्रश्न केल्यावरून भगवंतांनीं त्यास अपरोक्ष ज्ञान दिलें. त्यासहित विज्ञानाचा अनुभव

देण्याचा संकेत भगवान् दर्शवितात. सर्व त्रिगुणरचना भगवत्स्वरूप आहे असें ज्या ज्ञानानें कळतें त्यास **विज्ञान** ह्मणजे विशिष्ट ज्ञान ह्मणतात.

**राजविद्या राजगुह्यं पवित्रमिदमुत्तमम् ।**
**प्रत्यक्षावगमं धर्म्यं सुसुखं कर्तुमव्ययम् ॥ २ ॥**

**अर्थ.**–हें विज्ञान सर्व विद्यांचा राजा आहे व सर्व गुह्यांतलें गुह्य आहे. हें पवित्र आणि उत्तम आहे. हें प्रत्यक्षावगम व धर्म्य आहे. याचें साधन कष्टांवांचून होतें व हें अव्यय आहे.

**टीका.**–निर्गुणाद्वैत जाणणें ही विद्या होय. यासच व्यतिरेक ह्मणतात. त्याचप्रमाणें जडांमध्यें चैतन्य पाहणें, ज्यास अन्वय ह्मणतात, तीही विद्या होय. या विद्येमुळें अनादि माया नष्ट होते. ह्या विद्या सर्व विद्येंत श्रेष्ठ आहेत, पण सर्वांहून श्रेष्ठ अशी राजविद्या आहे. ती सांगण्याचा उद्देश भगवान् प्रदर्शित करितात. सर्व शास्त्रें द्वैत बोलतात, पण वेदांतशास्त्र अद्वैत सांगतें. तें गुह्य आहे हें खरें, तथापि ह्या गुह्याहूनही गुह्य असें राजगुह्य सांगतों असें भगवंत ह्मणतात. असें राजगुह्य तें कोणतें हें उत्तरार्धानें भगवान् सांगतात. प्रत्यक्ष दिसणारें सर्व स्थावर जंगम विश्व भगवत्स्वरूप आहे असा "**अवगम**" ह्मणजे बोध होणें यास "**प्रत्यक्षावगम**" म्हणावें. निर्गुणोपासक सर्व त्रिगुणमय प्रपंचांत निर्गुण ब्रह्म पाहतात व मायाभास असत्य आहे ह्मणून तो त्याज्य आहे असें ह्मणतात. असें नुसतें तोंडानें ह्मटल्यानें त्याचा भास नाहींसा होतो असें नाहीं. तो भास वेळोवेळीं छातीवर बसतोच, ह्मणून तो आकारभासही भगवत्स्वरूप आहे हें जाणलें पाहिजे, असें "**प्रत्यक्षावगम**" या शब्दानें सुचविलें आहे. प्रत्यक्षाचें जडत्व इंद्रियांस कळतें व चित्स्वरूप बुद्धीनें समजतें. तथापि इंद्रियद्वारा जें भासतें तें जाणणेंही बुद्धीचेंच कर्म आहे. हा इन्द्रियद्वारा भासणारा मायाभासही भगवत्स्वरूप आहे हें बुद्धीनें जाणणें, यास विज्ञान म्हटलें आहे. हा मायाभास भगवत्स्वरूप आहे याचें स्पष्टी-

करण सातवे अध्यायाचे टीकेंत झालें आहे तें पहावें. ज्ञानाशिवाय विज्ञान होऊं शकत नाहीं, म्हणून ज्ञानासहित विज्ञान समजल्यानें अविद्या-नाश होतो असें म्हटलें आहे. जड भाग निषेधिल्यानें केवळ निर्गुण ब्रह्माचा बोध होतो. तें निर्गुण निर्धर्म आहे. त्याचें ज्ञान निर्धर्म्य ज्ञान होय या ज्ञानांत विज्ञान मिसळलें ह्मणजे तें सगुण धर्म्यज्ञान म्हणावें. मायेशिवाय धर्म नाहीं. म्हणून ईश्वर आणि विश्व सधर्म आहेत. यांचे ज्ञानासच "**धर्म्यज्ञान**" म्हणावें. याच ज्ञानास द्वादशाध्यायीं भग-वान् "**धर्म्यामृत**" या शब्दानें वर्णितील. असें ज्ञानसहित विज्ञान जाणणाऱ्यास सगुणभक्त अशी संज्ञा आहे. बीज आणि अंकुर यांचाच वृक्ष होतो. तसें ब्रह्म आणि माया मिळून विश्व होतें. तें भगवद्रूपच होय. बीज आणि अंकुर यांस जसें वेगळेंपण दिसतें तसेंच ब्रह्म आणि माया वेगळीं दिसतात. बीजाचें आणि अंकुराचें वृक्षरूपीं ऐक्य होतें, तसें माया आणि ब्रह्म यांचें ऐक्य विश्वरूपीं होतें; म्हणून विश्व भगवत्स्वरूप होय. असें जें भगवद्भक्तिरूप अत्यंत अद्वैत तें "**धर्म्य**" शब्दानें सुचविलें आहे. गीतेंत हेंच ज्ञान थोर ह्मटलें आहे, म्हणून अठरावे अध्यायांत हा सर्व संवाद "**धर्म्यसंवाद**" आहे असें भगवंत म्हणतील. ज्ञानासारखें पवित्र असें दुसरें कांहींच नाहीं असें "**नहि ज्ञानेन सदृशं**" या श्लोकानें चतुर्थाध्यायांत सांगितलें आहे. त्याहून हें विज्ञान विशिष्ट आहे हें दाख-विण्याकरितां "**पवित्रं**" या विशेषणास "**उत्तमं**" असें दुसरें विशेषण जो-डलें आहे. षष्ठाध्यायांतील योगप्रकरणीं मनोनिग्रह करणें अर्जुनास कठीण वाटला, तो निग्रह करण्यास वैराग्याचें आणि अभ्यासाचें साधन सांगितलें. त्या योगाहूनही हें ज्ञान थोर आहे, तेव्हां याचें साधन त्याहूनही कठीण असेल अशी शंका अर्जुनास वाटली. ती जाणून भगवान् ह्मणतात कीं, "**सुसुखं कर्तुं**" ह्मणजे हें साधन करण्यास फार सोपें आहे; कारण सर्व **वासुदेव** आहे असा भाव ठेवण्यास अष्टांगसाधनाची मुळींच जरूर नाहीं. इतकेंच नाहीं तर हें साधन साध्य झाल्यानें योग अनायासें बाणतो,

अष्टांगसाधनाची खटपट करणें नको, असें पुढें भगवान् सांगणार आहेत. हें प्रत्यक्षाचें ज्ञान आहे ह्मणून नाशवंत असेल अशी कोणी दीर्घ शंका घेतील म्हणून भगवान् या ज्ञानास " **अव्ययं** " म्हणजे नाश न होणारें असें म्हणतात. बरें तर मग नाश होऊन पुनः उपजणाऱ्यास अव्यय तरी कसें म्हणतां येईल ? या शंकेचें समाधान असें आहे कीं, आज मृगजळ दिसतें तें नाहींसें होऊन पुनः उद्यां दिसतें. यावरून आजच्या मृगजळाहून उद्यांचें मृगजळ दुसरें आहे असें नाहीं. आजचेंच उद्यां पुनः प्रगट होतें. कांहीं वेळ दिसणें व मग नाहींसें होणें हा आविर्भाव व तिरोभाव होय. देव दृष्टीस दिसतो तो त्याचा आविर्भाव होय व तो अंतर्धान पावतो तो त्याचा तिरोभाव होय. या भावें या ज्ञानास अव्यय असें म्हटलें आहे. ज्ञान तेंच ज्ञेय आणि तेंच ज्ञाता असा अविद्या गेल्यावर निश्चय होतो. तेव्हां सर्वच अव्यय आहे असा बोध होतो. नाश पावलेला देह पुनः येत नाहीं, तेव्हां त्यास अव्यय कसें म्हणतां येईल अशी पुनः शंका येते. पण थोडा विचार केला असतां तीही व्यर्थ होते. नाच्या पोऱ्या लुगडें नेसून बायकोचें रूप दाखवितो. तेंच लुगडें फेडून टाकून पुनः पुरुषाचें रूप दाखवितो. म्हणून बायको मेली व पुरुष जन्मला असें आपण म्हणतों काय? तद्वत् विश्व भगवंताचा वेष आहे, तें नाहींसें झालें तरी वेष घेणारा कायमच असतो. अस्तु.

हें महत्वाचें ज्ञान सुलभ रीतीनें मिळण्यासारिखें असून लोक संसारांत बुचकळ्या कां मारतात, या शंकेचेंही निरसन पुढच्या श्लोकांत केलें आहे.

**अश्रद्दधानाः पुरुषा धर्मस्यास्य परंतप ।**
**अप्राप्य मां निवर्तन्ते मृत्युसंसारवर्त्मनि ॥ ३ ॥**

**अर्थ.**-हे अर्जुना, या धर्मावर श्रद्धा न ठेवणारे लोकांस मी प्राप्त होत नाहीं, ह्मणून ते मृत्युयुक्त संसारमार्गांत परत येतात.

**टीका.**—या ज्ञानप्राप्तीचा मार्ग सुगम असून अश्रद्धेमुळें तो दुर्गम झाला आहे. जे वेदशास्त्र पढले नाहींत, त्यांची गोष्ट बाजूला राहूं द्या. पण नवल हें कीं, वेदशास्त्रपुराण सर्व जाणत असुनही पुष्कळ लोक अशी अव्यभिचारिणी भगवद्भक्ति करित नाहींत. जे अशी भक्ति करितील तेच भगवंतास पावतील. राजविद्या राजगुह्य हें भगवंताचें स्वरूप आहे. प्रत्यक्षावगमबोधरूपही तोच आहे. एकंदरींत रूप आणि अरूप सर्व भगवंत आहे. या ज्ञानास पावणें, हेंच भगवंतास पावणें होय. ह्मणून मागिल श्लोकांत सांगितलेल्या ज्ञानाचे ठायीं ज्यांची अश्रद्धा आहे, त्यांस भगवत्प्राप्ति होत नाहीं. हें ज्ञान ज्यांस माहित नाहीं त्यांना अश्रद्दधान ह्मणतां येत नाहीं. भागवत धर्म काय हें जाणूनही जे त्या धर्माचे ठायीं अश्रद्दधान् असतात, तें मृत्युसंसारमार्गीं परततात असें भगवान् ह्मणतात, हें उघड दिसतें. सर्व स्थावरजंगम सृष्टि भगवत्स्वरूपच आहे, असा "**अवगम**" ह्मणजे ज्ञान झालें ह्मणजे हें स्थावरजंगमच प्रत्यक्ष मृत्युसंसारमार्ग आहेत असें कळतें. आतां असे लोक मृत्युसंसारमार्गांत परततात कसे ? ते संसारमार्गांत तर असतातच. याचा निकाल **अश्रद्दधान्** शब्दानें केला आहे. ज्या घरांत अमृत ठेविलें असतें, त्या घराचे दरवाज्यापर्यंत जाऊन, त्यांत अमृत असेल नसेल ह्मणून संशय मानून जसे कोणी परतात, त्याप्रमाणें वेदशास्त्रांत सांगितलेलें ज्ञान जाणूनही त्यापासून फायदा होईल किंवा नाहीं याचा संशय बाळगून ते मोक्षमार्गास न लागतां तेथून उलटून काम्य कर्म करूं लागतात, व इतर क्षुद्र देवतांचें भजन करितात. भागवतधर्म आचरल्याशिवाय ज्ञानाची प्राप्ति होत नाहीं. तो भागवतधर्म ह्मणजे सर्व विहित निष्काम कर्म श्रीविष्णूस समर्पण करणें होय, असें चवथ्या अध्यायांत भगवंतांनीं सांगितलेंच आहे. ह्मणून "**धर्म**" शब्दाचा एथें भागवतधर्म असा अर्थ आहे. अस्तु. यापुढील श्लोकांत विज्ञानासहित ज्ञान भगवंत सांगतात.

**मया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना ।**
**मत्स्थानि सर्वभूतानि न चाहं तेष्ववस्थितः ॥ ४ ॥**
**न च मत्स्थानि भूतानि पश्य मे योगमैश्वरम् ।**
**भूतभृन्न च भूतस्थो ममात्मा भूतभावनः ॥ ५ ॥**

**अर्थ.**—माझ्या अव्यक्त मूर्तीनें सर्व जग व्यापिलें आहे. मजमध्यें सर्व भूतें आहेत. पण मी त्यांत नाहीं ॥ ४ ॥ मजमध्यें हीं भूतें नाहींत. हा माझा योग ऐश्वर पहा. मी भूतें धारण करितों, परंतु त्या भूतांत मी राहत नाहीं. माझ्या कल्पनेनें भूतें होतात.

**टीका.**—भगवंताची अव्यक्त मूर्ति म्हणजे चित्स्वरूप होय. त्या चित्स्वरूपानें सर्व जग व्यापिलें आहे. पूर्वाध्यायीं अपरोक्ष ब्रह्माचा उपदेश केला त्यामुळें अर्जुन तें जाणत होता, म्हणून त्या चित्स्वरूपानें सर्व जग व्यापिलें आहे तें पहा, असें भगवान् अर्जुनास म्हणतात. जेव्हां संतांपासून ज्ञान होईल तेव्हां सर्व भूतें भगवत्स्वरूपांत, तसेंच आपणांतही तूं पाहशील असें चतुर्थाध्यायांत भगवंतांनीं अर्जुनास "**येन भूतान्यशेषेण द्रक्ष्यस्यात्मन्यथो मयि**" या श्लोकार्धानें सांगितलें आहे. तेंच आतां भगवंत अर्जुनास प्रत्यक्ष दाखवित आहेत. आपल्या अव्यक्त मूर्तीनें हें जग व्यापिलें आहे, असें भगवान् बोलिले याचा हेतु काय हें पाहिलें पाहिजे. "**मी व्यापिलें**" असें नुसतें म्हटलें असतें तर भगवंताची चतुर्भुज मूर्ति अर्जुन पाहूं गेला असता व चित्स्वरूपानें व्यापिलें आहे असें नुसतें म्हटलें असतें तर भगवान् गोपाळकृष्णाचें आणि अर्जुनाचें ऐक्य दाखवितां आलें नसतें, म्हणून आपली जी अव्यक्त मूर्ति चित्स्वरूप त्यानें हें जग व्यापिलें आहे, तें पहा, असें भगवान् म्हणतात. यावरून असें सुचविलें आहे कीं, ज्या चित्स्वरूपानें जगत् व्यापिलें आहे त्याची मूर्ति भगवान् बनले आहेत. हा उपदेश झाल्याबरोबर अर्जुन भगवंताचें व्या-

पकत्व पाहण्यांत गुंतला, तेव्हां सर्व चराचर त्यास आत्मस्वरूप दिसूं लागलें. परंतु भगवत्स्वरूपाचे अनंतत्वाकडे अर्जुनाचें लक्ष पोंचलें नाहीं. असें पाहून भगवान् म्हणतात कीं, "**मत्स्थानि सर्वभूतानि**" म्हणजे सर्व भूतें मजमध्यें आहेत. हें सांगितल्याबरोबर अर्जुनास कळालें कीं, जेथें जेथें मन धांवतें, त्याचेही पलीकडे चित्स्वरूप आहेच. जें पाहिलें असेल किंवा ऐकिलें असेल त्याचे पलीकडे मन जाणार कोठून ? याप्रमाणें आपलें अनंतत्व अर्जुनास पूर्णपणें कळालें, परंतु आकाशांत जशीं भूतें आहेत तशीं स्वस्वरूपांत भूतें असतील असें वाटून द्वैतभास होईल, हें जाणून भगवान् म्हणतात कीं, "**न चाहं तेष्ववस्थितः**" म्हणजे मी त्यांत राहत नाहीं. हीं दोन वाक्यें एकमेकांस विरुद्ध दिसतात. तो विरोध परिहार होईल असा अर्थ झाला पाहिजे. एवढाच विरोध परिहार केल्यानें या तत्वांचा पूर्ण उकल होतो असें नाहीं. कारण लागलीच दुसरे श्लोकांत भगवान् म्हणतात कीं, "**न च मत्स्थानि भूतानि**" म्हणजे भूतें मजमध्यें नाहींत. तेव्हां एकमेकांस विरुद्ध अशीं तीन वाक्यें भगवंत बोलले आहेत. त्या सर्वांचा मेळ जुळेल असा अर्थ सांपडला पाहिजे. तो खरा अर्थ वामनपंडितांनीं दिला आहे तो असाः—समुद्रांत जसे तरंगांचे कल्लोळ उठतात, तशीं भगवत्स्वरूपांत भूतें विवर्तरूपानें वास करितात. पण तरंगांचे उदयलय पावणारे आकारांत समुद्र नसतो. समुद्रांत पाण्याशिवाय कांहींच नसतें. आकाररूपानें तरंगांचा नुसता भास होतो तो वास्तविक नाहींच म्हटला पाहिजे. म्हणून समुद्रांत जसे तरंग असतात, पण तरंगांत समुद्र नसतो, तद्वत् आपणांमध्यें भूतें असतात, पण भूतांत आपण नाहीं, कारण वास्तविक तीं नाहींतच असें भगवान् बोलतात. आतां भूतें नाहींतच तर "**मजमध्यें भूतें आहेत**" या वाक्यास विरोध येतो, म्हणून इतकें सांगून भगवान् म्हणतात कीं, "**न च मत्स्थानि भूतानि**" म्हणजे मजमध्यें भूतें नाहींतच. आतां, मजमध्यें भूतें आहेत, पण मीं त्यांत नाहीं, असें भगवान् प्रथम बोलले, व मागाहून

तीं मजमध्यें नाहींत, असें बोलले. असें कां बोलले याचें समाधानकारक स्पष्टीकरण झालें पाहिजे. तें असें कीं, हा उपदेश भगवान् गोपाळकृष्ण अर्जुनास करित आहेत. ज्ञान होण्यापूर्वी भूतें खरोखर आहेत अशी अर्जुनाची प्रतीति होती. ती प्रतीति धरून भगवान् बोलले कीं, **"भूतें मजमध्यें आहेत."** मागाहून **"भूतांमध्यें मी नाहीं"** असें जें भगवान् बोलले तें स्वतःचे प्रतीतीवरून बोलले. त्या उपदेशानें भूतें मिथ्या आहेत, म्हणून अर्जुनास प्रतीति आली. ही प्रतीति अर्जुनास झाल्याबरोबर, भूतें नसून, जें सर्व आहे तें आपलेंच स्वरूप आहे अशी स्वप्रतीति भगवान् अर्जुनास **"न च मत्स्थानि भूतानि"** हें बोलून देतात. एक रज्जूस रज्जु म्हणून जाणतो व दुसऱ्यास तो सर्प म्हणून भासतो. तो एक त्या दुसऱ्यास, सर्प मुळींच नाहीं, रज्जूवर सर्पाचा खोटा भास झाला, असें सांगतो. तेव्हां त्यास रज्जूचे ठायीं सर्प खरोखर नाहीं, रज्जुच आहे, असें कळतें. या दृष्टांतन्यायानें भगवंतांनीं अर्जुनास बोध केला आहे. याप्रमाणें एथपर्यंत अर्जुनास निर्गुणज्ञानाचे चार प्रकारच्या तत्वांचा अनुभव दिला. या श्लोकांतील **"पश्य"** शब्द पांच ठिकाणीं लावण्याचा आहे. त्यांपैकीं चार गोष्टींचें विवरण झालें. हें पाहण्याचें कर्म बुद्धीचें आहे, हें सुज्ञ वाचकांस सांगणें नको. हें जडजग मिथ्या आहे असा बुद्धीचा निश्चय झाला, तरी शरीर आहे तोंपर्यंत इंद्रियद्वारा जडांचा बुद्धीस भास होणारच. तो जडजगपसारा कोणत्या दृष्टीनें पहावा हें **"पश्य मे योगमैश्वरं"** हें बोलून सुचविलें आहे, म्हणजे ज्यास **"ऐश्वर"** ह्मणतात असा हा आपला योग आहे असें पाहण्याचा भगवान् उपदेश करितात. वास्तविक नसूनही निरनिराळीं विचित्र रूपें दिसतात, ही जी अघटित घटना तिला **"योग"** ह्मणावें. सर्व चित्स्वरूपच असून जडरूपाचा भास होतो, हा प्रताप भगवत्सामर्थ्याचा होय. हें सामर्थ्यच भगवंताचें ऐश्वर्य होय. याच भगवत्स्वरूपाचें, पुरुषसूक्तांत **"सहस्रशीर्षा पुरुषः"** ह्मणून वर्णन केलें आहे. हा अघटितघटनायोगच भगवंत

होय. हा "योग" त्याचें रूप आहे ह्मणून त्यास "ऐश्वर" ह्मणतात. याकरितां प्रत्यक्ष जें दिसतें तें सर्व भगवंताचें रूपच आहे असें पहा, ह्मणून "**पश्य मे योगमैश्वरं**" या शब्दांनीं सुचविलें आहे. चराचर भगवंताचा योग ह्मणजे युक्तिचातुर्य आहे; तसेंच अवताररूपही आहे. हा योग, ऐश्वररूपानें ह्मणजे विश्वरूपानें पहा असें भगवान् अर्जुनास सांगतात. या "**योग ऐश्वर**" शब्दाचा अर्थ विश्वरूप आहे. हें पुढें ११ वे अध्यायांत अर्जुनास विश्वरूप दाखविलें आहे त्या प्रसंगीं भगवान् ह्मणतील कीं, "**दिव्यं ददामि ते चक्षु पश्य मे योगमैश्वरं**" यावरून स्पष्ट सिद्ध होतें. व्यतिरेकानें आत्मा समजल्यावर अन्वयानें सर्व ब्रह्मच आहे असें उमजतें. त्यानंतर जडाचा भास माया आहे असें न ह्मणतां भक्त त्यास भगवद्रूप पाहतात, यासच विज्ञान ह्मणावें. यामागें सांगितलें तें ज्ञान होय. या विज्ञानानें जडजगीं बुद्धीस चिदात्मत्वानुभव असतो व इंद्रियें त्यास भगवद्रूपें पाहतात. एवंच जिकडे तिकडे भगवंतच निर्गुणत्वें अनुभवास येतो. हा लाभ भगवत्कृपेशिवाय होत नाहीं.

पांचव्या श्लोकाच्या पूर्वार्धाची टीका एथपर्यंत झाली. आतांपर्यंत वर्णन केलेला विषय फारच महत्वाचा आहे ह्मणून त्याचा उपसंहार ह्या श्लोकाच उत्तरार्धानें केला आहे.

**उत्तरार्ध.–भूतभृन्न च भूतस्थो ममात्मा भूतभावनः ॥ ५॥**

चित्स्वरूपांतच भूतांचा वास आहे, परंतु भूतांत तें नाहीं; कारण तीं मिथ्याच आहेत. यावरून भूतें मायामात्र आहेत असें सिद्ध झालें. तीं माया ह्मणून त्याज्यांशांत न काढितां भगवंताची कल्पना आहे ह्मणून जाणावीं. रामकृष्णादि अवताररूपांची जशी ईश्वर कल्पना करितो, तशींच चराचरही त्याची कल्पनाच होत. या भावानें "**ममात्मा भूतभावनः**" असें ह्मटलें आहे. भगवंताची जी बुद्धि ह्मणजे चिच्छक्ति तिलाच कल्पनाशक्ति ह्मणावें. या कल्पनाशक्तीनें भूतांची भावना

होते ह्मणून वर सांगितलेला योग ऐश्वर भगवंताची कल्पना होय. ही कल्पना कशा प्रकारें केली जाते, हें समजण्याकरितां " **भूतभृन्न च भूतस्थो** " या चरणानें यापूर्वी पहिलीं चार तत्वें सांगितलीं आहेत त्यांची सूचना केली आहे.

हा उपदेश ऐकून अर्जुनास जिकडे लक्ष जाईल तिकडे भगवत्स्वरूपच दिसूं लागलें व त्या आनंदांत तो निमग्न झाला. इतक्यांत त्यास शंका आली कीं, पाहिलें ऐकलें असेल व त्यापैकीं ज्याची आठवण असेल तितक्यापुरताच भगवद्भाव प्रतीतीस येईल व भगवान् तर ह्मणाले कीं, सर्व चराचरीं आपलें व भगवंताचें ऐक्य पहा. विश्व तर अपरिमित आहे, तेव्हां हें कसें घडावें? ही शंका जाणून त्याचा परिहार उत्तर श्लोकानें भगवान् करितात.

**यथाकाशस्थितो नित्यं वायुः सर्वत्रगो महान् ।**
**तथा सर्वाणि भूतानि मत्स्थानीत्युपधारय ॥ ६ ॥**

**अर्थ व टीका.**—आकाशांत वारा नेहमीं आणि सर्व ठिकाणीं असतो. पण तो स्थिर असला ह्मणजे प्रत्ययास येत नाहीं व चंचळ झाला म्हणजे स्पर्शरूपानें आपल्या अनुभवास येतो. कोंडीव जागेंत वाऱ्याचा स्पर्श न झाल्यामुळें उबारा होतो. पण पंखा हलविला म्हणजे तेथेंही त्याचा अनुभव येतो; कारण आकाशांत नेहमीं तो असतो. सर्व भूतें जरी प्रत्ययास येऊं शकत नाहींत तरी स्थिर वायु आकाशांत असूनही जसा तो प्रत्ययास येत नाहीं त्याप्रमाणें सर्व भूतें, त्यांचा प्रत्यय नसला तरी भगवत्स्वरूपांतच आहेत असें पहा, म्हणून भगवान् दृष्टांतानें अर्जुनाची समजूत करितात. ज्या ज्या ठिकाणीं बुद्धि अथवा इंद्रियें जाऊं शकतात तितक्यापुरताच आत्मप्रत्यय येतो. त्यावेगळीं जीं भूतें असतील तींही आत्म्यांत आहेत असें सिद्धांतदृष्टीनेंच पाहिलें पाहिजे. सबंध भाताचें भांडें समोर असूनही भात झाला कीं नाहीं हें पाहण्या-

करितां एकच शीत दाबून पाहतों, सगळा भात दाबून पाहत नाहीं. भाताचें भांडें तर आपल्याजवळ असतें ह्मणून तो भात बरोबर शिजला आहे किंवा नाहीं हें सर्व भात दाबूनही आपण पाहूं शकतों. असें असूनही सिद्धांतदृष्टीनें, एक शित शिजलें, ह्मणून सर्व भात शिजला असें आपण समजतों. मग सर्व ब्रह्मांडांचा प्रत्यय घेतां येत नाहीं अशा प्रसंगीं सिद्धांतदृष्टीनें निर्वाह करण्यांत कांहीं कमीपणा नाहीं.

एथपर्यंत विज्ञानाचें विवरण झालें. भगवत्स्वरूपांत पोहोंचल्यावर पुनरावृत्ति नाहीं असा सिद्धांत याच विवरणांत भगवंतांनीं सांगितला आहे. त्यासंबंधानें पूर्वपक्ष उत्पन्न होतो कीं, प्रलयकाळीं सर्व चराचर ब्रह्मांत लीन होतात ह्मणून जीवांस पुनरावृत्ति नसावी. याचें खंडन करण्याचा उपक्रम उत्तर श्लोकीं सुरू केला आहे.

**सर्वभूतानि कौंतेय प्रकृतिं यांति मामिकाम् ।**
**कल्पक्षये पुनस्तानि कल्पादौ विसृजाम्यहम् ॥ ७ ॥**

**अर्थ.**–हे अर्जुना, कल्पाच्या अंतीं सर्व भूतें माझ्या प्रकृतींत येऊन मिळतात. दुसरे कल्पाचे आरंभीं पुन्हां मी त्यांस उत्पन्न करितों.

**टीका.**–कल्पाचे अंतीं म्हणजे महाप्रलयाचे वेळीं सर्व भूतें प्रकृतींत मिळतात असें एथें म्हटलें आहे. म्हणून तीं ब्रह्मांत मिळत नाहींत असा यापासून भाव उत्पन्न होतो. जीवांचें अज्ञान नाहींसें झालें म्हणजे ते ब्रह्मांत मिळतात. मग त्यांस पुनरावृत्ति नाहीं, कारण आत्मा ओळखून जड भाग मिथ्या म्हणून ज्यांनीं लेखिला त्यांस प्रलयकाळचा स्पर्श होत नाहीं ह्मणून उत्पत्तिकाळीं ते उपजत नाहींत. ज्यांचें अज्ञान नष्ट झालें नाहीं ते प्रलयकाळीं प्रकृतींत मिळतात व प्रकृति ब्रह्मीं लय पावते. सृष्टिकाळीं प्रकृति आपोआप उद्भवते. त्याबरोबर सर्व भूतेंही उपजतात. जीवाची उपाधि बुद्धि आहे. ती बुद्धि ब्रह्ममय झाल्यावर उपाधीचा नाश होतो ह्मणून जीवभाव नाहींसा होतो, ह्मणजे चिदंशप्रतिबिंब

चैतन्यबिंबांत मिळून जातें. मग उत्पत्ति कोणास व्हावी ? प्रकृति उपाधिरूप आहे. तिच्यामुळें सर्व उत्पत्ति होते हें पूर्वीं सांगितलेंच आहे. ह्मणून ज्यांची बुद्धिरूप उपाधि कायम असते त्यासच जीवभाव असतो व तेच प्रलयकाळीं प्रकृतींत मिळतात व सृष्टिकाळीं पुन्हां प्रकृतीसहित उत्पन्न होतात. प्रकृति सृष्टीचें बीज आहे. बीजापासून वृक्ष उत्पन्न होतो. तो जरी तोडून टाकला व बीज जर शिल्लक राहिलें. तर त्यापासून पुन्हां वृक्ष उत्पन्न होतो. तद्वत् भूतांचे देह जरी नष्ट झाले तरी उपाधिरूप बुद्धि कायम असेपर्यंत पुनःपुनः देह उत्पन्न होणारच, ह्मणून प्रलयकाळीं ते समधर्म प्रकृतींत मिळतात व सृष्टिकाळीं तिजबरोबर प्रगट होतात. एवंच ज्यांचा उपाधि नष्ट झाला ते भूतेंच नव्हत असें सिद्ध होतें; ह्मणून त्यांस पुनरावृत्ति नाहीं. प्रलयकाळीं सर्व भूतें "**प्रकृतींत**" मिळतात तीं सृष्टिकाळीं "**मी**" उत्पन्न करितों असें भगवान् ह्मणतात. यांत गूढ भाव आहे. ईश्वरसत्तेशिवाय प्रकृति कांहींच करूं शकत नाहीं हें वेळोवेळीं सिद्ध झालेंच आहे. प्रकृति सत्ताहीन आहे ह्मणून ती जें कार्य करिते तें आपल्या सत्तेमुळें होतें हें दर्शविण्याकरितां "**मी उत्पन्न करितों**" असें भगवंत बोलले व हेंच उत्तर श्लोकानें स्पष्ट करून दाखविलें आहे.

**प्रकृतिं स्वामवष्टभ्य विसृजामि पुनःपुनः ।**
**भूतग्राममिमं कृत्स्नमवशं प्रकृतेर्वशात् ॥ ८ ॥**

**अर्थ.**—मी आपल्या प्रकृतीस अधिष्ठून आपआपल्या कर्मांनीं बद्ध झालेला परतंत्र असा हा सर्व भूतसमूह पुनःपुनः उत्पन्न करितों.

**टीका.**—रज्जूस अधिष्ठून जसा विवर्त सर्प उत्पन्न होतो त्याप्रमाणें हें मिथ्या जग उत्पन्न होतें, हें प्रकृतीचें कार्य आहे. प्रलयकालानंतर भगवंत योगनिद्रेंत असतो, तेव्हां ही प्रकृति त्याचे ठायीं लीन असते. प्रतिदिनीं सूर्यकिरणांपासून जसें मृगजळ उत्पन्न होतें, तशी

ही प्रकृति सृष्टिकाळीं आपोआप ब्रह्मापासून उत्पन्न होते. मध्यान्ह टळल्याबरोबर मृगजळ नाहींसें होतें, तें किरणांत लीन होतें, असें ह्मटलें पाहिजे. कारण दुसरे दिवशीं त्याच किरणांपासून पुन्हां तें उत्पन्न होतें. तद्वत् प्रलयानंतर प्रकृति ब्रह्मीं लीन होते, व पुन्हां तेथूनच उत्पन्न होते, यावरून प्रकृति आणि पुरुष निराळे नाहींत असें दिसून येतें. हें ऐक्य समजण्याकरितां त्यांचे निरनिराळे धर्म व्यतिरेकानें कळले पाहिजेत. यावरून असेंही सुचविलें आहे कीं, अविद्या वाईट आणि विद्या उत्तम होय. कारण अविद्यायुक्त जीव प्रलयीं ऐक्य पावत नाहींत. अस्तु. सृष्टिकाळीं प्रथम माया प्रगट होते. तिच्यायोगानें निर्गुण ब्रह्म सगुणत्व पावतें, तेव्हां त्या सगुण भगवंताचे अंगीं द्रष्टृत्व धर्म येतो, व त्यास सृष्टिउत्पत्तीची इच्छाही होते. म्हणून प्रकृतीस आपली सत्ता जोडून तो सृष्टि उत्पन्न करितो, व आपण द्रष्टा बनून राहतो. मायेमुळें ईश्वरत्व उत्पन्न होतें. तोच ईश्वर मायेचा द्रष्टा कसा होतो हें दृष्टांताशिवाय स्पष्ट कळणार नाहीं. "जीभ" हा शब्द जिभेनेंच उच्चारिला जातो. तो उच्चारणारा जिभेस व आपणास दोघांसही जाणतो, पण जीभ या द्रष्ट्यास व आपणास जाणत नाहीं. याप्रमाणें ज्या मायेशिवाय ईश्वर निर्धर्म निर्गुण असतो त्याच मायेमुळें तो ईश्वरत्व पावून आपणास व मायेस पाहूं लागतो. एवंच बीजांत जसा वृक्ष असतो, त्याप्रमाणें सृष्टिकाळापूर्वी सर्व जगत् प्रकृतींत असतें. तेंच कार्यरूपानें सृष्टिकाळीं प्रकट होतें. आतां प्रकृतीबरोबर भूतें कां उत्पन्न होतात याचें निवारण चतुर्थ चरणांत केलें आहे कीं, हीं स्वतंत्र नसून आपल्या कर्मांनीं बद्ध झाल्यामुळें प्रकृतीच्या आधीन असतात. ह्मणून तीं प्रकृतीबरोबर उत्पन्न होतात. अस्तु. जीव चिदंश असून तो बद्ध होतो, तसा चित्स्वरूप ईश्वर कां बद्ध नसतो हें आतां भगवान् सांगतात.

न च मां तानि कर्माणि निबध्नंति धनंजय ।
उदासीनवदासीनमसक्तं तेषु कर्मसु ॥ ९ ॥

अर्थ.–हे अर्जुना, त्या कर्मांनीं मी बद्ध होत नाहीं; कारण त्यांकडे मी आसक्ति ठेवित नाहीं, व उदासीनवृत्ति धरून स्वस्थ असतों.

**टीका.**—ईश्वर आपल्या सत्तेनें सर्व कर्मांचें कर्तृत्व आपलेकडे घेऊनही त्यांचे ठायीं आसक्ति न ठेवितां उदासीनासारखा राहतो ह्मणून तो मुक्त असतो. बंध आणि मोक्ष हे उपाधीच्या बोडक्यावर आहेत. बुद्धि जीवाची उपाधि आहे. ती आपले अंगीं अहंकर्तृत्वाभिमान घेते ह्मणून जीवास बद्धता येते. अज्ञानामुळें मन वासनायुक्त असतें, यामुळें विषयचिंतनावांचून कोणतही कर्म करण्याची प्रवृत्ति घडत नाहीं. वैराग्यावांचून औदासीन्य राहणेंच नाहीं. जीवांस वैराग्य नसल्यामुळें ते कधींही उदासीन असत नाहींत, नेहमीं विषयप्राप्तीच्या खटपटींत गर्क असतात. ह्मणून ते आपल्या कर्मांनीं बद्ध होतात. गळास अडकाविलेल्या मांसाच्या आशेनें माशाचे गळ्यांत गळ अडकून तो नाशकारक बंध पावतो. तद्वत् कर्मफळांचे ठायीं आसक्ति ठेविल्यानें जीव त्या फळांपासून होणारे सुखाहून शोकडोपटीनें अधिक असें दुःख भोगितात. भगवंताचे अंगीं ऐश्वर्य, यश, श्री, धर्म, ज्ञान आणि वैराग्य हे सहा गुण आहेत म्हणून त्यास षड्गुणसंपन्न म्हणतात. या सहा गुणांपैकीं वैराग्यामुळें तो कर्मबंधापासून मुक्त आसतो. म्हणून या वैराग्याच्या प्राप्तीकारितां जीवांनीं त्यास शरण जाऊन त्याचें अखंड चिंतन केलें पाहिजे.

आतां जगाचें उपादान कारण निर्गुण ब्रह्म आहे. तें निर्धर्म आहे म्हणून वैराग्य वगैरे धर्म ज्या भगवंताचे अंगीं आहेत त्यास जगाचें उपादान कारण कसें म्हणतां येईल, अशा शंकेच्या परिहारार्थ उत्तर श्लोकाची योजना केली आहे.

**मयाध्यक्षेण प्रकृतिः सूयते सचराचरम् ।**

**हेतुनानेन कौंतेय जगद्विपरिवर्तते ॥ १० ॥**

**अर्थ.**—हे अर्जुना, माझ्या अध्यक्षतेनें माझी प्रकृति सर्व चराचर उत्पन्न करिते. माझ्या हेतूमुळेंच सर्व जग पुनःपुनः उत्पन्न होतें.

टीका.—आईपासून मुलगा होतो हें खरें, तथापि तिचा नवरा त्याचे उत्पत्तीस कारणीभूत असतो. बाईल केल्याशिवाय नवरा ही संज्ञा पुरुषास मिळत नाहीं. त्याचप्रमाणें बायको ही संज्ञा नवरा केल्याशिवाय स्त्रीस मिळत नाहीं. यावरून नवऱ्यास नवरेपण बायकोमुळेंच आलें आहे. तसेंच ईश्वराचें ईशत्व प्रकृतीमुळें आहे व त्या ईशत्वामुळेंच प्रकृति चराचर उत्पन्न करूं शकते. या भावानें "**मयाध्यक्षेण प्रकृतिः सूयते सचराचरम्**" असें भगवान् या श्लोकांत म्हणतात. याचें स्पष्टीकरण असें कीं, ब्रह्म, मायेच्या योगानें ईश्वर होतें. व तो ईश्वर तिच्या योगानेंच प्रकृतीस प्रवर्तवितो. असें म्हटल्यानें माया आणि प्रकृति निरनिराळ्या वस्तु आहेत असा भास होतो, पण तसें नाहीं. माया आणि प्रकृति एकच आहे. मायेस दुसरी स्थिति प्राप्त झाली म्हणजे तिला प्रकृति हें नांव मिळतें. प्रथम माया शुद्धरूपिणी असते. त्रिगुणांची उत्पत्ति तिच्यापासून झाली म्हणजे त्या गुणांसहित तिला "**प्रकृति**" हें नांव प्राप्त होतें. आपल्यास मुलगी होते तिचें नांव गोदु अथवा यमुना ठेवितों. तीच उपवर झाली म्हणजे तिचें पुरुषाशीं लग्न करून देतों, तेव्हां तिचें नांव पार्वती अथवा रमा असें ठेवितात. म्हणून गोदु व पार्वती अथवा रमा आणि यमुना ह्या दोन निरानिराळ्या नसतात. स्थित्यंतर झाल्यामुळें एकीलाच निराळें नांव मिळतें एवढेंच. तद्वत् माया गुणवती होणें हीच तिची उपवर स्थिति होय. तिनें पुरुषाचें पतित्व पत्करिलें म्हणजे तीच प्रकृति हें नांव पावते. मग त्या पुरुषाचे सत्तेनें प्रकृतीपासून चराचर उत्पन्न होतात. "**ईश्वर मायेच्या योगानें प्रकृतीस प्रवर्तवितो**" असें जें वर सांगितलें, तें बरेंच सुबोध झालें. तथापि तिच्या योगानेंच तिला कसें प्रवर्तवितो ही रीति स्पष्ट झाली नाहीं. ती केली पाहिजे. सरकार प्रजेपासून कर घेतें व त्या धनानेंच प्रजेस वर्तवितें; तसेंच ईश्वर मायेपासून उत्पन्न झालेल्या त्रिगुणांनीं तिला उत्पत्ति करण्यास प्रवर्तवितो. म्हणजे धन प्रजेचेंच पण सत्तामात्र सरकारची असते.

त्या सत्तेनें प्रजेपैकींच नेमिलेले अधिकारी त्या धनाची व्यवस्था लावतात. तद्वत् सत्ता ईश्वराची व कर्तृत्व प्रकृतीचें असतें. या सत्तेनें म्हणजे ईश्वराचे अध्यक्षतेनें प्रकृति चराचर उत्पन्न करिते. मी ब्रह्म असें ब्रह्मीं स्फुरण झालें म्हणजे तो सगुणब्रह्म ईश्वर होय. व मी माया असें स्फुरण होतें तेव्हां ती प्रकृति होय. म्हणून मायेचें आधिपत्य ब्रह्मास व प्रकृतीचें आधिपत्य ईश्वरास आहे. जगत्कारण निर्गुणच आहे, 'तें मी आहें' असा सगुणास अनुभव असतो. म्हणून सगुणही जगत्कारण होय. घटाचे सबाह्य माती असते, त्याप्रमाणें सर्व जगीं सबाह्य ब्रह्म आहे. तें मी आहें असा ज्या ईश्वराचा अनुभव असतो त्यास जगाचें उपादान कारण कां म्हणतां येणार नाहीं? तो जगाचें उपादान कारण आहे. मातीचा घट होतो पण तो करणारा कुंभार असतो, त्यास निमित्त कारण म्हणतात. तसा कर्मानुरूप जीवांस उत्पन्न करणारा सर्वज्ञ भगवंत जगाचें निमित्त कारणही आहे.

असा सर्वज्ञ सर्वेश्वर जगाचे उद्धारार्थ अवतार धारण करितो. परंतु आसुरी संपत्तीचे लोक त्यास जाणत नाहींत असें आतां भगवान् सांगतात.

**अवजानंति मां मूढा मानुषीं तनुमाश्रितम् ।**
**परं भावमजानंतो मम भूतमहेश्वरम् ॥ ११ ॥**

**अर्थ.**—मी मनुष्यदेह धारण केला आहें तरी सर्व भूतांचा मी परमेश्वर आहें असें माझें खरें स्वरूप मूर्ख लोक जाणत नाहींत.

**टीका.**—श्रीकृष्ण भगवान् ह्मणतात कीं, "मी मनुष्यच आहें असें मला मानून माझा अवमान करितात ते मूर्ख आहेत." कोणी मोठा मनुष्य आपलें मोठेंपण गुप्त ठेऊन वागूं लागला ह्मणजे अज्ञ लोकांस त्याचें मोठेंपण कळत नाहीं, पण शहाणे लोक त्यास ओळखतात. वर सांगितल्याप्रमाणें जगाचें उपादान व निमित्त कारण जो सगुण सर्वेश्वर

आहे, तोच श्रीकृष्ण भगवान् होय हें दुर्योधनादिक मूर्ख लोक जाणत नाहींत, असें या श्लोकानें अर्जुनास सुचविलें आहे. अस्तु. हें सर्व जाणूनही लोक आडमार्गानें कां जातात याचें कारण पुढील श्लोकांत सांगितलें आहे.

**मोघाशा मोघकर्माणो मोघज्ञाना विचेतसः ।**
**राक्षसीमासुरीं चैव प्रकृतिं मोहिनीं श्रिताः ॥ १२ ॥**

**अर्थ.**—ज्या बुद्धिहीनांच्या आशा, कर्म आणि ज्ञान व्यर्थ होतात ते राक्षसी, आसुरी, आणि मोहिनी अशा प्रकृतींचा आश्रय करितात.

**टीका.**—बरेंवाईट कर्म सर्व आपले चित्ताचे वृत्तीवर अवलंबून असतें. प्रारब्धांत जी अर्थप्राप्ति नसते, ती झाली ह्मणजे भगवद्भजन टाकून क्षुद्र देवतेचें आराधन करण्यास मनुष्य प्रवृत्त होतो. प्रारब्धीं जें फळ असतें तेंच काम्य कर्म केल्यानें यथाकाळीं मिळतें. परंतु काम्य कर्म केल्यानें वज्रलेप बंध मात्र उत्पन्न होतो. या जन्मीं अमुक फळ नाहीं, तें पुढले जन्मीं मिळेल ह्मणून काम्य कर्म केलें तरी तें लागलीच दुसरे जन्मीं मिळतें असें नाहीं, कारण जबरदस्त संचितामुळें कित्येक लोकांस तें फळ शेंकडो जन्मपर्यंत मिळत नाहीं. एखादें फळ मिळण्याकरितां कोणी काम्य कर्म करूं लागला ह्मणजे विहित कर्म अंतरतें त्याचें पाप होतें. तें भोगिल्याशिवायही काम्य कर्माचें फळ मिळत नाहीं. जें जें फळ मनुष्यास मिळतें तें तें प्रारब्धरूपानें पूर्व कर्माचेंच फळ असतें, असें कोत्या विचाराचे लोकांस समजत नसल्यामुळें ते काम्यप्रवाहांत पडून विनाकारण जास्त बंध करून घेतात. अशा लोकांस **मोघाश** ह्मणावें. जे देवतांतराची निष्काम उपासना करितात त्यांस **मोघकर्मे** ह्मणावें. कारण निष्काम कर्म एका सगुण सर्वेश्वराकरितां केलें तरच तें मोक्षप्रद होतें, व तें त्यास अर्पण केलें नाहीं तर बंधक होतें. आतां **मोघज्ञान** ह्मणून ज्यांस ह्मटलें आहे ते दोन प्रकारचे असतात.

एक वेदश्रद्धाहीन व दुसरे वेदाश्रित. चार्वाक, बौद्ध इत्यादि पहिल्या प्रकारचे लोक होत; व अद्वैत कळूनही इतर देवताभजन करणारे दुसऱ्या प्रकारचे लोक होत. या दुसऱ्या प्रकारच्या लोकांचेंही ज्ञान व्यर्थ होतें. कारण भगवत्प्रसादावांचून अपरोक्ष साक्षात्कार होत नाहीं व तो प्रसाद भगवद्भजनावांचून होत नाहीं, हें यापूर्वी स्पष्ट झालेंच आहे. वेद आणि शास्त्रें जाणूनही अडमार्गांत लोक शिरतात याचें कारण त्यांची नैसर्गिक वाईट प्रकृति होय. नैसर्गिक प्रकृति अनंत जन्मांचे दृढ संस्कारानें बनते. चांगल्या संस्कारांचे प्रकृतीस "**दैवी प्रकृति**" ह्मणतात. वाईट संस्कारांचें प्रकृतीस "**आसुरी प्रकृति**" ह्मणतात. या आसुरी प्रकृतीचे तीन भेद आहेत: राक्षसी, आसुरी आणि मोहिनी. राक्षस मनुष्य भक्षितात ह्मणून सर्वदा हिंसा करण्याकडे ज्यांची बुद्धि वळते त्यांस राक्षसी प्रकृतीचे मनुष्य ह्मणावें. ज्यांची केवळ विषयासक्त बुद्धि असते त्यांस आसुरी प्रकृतीचे मनुष्य ह्मणावें. "असु" ह्मणजे इंद्रियें आणि "र" ह्मणजे रमणें अशी असुर शब्दाचीं पदें आहेत. म्हणून इंद्रियद्वारा जे विषयांतच आनंद मानितात त्यांस असुर ह्मणतात. देवही विषयासक्त असतात, पण त्यांस भगवद्भक्ति असते, ह्मणून ते विरक्त होतात. याकरितां भगवद्भक्तिरहित जे विषयासक्त असतात, त्यांसच असुर ह्मणावें. विवेक आणि ज्ञान यांचा ज्यांस गंध देखील नसतो त्यांस मोहिनी प्रकृतीचे मनुष्य ह्मणावें. अशा तिन्ही प्रकृतींचे लोकांच्या आशा, कर्म आणि ज्ञान पूर्वी सांगितल्याप्रमाणें व्यर्थ होतात.

या आसुरी प्रकृतीचें विस्तृत वर्णन सोळावे अध्यायांत भगवान् करणार आहेत, ह्मणून तें येथें संक्षेपानें केलें आहे. दैवी प्रकृतीच्या स्वभक्तांचें वर्णन मात्र भगवान् एथें विस्तारानें करितात.

**महात्मनस्तु मां पार्थ दैवीं प्रकृतिमाश्रिताः ।**
**भजंत्यनन्यमनसो ज्ञात्वा भूतादिमव्ययम् ॥ १३ ॥**

**अर्थ.**—जे मोठ्या मनाचे असतात ते दैवी प्रकृतीचा आश्रय करितात, आणि सर्व भूतांचा आदि जो मी अव्यय त्या मला जाणून माझें अनन्यभावें भजन करितात.

**टीका.**—राक्षसी, आसुरी आणि मोहिनी या तीन प्रकारचे आसुरी प्रकृतींचे लोक सांगितले. याहून विलक्षण अशा दैवी प्रकृतीच्या मनुष्यांची "**महात्मनः**" या शब्दानें सूचना केली आहे. ज्याचें चित्त थोर त्यास महात्मा ह्मणावें. थोर मनाचे लोकांजवळ शांतीचा अखंड वास असतो. ह्मणून ते परांचा अपराध सोसतात, व त्यांचे हातून परपीडा घडण्याचा संभवच नसतो. यावरून त्यांची राक्षसी प्रकृति नसते हें उघड सिद्ध होतें. ज्यांचें चित्त उदार असतें तेच थोर मनाचे लोक होत. स्पृहा नसणें हें औदार्याचें लक्षण आहे. इच्छित कार्यभाग साधण्याकरितां मोकळ्या हातानें खर्च करणारे लोक उदार ह्मणतां येत नाहींत. ह्मणून ज्यांस विषयस्पृहा नाहीं तेच खरे उदार ह्मटले पाहिजेत. याकरितां आसुरी प्रकृति महात्म्याचे अंगीं नसते, असें सुचविलें आहे. असे महात्मे ज्ञानसंपन्न असल्यामुळें मोह ह्मणजे अविवेक त्यांच्या वाऱ्यास देखील उभा राहत नाहीं, ह्मणून मोहिनी प्रकृतिही त्यांचेजवळ नसते. यावरून या तीन्ही प्रकारच्या आसुरी प्रकृतींहून विलक्षण अशी दैवी प्रकृति ज्यांची असते त्यांस महात्मे असें ह्मटलें आहे हें स्पष्ट झालें. असे महात्मे भगवंताचें अनन्यभावें भजन करितात; ह्मणजे भगवंताखेरीज इतर कोणाचें व कशाचेंही भजन ते करित नाहींत. सर्व भूतांचा आदि जें भगवंताचें अव्यय असें निर्गुणस्वरूप तें जाणून अनन्यभावानें हे महात्मे त्याचें भजन करितात, असें एथें ह्मटलें आहे. यावरून ज्ञानोत्तर काळीं करण्याचे सगुणभक्तीची सूचना केली आहे. सृष्ट्युत्पत्तीच्या पूर्वी जें निर्गुण ब्रह्म असतें तेंच प्रलयानंतरही उरतें, यावरून स्थितिकाळींही तेंच असतें, हें उघड सिद्ध

होतें. मृगजळास आदि सूर्यकिरण असतें. मृगजळ नाहींसें झाल्यावरही किरण असतें. तेव्हां मृगजळही सूर्याचे किरणाचेंच रूप असतें यांत कांहीं संशय नाहीं. यावरून सर्व सृष्टि भगवत्स्वरूपच आहे असें जाणून हे महात्मे सर्वात्मभक्तीनें भगवंताचें भजन करितात असें भगवान् सांगतात.

**सततं कीर्तयंतो मां यतंतश्च दृढव्रताः ।**
**नमस्यंतश्च मां भक्त्या नित्ययुक्ता उपासते ॥ १४ ॥**

**अर्थ.**—ते सतत माझें कीर्तन करितात, निश्चयानें माझे प्राप्तीचा यत्न करितात व भक्तियुक्त मला नमन करितात; अशा प्रकारें नित्ययुक्त होत्साते ते माझी उपासना करितात.

**टीका.**—पूर्व श्लोकीं सांगितल्याप्रमाणें स्वरूपस्थिति जाणून सगुण भक्त भगवंताचें सप्रेम अखंड कीर्तन करितात. वास्तविक कीर्तन भगवन्नामाचें घडतें, असें असून "**मला कीर्तितात**" म्हणून भगवंत बोलून गेले. त्याचें कारण असें कीं, भगवंतास कीर्तनाची जी निःसीम आवडी आहे तिची आठवण होऊन कंठीं प्रेम दाटला व भान हरपून "**मां कीर्तयन्तः**" असें बोलून गेले. पण त्यांतच आपण व आपलें नाम निराळें नाहीं हेंही दर्शविलें. भक्त लोक सर्व काळ भगवंताचें नाम घेतात. प्रारब्ध सारित असतांही त्यास ते विसरत नाहींत. सवड असेल तेव्हां तालमृदंगादि साहित्यासहित प्रेमानें कीर्तन करितात, व इतर काळीं त्यांची वाचा भगवन्नाम उच्चारित असते. अशा सतत अभ्यासानें झोपेंत देखील त्यांची जीभ भगवन्नामच चावळत असते, व स्वप्नींही तेंच त्यांस दिसतें, असें पंडित ह्मणतात. पोट भरून कीर्तन करणारे लोक मुळींच नाम न घेणाऱ्यांपेक्षां पुष्कळ बरे समजले पाहिजेत. फुलांचा विकरा करणारा फुलांचा वास घेतच असतो. त्याप्रमाणें अशा लोकांचे अंतःकरणावर भगवन्नामाचा परिणाम झालाच पाहिजे. नामास कोणताच काळ वर्ज नाहीं. भगवच्चरणांगु-

ष्ठास स्पर्शलेली गंगा सर्व अपवित्रांस पवित्र करिते. मग त्याचे नामाचा महिमा किती आहे याचें गणितच करितां येत नाहीं. हरिनामानें पापाचा नाश होतो, हरिनामानें अज्ञानाचा नाश होतो, हरिनामानें आत्मा प्रकाशतो व हरिनामानें जिवन्मुक्तदशाही प्राप्त होते. इतकेंच सांगून पुरें केलें पाहिजे, नाहीं तर माझा सर्व जन्म या नामाचा महिमा वर्णन करण्यांत जाईल व हातीं घेतलेलें काम तसेंच राहील. हें ज्ञानसंपन्न भक्ताचें प्रकरण आहे, व तो सतत कीर्तन करितो असें भगवान् ह्मणतात. यावरून तो स्वरूपध्यान करीत नाहीं कीं काय अशी शंका येते. तिचें निरसन दुसऱ्या चरणानें केलें आहे कीं, समाधिसाधन करीत असतांही त्याचें भजन चाललेंच असतें. त्याचे मुखीं नाम असतें व बुद्धि स्वरूपीं स्थिर असते. तो गातो, नाचतो तें सर्व भगवत्स्वरूपच आहे असें तो पाहत असतो. एवंच तो आपलें साधन करून जगतावरही उपकार करित असतो. तोंडानें जें जें नाम उच्चारित असतो, तद्रूप त्याची दृष्टि होत असते. अनंत अनंत ह्मणतां सर्व जग व्यापून आत्मा उरला आहे असें तो पाहतो. भगवान्, भगवान् ह्मणतां सर्व सृष्टि भगवद्रूप पाहतो. याप्रमाणें अर्थाकडे दृष्टि देऊन त्याचें भजन चालूं असतें. आतां तृतीय चरणानें त्याची नवविधा भक्ति दर्शविली आहे. "**नमस्यंतश्च**" यांतील "च"कारानें इतर भक्ति सुचविल्या आहेत. या नऊ प्रकारच्या भक्ति कोणत्या हें यापूर्वीं सांगितलेंच आहे. कीर्तन सर्व भक्तींत घडतें, ह्मणून त्यास सतत शब्द जोडला आहे. याप्रमाणें भक्तीकरून नित्ययुक्त होत्साता दैवी प्रकृतीचा ज्ञानी भक्त आपलें भजन करितो, असें भगवत सांगतात. यांहूनही आणखी दुसऱ्या भजनरीति आहेत, त्या भगवान् पुढील श्लोकीं सांगतात.

**ज्ञानयज्ञेन चाप्यन्ये यजंतो मामुपासते ।**
**एकत्वेन पृथक्त्वेन बहुधा विश्वतोमुखम् ॥ १५ ॥**

**अर्थ.**—कित्येक भक्त ज्ञानयज्ञेंकरून यजन करून माझी उपासना करितात, कित्येक एकत्वानें व कित्येक भेदभावानें माझी उपासना करितात व कित्येक सर्व विश्व माझें स्वरूप आहे असें समजून त्या विश्वरूपाची उपासना करितात.

**टीका.**—" **वासुदेवः सर्वमिति** " जाणणारे भक्त नेहमीं निर्गुणसमाधींत राहत नाहींत. त्यांचें वर्णन मागील श्लोकीं केलें आहे. कांहीं सगुणभक्तांची श्रवणकीर्तनीं प्रवृत्ति असून त्यांस व्यतिरेकसमाधीची अत्यंत गोडी असते. तसे भक्त पूर्वार्धानें सुचविले आहेत. " **चापि** " या शब्दांनीं पूर्वोक्त भक्ति सुचविली आहे. आत्मा अग्नि आहे अशी भावना करून, त्या अग्नींत चित्तवृत्तिरूप हविष्यांचा ते यज्ञ करितात. चतुर्थाध्यायांत यासंबंधी पूर्ण माहिती दिली आहे. आतां कोणी एकत्वें उपासना करितात याचा अर्थ काय हें पाहूं. ज्ञानयज्ञांत एकत्व असतेंच. त्याशिवाय एकत्वें उपासना सांगितली आहे ती कोणती असावी? ज्ञानयज्ञांतलें " **ज्ञान** " शब्दज्ञान ह्मणावें तर ज्ञानयज्ञ करणारा जिज्ञासु ह्मटला जाईल, ह्मणून तसें समजतां येत नाहीं. अद्वैत कळण्याकरितां दास्यभावानें उपासना करणारा भक्त " **पृथक्त्वें** " शब्दानें सुचविला आहे. यावरून अपरोक्ष अद्वैत ज्ञान ज्यास झालें आहे, असा ज्ञानयज्ञ करणारा भक्त आणि पृथक्त्वें दास्यभावानें उपासना करणारा भक्त या दोघांचे दरम्यानचे कोटीचा भक्त " **एकत्वेन** " या शब्दानें सुचविला आहे असें उघड दिसतें. यावरून सामाधिसुखाची स्थिति ज्यास बाणली नाहीं, परंतु नुसतें आत्मत्व ज्यास कळलें आहे, असा भक्त " **एकत्वेन** " ह्मणजे ऐक्यभावाची भावना करून सगुणभक्ति करितो असें भगवान् सांगतात. जगदुपाधीस ईश्वरोपाधि ह्मणतात. त्यासच " **तत्पद** " अशी संज्ञा आहे. जीवोपाधीस " **त्वंपद** " अशी संज्ञा आहे. या दोहींचें ऐक्य ज्यास अपरोक्ष कळलें आहे, तो ज्ञानयज्ञ

करणारा भक्त होय. या दोन्ही उपाधींचें प्रकाशक जें चित्स्वरूप, तें ज्यास आत्मत्वें कळलें आहे, परंतु या दोन्ही उपाधींचें ऐक्य मात्र जाणलें नाहीं, तो नुसता एकत्वभाव ठेवून भजन करणारा भक्त होय. व अद्वैत-ज्ञानाचे प्राप्तीची इच्छा धरून भगवंताचें द्वैतभावानें भजन करितो, तो पृथक्त्वें भजन करणारा होय. आतां निरनिराळ्या आकारांचें सर्व विश्व भगवद्रूपच आहे असें भजन करणारेही कित्येक भक्त असतात त्यांचें वर्णन चतुर्थ चरणानें केलें आहे. ही विश्वतोमुख उपासना पुढील श्लोकापासून वर्णन करितात.

अहं क्रतुरहं यज्ञःस्वधाहमहमौषधम् ।
मंत्रोऽहमहमेवाज्यमहमग्निरहं हुतम् ॥ १६ ॥

**अर्थ.**–श्रुत्युक्त होमरचना, स्मृत्युक्त होमरचना, देवतांच्या आहुति, पितरांस पिंड तिळजळ देतात तें, सर्व प्रकारचें धान्य व औषधी, मंत्र, तूप, अग्नि आणि आहुति हें सर्व मीच आहें.

**टीका.**–या श्लोकानें भगवान् असें सुचवितात कीं, सर्व सृष्टि आपणच आपल्या कल्पनेनें ते झाले आहेत. एवढी मोठी सृष्टि ईश्वर आपल्या कल्पनेनें कोठून व कसा काढीत असेल याचें अनुमान होणें अगदींच अशक्य झालें असतें ह्मणून कोळी नांवाचा किडा आपल्या दृष्टीसमोर भगवंतांनीं आणून ठेविला आहे. हा माशीएवढा किडा असतो. याचे पोटांत रहाट, चाती, कापूस, वाख अथवा ताग यांपैकीं कांहींच नसून तो पोटांतून अपार तंतु कोणते रीतीनें काढित असेल बरें ? एवंच भगवत्सामर्थ्य कल्पनेच्या बाहेर आहे. ती कल्पना नाहींशी झाली म्हणजे सर्व स्पष्ट दिसून येतें. तोंपर्यंत जाणते लोक अनुभवानें जें सांगतात त्याजवर भरंवसा ठेवून मजल मारली पाहिजे. आपल्या कल्पनेनें आपण वाटेल तशी स्वप्नसृष्टि उत्पन्न करितो, मग सर्वज्ञ सर्व-साक्षी ईश्वर काय न करूं शकेल ?

**पिताहमस्य जगतो माता धाता पितामहः ।**
**वेद्यं पवित्रमोंकार ऋक् साम यजुरेव च ॥ १७ ॥**

**अर्थ.**—या जगताचा पिता, माता, धारणकर्ता, पितामह मीच आहें, व जाणावयाची पवित्र वस्तु मीच आहें, त्याप्रमाणें ओंकार मी, ऋग्वेद, सामवेद, यजुर्वेद मीच आहें.

**टीका.**—मागल्या व या श्लोकानें भगवान् असें दर्शवितात कीं, सर्व सृष्टि आपणच आहें. प्रथम पद्मनाभरूपानें आपणास कल्पून नाभिस्थानीं ब्रह्मदेवही आपणच झाला. नंतर ब्रह्मदेवाच्या रूपानें आपल्या कल्पनेनें मनु व शतरूपा यांचें जोडपें उत्पन्न केलें. त्या जोडप्यापासून मिथुनसृष्टि होऊं लागली असें वेद सांगतात. यासंबंधानें तपशीलवार माहिती पाहिजे असल्यास श्रीमद्भागवतांत ती पहावी. एवंच ही सर्व सृष्टि ईश्वराची अचाट कल्पना होय. ती कल्पना करणें मायेचा धर्म होय. अविद्यानिर्मित विचित्र जडभास ओंगळच आहे. त्यांत जाणावयास योग्य असें चित्स्वरूप आहे तें पवित्र आहे. तें जाणण्याचें साधन वेद होत. त्यांपैकीं ऋक्, साम आणि यजुर्वेद यांचें रूप ओंकार आहे. तोही आपणच आहें असें भगवान् सांगतात. कित्येक भक्त याप्रमाणें समजून विश्वतोमुख उपासना करितात. याच प्रसंगानें आतां भगवान् आपलें ईशत्व वर्णन करितात.

**गतिर्भर्ता प्रभुः साक्षी निवासः शरणं सुहृत् ।**
**प्रभवः प्रलयः स्थानं निधानं बीजमव्ययम् ॥ १८ ॥**

**अर्थ.**—सर्वांची गति, सर्वांचा धनी, सर्वसाक्षी, सर्व भूतांचें वसतिस्थान, सर्वांचा रक्षक व सर्वांचा सुहृद् मीच आहें. व उत्पत्ति, लय आणि स्थितिकाळ मीच आहें. माझ्यांतच सर्वांचा लय होतो, आणि मीच सर्व जगताचें न नासणारें बीज आहें.

टीका.—मुक्ति, अपुनरावृत्ति आणि स्वर्गादि लोक या तीन प्रकारच्या गति आहेत. त्या सर्व भगवंतच आहे. ज्ञानानें मुक्ति मिळते व कर्मानें गति मिळते, त्या भगवंतच आहे. ह्मणून तो सर्वांचा भर्ता ह्मणजे धनी होय. भगवंतच विश्व आहे, जीव भगवंदश आहेत, आणि कर्में करून गति मिळते तीही भगवंतच आहे, तर भगवंतानें दिल्याशिवाय जीवांस आपोआप गति कां न मिळावी ? याचें उत्तर असें आहे कीं, ईश्वर प्रभु समर्थ आहे व जीव अविद्येनें बद्ध असून असमर्थ आहेत. ईश्वर सर्वसाक्षी आहे ह्मणून जीवांचीं सर्व कर्में तो जाणतो आणि ह्मणून तदनुरूप फळें देतो. भगवंत सर्वांचें निवासस्थानच आहे ह्मणून त्यास कोठून लांबून पाहणें नको, साक्षित्व हा त्याचा सहज गुण आहे. हें साक्षित्व आणि फळ देण्याचें सामर्थ्य अनादि आहेत. त्या गुणांमुळें गतिप्रदत्व ईश्वराकडे आहे. कर्मानुरूप फळ मिळत असून सर्व विवेकी लोक ईश्वरास भजतात याचें कारण असें आहे कीं, ईश्वर शरणागतांचा रक्षक आहे. जे आपले रक्षणाकरितां ईश्वरास शरण जातात, त्यांसच तो निजगति देतो, इतरांस देत नाहीं, कारण तो कल्पवृक्षस्वभाव आहे. जो जें मागेल त्यास तें तो देतो. मागितल्याशिवाय तो कोणास कांहीं देत नाहीं. बरें कल्पवृक्ष अज्ञ आहे व भगवंत तर सर्वज्ञ आहे. असें असून तो जर लोकांवर दया करून त्यांस चांगले मार्गास लावणार नाहीं, तर त्यास सुहृद् तरी कसें ह्मणावें ? याचें समाधान असें होतें कीं, वेद, शास्त्र, पुराणें, व अवतार ईश्वरानें प्रगट केले, ते या हेतूनें कीं, त्यांचें श्रवण करून लोकांनीं त्यास शरण यावें. राजानें अन्नसत्र न घातल्यामुळें दुष्काळपीडित लोक मरतील तर राजाकडे दोष येईल. पण अन्नसत्र घालूनही तेथें जाऊन कोणी जेवणार नाहीं, तर त्याचा दोष राजावर नाहीं. तसें, ज्ञानप्राप्तीची सर्व तजवीज करून ठेविली असूनही जर लोक त्याचा उपयोग करून न घेतील तर ते आत्मघातकी होत. त्याजबद्दल ईश्वराकडे कोणतेही प्रकारचा दोष लागूं शकत नाहीं. आतां त्याचे बुद्धींत प्रेरणा

करावी, तर सर्वांस त्यानें तारलें पाहिजे. असें करणें ह्मणजे स्वस्वरूपाचा आणि स्ववैभवाचा नाश करणें होय. तसें होऊं शकत नाहीं, कारण तीं अभंग आहेत. जर ब्रह्म नासूं शकेल, तरच प्रपंचाचा उगम बंद पडेल. जीवांवांचून प्रपंच उपजूं शकत नाहीं. ह्मणून हे सर्व जीवच मुक्त झाले, तर मग प्रपंच तरी कोणाकरितां उत्पन्न व्हावा ? तें असो, पण ब्रह्म न नासणारें आहे व तें प्रपंचवृक्षाचें बीज आहे असें उत्तरार्धानें भगवान् सांगतात. इतर बीज जसें नासतें, तसें ब्रह्म नासत नाहीं, म्हणून सृष्टि, स्थिति, व प्रलय हे नेहमीं होणारच. सूर्यकिरण आहे तोंपर्यंत रोज मृगजळ उपजणार, राहणार व लय पावणार. ह्मणून सर्व जीवांचा उद्धार करणें ईश्वराकडून होऊं शकत नाहीं. यासंबंधानें विस्तृत विचार यापूर्वीं झाला आहे तो पहावा. यावरून जीव अनादि आहेत तसाच ईश्वरही अनादि आहे, आणि न मागतां मुक्ति न देण्याचा त्याचा धर्मही अनादि आहे, ह्मणून सर्वांस मोक्ष देणें घडूं शकत नाहीं. एकास देऊन एकास न द्यावा तर समता बिघडते, ह्मणून जो मागेल त्यासच तो देण्याचा ईश्वराचा सहज धर्म आहे. यापुढील श्लोकांतही आपलें सुहृद्‌पण व दयालुत्व भगवान् दाखवितात.

**तपाम्यहमहं वर्षं निगृण्हाम्युत्सृजामि च ।**
**अमृतं चैव मृत्युश्च सदसच्चाहमर्जुन ॥ १९ ॥**

**अर्थ.**—किरणरूपें मीच तपतों. पर्जन्यही मीच आहें. तो पर्जन्य मीच आटोपतों व मीच सोडतों. मोक्ष मीच व मृत्यूही मीच आहें. सत् आणि असत् मीच आहें.

**टीका.**—सकाम व केवळ विषयभोगानें तृप्ति मानणारे ऐहिक लोक यांचाही सुहृद् आपणच आहें असें श्लोकाचे पूर्वार्धानें भगवान् दाखवितात. सूर्यकिरणरूपानें भगवंत तपून पर्जन्यवृष्टि होते. ती तो वेळेवर बंद करून पुन्हां वेळेवर सुरू करितो. त्यामुळें सर्व प्रकारचीं धान्यें व

औषधी उत्पन्न होऊन लोकांचें रक्षण होतें. हें भगवंताचे कृपेचें लक्षण होय. रोज नियमानें सूर्य उगवतो व नियमानें अस्तास पावतो. सागर आपली मर्यादा कधींही उल्लंघन करित नाहीं. या गोष्टींचा शास्ता भगवंतच आहे. पण मूर्ख लोकांस हें कळत नाहीं. कसला ईश्वर आणि तो आहे तरी कोठें असें ते अविश्वासपर बोलतात. तोच त्यानें पाऊस आवरून धरिला कीं महादेवास पाण्यांत बुडवूं लागतात, व मशीदींत मोठमोठ्यानें ओरडूं लागतात. पोकळ आकाशांत मेघ उत्पन्न होतात व त्यांपासून पर्जन्यवृष्टि होते. त्याचप्रमाणें हजारों अचंबा करण्यासारख्या गोष्टी आपल्यासमोर होऊनही ईश्वराचे अस्तित्वाविषयीं संशय असतो. अस्तु. ईश्वराची भक्ति न करणाऱ्यासही भगवंत आपलें दयालुत्व व सुहृदत्व बरप्रमाणें दाखवितो; तथापि या लोकांस खाण्यापिण्यास देतो तसें भक्तांसही देतो, पण भक्तांस याशिवाय मुक्तिही देतो ह्मणून भगवंताकडे वैषम्य लागतें. त्याचा परिहार उत्तरार्धानें केला आहे कीं, मुक्तांचा मोक्ष आणि अभक्तांचा मृत्यु, बरें आणि वाईट सर्व भगवंतच आहे. जो जशी अपेक्षा करील त्याप्रमाणें त्यास फळ मिळतें, यामुळें भगवंतास वैषम्य लागत नाहीं. पथ्य केलें असतां आरोग्य होतें व अपथ्यानें मृत्यु होतो. तसें जे मुमुक्षा धरितात त्यांस मोक्ष मिळतो व ज्यांस विषयांची बुभुक्षा असते त्यांस मृत्यु मिळतो. सकाम लोकांस मृत्यु कसा मिळतो याचें वर्णन यापुढचे दोन श्लोकांनीं केलें आहे.

**त्रैविद्या मां सोमपाः पूतपापा यज्ञैरिष्ट्वा स्वर्गतिं प्रार्थयंते ।**
**ते पुण्यमासाद्य सुरेंद्रलोकमश्नंति दिव्यान्दिवि देवभोगान् ॥२०॥**
**ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशंति ।**
**एवं त्रयीधर्ममनुप्रपन्ना गतागतं कामकामा लभंते ॥ २१ ॥**

अर्थ व टीका.—ऋग्वेद, सामवेद व यजुर्वेद, या तिन्हीं वेदांच्या मंत्रेंकरून अग्निमुखें भगवानाचें भजन करून स्वर्गप्राप्तीची प्रार्थना करि-

तात, ते सोमरस पिऊन निष्पाप होतात, व त्या पुण्यबळानें इंद्रलोक ह्मणजे स्वर्ग पावतात. तेथें नियतकालपर्यंत देवांस मिळणारे भोग भोगून पुण्याचा क्षय झाला ह्मणजे ते मृत्युलोकीं गर्भवास पावतात. वैदिक मार्गाचा आश्रय करून फलेच्छा धरणारे लोक याप्रमाणें जन्ममृत्यु पावतात. हे लोकही दैवी प्रकृतीचेच होत. कारण देवतारूपानें यज्ञभोक्ता ईश्वरच आहे, असें समजून ते यज्ञ करितात. असें जाणूनही ते विषयतत्पर असतात ह्मणून इतर देवतांचें यजन करितात. याकरितां त्यांस जन्ममृत्यु होतो. असा भाव न धरितां स्वतंत्रपणें जे इतर देवांचें यजन करितात, ते असुर स्वभावाचे लोक होत, असें पुढें सोळावे अध्यायांत भगवंत स्पष्ट सांगणार आहेत. आतां निष्काम अशा भक्तांचें वर्णन भगवान् करितात.

**अनन्याश्चिंतयंतो मां ये जनाः पर्युपासते ।**
**तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् ॥ २२ ॥**

**अर्थ.**—जे लोक अनन्यभावानें माझें चिंतन करित होत्साते माझी उपासना करितात, अशा नित्याभियुक्तांच्या योगप्राप्तीचा आणि प्राप्तयोगाचें जतन करण्याचा भार मी वाहतों.

**टीका.**—मोक्षाची सुद्धां इच्छा न करितां भगवच्चरणाची सेवा ज्यास गोड वाटते, अशा भगवद्भक्तास "**नित्याभियुक्त**" ह्मटलें आहे. चिमणीच्या पोटांत गर्भ राहिल्याबरोबर पुढें होणारे संतानाकरितां गवत आणि कापसाची मृदु शेज ती तयार करिते. याकरितां अंडें चिमणीची प्रार्थना करित नाहीं. हा केवळ मायाधर्मच होय. त्याप्रमाणें भगवद्भक्ति करूं लागल्यावर सर्व भार भगवंत आपण होऊन वाहतो. भक्त झाल्यावर भगवंताची दया मागणेंच नको. लहान पोर सर्पास धरूं जातें, पण आई त्यास उचलून घेऊन सर्पाचें तोंड ठेंचिते. तद्वत् भगवंत भक्ताचें

रक्षण करितो. न मागतां भक्तास तो ज्ञान देतो व त्याच्या ज्ञानाचें संरक्षण करून त्यास मोक्ष देतो. आपणाजवळ जें नसतें तें प्राप्त होणें यास "योग" ह्मणतात; व प्राप्त झालेल्या वस्तूचें जतन करण्यास "क्षेम" ह्मणतात. भगवद्भक्तास मोक्षाची अपेक्षा नसते तरी गुरुरूपें प्रगट होऊन भगवंत त्यास ज्ञान देतो, असें "योग वाहतों" या शब्दांनीं सुचविलें आहे. व तें ज्ञान तो त्याचे अंगीं बिंबवून जतन करितो असें "क्षेम वाहतों" या शब्दांनीं सुचविलें आहे. ज्ञान झालें तरी पूर्व संस्कारांमुळें ज्ञान्यास स्वरूपाची विस्मृति होते, तेव्हां भगवंत भक्ताची बुद्धि जागृत करितो. अशा रीतीनें भक्तांचा योग आणि क्षेम यांचा भार भगवंत वाहतो, असें या श्लोकानें सांगितलें आहे. या श्लोकाचा कोणी असा अर्थ करितात कीं, भगवंत भक्ताचे अन्नवस्त्राची काळजी ठेवून तें त्यास पुरवितो. पण गजांत लक्ष्मी देणारा जोड्याची काळजी ठेवितो, असें ह्मणण्यासारखें हें होय. जो लग्न करून देण्यास तयार असतो तो हळद पुरविणार नाहीं काय? जो कृपाळु भगवंत अज्ञानाचा नाश करून मोक्षसुख देण्यास तयार असतो, तो भक्तांस अन्न पुरविणार नाहीं काय? अन्नाच्छादन प्रारब्धानुसार सर्वांसच मिळतें. त्यांचा निर्वाह जन्म देण्यापूर्वीच करून ठेविलेला असतो. तेव्हां भक्तास तें भगवंत पुरवितो या ह्मणण्यांत कांहींच अर्थ नाहीं. कदन्न न सोसण्यासारखा ज्यांचा देह असतो त्यांस सदन्नच मिळावें, अशी त्यांच्या प्रारब्धीं योजना केली असते; व ज्यांचे प्रारब्धीं कदन्न नेमलें असतें त्यांस भगवंत तें सोसण्यासारखें शरीर देतो. अस्तु. भक्तास मोक्ष न मागतां मिळतो व अभक्तास मृत्यूची अपेक्षा नसूनही त्यास तो मिळतो, तरी यामुळें भगवंताकडे वैषम्य येत नाहीं. कारण पथ्य करणाऱ्या रोग्यास आरोग्य न मागतां मिळतें व अपथ्य करणाऱ्यास इच्छा नसतां रोग जडतो. हें वस्तुस्वभावाचें माहात्म्य होय. येथें दुसरी एक शंका उत्पन्न होते, ती अशी कीं, सर्व

देवता भगवंतच होय, मग इतर देवताभक्तांचा भार भगवंत कां वाहत नाहीं? तिचें निरसन भगवान् उत्तर श्लोकानें करितात.

**येऽप्यन्यदेवताभक्ता यजन्ते श्रद्धयान्विताः।**
**तेऽपि मामेव कौंतेय यजन्त्यविधिपूर्वकम् ॥ २३ ॥**

**अर्थ.**–हे अर्जुना, अन्य देवतांचे भक्त त्या त्या देवतांच्या ठिकाणीं श्रद्धा धरून त्यांचें जें यजन करितात, तें माझेंच यजन होय; पण तें यजन अविधिपूर्वक होय.

**टीका.**–इतर देवतांचें यजनही भगवंताचेंच यजन होय, परंतु तें विधिपूर्वक नसतें. नित्यफलप्राप्तीकरितां विष्णुरूपानेंच भगवंत यजिला पाहिजे. आपला सगळा देह एकच होय, पण क्षुधानिवृत्तीकरितां उदरांत अन्न पोंचविणें तें मुखावाटेच पोहोंचलें पाहिजे. तें कानांत घातलें तर क्षुधानिवृत्ति होणार नाहीं. इतर देवतांचें आणि भगवंताचें ऐक्य आहे, तें चित्स्वरूपीं आहे. उपाधिभेदें उच्चनीचपण असलेंच पाहिजे. लोखंडाचीच बेडी असते व लोखंडाचेंच शस्त्र असतें, पण शस्त्राचे अंगीं बेडी तोडण्याचें सामर्थ्य असतें. तद्वत् ईश्वर आणि इतर देवता एका चित्स्वरूपापासून झालीं, तरी उपाधिभेदामुळें ईश्वराचे अंगीं बंधमुक्त करण्याचें सामर्थ्य आहे, तें इतर देवतांचे अंगीं नाहीं. बेडी आणि शस्त्र लोखंडाचेच बनलीं असतात. तथापि बेडी तुटण्याकरितां बेडीचीच प्रार्थना केली, तर ती प्रार्थना अविधिपूर्वक होते. ह्मणून ती तुटण्याची फलप्राप्ति होत नाहीं. आतां श्रद्धेनें फलप्राप्ति होते, हें जरी खरें आहे, तरी ती श्रद्धा योग्य ठिकाणीं ठेविली पाहिजे. नाहीं तर तिचा कांहीं उपयोग होत नाहीं. गाय दूध देते अशी श्रद्धा धरून तिचें शेंपूट पिळिलें, तर दूध निघेल काय? नाहीं. तें मिळण्याकरितां तिचें थानच पिळिलें पाहिजे. याकरितां मोक्षानिमित्त भजन करणें तें एका भगवंताचेंच केलें पाहिजे.

ज्यांस इतर देवतांची भक्ति आहे असे कांहीं टीकाकार या "अविधिपूर्वक" शब्दाचा असा अर्थ कारितात कीं, ज्या विधीनें मोक्ष मिळतो तो विधि करावयास ते चुकतात; ह्मणजे इतर देवतांचें निष्काम यजन करण्यानेंही मोक्ष मिळतो, सकाम यजन केल्यानें मिळत नाहीं, असें ते सांगतात. परंतु पूर्वापर संबंध पाहिला असतां हा अर्थ अगदीं चुकीचा आहे हें उघड सिद्ध होतें. काम्यफलीं जे आसक्ति ठेवितात, ते सर्वच निंदेस पात्र आहेत, तर अर्थार्थी भगवद्भक्त संमत आहेत व अथार्थी इतर देवताभक्त असंमत आहेत असें भगवान् या पूर्वीं बोलले, त्यास बाध येतो. (सातवे अध्यायांतील १६, १८ आणि २० श्लोक पहा.) यावरून तो अर्थ युक्त नव्हे. अशा रीतीनें अन्यदेवताभजन करण्याचें कारण हें कीं, अद्वैत बरोबर न समजल्यामुळें सगुण ब्रह्म ह्मणजे काय हें तत्वतः त्यांस कळलें नाहीं. हेंच भगवान् आतां सांगतात.

**अहं हि सर्वयज्ञानां भोक्ता च प्रभुरेव च ।**
**न तु मामभिजानंति तत्वेनातश्च्यवंति ते ॥ २४ ॥**

**अर्थ.**–सर्व यज्ञांचा भोक्ता मीच आहें. कारण सर्व देवांचा धनी मी आहें. तत्वदृष्टीनें जे याप्रमाणें माझें सर्वेश्वरत्व जाणत नाहींत ते पदभ्रष्ट होतात.

**टीका.**–सर्वयज्ञभोक्ता आणि प्रभु एकटा सगुण सर्वेश्वर आहे, दुसरा कोणीही नाहीं, असें दोन "च" कारांनीं सुचविलें आहे. 'आपणास सर्वयज्ञभोक्तृत्व व प्रभुत्व आहे असें तत्वतः जाणत नाहींत' याह्मणण्यानें तें तत्व, यज्ञभोक्तृत्वीं सुचविलें आहे. यावरून स्वरूपीं अद्वैत व उपाधींत द्वैत दाखविलें आहे. कारण यज्ञामध्यें एक दैवत मुख्य असतें व बाकी देवता अंगभूत असतात. एका देवतेची आहुति दुसरी देवता घेऊं शकत नाहीं, आणि ज्या यज्ञांत जें दैवत नसतें तें त्या यज्ञास जाणत देखील नाहीं. परंतु भगवंताच्या नांवानें कोणी आहुति

देत नाहीं, तरी त्या यज्ञाचा भोक्ता तोच असतो, कारण यज्ञ त्याचेंच रूप आहे, या भावें "**तेऽपि मामेव कौंतेय**" असें पूर्व श्लोकीं ह्मटलें आहे. अलंकार तितकें सोनें आहे हें खरें, पण सराफास सरी मागितली तर तो कटिदोरा देत नाहीं. त्याप्रमाणें सर्व देवता ईश्वरच होय, तथापि "**वरुणं आवाहयामि**" असें ह्मटल्यानें इंद्र येत नाहीं. येथें कोणी असें ह्मणतील कीं, वरुणास बोलाविलें तर ईश्वरही येत नाहीं. तर त्यास हेंच उत्तर कीं, वरुणरूपानें ईश्वरच येतो. सरी मागितली असतां सुवर्ण त्या रूपानें येतें यावरून वरुण आणि ईश्वराचे पद्मनाभादि देह सारिखेच आहेत असें कधींही ह्मणतां येणार नाहीं. ईश्वरानें देह धारण केला तरी त्यास देहात्मता मुळींच नसते. पण देवतादिकांस ती असते. याचें कारण उपाधिभेद होय. शुद्ध मायेच्या योगानें निर्गुण सगुण होतें. तो नित्यमुक्त सगुण ईश्वर यज्ञनारायण होय. त्यालाच सर्व यज्ञांचें भोक्तृत्व असतें. हें तत्व न जाणतां अन्यदेवतोपासना करितात, ते त्या देवतेस पावतात, व कालांतरानें तेथून भ्रष्ट होऊन पुन्हां गर्भवास पावतात. यावरून वर सांगितलेलें तत्व न जाणणारे भक्तही च्यवतात कीं काय अशी शंका उत्पन्न होते. तिचा परिहार उत्तर श्लोकानें केला आहे.

**यांति देवव्रता देवान् पितॄन् यांति पितृव्रताः ।**
**भूतानि यांति भूतेज्या यांति मद्याजिनोऽपि माम् ॥ २५ ॥**

**अर्थ.**—जे देवांची भक्ति करितात, ते देवलोकास जातात. पितरांची भक्ति करितात ते पितृलोकास जातात, जे भूतगणांची भक्ति करितात ते त्यांप्रत पावतात. आणि माझी भक्ति करितात ते मला येऊन मिळतात.

**टीका.**—जे ज्यांची भक्ति करितात ते त्यांची आकृति पावून त्यांप्रत पावतात. तसें भगवद्भक्त भगवत्स्वरूप पावून तत्स्वरूप जो वैकुंठ-

लोक त्याप्रत पावतात. या वैकुंठीं रजतम नाहींत, ह्मणून ज्ञानाशिवाय वैकुंठाप्रत कोणी पावूं शकत नाहीं. यावरून भगवद्भक्तांस भगवंत गुरुरूपानें ज्ञान देऊन नंतर तो त्यांस वैकुंठ देतो, हें उघड सिद्ध होतें. कारण भगवत्स्वरूपास पावल्यावर पुनरावृत्ति नाहीं हें मागें वारंवार सांगितलें आहे. अन्यदेवतांचे उपासक च्यवतात याचें कारण हें कीं, त्या देवतांचे अंगीं ज्ञान देण्याचें सामर्थ्य नाहीं. तें एकट्या भगवंतासच आहे. या तीन श्लोकांनीं जे सिद्धांत सांगितले ते असे कीं, सर्व देव आणि ईश्वर एकच होत, कारण सर्व चित्स्वरूपच आहे. परंतु सर्वयज्ञभोक्तृत्व ईश्वराकडे आहे, ह्मणून त्याचेच भजनानें मोक्ष प्राप्त होतो. व तेंच भजन विधिपूर्वक असून, इतर देवतांचें भजन अविधिपूर्वक होय. अशा प्रकारें तत्व न जाणून जे भगवद्भजन करितात त्यांस तें तत्व भगवंत दाखवून आपल्या स्वरूपास पोंचवितो. तें भजनही फार सुगम आहे, असें आतां भगवान् सांगतात.

**पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति ।**
**तदहं भक्त्युपहृतमश्नामि प्रयतात्मनः ॥ २६ ॥**

**अर्थ.**–ज्याचें चित्त निष्काम आणि शुद्ध आहे असा मनुष्य भक्तीनें पत्र, पुष्प, फल अथवा पाणी मला अर्पण करितो तरी तें मी आवडीनें भक्षण करितों.

**टीका.**–ईश्वरास अशन नाहीं असें श्रुति ह्मणते. ती अशीः–"**अनश्नन्नन्यो अभिचाकशीति,**" व येथें तर भगवंत ह्मणतात कीं, भक्तानें अर्पिलेलें पत्र, पुष्प वगैरे भक्षण करितों.

हा विरोध परिहार केला पाहिजे. ईश्वरास भोजन नाहीं, याचा अर्थ विषयसेवन नाहीं असा आहे. कारण ज्या इंद्रियाचा जो विषय तेंच त्याचें भोजन होय. ईश्वर अतींद्रिय आहे, त्याला इंद्रियेंच नाहींत. त्याला दर्शनश्रवण आहे; परंतु स्वस्वरूपावांचून त्यास कोठें दुसरें दि-

सतच नाहीं. जोंपर्यंत विषय, विषयरूपानें दिसत नाहींत, तोंपर्यंत इंद्रियें नाहींत असें समजलें पाहिजे. ह्मणून ईश्वरास अशन नाहीं. तथापि शुद्धांतःकरणाचे भक्तानें भक्तीनें तुळशीचें वाळलें पान जरी अर्पण केलें तरी तें तो भक्षितो. विषयापेक्षेनें इतर देवतांस केलेलें अर्पण अशुद्ध चित्ताचें असतें, ह्मणून तें भगवंत स्वीकारीत नाहीं. भक्तांस विषयांची वांछा नसते, ह्मणून ते जें अर्पण करितात, तें स्वस्वरूप समजून भगवंत त्याचें अशन करितो; कारण भगवंताचें अशन स्वस्वरूपच आहे. येथें भक्षण करणें याचा अर्थ तोंडानें खातो असा नाहीं, तर त्याचा भोग घेतो असा आहे. अस्तु. याहूनही सुलभ अशी भजनरीति पुढील श्लोकांत सांगितली आहे.

**यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत् ।**
**यत्तपस्यसि कौंतेय तत्कुरुष्व मदर्पणम् ॥ २७ ॥**

**अर्थ.**–हे अर्जुना, तूं जें करशील, जें खाशील, जें होमिशील, जें दान करशील, जें तप करशील तें सर्व मला अर्पण कर.

**टीका.**–भगवंतास आपण अर्पण तें काय करावें? तो अवाप्तकाम आहे, परंतु त्याची सेवा करणें आपलें कर्तव्य आहे. आपलें सर्व कर्म त्याचे चरणीं अर्पण करणें, हा प्रथम भागवतधर्म आहे. असें केल्यानें सर्व काळ त्याची सेवा केल्याचें श्रेय आहे. याप्रमाणें कर्मार्पण केल्याचें फळ पुढचे श्लोकीं सांगितलें आहे.

**शुभाशुभफलैरेवं मोक्ष्यसे कर्मबंधनैः ।**
**संन्यासयोगयुक्तात्मा विमुक्तो मामुपैष्यसि ॥ २८ ॥**

**अर्थ.**–अशा कर्मार्पणानें तूं शुभ आणि अशुभ फळरूप कर्मबंधनापासून मुक्त होशील व संन्यासयोगयुक्त होऊन सर्व विपरीत भावनांपासून मुक्त होऊन माझ्या स्वरूपास पावशील.

टीका.–कर्मसमर्पणानें पुण्य आणि पाप या दोहींचाही नाश होतो व त्यायोगानें सर्व काळ प्रभूचें दास्यत्व घडतें. अशा दासास समर्थ आणि दयाळु भगवंत कसा उपेक्षील बरें? ज्या दिवसापासून भक्त कर्मसमर्पण करूं लागतो, त्याच दिवशीं त्यास भगवंत मोक्ष देण्याचा निश्चय करितो. ज्ञानाशिवाय शुभाशुभ संचितक्रियमाणांचा नाश होत नाहीं, व तें ज्ञान संन्यास आणि त्यागावांचून होत नाहीं. तेव्हां नुसत्या कर्मार्पणानें मोक्ष कसा सांगितला? याचा परिहार असा कीं, सर्वकर्मार्पण हाच त्याग होय, व सर्वकर्मार्पण करण्यास जो तयार झाला, तो काम्यकर्म काय ह्मणून करील? ह्मणून या कर्मार्पणानेंच त्याग आणि संन्यास घडतो हें दर्शविण्याकरितां "**सन्यासयोगयुक्तात्मा**" असें ह्मटलें आहे. एवं कर्मार्पणानें भगवत्प्रसाद होऊन ज्ञान प्राप्त होतें व त्या ज्ञानानें प्रपंच असत्य असून सत्य आहे, अशी जी विपरीत भावना असते तिजपासून मुक्त होऊन भगवत्स्वरूपाची प्राप्ति होते. आतां भगवंत भक्तास उद्धरितो व अभक्ताची उपेक्षा करितो असा दोष येऊं पाहतो, त्याचा परिहार उत्तर श्लोकानें केला आहे.

**समोऽहं सर्वभूतेषु न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः।**
**ये भजंति तु मां भक्त्या मयि ते तेषु चाप्यहम् ॥ २९ ॥**

**अर्थ.**–मी सर्व भूतीं सम आहे, मला कोणी द्वेष्य नाहीं, व प्रियही नाहीं. जे मला भक्तीनें भजतात, ते माझ्या ठायीं असतात व मीं त्यांचे ठायीं असतो.

टीका.–चित्स्वरूप भगवंत सर्वांभूतीं सारखा आहे, व त्याजमध्येंच सर्व भूतें आहेत. परंतु अविद्येमुळें जीव हें जाणत नाहींत. भगवंत कल्पवृक्षस्वभाव आहे. ह्मणून तो जशास तसा आहे. जे त्यास भजतात त्यांस तो जवळच आहे. अभक्तांस मात्र तो दूर आहे. भगवंत सर्वांत आहे, पण जे त्यास भजतात, त्यांच्यांत आपण आहों, व ते आ-

पल्यांत आहेत, असें भगवंतास वाटतें; कारण भक्तांस त्याचें स्मरण असतें. जे भगवंतास विसरतात त्यास भगवंतही विसरतो. जो उदकांत बुडालेला असूनही तृषित असतो तो उदकांत नाहींच असें ह्मटलें पाहिजे. तसा जो भगवंतास विसरला आहे, तो भगवंतांत नाहीं व भगवंत त्याच्यांत नाहीं असेंच समजलें पाहिजे. अस्तु.

विषयवासना नाहींशी होईपर्यंत काम्यत्याग घडत नाहीं व विषयभोगत्याग घडेपर्यंत भक्तियोग साध्य होऊं शकत नाहीं ह्मणून हा योग सुगम नसून दुर्गम आहे असें अर्जुनास वाटलें. त्याचें समाधान यापुढें केलें आहे.

**अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् ।**

**साधुरेव स मंतव्यः सम्यग्व्यवसितो हि सः ॥ ३० ॥**

**अर्थ.**—कोणी अत्यंत दुराचारी असूनही तो माझी अव्यभिचारिणी भक्ति करित असला, तर तोही साधुच समजला पाहिजे. कारण त्याच्या चित्तांत उत्तम निश्चय असतो.

**टीका.**—भगवान् ह्मणतात कीं, अत्यंत दुराचारीही अनन्यभावें भगवंताची भक्ति करित असेल तर तो साधुच समजावा, मग यथान्यायें स्वधर्मास अनुसरून जो भक्त विषयासक्त असेल तो साधु नाहीं असें कसें ह्मणतां येईल? जो रोगी अपथ्यकर औषध टाकून उत्तम औषध निरंतर सेवन करितो, तो रोगमुक्त झाला असें उत्तम वैद्य समजतो. संसाररोगास हरण करणारी अशी भगवद्भक्ति जो करितो आणि विषयरोग वाढविणाऱ्या पदार्थांचें सेवन वर्ज करितो, तो विषयवासनारोगापासून मुक्त होतोच. औषधावांचून रोग बरा होत नाहीं; तद्वत् भगवद्भक्तीवांचून चित्तशुद्धि होत नाहीं. मूळ रोग विषयवासना आहे, ती नाहींशी करण्याकरितां भगवद्भक्तिरूप औषध घेतलें पाहिजे. वासना एकदम नाश पावत नाहीं. ती जशी कमी होत जाते तसतसा विषय-

त्याग आपोआप होतो; त्याकरितां निराळी खटपट करणें नको. आचार वाईट असला ह्मणजे मुक्ति मिळत नाहीं असें नाहीं. भगवद्भक्तीचा जोर विलक्षण आहे.

**क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वच्छांतिं निगच्छति ।**

**कौंतेय प्रतिजानीहि न मे भक्तः प्रणश्यति ॥ ३१ ॥**

**अर्थ.**–भक्तीमुळें अशा भक्ताचें चित्त लवकर धर्मयुक्त होतें व तो शाश्वत शांतीप्रत पावतो. हे अर्जुना, तूं पक्कें समज कीं, माझा भक्त कधींही वांया जात नाहीं.

**टीका.**–ही भगवंताची वाणी प्रतिज्ञापूर्वक आहे, ह्मणून ती नेहमीं लक्षांत ठेविली पाहिजे. यामागील व हा असे दोन्ही श्लोक सत्कुलोत्पन्न परंतु दुराचारी अशा भक्तासंबंधानें भगवंत बोलले आहेत. आतां कुलानें नीच असलेले लोकही भगवद्भक्तीनें तरतात, असें पुढील श्लोकानें सांगितलें आहे.

**मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः ।**

**स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम् ॥ ३२ ॥**

**अर्थ.**–नीच कुलांत उत्पन्न झालेले लोक, स्त्रिया, वैश्य आणि शूद्र हेही माझा आश्रय करून परम गति पावतात.

**टीका.**–स्त्रिया जात्याच कृत्रिमस्वभाव असतात, ह्मणून त्यांस नीचत्व दिलें आहे. वैश्यांस धनलोभ अतिशय असतो व शूद्र तर केवळ तमोगुणी असतात. असे लोक देखील भगवद्भक्तीनें तरतात.

**किं पुनर्ब्राह्मणाः पुण्या भक्ता राजर्षयस्तथा ।**

**अनित्यमसुखं लोकमिमं प्राप्य भजस्व माम् ॥ ३३ ॥**

**अर्थ.**–तेव्हां उत्तम कुलांत उत्पन्न झालेले आणि पुण्यकर्म आचरणारे ब्राह्मण तसेंच भक्तिमान क्षत्रिय ऋषि हे तरतील, असें सांगणें

नको. अनित्य आणि दुःखकारक नरदेहास तूं आला आहेस तर माझें भजन कर.

टीका.—या नरदेहानें मोक्ष मिळतो व नरकही मिळतो. देह-गेह यांच्या ठिकाणीं आसक्ति ठेविल्यानें दुःखप्राप्ति होते. ती सोडून भगवंताचें भजन केल्यानें सुखस्वरूप मोक्ष मिळतो. मोक्ष मिळण्यास नरदेहावांचून साधन नाहीं ह्मणून आजउद्यां न ह्मणतां एकदम भगव-द्भक्ति करूं लाग असें भगवान् अर्जुनास सांगतात. आतां ती भक्ति कशी करावी हें भगवान् पुढील श्लोकीं सांगतात.

**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।**
**मामेवैष्यसि युक्त्वैव मात्मानं मत्परायणः ॥ ३४ ॥**

अर्थ.—माझे चरणीं मन ठेवून अंतःकरणांत माझी भक्ति धरून माझें भजन कर व मला नमस्कार कर आणि मत्परायण होऊन अंतःक-रणाची योजना माझे ठायींच कर ह्मणजे तूं मला पावशील.

टीका.—श्रीकांत वासुदेव सर्व देवांचा देव आहे. व तोच एकटा तारक आहे, असा ज्याचा दृढ निश्चय असतो त्यास "**मत्परायण**" असें ह्मटलें आहे.

असा मत्परायण होऊन वर सांगितल्याप्रमाणें अनन्यभावें भजन करावें, असा अर्जुनास उपदेश केला आहे. तो या ग्रंथाचे व च-कांस सफल होवो अशी प्रार्थना करून ही नवमाध्यायाची टीका त्याच वक्त्यास अनन्यभावानें समर्पण करितों.



श्री.

# अध्याय १० वा.

ॐ नमो भगवते वासुदेवाय.

मागील अध्यायीं भगवंतांनीं स्वभजनाचें महत्व वर्णन करून सांगितलें. तोच विषय या अध्यायांतही प्रतिपादन केला आहे.

**भूय एव महाबाहो शृणु मे परमं वचः ।**
**यत्तेऽहं प्रीयमाणाय वक्ष्यामि हितकाम्यया ॥ १ ॥**

**अर्थ.**—हे अर्जुना, तुला माझी प्रीति आहे ह्मणून तुझे हिताकारितां मी उत्कृष्ट असे बोल बोलतों ते पुन्हां ऐक.

**न मे विदुः सुरगणाः प्रभवं न महर्षयः ।**
**अहमादिर्हि देवानां महर्षीणां च सर्वशः ॥ २ ॥**

**अर्थ.**—माझी उत्पत्ति देवगण जाणत नाहींत व महर्षिही जाणत नाहींत, कारण या सर्वांच्या पूर्वीं मी उत्पन्न झालों आहें.

**टीका.**—निर्गुणब्रह्मीं माया उत्पन्न झाली तेंच निर्गुणाचें सगुणत्व होय. अशा सगुण भगवंताची उत्पत्ति त्याचे मागून झालेले देव आणि महर्षि कसे जाणतील?

**यो मामजमनादिं च वेत्ति लोकमहेश्वरम् ।**
**असंमूढः स मर्त्येषु सर्वपापैः प्रमुच्यते ॥ ३ ॥**

**अर्थ.**—मला जन्म नाहीं व मला आदि नाहीं. असा सर्व लो-

कांचा जो मी मोठा ईश्वर त्या मला जो जाणतो तो सर्व मनुष्यांत श-हाणा होय, व तो सर्व पापांपासून सुटतो.

टीका.–पूर्वश्लोकीं " **प्रभव** " कोणी जाणत नाहींत असें भगवान् बोलले व या श्लोकीं आपणास जन्म नाहीं असें ते ह्मणतात. या दोन्ही बोलांचें ऐक्य समजलें पाहिजे. ब्रह्मीं माया प्रगट होते, तेव्हां ईश्वर प्रगट होतो. तो ईश्वराचा जन्म ह्मणावा, तर प्रतिसृष्टीच्या आदिकालीं याचप्रमाणें घडतें, ह्मणून हा अनादि ईश्वरोपाधीचा प्रादुर्भाव समजला पाहिजे. यावरून ईश्वर अनादि आहे असें सिद्ध होतें. ह्मणून " **प्रभव** " या शब्दानें ईश्वराचा जन्म होतो असें ह्मणतां येत नाहीं. प्रलयानंतर ईश्वरोपाधिमाया ब्रह्मीं लीन होते, ह्मणून त्या स्थितीस भगवंताची योगनिद्रा असें ह्मणतात; योगसमाधि असें ह्मणतां येत नाहीं. कारण समाधींत आत्मप्रत्यय उरतो, तसा प्रलयानंतर ब्रह्मीं प्रत्यय नसतो. तथापि आपल्या निद्रेसारखी भगवंताची निद्रा नव्हे. जीवोपाधि निद्राकाळीं तमांत लीन असतो, परंतु शुद्धसत्वईश्वरोपाधि शुद्धसत्वांतच लय पावतो व त्यांतूनच पुन्हां उत्पन्न होतो. ब्रह्म जसें अनादि आहे तसाच ईश्वरोपाधिही अनादि आहे. ह्मणून ईश्वरास जन्म आहे असें ह्मणतां येत नाहीं. याकरितां पूर्वश्लोकांतील " **प्रभव** " शब्दाचा " **प्रादुर्भाव** " असा अर्थ समजला पाहिजे. वर सांगितलेलें तत्व जो जाणतो तो अत्यंत विवेकी होय, आणि सर्व मनुष्यांत तो श्रेष्ठ होय. कारण ह्या ज्ञानानें तो सर्व पापांपासून मुक्त होतो. या " **असंमूढ** " शब्दांत गहन भाव आहे. " **मूढ** " ह्मणजे अज्ञ, " **संमूढ** " ह्मणजे अत्यंत विवेकहीन व " **असंमूढ** " ह्मणजे अत्यंत विवेकी असा अर्थ आहे. अविद्यायुक्त सर्वच मूढ असतात. पण सर्वांहून भगवंत थोर आहे असें जाणून जो त्याचें भजन करितो तो संमूढ नव्हे असें येथें दर्शविलें आहे; कारण अशा भजनानें त्याची अविद्याग्रंथि खास सुटणार आहे. ईश्वराचें श्रेष्ठत्व जाणून जो त्यास भजत नाहीं त्यास संमूढ ह्मणावें, व जो असें परत्व

जाणून त्यास भजतो त्यास असंमूढ ह्मणावें. ईश्वराविषयीं अशी भावना ज्यास नाहीं त्यानें गुरुमुखानें वेदांतश्रवण केलें तरी त्या ज्ञानाचा त्यास कांहींच उपयोग होत नाहीं असें द्वितीयाध्यायांत "श्रुत्वाप्येनं वेद न चैव कश्चित्" या चरणानें सांगितलें आहे. त्याचें चित्त चित्स्वरूपीं स्थिर होत नाहीं, कारण त्याचे पापरूप पूर्व संस्कारांचा नाश झाला नसतो. याचें मूळ कारण भगवंताचें अजत्व, अनादित्व, व महेश्वरत्व न जाणणें हें होय. जो हें जाणून भगवद्भजन करितो, तो सर्व पापांपासून ह्मणजे संचितापासून व क्रियमाणापासून मुक्त होतो असें भगवान् ह्मणतात.

याप्रमाणें आदिकाळाचें आपलें श्रेष्ठत्व भगवंतांनीं प्रदर्शित केलें. आतां स्थितिकाळाचा आपला प्रभाव ते सांगतात.

**बुद्धिर्ज्ञानमसंमोहः क्षमा सत्यं दमः शमः ।**
**सुखं दुःखं भवोऽभावो भयं चाभयमेव च ॥ ४ ॥**
**अहिंसा समता तुष्टिस्तपो दानं यशोऽयशः ।**
**भवंति भावा भूतानां मत्त एव पृथग्विधाः ॥ ५ ॥**

**अर्थ.**–बुद्धि, ज्ञान, असंमोह, क्षमा, सत्य, दम, शम, सुख, दुःख, भव, अभाव, भय, अभय, अहिंसा, समता, तुष्टि, तप, दान, यश, अयश असे निरनिराळे भाव प्राण्यांचे ठायीं उत्पन्न होतात ते सर्व मजपासूनच होतात.

**टीका.**–आपल्यास सुख व्हावें, दुःख होऊं नये, असा निश्चय बुद्धि करिते. संसारदुःखापासून मुक्त होणें हेंच खरें स्वहित होय. अशा स्वहिताचा निश्चय करणारी बुद्धि भगवत्कृपेनें उत्पन्न होते. तदनंतर भगवत्कृपेनेंच ज्ञान प्राप्त होतें. आपणास ओळखणें यास ज्ञान ह्मटलें

आहे. जडचैतन्याचे विभागानें आत्मज्ञान होतें. त्यामुळें अज्ञानाचे आवरणाचा नाश होतो; ह्मणजे मी देह असा जो मोह असतो तो नाहींसा होऊन, आपण कोण हें समजतें. एवढ्यानें जडद्वैताचा नाश होत नाहीं. या जडद्वैतास संमोह ह्मणावें. तो संमोहही भगवत्कृपेनेंच नष्ट होतो. एवंच मुमुक्षा उत्पन्न होऊन व्यतिरेक आणि अन्वय यांचें ज्ञान भगवत्कृपेनें प्राप्त होतें असें भगवान् सांगतात. त्याचप्रमाणें क्षमा, सत्य, दम, आणि शम प्राप्त होणें हेंही भगवत्कृपेचेंच फळ होय. "**क्षमा**" ह्मणजे दुसऱ्याचा अपराध सहन करणें, "**सत्य**" ह्मणजे यथार्थ बोलणें, "**दम**" ह्मणजे इंद्रियनिग्रह आणि "**शम**" ह्मणजे चित्ताचा स्वस्वरूपीं उपरम होणें हीं होत. पुण्याचें फळ सुख व पापाचें फळ दुःख हींही भगवंतापासून मिळतात. या पुण्यपापांचे उपभोगाकरितां "**भव**" ह्मणजे जन्म व तें भोगल्यानंतर "**अभाव**" ह्मणजे मरण हे दोन्ही भगवंतच देतो. त्याचप्रमाणें दुःखदर्शनानें भय उत्पन्न होतें तें व त्याचा परिहार ह्मणजे अभय तोच देतो.

"**अहिंसा**" ह्मणजे परपीडा न करणें, "**समता**" ह्मणजे सर्वांस सारखें पाहणें, "**तुष्टि**" ह्मणजे तृप्ति व "**दान**" हे सगुण ईशकृपेनें प्राप्त होतात. यश आणि अयश ईश्वरच देतो. या दोन श्लोकांत सांगितलेले सर्व भाव आपणापासूनच प्राप्त होतात असें भगवंत सांगतात. यांपैकीं चांगलें तेवढें भक्तांस व वाईट तेवढें अभक्तांस प्राप्त होतें असा भाव आहे. एथपर्यंत भगवंतांनीं आपलें सर्वेश्वरत्व वर्णन केलें आहे. आतां आपण सर्वांस सेव्य आहों असें पुढील श्लोकांत सांगतात.

**महर्षयः सप्त पूर्वे चत्वारो मनवस्तथा ।**
**मद्भावा मानसा जाता येषां लोक इमाः प्रजाः ॥ ६ ॥**

**अर्थ.**–सात महर्षि व त्यांचे पूर्वींचे चार महर्षि आणि सर्व मनु

हे माझ्या मनापासून उत्पन्न झाले. हे माझे भक्त होते. त्यांपासून जगामध्यें ह्या सर्व प्रजा उत्पन्न झाल्या.

टीका.–भगवंताच्या पद्मनाभमूर्तीच्या नाभिकमळापासून ब्रह्मदेव उत्पन्न झाला. त्याच्या मनापासून सप्त ऋषि, सनकादिक चौघेजण व चौदा मनु उत्पन्न झाले. या सप्त ऋषींपासून आणि मनूपासून सर्व विश्वसंतान उत्पन्न झालें आहे. हे सर्वही जाडे भगवद्भक्त होते. भगवंतांनीं प्रथम ब्रह्मदेवास ब्रह्मविद्येचा उपदेश केला व त्याजपासून ती विद्या परंपरेनें आजपर्यंत चालत आली आहे. यावरून ही संतति दों प्रकारांनीं आहे. एक देहाचे उत्पत्तीमुळें. व दुसरी शिष्यत्वामुळें. ही दोन्ही प्रकारची संतति भगवंतापासून उत्पन्न झाली ह्मणून तो जगत्पिता व जगद्गुरुही आहे. जीवन्मुक्त संत भगवत्स्वरूप झाले असतात ह्मणून ते भगवंताची विभूति होत. सर्व जगांत भगवंताचें वास्तव्य आहेच. परंतु ज्ञानसामर्थ्यामुळें संतांचे ठायीं भगवंताचें वास्तव्य विशेषत्वें आहे ह्मणून त्यांस त्याची विभूति ह्मटलें आहे. या ज्ञानाचे दोन प्रकार आहेत. एक निर्गुण व दुसरा सगुण. हें सगुण ह्मणजे ऐश्वरयोगाचें धर्म्यज्ञान निर्गुणाचे ज्ञानाहून श्रेष्ठ आहे असें या गीतेंत पदोपदीं सांगितलें आहे. या ऐश्वरयोगांत भगवद्विभूति विशेषेंकरून वर्ततात. त्या विभूतींचें व योगाचें जें ज्ञान त्यासच सगुणभक्ति असें ह्मणतात. तेंच ज्ञान भगवंत यापुढें बोलणार आहेत.

**एतां विभूतिं योगं च मम यो वेत्ति तत्त्वतः ।**
**सोऽविकंपेन योगेन युज्यते नात्र संशयः ॥ ७ ॥**

अर्थ.–ही माझी विभूति आणि योग जो तत्वतः जाणतो त्याचे ठायीं ज्ञानयोग बाणतो यांत संशय नाहीं.

टीका.–मागील श्लोकांत सांगितलेले भक्त विभूति होत व मागील

अध्यायांत सांगितलेला ऐश्वरयोग भगवंताचा योग होय. हा योग व ह्या विभूति सगुणसर्वेश्वराच्या मूर्ति आहेत असें जे अनुभवानें जाणतात त्यांस योग बाणतो असें भगवान् ह्मणतात. या श्लोकांत " मम " या शब्दानें असें सुचविलें आहे कीं, इतर देवतांस ईश्वर समजून त्यांच्या ह्या विभूति आणि योग आहेत असें न ह्मणतां, आपण जो सगुणसर्वेश्वर त्याच्याच त्या आहेत असें जो समजतो त्यासच योग बाणतो. या " मम " शब्दानें असेंही सुचविलें आहे कीं, या विभूति आणि हा योग यांचा धनी आपणच आहे. आत्मज्ञानावांचून याचें खरें ज्ञान होत नाहीं, हें " तत्वतः " या शब्दानें सुचविलें आहे. भगवद्भक्ति न करणारे लोक स्वस्वरूपीं चित्त योजितात. परंतु चित्तवृत्तींच्या चंचलत्वामुळें त्यांस योग लवकर बाणत नाहीं. त्यांचें चित्त स्वरूपास जाणतें तथापि तें सकम्प होतें. पण या योगाचें आणि विभूतींचें ज्ञान झाल्यानें तेंच स्वरूपीं अविकम्प राहतें. जेथें जें उत्तम असेल तें ईश्वरसामर्थ्याचें लक्षण होय असें जाणणें यासच भक्तियोग ह्मणतात. भगवंत भक्तांस ज्ञान देतो हा त्यांचा योग वाहणें होय आणि आपला योगैश्वर तत्वतः दाखवून त्यांचे अंगीं अविकम्पयोग बाणवितो हें त्यांचा क्षेम वाहणें होय. अशा रीतीनें तो भक्तांचा योगक्षेम वाहतो ह्मणून मागील अध्यायांत " **अनन्याश्चिंतयंतो मां** " या श्लोकीं भगवान् बोलले आहेत.

**अहं सर्वस्य प्रभवो मत्तः सर्वं प्रवर्तते ।**

**इति मत्वा भजंते मां बुधा भावसमान्विताः ॥ ८ ॥**

**अर्थ.**—मीच सर्वांचा प्रभव आहें व मजपासूनच सर्व उत्पन्न होतें हें जाणून ज्ञाते लोक माझें भजन करितात.

**टीका.**—भगवंत सर्व जगाचें उपादान कारण आहे असें प्रथम चरणानें सुचविलें आहे आणि तोच निमित्त कारणही आहे असें द्वितीय चरणानें सुचविलें आहे. सुवर्णालंकारन्यायानें निगुर्णस्वरूपेंकरून तो

जगाचें उपादान कारण आहे व मायाशबलित साक्षित्वानें तें कल्पितो ह्मणून तो त्याचें निमित्त कारणही आहे. अशा ज्ञानानें युक्त होत्साते जे भगवद्भजन करितात तेच बुध होत. या पुढील श्लोकांत भजनप्रकार सांगितला आहे.

**मच्चित्ता मद्गतप्राणा बोधयंतः परस्परम् ।**
**कथयंतश्च मां नित्यं तुष्यंति च रमंति च ॥ ९ ॥**

**अर्थ.**–ते माझे ठायीं चित्त ठेऊन व मद्गतप्राण होऊन, परस्परांना मजविषयीं बोध करीत व माझें कीर्तन करीत सर्व काळ संतुष्ट राहून आपली करमणूक करितात.

**टीका.**–सर्व देहांत चैतन्य असतें, परंतु चित्तावांचून त्यास (देहास) सचेतनत्व नसतें. तें चित्त आपले ठायीं ठेवितात या ह्मणण्यानें असा भाव दर्शविला आहे कीं, भजनावांचून आपलें जीवित्व व्यर्थ आहे असें ते समजतात. ज्या देहांत चैतन्य असून चित्त नसतें त्यास प्रेत ह्मणतात. त्याप्रमाणें भजनावांचून ते आपला देह प्रेतवत् समजतात. आतां प्राण असेपर्यंत देहास प्रेत ह्मणतां येत नाहीं, ह्मणून त्यांस "**मद्गतप्राण**" ह्मटलें आहे; ह्मणजे त्यांचा प्रत्येक श्वास आणि उच्छ्वास भगवत्प्रीतियुक्त असतो. अशा प्रकारें भजनावांचून त्यांचा एक क्षणही जात नाहीं असें भगवान् ह्मणतात. असें भजन सत्संगावांचून घडत नाहीं. सत्संग असला ह्मणजे एकास विस्मृति पडली तर दुसरा त्यास स्मरण देतो. अशा प्रकारें ते एकमेकांस भजनमहात्म्याचा बोध करितात, व नेहमीं भगवत्कीर्तन करितात; ह्मणजे एक कीर्तन करितो व बाकीचे ऐकतात. यांतच ते संतोष मानितात व क्रीडा करितात. "**क्रीडा करितात**" या शब्दांनीं असें सुचविलें आहे कीं, कीर्तनप्रसंगीं कथानुसंधानाप्रमाणें ते हावभावही करितात. अशा भजनाचें त्यांस कोणतें फळ मिळतें तें भगवंत यापुढील श्लोकानें सांगतात.

**तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम् ।**
**ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयांति ते ॥ १० ॥**

**अर्थ.**–प्रीतिपूर्वक सर्व काळ याप्रमाणें भजन करणारे भक्तांस मी बुद्धियोग देतों त्यायोगानें ते मला पावतात.

**टीका.**–भगवंताची प्रीति पुढें करून ते भजतात ह्मणून त्यांस बुद्धियोग देतों असें भगवंत ह्मणतात. यावरून असें सुचावलें आहे कीं, ते आपण होऊनच भजन करितात. भगवंत त्यांस मुक्तत करण्यास लावीत नाहीं. हा "**प्रीतिपूर्वक**" शब्द भगवंताचें अकर्तृत्वसूचक आहे. त्यांत आणखीही गूढ भाव आहे. तो असा कीं, निमित्तावांचून कोणीही कोणास भजत नाहीं. तें निमित्त मनांत पुढें करून तो प्रयत्न करितो ह्मणजे प्रथम उद्देश मग प्रयत्न याप्रमाणें असतें. भक्त भगवत्प्रीतीस पुढें करून भजन करितात, ह्मणजे भगवत्प्रीति मिळावी हा त्यांचा उद्देश असतो; व त्या उद्देशानें ते भजन करितात. आणि भगवंत कल्पवृक्षस्वभाव आहे, ह्मणून तो त्यांस, ते जें मागतात तेंच ह्मणजे स्वभक्तियोग देतो. अशा रीतीनें "**प्रीतिपूर्वक**" या शब्दानें तो आपल्याकडे वैषम्यही येऊं देत नाहीं. कोणी भक्त काम्यफळ मागतात व कोणी मोक्ष मागतात, पण हे केवळ भगवत्प्रीति मागतात; ह्मणून ते सर्वांहून श्रेष्ठ होत. अशा भजनानें भगवंत त्यांस बुद्धियोग देतो. बुद्धियोग ह्मणजे बुद्धीचा व चैतन्याचा संयोग होय. बुद्धीचा आणि चैतन्याचा आयता संयोग आहेच. परंतु अनादि अविद्यासंस्कारांमुळें त्यांचा वियोग झाला असतो तो भगवंत नाहींसा करितो. हें आत्मज्ञानानें घडतें. यावरून आत्मज्ञान देऊन नंतर तो भक्तियोग देतो असें स्पष्ट दिसतें. हा भक्तियोग नवव्या अध्यायाच्या चवथ्या आणि पांचव्या श्लोकांत सांगितला आहे. एवंच बुद्धियोग शब्दानें आत्मसाक्षात्कार सुचविला आहे व त्यानंतर "**येन मामुपयांति ते**" ह्मणजे "**या बुद्धियोगानें ते मला पावतात**" असें ह्मटलें आहे. भगवंतास पावणें ह्मणजे त्याचा

ऐश्वरयोग तत्वतः ओळखणें हेंच होय. "एतां विभूतिं योगं च" या श्लोकीं 'जो विभूति नुसत्या जाणतो व योग तत्वतः जाणतो' असें ह्मटलें आहे. कारण शास्त्रश्रवणानें विभूति कोणीही जाणूं शकेल. पण ऐश्वरयोग ह्मणजे बुद्धियोग आत्मज्ञान प्राप्त झाल्याशिवाय कोणीही तत्वतः जाणूं शकणार नाहीं. यावरून ऐश्वरयोग भगवद्रूप आहे हें जाणणें बुद्धियोग प्राप्त झाल्यानंतरचें आहे. आणि या श्लोकांत, बुद्धियोग मिळाल्यानंतर भक्त मला पावतात असें भगवान् ह्मणतात. ह्मणून भगवंतास पावणें ह्मणजे ऐश्वरयोग तत्वतः जाणणें होय असें सिद्ध होतें. एवंच पूर्वश्लोकीं वर्णिलेल्या भक्तांस भगवंत बुद्धियोग देतो. त्यायोगानें ते त्याचा ऐश्वरयोग तत्वतः जाणतात असें या श्लोकानें सांगितलें आहे.

या बुद्धियोगाचे ह्मणजे ज्ञानाचे दोन प्रकार आहेत. एक व्यतिरेकज्ञान व दुसरें अन्वयज्ञान. पहिलें अविद्यावरणाचा नाश करितें व दुसरें अविद्याविक्षेपाचा नाश करितें. हें दोन प्रकारचें ज्ञान पुढील श्लोकीं सांगितलें आहे. पूर्वोक्त भक्त केवळ भगवत्प्रीति मागतात ह्मणून त्यांस अविकंपयोगस्थिति बाणेल अशी भगवंत कृपा करितोहेंही त्यांत सांगितलें आहे.

**तेषामेवानुकम्पार्थमहमज्ञानजं तमः ।**
**नाशयाम्यात्मभावस्थो ज्ञानदीपेन भास्वता ॥ ११ ॥**

अर्थ.—त्यांच्यावरच अनुग्रह करण्याच्या हेतूनें त्यांच्या बुद्धींत राहून दीपासारिखें ज्ञान देऊन त्यांचे अज्ञानावरणाचा नाश करितों, व सूर्यासारिखें विज्ञान देऊन त्यांच्या अज्ञानजनित जडद्वैतभ्रमाचा नाश करितों.

टीका.-" तेषामेव " या शब्दांनीं पूर्वोक्त भक्तांचें विशेषत्व दाखविलें आहे. मोक्षार्थ भगवंताचें भजन करणारे व प्रीतिपूर्वक भजन करणारे या दोघांसही भगवत्कृपेनेंच ज्ञान प्राप्त होतें. तथापि ज्ञान झाल्यावर मोक्षार्थ भजणारे अव्यक्तोपासक सगुणभक्ति सोडल्यामुळें योगानिमित्त अति कष्ट पावतात. परंतु प्रीतिपूर्वक भजणाऱ्या सगुणभक्तांवर भगवंताची विशेष कृपा होते, त्यामुळें त्यांस अविकंपयोग अनायासें बाणतो. भगवंत त्यांस द्विविध ज्ञान देतो. अनादि अविद्यावरणामुळें आपलें खरें स्वरूप जीव जाणत नाहींत, तें आवरण ह्मणजे तम व्यतिरेकज्ञान देऊन नाहींसें करितो, व अनादि अविद्यारूप पूर्वसंस्कारांमुळें जडद्वैतभ्रम झाल्यानें चित्त चिन्मय होऊन राहत नाहीं, त्या अज्ञानजनित तमाचा अन्वयज्ञान देऊन नाश करितो. असें हें दोन प्रकारचें ज्ञान या श्लोकांत सांगितलें आहे, हें उत्तरार्धांतील दृष्टांतावरून स्पष्ट सिद्ध होतें. आवरणतमनाशक ज्ञानास दीपाचा दृष्टांत दिला आहे व अज्ञानजनित जडभ्रमनाशक ज्ञानास सूर्याचा दृष्टांत दिला आहे. तम ह्मणजे अंधकार होय. अंधारांत मनुष्य आपल्यास आपण जाणतो, पण आपलें स्वरूप पाहूं शकत नाहीं. तोच दिवा आला कीं अंधाराचा नाश होऊन तो आपले देहास पाहूं लागतो. देहांत आत्मस्फुरण असूनही अज्ञानतमावरणामुळें मनुष्य आपलें स्वरूप जाणत नाहीं. पण व्यतिरेकज्ञानदीपानें अज्ञानांधकाराचा नाश झाला ह्मणजे तो आपलें स्वरूप ओळखतो. हें ज्ञान झालें तरी जडभाग द्वैत धरून समोर उभाच असतो. तो जडभागही आत्माच होय असें अन्वयज्ञानानें समजतें. तें अन्वयज्ञान सूर्याचे दृष्टांतानें सुचविलें आहे. रज्जु न कळतां सर्प दिसतो. त्यामुळें भय आणि कंप उत्पन्न होतात. पण रज्जु न दिसल्यानें तसें कांहीं होत नाहीं. ह्मणून आपणांस आपण न जाणण्यापेक्षां जडभ्रम विशेष दुःखद आहे. याकरितां आवरणनाशक ज्ञान दीपासारिखें होय व विक्षेपनाशक अन्वयज्ञानाचा प्रताप सूर्यासारखा

असतो. कारण अंधारांत आपलें रूप पाहण्यास दिवा पुरेसा होतो, पण अंधारांत असलेला विस्तृत प्रपंच दिव्याच्या उजेडानें दिसूं शकत नाहीं. ह्मणून विश्वप्रकाशक अन्वयज्ञान " **भास्वता** " या शब्दानें सुचविलें आहे.

कोणी टीकाकार असा अर्थ न करितां " **भास्वता दीपेन** " ह्मणजे " **प्रकाशवंत दिव्यानें** " असा अर्थ करितात. दिवा प्रकाशवंत असतोच, तेव्हां प्रकाशवंत ह्मटल्यानें काय विशेष सुचविल्यासारखें झालें? तेंही असो. पण हा उपदेश कोणत्या प्रसंगीं झाला याजकडेही लक्ष दिलें पाहिजे. हा उपदेश युद्धाचे तांतडींत केला आहे. अशा प्रसंगीं एका शब्दांत जें कार्य होऊं शकतें त्याकरितां जास्त शब्दांचीं योजना भगवंतांनीं केली असें घडूं शकत नाहीं. पण थोड्या शब्दांत पुष्कळ अर्थ दर्शविला आहे हें ह्मणणें शोभतें.

आतां भगवंत कोठें राहून अशा प्रकारें अज्ञानाचा नाश करितो हें " **आत्मभावस्थः** " या पदानें सुचविलें आहे. आत्मा ह्मणजे बुद्धि. त्या बुद्धीच्या भावांत भगवान् राहून अज्ञानाचा नाश करितात असें ह्मटलें आहे. बुद्धीचा भाव वृत्ति होय. तिच्यांत जी आत्मप्रत्ययस्फूर्ति असते तीच भगवंताची अमूर्त मूर्ति होय.

या अकरा श्लोकेंकरून श्रीकृष्ण सर्व देवांचा देव आहे अशी अर्जुनाची खात्री झाली ह्मणून अत्यंत भक्तिभावानें तो यापुढें प्रश्न करित आहे.

**परं ब्रह्म परं धाम पवित्रं परमं भवान् ।**
**पुरुषं शाश्वतं दिव्यमादिदेवमजं विभुम् ॥ १२ ॥**
**आहुस्त्वामृषयः सर्वे देवर्षिर्नारदस्तथा ।**
**असितो देवलो व्यासः स्वयं चैव ब्रवीषि मे ॥ १३ ॥**

**अर्थ.**–प्रकृतिपुरुषापलीकडचें असें ब्रह्म तूं आहेस. तूं श्रेष्ठ आणि पवित्र असें वैकुंठ आहेस. तूं शाश्वत आणि दिव्य असा पुरुष आहेस. तूं अज आणि सर्वांचा धनी आदिदेव आहेस.

**टीका.**–" प्रकृतिपुरुषापलीकडचें निर्गुण ब्रह्म तूं आहेस " या बोलण्यानें निर्गुणमोक्ष भगवंत आहे असें सुचविलें आहे. " **परं धाम** " या शब्दानें वैकुंठ सुचविलें आहे. कारण " **पवित्र** " " **परम** " आणि " **धाम** " हे शब्द सगुणदर्शक आहेत. निर्गुण ब्रह्म पवित्रही नाहीं आणि अपवित्रही नाहीं. जेथें अपवित्र रजतमांचा विटाळ नाहीं असें शुद्धसत्वरूप वैकुठ " **परं धाम** " या शब्दानें सुचविलें आहे. सृष्टींत पवित्र पदार्थ पुष्कळ आहेत, तथापि त्यांत रजतमांचें थोडें तरी मिश्रण सांपडतें. परंतु शुद्धसत्वांत रजतमांचा लेश देखील नसतो; ह्मणून त्यास " **परमं पवित्रं** " असें विशेषण दिलें आहे. सर्व पिंड व ब्रह्मांडें पुरें होत. यांचे ठिकाणीं वास करणारा पुरुषही भगवंतच आहे. पुरांत जीवही राहतात, तसा भगवंत नाहीं हें दाखविण्याकरितां त्यास शाश्वत हें विशेषण दिलें आहे. या पुरुषाचें अलौकिकत्व " **दिव्य** " शब्दानें दर्शविलें आहे. भगवंत आदिदेव, अज आणि विभु आहे असें व्यासादिक सर्व ऋषि ह्मणतात, व तसेंच स्वतः भगवंतही यामागें याच अध्यायांत बोलले आहेत. या प्रकारें भगवंताची थोरवी वर्णन करून अर्जुन ह्मणतो कीं,

**सर्वमेतदृतं मन्ये यन्मां वदसि केशव ।**
**न हि ते भगवन्व्यक्तिं विदुर्देवा न दानवाः ॥ १४ ॥**

**अर्थ.**–हे केशवा, तूं जें जें बोलतोस तें सर्व मला खरें वाटतें. हे भगवंता, तुझे सगुणत्वाची अभिव्यक्ति देवदानव कोणीही जाणत नाहींत.

**टीका.**–"देव" आणि "दानव" या दोन शब्दांनीं दैवी संपत्तीचे आणि आसुरी संपत्तीचे लोक दर्शविले आहेत.

**स्वयमेवात्मनात्मानं वेत्थ त्वं पुरुषोत्तम ।**

**भूतभावन भूतेश देवदेव जगत्पते ॥ १५ ॥**

**अर्थ.**–हे पुरुषोत्तमा, स्वतःचेच बुद्धीनें तूं स्वतःला जाणतोस. हे जगत्पते, तुझ्याच कल्पनेनें तूं भूतें उत्पन्न करितोस व त्यांस वर्तविणारा प्रभुही तूंच आहेस. सर्व देवांचा देवही तूंच आहेस.

**टीका.**–माया ही प्रभूच्या बुद्धिस्थानीं कल्पिली आहे. त्या मायेंकरून भगवंत आपणास जाणतो. ही माया कांहीं दुसरी निराळी वस्तु नाहीं. ती ब्रह्माची शक्तिच आहे. ह्मणून तूं स्वयमेव आपणास जाणतोस असें ह्मटलें आहे.

**वक्तुमर्हस्यशेषेण दिव्या ह्यात्मविभूतयः ।**

**याभिर्विभूतिभिर्लोकानिमांस्त्वं व्याप्य तिष्ठसि ॥ १६ ॥**

**अर्थ.**–ज्या आपल्या विभूतींच्या योगानें सर्व जगास तूं व्यापून राहतोस त्या सर्व पूर्णपणें सांगण्यास तूंच योग्य आहेस.

**कथं विद्यामहं योगिंस्त्वां सदा परिचिंतयन् ।**

**केषु केषुच भावेषु चिंत्योऽसि भगवन्मया ॥ १७ ॥**

**अर्थ.**–हे ऐश्वर्ययोगवंता, कोणकोणत्या रूपानें तुझें सदा चिंतन केलें असतां मी तुला जाणेन? हे भगवंता, कोणकोणत्या भावीं तुझें चिंतन करावें?

**टीका.**–चित्स्वरूप सर्व ठिकाणीं समत्वेंच असतें. त्याचें चिंतन करून शिवाय विशेषत्वें विभूतिरूपानेंही भगवंताचें ध्यान केलें पाहिजे, असा या श्लोकांतील भावार्थ आहे.

**विस्तरेणात्मनो योगं विभूतिं च जनार्दन ।**
**भूयः कथय तृप्तिर्हि शृण्वतो नास्ति मेऽमृतम् ॥ १८ ॥**

**अर्थ व टीका.**—पूर्वी सप्तमाध्यायांत संक्षेपानें विभूति सांगितल्या. आतां योगासहित त्या विभूति विस्तारानें पुन्हां सांगण्याविषयीं अर्जुन भगवंताची प्रार्थना करित आहे. कारण विभूतिरूप अमृत पूर्वी पिऊनही आपली तृप्ति झाली नाहीं, असें उत्तरार्धांत अर्जुन ह्मणतो.

आतां अर्जुनाच्या प्रश्नाचें उत्तर भगवान् देतात.

**हंत ते कथयिष्यामि दिव्या ह्यात्मविभूतयः ।**
**प्राधान्यतः कुरुश्रेष्ठ नास्त्यंतो विस्तरस्य मे ॥ १९ ॥**

**अर्थ.**—हे अर्जुना, फार उत्तम आहे. माझ्या दिव्य विभूति मी तुला मुख्यत्वें सांगतों, कारण माझ्या विस्ताराला अंत नाहीं.

**टीका.**—भगवंताच्या ऐश्वर योगाचें चिंतन करित असतां विभूतिरूपानें विशेषत्वें कसें चिंतन करावें असा अर्जुनाचा प्रश्न होता. ह्मणून या श्लोकांत जरी नुसता विभूति शब्द आहे, तरी योगासहित विभूति सांगेन असें भगवान् ह्मणतात ह्मणून ग्रहण केलें पाहिजे किंबहुना "**आत्मविभूतयः**" या शब्दांनीं तो अर्थ स्पष्ट दर्शविला आहे, असें ह्मणण्यासही हरकत दिसत नाहीं. आत्मा ह्मणजे देहच. सर्व विश्वरचना ह्मणजे अघटितघटनायोग ईश्वराचा देह. यावरून "**आत्मविभूतयः**" या शब्दानें ऐश्वरयोगासहित विभूतींचा बोध होतो. एवंच या योगांत श्रेष्ठत्वें जें असेल तें योगासहित भगवान् यापुढें सांगणार आहेत.

**अहमात्मा गुडाकेश सर्व भूताशयस्थितः ।**
**अहमादिश्च मध्यं च भूतानामंत एव च ॥ २० ॥**

अर्थ.–सर्व भूतांचे आशयांत असणारा आत्मा मीच आहें. मीच सर्व भूतांचा आदि, मध्य आणि अंतही आहें.

टीका.–आपलें बरें व्हावें हा सर्व प्राण्यांचा आशय असतो. त्या आशयांत जो प्रियरूप आत्मा असतो तो भगवंतच होय. चंद्रास राहु आच्छादून टाकतो त्यामुळें चंद्र हतप्रभव होतो. तद्वत् आत्मा स्वतःसिद्ध निर्मळच आहे. पण अहंबुद्धीनें तो झांकला जाऊन त्याचा प्रकाश प्रत्ययास येत नाहीं. त्या मीपणांतच मला सुख होवो हा आशय असतो. त्या आशयांत सर्वव्यापक चित्स्वरूप असतेंच. ह्मणून जीवांची कोणतीही इच्छा तृप्त झाली तरी त्यानें भगवंतच तृप्त होतो. कारण जीव चिदंश आहे आणि सर्व भोग त्या चिदंशाच घडतात. सर्व जीव भगवदंश आहेत, ह्मणून त्यांस जें सुखदुःख आपण देतों तें भगवंतास दिल्यासारखें होतें. या उपदेशाकडे सावधान चित्त द्यावें असें "गुडाकेश" या नांवानें अर्जुनास आळवून सुचविलें आहे. ज्यानें निद्रा जिंकिली आहे ह्मणजे स्वहिताविषयीं ज्यास जागृति आहे त्यास गुडाकेश ह्मणावें. अस्तु, जडापासून चैतन्य वेगळें करून तें चैतन्य आपणच आहों असें पूर्वार्धानें सुचविलें आहे, आणि सर्व भूतांचा आदि, मध्य आणि अंत आपणच आहों असें ह्मणून सर्व विश्व आपलेंच रूप आहे असें उत्तरार्धानें सुचविलें आहे. सुवर्णातच अलंकार असतो. पण आदीं आणि अंतीं तो भासमान होत नाहीं, मध्यांत ह्मणजे स्थितिकाळीं तो भासतो. तद्वत् सृष्टीचा आदीं आणि अंतीं भास नसतो, कारण ती भगवद्रूपांत गुप्त असते. पण मायायोगानें स्थितिकाळीं तिचा भास होतो. तोच भगवंताचा ऐश्वरयोग होय असें यापूर्वीं सांगितलेंच आहे. तो ऐश्वर योग आपणच आहों ह्मणून भगवान् सांगतात. या श्लोकाचे उत्तरार्धानें योग दाखवून त्या योगांत जी विभूति आहे ती पूर्वार्धानें दाखविली

आहे. यावरून यापुढेंही योगासहित विभूति दाखविल्या आहेत हें सांगणें नको.

**आदित्यानामहं विष्णुर्ज्योतिषां रविरंशुमान् ।**
**मरीचिर्मरुतामस्मि नक्षत्राणामहं शशी ॥ २१ ॥**

**अर्थ.**—सर्व देवांत मी विष्णु आहें. प्रकाशवंतांत मी सूर्य आहें. मरुद्गणांत मरीचि मी आहें. नक्षत्रांत चंद्र मी आहें.

**टीका.**—सर्व इंद्रियांचे अभिमानी निरनिराळे देव आहेत. त्यांत पायांचा अभिमानी वामनरूपी विष्णु आहे. इंद्रियांचा जो जो विषय असतो त्या सर्वांकडे पायच नेऊन पोंचवितात. ह्मणून पादाभिमानी दैवत आपली विभूति आहे असें भगवान् ह्मणतात.

**वेदानां सामवेदोऽस्मि देवानामस्मि वासवः ।**
**इंद्रियाणां मनश्चास्मि भूतानामस्मि चेतना ॥ २२ ॥**

**अर्थ.**—वेदांमध्यें सामवेद मी आहें. देवांमध्यें इंद्र मी आहें. इंद्रियांमध्यें मन मी आहें. भूतांमध्यें जीवनकळा मी आहें.

**रुद्राणां शंकरश्चास्मि वित्तेशो यक्षरक्षसाम् ।**
**वसूनां पावकश्चास्मि मेरुः शिखरिणामहम् ॥ २३ ॥**

**अर्थ.**—रुद्रांमध्यें शंकर मी आहें. यक्षांत आणि राक्षसांत कुबेर मी आहें. वसूंमध्यें अग्नि मी आहें. पर्वतांमध्यें मेरु मी आहें.

**पुरोधसां च मुख्यं मां विद्धि पार्थ बृहस्पतिम् ।**
**सेनानीनामहं स्कंदः सरसामस्मि सागरः ॥ २४ ॥**

**अर्थ.**—सर्व पुरोहितांमध्यें बृहस्पति मी आहें असें जाण. सेनापतींमध्यें स्कंद व सर्व सरोवरांत सागर मी आहें.

**महर्षीणां भृगुरहं गिरामस्म्येकमक्षरम् ।**
**यज्ञानां जपयज्ञोऽस्मि स्थावराणां हिमालयः ॥ २५ ॥**

अर्थ.—सर्व महर्षींमध्यें भृगु मी आहें. वाणींमध्यें एकाक्षर ॐ-कार मी आहें. सर्व यज्ञांत जपयज्ञ मी आहें. स्थावरांत हिमालय मी आहें.

टीका.—परा, पश्यंती, मध्यमा आणि वैखरी या चार वाचा शब्द-रूपें जीवांच्या उपाधि आहेत. माझें अमुक आहे, मला अमुक पाहिजे अशा कल्पना पश्यंती वाचा करिते. ती एक घटकाभर देखील स्वस्थ रहात नाहीं. जपकाळीं तिची मंत्रावर उडी पडते. कल्पनाच संसाराचें मूळ आहे व तिच्यामुळेंच चिदंश जीवत्व पावला आहे. पश्यंती वाचे-मध्यें नारायणाचा मंत्र जेव्हां आठवतो तेव्हां चिदंशास संसारकल्पने-पासून विसांवा मिळतो. जप करितां करितां कल्पना मंत्ररूप होते. तिची स्फूर्ति मंत्राग्नींत होमिली ह्मणजे जपयज्ञ करणाऱ्या यजमानास कैवल्यफळच मिळतें. भगवन्नाम वैखरीस आलें कीं ती पवित्र होते. पश्यंतीस जप घडतो तोंपर्यंत तो मंत्ररूप उपाधिच असतो. पश्यंती मंत्र ह्मणते तेव्हां बुद्धि आत्मप्रत्ययानें तेवढेंच जाणते. ह्मणून त्या वेळीं जीव समाधिजवळ जवळ असतो. मंत्राचा जप बंद झाला कीं बुद्धि आत्मस्वरूपासच पाहते. असा अनुभव सामान्य मनुष्यास देखील क्षणैक घडतो, पण अविद्येमुळें त्यास तो ओळखूं येत नाहीं. याप्रमाणें वारंवार होत गेलें ह्मणजे आत्मस्वरूपाची ओळख होते. असा जपाचा महिमा आहे ह्मणून सर्व यज्ञांत जपयज्ञ भगवंताची विभूति होय.

**अश्वत्थः सर्ववृक्षाणां देवर्षीणां च नारदः ।**
**गंधर्वाणां चित्ररथः सिद्धानां कपिलो मुनिः ॥ २६ ॥**

अर्थ.—सर्व वृक्षांत पिंपळ मी आहें. देवर्षींमध्यें नारद मी आहें. गंधर्वांत चित्ररथ गंधर्व मी आहें, व सर्व सिद्धांमध्यें कपिल महामुनि मी आहें.

**उच्चैःश्रवसमश्वानां विद्धि माममृतोद्भवम् ।**
**ऐरावतं गजेंद्राणां नराणां च नराधिपम् ॥ २७ ॥**

**अर्थ.**—हे अर्जुना, क्षीराब्धीचें मंथन करून अमृत काढिलें त्या वेळेस उच्चैःश्रवा नांवाचा घोडा उत्पन्न झाला तो सर्व घोड्यांत माझी विभूति होय असें जाण. गजेंद्रांमध्यें ऐरावत मी आहें व नरांमध्यें राजा मी आहें.

**आयुधानामहं वज्रं धेनूनामस्मि कामधुक् ।**
**प्रजनश्चास्मि कंदर्पः सर्पाणामस्मि वासुकिः ॥ २८ ॥**

**अर्थ.**—आयुधांमध्यें वज्र मी आहें. धेनूंमध्यें कामधेनू मी आहें. प्रजा उत्पन्न करणारा मदन मी आहें. सर्पांमध्यें वासुकि मी आहें.

**अनंतश्चास्मि नागानां वरुणो यादसामहम् ।**
**पितॄणामर्यमा चास्मि यमः संयमतामहम् ॥ २९ ॥**

**अर्थ.**—नागांत शेष मी आहें. जलचरांचे गणांमध्यें वरुण मी आहें. पितरांमध्यें अर्यमा मी आहे. ज्याचे योगानें इंद्रियें आणि मन याचा संयम होतो त्यांत यम मी आहें.

**प्रल्हादश्चास्मि दैत्यानां कालः कलयतामहम् ।**
**मृगाणां च मृगेंद्रोऽहं वैनतेयश्च पक्षिणाम् ॥ ३० ॥**

**अर्थ.**—दैत्यांमध्यें प्रल्हाद मी आहें. चालकांमध्यें काळ मी आहें. पशूंमध्यें सिंह मी आहें. व पक्ष्यांमध्यें गरुड मी आहें.

**टीका.**—चालक ह्मणजे वर्तविणारा. जसा ग्रामाचा चालक ग्रामपाळ व देशाचा चालक राजा असतो, तसा काळ सर्वांचा चालक आहे. ह्मणून सर्व चालकांमध्यें काळ श्रेष्ठ आहे. याकरितां तो भगवंताची विभूति आहे.

**पवनः पवतामस्मि रामः शस्त्रभृतामहम् ।**
**झषाणां मकरश्चास्मि स्रोतसामस्मि जान्हवी ॥ ३१ ॥**

**अर्थ.**—वेगवानांमध्यें पवन मी आहें. शस्त्र धारण करणारांमध्यें राम मी आहें. जलचरांमध्यें मकर मी आहें. नद्यांमध्यें भागीरथी मी आहें.

**सर्गाणामादिरंतश्च मध्यं चैवाहमर्जुन ।**
**अध्यात्मविद्या विद्यानां वादः प्रवदतामहम् ॥ ३२ ॥**

**अर्थ.**—हे अर्जुना, सृष्टीचा आदि, अंत आणि मध्य मीच आहें. सर्व विद्यांमध्यें अध्यात्मविद्या मी आहें. सर्व भाषणांत गुरुशिष्यांचा वाद मी आहें.

**टीका.**—सृष्टीच्या आदीं आणि अंतीं अद्वय ब्रह्मच असतें व स्थितिकाळींही तेंच असतें असें "**चैव**" शब्दांनीं सुचविलें आहे. स्थितिकाळीं भगवंताचें अघटितघटनाचातुर्य दिसतें, तो त्याचा ऐश्वरयोग होय, हें यापूर्वीं सांगितलें आहे. याचें खरें ज्ञान अध्यात्मविद्येवांचून होत नाहीं. अध्यात्म ह्मणजे आपला भाव. सर्व सृष्टींत व सर्व आपणच आहों असें पाहण्यास अध्यात्मविद्या ह्मणतात. ही विद्या समजून घेण्याकरितां शिष्य गुरूस प्रश्न करितो व गुरु त्याचें उत्तर देतो. शिष्याची नीट समजूत होण्याकरितां जो वाद होतो त्यास "**वाद**" असें एथें ह्मटलें आहे.

**अक्षराणामकारोऽस्मि द्वंद्वः सामासिकस्य च ।**
**अहमेवाक्षयः कालो धाताऽहं विश्वतोमुखः ॥ ३३ ॥**

**अर्थ.**—सर्व अक्षरांत अकार मी आहें. सर्व समासांत द्वंद्वसमास मी आहें. नष्ट न होणारा काळ मी आहें. सर्व सृष्टीला धारण करणारा मी आहें.

टीका.–“ अ ” हा स्वर सर्व अक्षरांचें मूळ आहे हें सांगणें नको. “ रामकृष्ण ” व “ जीवेश्वर ” हीं द्वंद्व समासाचीं उदाहरणें होत. वास्तविक हे एक एकच शब्द आहेत. परंतु व्यवहारांत ते दोन दोन समजले जातात. व्यवहारीं जीवेश्वर दोन असतात, पण परमपद निर्गुण ब्रह्म एकच आहे. ज्या दृष्टांतांनीं परमार्थ सिद्ध होतो ते भगवंताची विभूति होत असा यापासून तत्वार्थ निघतो. मागें “ **कालः कलयतामहं** ” **या चरणांत** जो काळ सुचविला आहे तो सृष्टिस्थितिसंहाररूप काळ होय. तो क्षर आहे, कारण प्रलयानंतर त्रिकाळांस गिळून एकटा महाकाळच उरतो. तो महाकाळ आपण आहें असें भगवान् सांगतात. तो महाकाळ स्वतःसिद्ध असतो ह्मणून योग अथवा विभूति यांचा त्यास संबंध नाहीं. विश्व त्रिकाळरूप आहे. त्यांचा धारण करणारा प्रलयशोषकाळ ब्रह्म होय.

**मृत्युः सर्वहरश्चाहमुद्भवश्च भविष्यताम् ।**
**कीर्तिः श्रीर्वाक्च नारीणां स्मृतिर्मेधा धृतिः क्षमा ॥ ३४ ॥**

**अर्थ.**–सर्वांचें हरण करणारा मृत्यु मीच आहें. पुढें होणाऱ्यांचा उद्भवही मीच आहें. नारींमध्यें कीर्ति, श्री, वाचा, स्मृति, मेधा, धृति आणि क्षमा मीच आहें.

**टीका.**–कीर्ति ह्मणजे उत्तम कीर्ति. श्री ह्मणजे धनधान्यसौंदर्यादिकांची समृद्धि. वाचा ह्मणजे उत्तम वक्तृत्व. स्मृति ह्मणजे उत्तम स्मरण. मेधा ह्मणजे तीक्ष्ण बुद्धि. धृति ह्मणजे ग्रहण करण्याची शक्ति. क्षमा ह्मणजे दंड करण्याची शक्ति असूनही दुसऱ्याचा अपराध सहन करणें होय.

**बृहत्साम तथा साम्नां गायत्री छंदसामहम् ।**
**मासानां मार्गशीर्षोऽहमृतूनां कुसुमाकरः ॥ ३५ ॥**

**अर्थ.**—सर्व सामवेदांत बृहत्साम मी आहें. सर्व छंदांत गायत्री-छंद मी आहें. बारा महिन्यांत मार्गशीर्ष मी आहें. ऋतूंमध्यें वसंत ऋतु मी आहें.

**टीका.**—गोपींनीं मार्गशीर्ष महिन्यांत कात्यायनी व्रत केल्यानें त्यांस कृष्णप्राप्ति झाली ह्मणून या महिन्यांत केलेलें कर्म सफळ होतें. याकरितां हा महिना श्रेष्ठ मानिला आहे.

**द्यूतं छलयतामस्मि तेजस्तेजस्विनामहम् ।**
**जयोऽस्मि व्यवसायोऽस्मि सत्त्वं सत्ववतामहम् ।। ३६ ।।**

**अर्थ.**—सर्व कपटरीतींत द्यूत माझी विभूति आहे. सर्व तेजस्वी भूतांमधील तेज मी आहें. सर्व व्यवहारांत जय मी आहें. सात्विक लोकांमधील सत्व मी आहें.

**वृष्णीनां वासुदेवोऽस्मि पांडवानां धनंजयः ।**
**मुनीनामप्यहं व्यासः कवीनामुशना कविः ।। ३७ ।।**

**अर्थ.**—सर्व यादवांत वासुदेव मी आहें. पांडवांत धनंजय मी आहें. सर्व मुनींमध्यें व्यास मी आहें. सर्व कवींमध्यें शुक्र मी आहें.

**दंडो दमयतामस्मि नीतिरस्मि जिगीषताम् ।**
**मौनं चैवास्मि गुह्यानां ज्ञानं ज्ञानवतामहम् ।। ३८ ।।**

**अर्थ.**—दंडकर्त्यांमध्यें दंड मी आहें. जय इच्छिणारे लोक ज्या नीतीनें जय पावतात ती नीति मी होय. सर्व गुह्यांमध्यें परावाचेचें मौन मी आहें. ज्ञानवंताचें ज्ञान मी आहें.

**यच्चापि सर्वभूतानां बीजं तदहमर्जुन ।**
**न तदस्ति विना यत्स्यान्मया भूतं चराचरम् ।। ३९ ।।**

**अर्थ.**—हे अर्जुना, सर्व भूतांचें बीज मी आहें. सर्व स्थावरजंगम भूतें मजवांचून असूं शकत नाहींत.

**नांतोऽस्ति मम दिव्यानां विभूतीनां परंतप ।**
**एष तूद्देशतः प्रोक्तो विभूतेर्विस्तरो मया ॥ ४० ॥**

अर्थ.—हे अर्जुना, माझ्या दिव्य विभूतींना अंत नाहीं. माझ्या विभूतींचा आतांपर्यंत मी जो विस्तार केला तो केवळ त्या विभूतींची दिशा दाखविण्याकरितां केला आहे.

**यद्यद्विभूतिमत्सत्त्वं श्रीमदूर्जितमेव वा ।**
**तत्तदेवावगच्छ त्वं मम तेजोंऽशसंभवम् ॥ ४१ ॥**

अर्थ.—जें जें ऐश्वर्ययुक्त, शोभायुक्त किंवा कांहीं तरी प्रभावानें युक्त असेल तें तें माझ्या तेजाच्या अंशापासून झालें आहे असें समज.

टीका.—या श्लोकानें तात्पर्येंकरून विभूतिलक्षण सांगितलें आहे. हें नीट लक्षांत ठेविलें पाहिजे.

**अथवा बहुनैतेन किं ज्ञातेन तवार्जुन ।**
**विष्टभ्याहमिदं कृत्स्नमेकांशेन स्थितो जगत् ॥ ४२ ॥**

अर्थ.—हे अर्जुना, अशा पुष्कळ विभूति समजल्या तरी त्यांपासून तुला विशेष काय मिळणार? तूं एवढें मात्र लक्षांत ठेव कीं हें सर्व जगत् मी एका अंशानें व्यापिलें आहें.

अशीं अनंत कोटि ब्रह्मांडें ज्याचा ऐश्वरयोग आहेत त्या अनंतास अनंत वंदनें करून ही दशमाध्यायाची टीका समर्पण करितों.



श्री.

# अध्याय ११ वा.

ॐ नमो भगवते वासुदेवाय.

नवव्या अध्यायांत राजविद्याराजगुह्य सांगून, प्रत्यक्ष सृष्टि दिसते ती भगवदवतारमूर्तिसम आहे अशी अर्जुनाची समजूत करून दिली, व तसा अनुभवही त्यास भगवंतांनीं दिला. यामुळें जेथें जेथें अर्जुनाची बुद्धि जाई, तेथें तेथें तो अनुभव त्यास होऊं लागला. पण जेथें बुद्धि जाऊं शकेना, तेथचा अनुभव प्रत्यक्ष मिळावा अशी अर्जुनास उत्कट इच्छा उत्पन्न झाली. ती प्रदर्शित करण्यास आतांपर्यंत त्यास सवड मिळाली नाहीं. शिवाय दहावे अध्यायांत भगवंतांनीं कांहीं विभूति सांगितल्या, व त्या कशा ओळखाव्या याचें तत्व सांगून तो विषय पुरा केला. त्या विभूतिही पूर्णपणें दिसाव्या असें त्यास वाटत होतें. आपला सर्व ऐश्वरयोग भववंतांनीं दाखविला असतां हीं दोन्ही कार्यें होऊन येतात. ह्मणून तो दाखविण्याविषयीं अर्जुन भगवंताची प्रार्थना करितो.

**मदनुग्रहाय परमं गुह्यमध्यात्मसंज्ञितम् ।**
**यत्त्वयोक्तं वचस्तेन मोहोऽयं विगतो मम ॥ १ ॥**

**अर्थ.**—मजवर अनुग्रह करण्याकरितां परम ज्ञान आणि गुह्य असें अध्यात्मज्ञान यांचा उपदेश तूं मला केला, त्या बोलण्यानें माझी भ्रांति नष्ट झाली.

**टीका.**—जडीं चैतन्य पाहणें ह्या ज्ञानास परम ज्ञान ह्मणावें व तेंच आत्मभावानें पाहणें या ज्ञानास अध्यात्म ह्मणावें. या दोन्ही

विषयांचें स्पष्टीकरण आठवे आध्यायांतील " अक्षरं परमं ब्रह्म " या श्लोकाच्या टीकेंत केलें आहे तें पहावें. वास्तविक दोन्ही मिळून अन्वय-ज्ञान होतें. परंतु स्पष्ट समजुतीकरितां हे दोन प्रकार धरिले आहेत. " अध्यात्म " शब्दांत " परम " ह्मणून जें ज्ञान सांगितलें, त्याचा समावेश होतोच; ह्मणून " परम " शब्द " अध्यात्म " शब्दाचें विशेषण होय, असें ह्मणण्यासही कांहीं हरकत नाहीं. प्रथम व्यतिरेक-ज्ञान झालें पाहिजे तेव्हां अन्वय ह्मणजे आपला आत्माच सर्व जग आहे हें ज्ञान होतें. या दोन्ही प्रकारचें ज्ञान झालें ह्मणजे जड भ्रांति नष्ट होते. असें ज्ञान होऊन आपण कृतार्थ झालों असें अर्जुन या श्लोकानें सांगत आहे.

**भवाप्ययौ हि भूतानां श्रुतौ विस्तरशो मया ।**
**त्वत्तः कमलपत्राक्ष माहात्म्यमपि चाव्ययम् ॥ २ ॥**

**अर्थ.**—हे कृष्णा, सृष्टीचा उद्भव आणि नाश हे दोन्हीही मी तुजपासून विस्तारानें ऐकिले. आणि तुझें अव्यय असें माहात्म्य मी समजलों.

**टीका.**—सृष्टीची उत्पत्ति व संहार तत्त्वदृष्टीनें समजल्यानें सर्वात्म-बोध बिंबतो, हें यामार्गें वारंवार स्पष्ट करून दाखविलें आहे.

**एवमेतद्यथात्थ त्वमात्मानं परमेश्वर ।**
**द्रष्टुमिच्छामि ते रूपमैश्वरं पुरुषोत्तम ॥ ३ ॥**

**अर्थ.**—हे पुरुषोत्तमा, तूं जें आपलें ऐश्वरयोगाचें वर्णन केलेंस तें यथार्थ आहे असें मी समजतों. तें ऐश्वररूप पहावें अशी मला इच्छा उत्पन्न झाली आहे.

**मन्यसे यदि तच्छक्यं मया द्रष्टुमिति प्रभो ।**
**योगेश्वर ततो मे त्वं दर्शयात्मानमव्ययम् ॥ ४ ॥**

अर्थ.—हें रूप पाहण्यास मी योग्य आहें असें तुला वाटेल, तर हे योगेश्वरा, तें तुझें अव्यय असें रूप मला दाखीव.

टीका.—सगुण भगवंत चित्स्वरूप आहे ह्मणून तो अरूप आहे. त्याप्रमाणें साक्षित्वही अरूप आहे. पण जगाची कल्पना करून तें आपण झाला ह्मणून सर्व विश्व त्याचें रूप आहे असें ह्मटलें पाहिजे. ह्मणूनच त्या रूपास "अव्यय" असें विशेषण दिलें आहे. हा जो अघटितघटनायोग तो स्वतः भगवंतच होय हें "योगेश्वर" या शब्दानें सुचविलें आहे. हें अर्जुनाचें भाषण ऐकून भगवान् ह्मणतात.

**पश्य मे पार्थ रूपाणि शतशोऽथ सहस्रशः ।**
**नानाविधानि दिव्यानि नानावर्णाकृतीनि च ॥ ५ ॥**

अर्थ.—हें अर्जुना, अनेक प्रकारचीं, अनेक वर्णांचीं, अनेक आकृतींचीं माझीं शेंकडो, हजारों रूपें पहा.

**पश्यादित्यान्वसून्रुद्रानश्विनौ मरुतस्तथा ।**
**बहून्यदृष्टपूर्वाणि पश्याश्चर्याणि भारत ॥ ६ ॥**

अर्थ.—हे अर्जुना, आदित्य पहा, वसू पहा, रुद्र पहा, अश्विनी देव पहा, मरुद्गण पहा आणि पूर्वीं पाहिल्या नाहींत अशा अनेक आश्चर्यकारक गोष्टी पहा.

**इहैकस्थं जगत्कृत्स्नं पश्याद्य सचराचरम् ।**
**मम देहे गुडाकेश यच्चान्यद्द्रष्टुमिच्छसि ॥ ७ ॥**

अर्थ.—हे अर्जुना, मी जो एक त्या एकाचे ठायीं असलेलें सर्व चराचर माझ्या देहांत आतां पहा. याशिवाय आणखी जें तुला पाहावेंसें वाटत असेल तेंही पहा.

**न तु मां शक्यसे द्रष्टुमनेनैव स्वचक्षुषा ।**
**दिव्यं ददामि ते चक्षुः पश्य मे योगमैश्वरम् ॥ ८ ॥**

अर्थ.—ह्या तुझ्या डोळ्यांनीं तूं मला पाहूं शकणार नाहींस, ह्मणून मी तुला दिव्य चक्षु देतों. मग त्या चक्षूंनीं माझा ऐश्वरयोग पहा.

टीका.—पूर्वार्धांतील " मां " शब्दानें हा अघटितघटनायोग ह्मणजे सर्व विश्व आपलेंच रूप आहे असें स्पष्ट दर्शविलें आहे. इतक्यावरही तसें कोणी न समजतील तर त्यांची मर्जी असेंच ह्मणणें भाग आहे. यानंतर संजय ह्मणाला.

एवमुक्त्वा ततो राजन्महायोगेश्वरो हरिः ।
दर्शयामास पार्थाय परमं रूपमैश्वरम् ॥ ९ ॥

अर्थ.—हे धृतराष्ट्रा, सर्व योग्यांचा प्रभु गोपाळकृष्ण, याप्रमाणें बोलून, आपलें स्वरूपाचें ऐश्वर्य दाखविता झाला.

अनेकवक्त्रनयनमनेकाद्भुतदर्शनम् ।
अनेकदिव्याभरणं दिव्यानेकोद्यतायुधम् ॥ १० ॥

अर्थ.—त्याला अनेक नेत्र होते. त्यामध्यें अनेक अद्भुत दर्शनीय चमत्कार दिसत होते. त्यावर अनेक दिव्य अलंकार होते. व त्यानें लखलखित आयुधें धरिलीं होतीं ( असें अर्जुनास दिसलें. )

दिव्यमाल्यांबरधरं दिव्यगंधानुलेपनम् ।
सर्वाश्चर्यमयं देवमनंतं विश्वतोमुखम् ॥ ११ ॥

अर्थ.—त्याचे अंगावर दिव्य पुष्पें व वस्त्रें होतीं. त्याचे अंगास दिव्य सुवासिक पदार्थ लाविले होते. अशा आश्चर्यमय, अनंत आणि ज्यास पुष्कळ मुखें आहेत अशा देवास ( अर्जुन पाहतां झाला. )

दिवि सूर्यसहस्रस्य भवेद्युगपदुत्थिता ।
यदि भाः सदृशी सा स्याद्भासस्तस्य महात्मनः ॥ १२ ॥

अर्थ.—आकाशांत एका वेळेस सहस्र सूर्यांचें तेज उठलें तर तें त्या महात्म्याचे तेजासारखें कांहींसें दिसेल.

टीका.–निर्गुण ब्रह्म तेजोरूप आहे असें ह्मणणारे लक्षवादी लोक या श्लोकाचा आधार आपले मतास सांगतात. त्यांचें हें मत शास्त्र व अनुभव यांचे विरुद्ध आहे हें मागें सिद्ध झालेंच आहे. आतां या श्लोकाचा खरा अर्थ काय आहे हें पाहूं. पुराणांतून आपण ऐकिलें आहे कीं, शिशुपाल, वक्रदंत, अघासुर वगैरे यांचा कृष्णाहातीं उद्धार झाला. या लोकांचें तेज त्यांचे मरणकालीं कृष्णरूपीं मिळालें, असें त्या उद्धाराचें वर्णन केलें आहे. अत्यंत कृष्णद्वेषामुळें त्यांस अखंड कृष्णाचिंतन झालें. अशा चिंतनानें त्यांचें अंतःकरण शुद्धसत्व-रूप झालें होतें, कारण भगवंताचें शुद्धसत्वरूप आहे. "**यं यं वापि स्मरन् भावं त्यजत्यंते कलेवरं**" या श्लोकांतील भावान्वयें अंतसमयीं या लोकांस कृष्णरूपाचें चिंतन झाल्यामुळें, ते कृष्णरूप ह्मणजे शुद्ध-सत्वरूप होऊन त्या स्वरूपीं त्यांचा प्रवेश झाला. अर्जुनानें भगवान् गोपाळकृष्णाचे देहांत सहस्र सूर्याचें तेजाहून अगळें जें तेज पाहिलें तें याच सत्वाचें तेज होय. अस्तु. "आत्मा" शब्दाचा या श्लोकांत देह असा अर्थ आहे, यावरून "महात्मा" शब्दानें भगवंताचे वि-श्वरूपाचा बोध केला आहे. भगवान् कृष्णपरमात्म्याचें शरिरांत हें विश्वरूप पाहिलें ह्मणून अनेक मुखें, अनेक डोळे, दिव्य माल्यांबर, दिव्य गंधानुलेपन अर्जुनास दिसलें.

**तत्रैकस्थं जगत्कृत्स्नं प्रविभक्तमनेकधा ।**
**अपश्यद्देवदेवस्य शरीरे पांडवस्तदा ॥ १३ ॥**

अर्थ.–तेव्हां सर्व देवांचा देव जो कृष्ण याचे देहांत, ईश्वराचे अद्वय स्वरूपांत अनेक रूपानें वास्तव्य करणारें जग अर्जुन पाहतां झाला.

**ततः स विस्मयाविष्टो हृष्टरोमा धनंजयः ।**
**प्रणम्य शिरसा देवं कृतांजलिरभाषत ॥ १४ ॥**

अर्थ.–असें रूप पाहिल्यानंतर अर्जुन आश्चर्यचकित होऊन

त्याचे अंगावर रोमांच उभे राहिले, तेव्हां तो मस्तक वांकवून व हात जोडून देवास ह्मणाला.

**पश्यामि देवांस्तव देव देहे सर्वांस्तथा भूतविशेषसंघान् ।**
**ब्रह्माणमीशं कमलासनस्थमृषींश्च सर्वानुरगांश्च दिव्यान् ॥१५॥**

**अर्थ.**—हे देवा, तुझ्या देहांत मला सर्व देव दिसतात, त्याचप्रमाणें निरनिराळ्या भूतांचे समूह दिसतात, कमलासनावर बसलेला ब्रह्मा व महेश दिसतात, सर्व ऋषि दिसतात, आणि दिव्य असे सर्व सर्पही दिसतात.

**टीका.**—सप्त द्वीपांतलें पुष्करद्वीप हें शेवटलें होय. तेथें ब्रह्मदेव असतो. त्यास अर्जुनानें पाहिलें. शंकर कैलासांत असतो त्यास व उरग पाताळांत असतात त्यांसही अर्जुनानें पाहिलें. यावरून चतुर्दश भुवनें अर्जुनाचे पाहण्यांत आलीं, असें या श्लोकानें दर्शविलें आहे.

**अनेकबाहूदरवक्त्रनेत्रं पश्यामि त्वां सर्वतोऽनंतरूपम् ।**
**नांतं न मध्यं न पुनस्तवादिं पश्यामि विश्वेश्वर विश्वरूपम् ॥१६॥**

**अर्थ.**—हे विश्वेश्वरा, अनेक बाहू, अनेक उदरें, अनेक मुखें व अनेक नेत्र ज्यास आहेत, असें तुझें अनंत विश्वरूप मला दिसत आहे; परंतु त्याचा आदि, मध्य अथवा अंत कोठेंच दिसत नाहीं.

**टीका.**—या श्लोकानें असें सुचविलें आहे कीं, अनंत कोटि ब्रह्मांडें अर्जुनानें पाहिलीं. एक एक ब्रह्मांड भगवंताचें शरीर होय. सूर्य त्याचा चक्षु होय. अशा रीतीनें सर्व शरिराच्या भागांचें वर्णन केलें आहे. अनेक ब्रह्मांडरूप भगवंताचीं अनेक शरीरें आहेत, त्या शरिरांचे अनेक अवयवही आहेत. तीं सर्व शरीरें व त्यांचे अवयव अर्जुनाचे पाहण्यांत आले. कृष्णास एक एकच अवयव असून, अनेक तोंडें, अनेक

उदरें वगैरे अर्जुनाला दिसलीं हें कसें, असा संशय उत्पन्न होतो, त्याचा निकाल वरील माहितीनें होतो.

किरीटिनं गदिनं चक्रिणं च तेजोराशिं सर्वतो दीप्तिमंतम् ।
पश्यामि त्वां दुर्निरीक्ष्यं समंताद् दीप्तानलार्कद्युतिमप्रमेयम् ॥ १७॥

**अर्थ.**—ज्याचे मस्तकावर किरीट आहे, ज्याचे हातांत गदा आणि चक्र आहे, जो तेजाची राशि आहे, ज्याची कांति चहूंकडे पसरली आहे, अशा तुला मी पाहत आहें. अग्नीच्या आणि सूर्याच्या प्रभेसारखी सभोंवार पसरलेली तुझी प्रभा माझ्यानें पाहवत नाहीं. तुझें स्वरूप अप्रमेय आहे.

**टीका.**—या विश्वरूपाचें प्रकाशक चित्स्वरूप आहे असें "**अप्रमेय**" या शब्दानें सुचविलें आहे, व तेंच चित्स्वरूप किरीटगदाचक्रयुक्त भगवान् श्रीकृष्ण आहेत असेंही प्रथम चरणानेंच सुचविलें आहे. या सगुण भगवंताचे भजनानेंच या चित्स्वरूपाची खूण सांपडते, अशा अर्थानें अर्जुन भगवंताची यापुढें स्तुति करित आहे.

त्वमक्षरं परमं वेदितव्यं त्वमस्य विश्वस्य परं निधानम् ।
त्वमव्ययः शाश्वतधर्मगोप्ता सनातनस्त्वं पुरुषो मतो मे ॥ १८ ॥

**अर्थ.**—तूं अक्षर आहेस, परम म्हणजे प्रकाशक आहेस, ज्ञेय अशी वस्तु तूं आहेस. तूं या विश्वाचा मोठा आधार आहेस, अवताररूपानें शाश्वत धर्माचा संरक्षणकर्ता तूं आहेस आणि सनातन असा पुरुष तूं आहेस, असें माझें मत आहे.

अनादिमध्यान्तमनंतवीर्यमनंतबाहुं शशिसूर्यनेत्रम् ।
पश्यामि त्वां दीप्तहुताशवक्त्रं स्वतेजसा विश्वमिदं तपंतम् ॥ १९॥

**अर्थ.**—तुला आदि, अंत आणि मध्य नाहीं, तूं अनंतशक्ति, अनंतहस्त आहेस, चंद्रसूर्य तुझे नेत्र आहेत, तुझ्या मुखांमध्यें अग्नि

भडकत आहे, व या सर्व विश्वास तूं आपल्या तेजानें तापवीत आहेस, असा मला दिसतोस.

टीका.—चंद्र ईश्वराचें मन आहे, असें असून एथें त्यास नेत्र ह्मणून संज्ञा दिली आहे. नेत्र शरिरास वर्तवितात व त्याप्रमाणें मन-ही शरिरास वर्तवितें. म्हणून चंद्र ईश्वराचें मन आहे, असेंच " नेत्र " शब्दानें सुचविलें आहे, कारण जें नेतें तें नेत्र असा अर्थ आहे.

**द्यावापृथिव्योरिदमंतरं हि व्याप्तं त्वयैकेन दिशश्च सर्वाः ।**
**दृष्ट्वाद्भुतं रूपमुग्रं तवेदं लोकत्रयं प्रव्यथितं महात्मन् ॥ २० ॥**

अर्थ.—हे महात्मन्, आकाश आणि पृथ्वी यांचेमधील अंतर व सर्व दिशा यांस तूं एकट्यानेंच व्यापिलें आहेस. तुझें हें अद्भुत उग्र रूप पाहून हें सर्व त्रैलोक्य अतिशय व्यथित होत आहे.

**अमी हि त्वां सुरसंघा विशंति केचिद्भीताः प्रांजलयो गृणंति ।**
**स्वस्तीत्युक्त्वा महर्षिसिद्धसंघास्तुवंति त्वां स्तुतिभिः पुष्कलाभिः॥**

अर्थ.—देवांचे समुदाय तुजमध्यें प्रवेश करित आहेत. कोणी भया-मुळें हात जोडून तुझी स्तुति करित आहेत. महर्षि आणि सिद्ध यांचे समुदाय " **जगाचें कल्याण असो** " असे शब्द उच्चारून पुष्कळ प्रकारें तुझी स्तुति करित आहेत.

टीका.—या श्लोकाच्या शब्दार्थावरून असें स्पष्ट दिसतें कीं, देव, महर्षि व सिद्ध हे भगवंताचें विश्वरूप पाहतात व त्यामुळें त्यांचे ठिकाणीं निरनिराळे भाव उत्पन्न होऊन ते वर्तन करितात. परंतु याच अध्या-यांत भगवान् असें ह्मणतात कीं, अर्जुनानें ज्याप्रमाणें विश्वरूप पाहिलें असें प्रत्यक्ष कोणासही दिसणें शक्य नाहीं. या दोन भगवद्वचनांचा एक-मेकाशीं विरोध दिसतो. यावरून या श्लोकाचा भावार्थ निराळा आहे हें उघड दिसतें. या भावार्थाची किल्ली " **कालोऽस्मि लोकक्षयकृत्** "

असें भगवान् यापुढें बोलले आहेत त्या श्लोकचरणांत आहे. लोकांचा क्षय करणारा काळ आपलें रूप आहे असें भगवान् म्हणतात, या काळास भिऊन देव म्हणजे दैवी संपत्तीचे मनुष्य भगवद्भजन करितात, व त्या साधनानें स्वस्वरूपीं प्रवेश करितात, म्हणजे चिद्रूपस्थिति पावतात. यावरून ज्ञाननिष्ठ दैवी संपतीचे लोक भगवत्स्वरूप पावतात असें अर्जुनाचे दृष्टीस पडलें, अता प्रथम चरणाचा अर्थ सिद्ध होतो. द्वितीय चरणानें कालाच्या भयानें घाबरलेले मुमुक्षु जन सुचविले आहेत, व या भयापासून मुक्त झालेले व्यासादिक ऋषीश्वर, त्याच भयापासून लोकांनीं मुक्त व्हावें या हेतूनें पुराणेंकरून व इतर प्रकारें भगवच्चारित्रांचें वर्णन करितात, असें शेवटल्या दोन चरणांनीं सुचविलें आहे.

**रुद्रादित्या वसवो ये च साध्या विश्वेऽश्विनौ मरुतश्चोष्मपाश्च ।**
**गंधर्वयक्षासुरसिद्धसंघा वीक्षंते त्वां विस्मिताश्चैव सर्वे ॥ २२ ॥**

**अर्थ.**–रुद्र, आदित्य, वसु, साध्य, विश्वेदेव, अश्विनकुमार, मरुत, पितर, गंधर्व, यक्ष, असुर, सिद्ध यांचे समूह आश्चर्यानें तुजकडे पाहत आहेत.

**टीका.**–मागील श्लोकाचे टीकेंत सांगितल्याप्रमाणें सर्वजण भगवंताचे काळरूपासच विस्मयानें पाहतात. असा याही श्लोकाचा भावार्थ आहे. अर्जुनास दिसलें तसें सर्वांस विश्वरूप दिसणें शक्य असतें, तर अर्जुनास दिव्य दृष्टि देण्याची आवश्यकता नव्हती.

**रूपं महत्ते बहुवक्त्रनेत्रं महाबाहो बहुबाहूरुपादम् ।**
**बहूदरं बहुदंष्ट्राकरालं दृष्ट्वा लोकाः प्रव्यथितास्तथाहम् ॥ २३ ॥**

**अर्थ.**–हे महाबाहो कृष्णा, तुझें हें बहुत मुखांचें, बहुत नेत्रांचें, बहुत हस्तांचें, बहुत मांड्यांचें, बहुत पायांचें, बहुत पोटांचें, बहुत वि-

काळ दाढांचें, विशाळ असें रूप पाहून सर्व लोक अत्यंत व्यथित होत आहेत. तसाच मीही व्यथित होत आहें.

नभःस्पृशं दीप्तमनेकवर्णं व्यात्ताननं दीप्तविशालनेत्रम् ।
दृष्ट्वा हि त्वां प्रव्यथितांतरात्मा धृतिं न विंदामि शमं च विष्णो॥२४।

**अर्थ.**—हे विष्णो, आकाशापर्यंत पोहोंचलेला, प्रकाशमान, अनेक वर्णांचा, पसरलेल्या तोंडाचा, प्रदीप्त आणि विशाळ नेत्रांचा, अशा तुला पाहून माझा अंतरात्मा व्यथित होऊन गेला आहे. मला धैर्य वाटत नाहीं व शांतिही वाटत नाहीं.

दंष्ट्राकरालानि च ते मुखानि दृष्ट्वैव कालानलसंनिभानि ।
दिशो न जाने न लभे च शर्म प्रसीद देवेश जगन्निवास॥२५॥

**अर्थ.**—हे जगन्निवासा देवाधिदेवा, प्रळयकालच्या अग्नीसारखीं प्रदीप्त आणि भयंकर दाढांनीं विक्राळ अशीं तुझीं तोंडें पाहून, मला दिशा दिसेनाशा झाल्या आहेत. मला स्वस्थता वाटत नाहीं, करितां माझ्यावर प्रसन्न हो.

अमी च त्वां धृतराष्ट्रस्य पुत्राः सर्वे सहैवावनिपालसंघैः।
भीष्मो द्रोणः सूतपुत्रस्तथाऽसौ सहास्मदीयैरपि योधमुख्यैः॥२६॥
वक्त्राणि ते त्वरमाणा विशंति दंष्ट्राकरालानि भयानकानि ॥
केचिद्विलग्ना दशनांतरेषु संदृश्यंते चूर्णितैरुत्तमांगैः ॥ २७ ॥
यथा नदीनां बहवोऽम्बुवेगाः समुद्रमेवाभिमुखा द्रवंति ।
तथा तवामी नरलोकवीरा विशंति वक्त्राण्यभिविज्वलंति ॥२८॥

**अर्थ.**—सर्व राजांचे समुदायासह हे धृतराष्ट्राचे पुत्र, भीष्म, द्रोण, तसाच हा सूतपुत्र कर्ण व आम्हांकडील मुख्य योद्धे ॥ २६ ॥ विक्राळ दाढांनीं युक्त अशा तुझ्या भयंकर तोंडांत तांतडीनें शिरत आहेत. कोणी तुझ्या दांतांत अडकल्यामुळें त्यांचे डोक्यांचा चुराडा झाला आहे

असें दिसत आहे ॥ २७ ॥ जसे नद्यांचे बहुत पाण्याचे ओघ, समुद्राचे सन्मुख होरसाते, त्यांत जाऊन मिळतात, तसे हे मृत्युलोकींचे वीर तुझ्या प्रज्वलित मुखांत प्रवेश करीत आहेत ॥ २८ ॥

**यथा प्रदीप्तं ज्वलनं पतंगा विशंति नाशाय समृद्धवेगाः ॥**
**तथैव नाशाय विशंति लोकास्तवापि वक्त्राणि समृद्धवेगाः॥२९॥**

**अर्थ.**–प्रदीप्त अशा अग्नींत नाश पावण्याकरितां जसे पतंग जोरानें जाऊन पडतात तसे हे लोक तुझ्या तोंडांत शिरत आहेत.

**लेलिह्यसे ग्रसमानः समंताल्लोकान्समग्रान्वदनैर्ज्वलद्भिः ।**
**तेजोभिरापूर्य जगत्समग्रं भासस्तवोग्राः प्रतपंति विष्णो॥३०॥**

**अर्थ.**–सभोंवतालच्या सर्व लोकांना आपल्या जळजळणाऱ्या मुखांत अन्नाच्या घासाप्रमाणें टाकून गिळित आहेस व मागाहून जिभेनें चाटित आहेस. तुझी प्रभा सर्व जगतास व्यापून आपल्या उग्र तेजानें त्यास तापवित आहे.

**आख्याहि मे को भवानुग्ररूपो नमोस्तु ते देववर प्रसीद ।**
**विज्ञातुमिच्छामि भवंतमाद्यं न हि प्रजानामि तव प्रवृत्तिम्॥३१॥**

**अर्थ.**–असें उग्र रूप धारण करणारा तूं आहेस तरी कोण, हें मला सांग. हे देवाधिदेवा, तुला नमस्कार असो. तूं प्रसन्न होऊन कृपा कर. सर्वांचें कारण असा जो तूं त्या तुला जाणण्याची माझी इच्छा आहे. तुझी प्रवृत्ति मला समजत नाहीं.

**टीका.**–विश्वरूप दाखविण्याविषयींच अर्जुनानें प्रार्थना केली होती ह्मणून असा उग्ररूपधारी तूं कोण असा अर्जुनानें प्रश्न केला आहे. हें ऐकून भगवान् ह्मणतात.

**कालोऽस्मि लोकक्षयकृत् प्रवृद्धो लोकान्समाहर्तुमिह प्रवृत्तः ।**
**ऋतेऽपि त्वां न भविष्यंति सर्वे येऽवस्थिताः प्रत्यनिकेषु योधाः ३२**

अर्थ.—लोकांचा क्षय करणारा काळ मी आहें. तो या वेळीं वाढलों आहें व लोकांचा क्षय करण्याकरितां प्रवर्तलों आहें. तूं युद्ध केलें नाहींस, तरी प्रत्येक सैन्यांत जे योद्धे उभे आहेत ते जिवंत राहणार नाहींत.

**तस्मात्त्वमुत्तिष्ठ यशो लभस्व जित्वा शत्रून् भुंक्ष्व राज्यं समृद्धम्।**
**मयैवैते निहताः पूर्वमेव निमित्तमात्रं भव सव्यसाचिन् ॥ ३३ ॥**

अर्थ.—यास्तव तूं ऊठ, शत्रूंना मारून जय मिळीव आणि अवध्या राज्याचा उपभोग घे. हे अर्जुना, यांना मी पूर्वींच मारून ठेविलें आहे. निमित्ताला मात्र तूं पुढें हो.

**द्रोणं च भीष्मं च जयद्रथं च कर्णं तथान्यानपि योधवीरान्।**
**मया हतांस्त्वं जहि मा व्यथिष्ठा युद्धस्व जेतासि रणे सपत्नान्॥३४॥**

अर्थ.—द्रोण, भीष्म, जयद्रथ व कर्ण यांस व आणखी इतर शूर योध्यांना मी आधींच मारिलें आहें. त्यांना तूं मार, खिन्न होऊं नकोस. युद्ध कर, रणामध्यें वैऱ्यांना तूं जिंकशील.

**टीका.**—कौरवपक्षाकडील मंडळी भगवंतांनीं मारून दाखविली तरी अर्जुनाचे मनांत खेद राहिलाच कीं आपल्यास निमित्त मात्र तरी भगवंत कां करितो ? त्याचें उत्तर चतुर्थ चरणानें दिलें आहे कीं, " **अर्जुना, तूं जिंकशील** " ह्मणजे होणार भविष्य तें होईल. प्रारब्ध कधींही टळणार नाहीं, असें भगवंतानीं अर्जुनास सुचविलें आहे. यानंतर संजय ह्मणाला.

**एतच्छ्रुत्वा वचनं केशवस्य कृतांजलिर्वेपमानः किरीटी ।**
**नमस्कृत्वा भूय एवाह कृष्णं सगद्गदं भीतभीतः प्रणम्य ॥३५॥**

अर्थ.—याप्रमाणें भगवंताचें वचन ऐकून अर्जुनानें भगवंतास

नमस्कार केला व हात जोडून थरथरां कांपत पुन्हां नमस्कार करून रुद्गदित वाणीनें भीतभीत बोलूं लागला.

**स्थाने हृषीकेश तव प्रकीर्त्या जगत्प्रहृष्यत्यनुरज्यते च ।**
**रक्षांसि भीतानि दिशो द्रवंति सर्वे नमस्यंति च सिद्धसंघाः॥३६॥**

**अर्थ.**—हे कृष्णा, स्थितिकाळीं सर्व जग तुझी कीर्ति गाऊन आनंद पावतें व प्रेमभरित होतें, राक्षस तुला भिऊन दिगंतरीं पळून जातात आणि सिद्धांचा समुदाय तुला नमस्कार करितो.

**टीका.**—यापूर्वी भगवंतांनीं संहारकाळाचें दर्शन अर्जुनास दिल्यामुळें अर्जुन घाबरून गेला होता, ह्मणून त्याचें मन स्थिर होण्याकरितां स्थितिकाळस्वरूप दाखविलें. त्याचें वर्णन अर्जुन या श्लोकांत करित आहे. या स्थितिकाळींच भगवदवतार होतात. त्या अवतारांचे कीर्तनानें जगाचा उद्धार होतो. दैवी संपत्तीचे भक्तजन विषयांचा त्याग करून भगवद्भजनापासून उत्पन्न होणारे हर्ष व प्रीति यांचा अनुभव घेतात. परंतु असुर ह्मणजे विषयनिष्ठ पुरुष भगवत्कीर्तीस भिऊन दूर पळतात. सिद्धही नारायणास शरण जातात. हा सर्व देखावा अर्जुनानें पाहिला.

**कस्माच्च ते न नमेरन्महात्मन् गरीयसे ब्रह्मणोप्यादिकर्त्रे ।**
**अनंत देवेश जगन्निवास त्वमक्षरं सदसत्तत्परं यत् ॥ ३७ ॥**

**अर्थ.**—हे महात्मन्, ब्रह्मदेवाहूनही श्रेष्ठ, सर्वांचा आदिकर्ता अशा तुला ते सिद्ध कां वंदन करणार नाहींत? हे अनंता, देवेशा, जगन्निवासा, सत् आणि असत् तूंच आहेस व यांचेपलीकडे असणारें अक्षर ब्रह्मही तूंच आहेस.

**टीका.**—ब्रह्मदेव सर्वांचा उत्पन्नकर्ता आहे. त्याचाही बाप, गुरु आणि धनी भगवंत आहे. निर्गुणब्रह्मीं कर्तृत्वाची वार्ता नसते. माया-

योगें सगुणत्वीं तें कर्तृत्व येतें, इतकें पूर्वार्धानें सुचविलें आहे. "सत्" शब्दें इंद्रियांस गोचर अशीं पंचभूतें सुचविलीं आहेत, व "असत्" शब्दें इंद्रियांस अगोचर मन, बुद्धि आणि चित्त यांची सूचना केली आहे. या दोहींच्याही पलीकडे असणारें निवळ निर्गुणब्रह्म तूं आहेस, असें उत्तरार्धानें अर्जुन ह्मणत आहे.

**त्वमादिदेवः पुरुषः पुराणस्त्वमस्य विश्वस्य परं निधानम् ।**
**वेत्तासि वेद्यं च परं च धाम त्वया ततं विश्वमनंतरूप ॥ ३८ ॥**

**अर्थ.**—हे अनंतरूपा, तूं आदिदेव व पुराणपुरुष आहेस. या विश्वाचें लयस्थान तूं आहेस. ज्ञाता व ज्ञेय तूंच आहेस. परं धाम ह्मणजे वैकुंठ तूं आहेस. व विश्वास तूंच व्यापिलें आहेस.

**वायुर्यमोऽग्निर्वरुणः शशांकः प्रजापतिस्त्वं प्रपितामहश्च ।**
**नमो नमस्तेऽस्तु सहस्रकृत्वः पुनश्च भूयोऽपि नमो नमस्ते ॥ ३९ ॥**

**अर्थ.**—वायु, यम, अग्नि, वरुण, चंद्र, ब्रह्मा हे सर्व तूंच आहेस. व ब्रह्मदेवाचा पिताही तूंच आहेस. सहस्र वेळां तुला नमस्कार करूनही पुनःपुनः तुला नमस्कार असो.

**टीका.**—सर्व देव व दिशा वगैरे सृष्टि भगवद्रूप जाणून त्या अनंत रूपांस अनंत नमस्कार अर्जुन करित आहे व पुन्हां आपले समोर असणारे भगवंताचे अवताररूपास नमस्कार करित आहे.

**नमः पुरस्तादथ पृष्ठतस्ते नमोऽस्तु ते सर्वत एव सर्व ।**
**अनंतवीर्यामितविक्रमस्त्वं सर्वं समाप्नोषि ततोऽसि सर्वः ॥ ४० ॥**

**अर्थ.**—तुझें सामर्थ्य व पराक्रम अनंत आहे. तूं सर्व जगास व्यापून आहेस. ह्मणून तुला "सर्व" असें नांव आहे. अशा तुला समोरून नमस्कार असो, पाठीकडून नमस्कार असो, व सर्व बाजूंनीं तुला नमस्कार असो.

सखेति मत्वा प्रसभं यदुक्तं हे कृष्ण हे यादव हे सखेति ।
अजानता महिमानं तवेदं मया प्रमादात्प्रणयेन वापि ॥ ४१ ॥

**अर्थ.**– तुला आपला खेळगडी समजलों व तुझा असा हा महिमा न जाणतां अज्ञानानें व स्नेहानें तुला, हे कृष्णा, हे यादवा, हे सख्या, असें उद्धट रीतीनें मी बोललों आणि

यच्चाऽवहासार्थमसत्कृतोऽसि विहारशय्यासनभोजनेषु ।
एकोऽथवाप्यच्युत तत्समक्षं तत्क्षामये त्वामहमप्रमेयम् ॥ ४२ ॥

**अर्थ.**–हे अच्युता, खेळतांना, निजतांना, बसतांना अथवा जेवतांना, एकांतांत अथवा चौघांसमक्ष थट्टेनें तुझा मी अपमान केला, या सर्व गोष्टींची क्षमा करावी अशी तुझी अप्रमेयाची मी प्रार्थना करितों.

पितासि लोकस्य चराचरस्य त्वमस्य पूज्यश्च गुरुर्गरीयान् ।
न त्वत्समोऽस्त्यभ्यधिकः कुतोऽन्यो लोकत्रयेऽप्यप्रतिमप्रभावः ४३

**अर्थ.**–तूं सर्व चराचर लोकांचा पिता आहेस ह्मणून तूं पूज्य आहेस. तूं सर्व प्रकारच्या गुरूंमध्यें श्रेष्ठ आहेस व तुझा महिमा अप्रतिम आहे. तुझी बरोबरी करणारा असा दुसरा कोणी नाहीं. तेव्हां तुझ्याहून अधिक कोण असणार ?

तस्मात्प्रणम्य प्रणिधाय कायं प्रसादये त्वामहमीशमीड्यम् ।
पितेव पुत्रस्य सखेव सख्युः प्रियः प्रियायार्हसि देव सोढुम् ॥ ४४ ॥

**अर्थ.**–तस्मात् स्तुतीस योग्य असा जो सर्वनियंता तूं त्या तुला शरीर वांकवून मी नमस्कार करितों व तुझी कृपा व्हावी ह्मणून तुझी प्रार्थना करितों. हे देवा, पुत्राचे अपराध बाप सहन करितो, मित्राचे अपराध मित्र सहन करितो आणि बायकोचे अपराध नवरा सहन करितो, त्याप्रमाणें तूंही माझे अपराध सहन करून त्यांची क्षमा करणारा आहेस.

**टीका.**—भगवन्तापासून सर्व सृष्टीची उत्पत्ति आहे असें तत्व "**पितेव पुत्रस्य**" या पदांनीं दाखविलें आहे. "**द्वा सुपर्णा**" या श्रुतींत सांगितल्याप्रमाणें ईश्वर जीवांचा सखा आहे हें तत्व "**सखेव सख्युः**" या पदांनीं दर्शविलें आहे आणि पतिव्रता आपले पतीची जशी अव्यभिचारिणी प्रीति करिते तशी भक्त लोक देवाची प्रिति करितात हें तत्व "**प्रियः प्रियायाः**" या शब्दांनीं सुचविलें आहे.

**अदृष्टपूर्वं हृषितोऽस्मि दृष्ट्वा भयेन च प्रव्यथितं मनो मे ।**
**तदेव मे दर्शय देव रूपं प्रसीद देवेश जगन्निवास ॥ ४५ ॥**

**अर्थ.**—पूर्वीं कधीं न पाहिलेलें हें रूप पाहून मला हर्ष झाला आहे, तथापि भयानें माझें मन व्यथित झालें आहे. याकरितां, हे देवा, तुझें नेहमींचें स्वरूप मला आतां दाखीव. हे जगन्निवासा, कृपा कर.

**किरीटिनं गदिनं चक्रहस्तमिच्छामि त्वां द्रष्टुमहं तथैव ।**
**तेनैव रूपेण चतुर्भुजेन सहस्रबाहो भव विश्वमूर्ते ॥ ४६ ॥**

**अर्थ.**—हे सहस्रबाहू विश्वमूर्ते, किरीट घातलेला, हस्तांत गदा आणि चक्र धारण केलेला, चतुर्भुज अशा पूर्व रूपानें तुला पहावें अशी मला इच्छा झाली आहे. हें ऐकून भगवान् बोलतात कीं,

**मया प्रसन्नेन तवार्जुनेदं रूपं परं दर्शितमात्मयोगात् ।**
**तेजोमयं विश्वमनंतमाद्यं यन्मे त्वदन्येन न दृष्टपूर्वम् ॥ ४७ ॥**

**अर्थ.**—हे अर्जुना, मी प्रसन्न होऊन माझ्या योगसामर्थ्यानें हें आपलें मूळचें तेजोमय आणि अनंत असें उत्कृष्ट विश्वरूप तुला दाखविलें आहे. तुझ्यावांचून इतर कोणीही हें रूप यापूर्वी पाहिलें नाहीं.

**न वेदयज्ञाध्ययनैर्न दानैर्न च क्रियाभिर्न तपोभिरुग्रैः ॥**
**एवंरूपः शक्य अहं नृलोके द्रष्टुं त्वदन्येन कुरुप्रवीर ॥ ४८ ॥**

**अर्थ.**—हे अर्जुना, या मृत्युलोकीं वेदांचें अथवा यज्ञविद्येचें

अध्ययन केल्यानें, दान केल्यानें, अनुष्ठान केल्यानें, अथवा उग्र तप केल्यानें, या प्रकारचें माझें रूप पाहण्यास कोणीही समर्थ होत नाहीं. तुला एकट्यालाच तें दिसलें आहे.

मा ते व्यथा मा च विमूढभावो दृष्ट्वा रूपं घोरमीदृङ्ममेदम्
व्यपेतभीः प्रीतमनाः पुनस्त्वं तदेव मे रूपमिदं प्रपश्य ॥ ४९॥

अर्थ.–असें माझें उग्र रूप पाहून तुला व्यथा होऊं देऊं नकोस आणि तूं गोंधळूं नकोस, भय सोडून शांत मनानें तेंच माझें रूप पुन्हां नीटपणें आत्मदृष्टीनें पहा. इतकें सांगून संजय धृतराष्ट्रास ह्मणाला.

इत्यर्जुनं वासुदेवस्तथोक्त्वा स्वकं रूपं दर्शयामास भूयः ।
आश्वासयामास च भीतमेनं भूत्वा पुनः सौम्यवपुर्महात्मा ॥५०॥

अर्थ.–कृष्णानें याप्रमाणें अर्जुनास सांगून पुन्हां आपलें पूर्वींचें रूप त्यास दाखविलें, आणि अर्जुन भ्याला आहे असें पाहून त्या महात्म्यानें सौम्य रूप धारण करून त्यास धीर दिला. तें रूप पाहून अर्जुन ह्मणाला कीं,

दृष्ट्वेदं मानुषं रूपं तव सौम्यं जनार्दन ।
इदानीमस्मि संवृत्तः सचेताः प्रकृतिं गतः ॥ ५१ ॥

अर्थ.–हे जनार्दना, तुझें हें सौम्य असें मनुष्यरूप पाहून मी आतां सावध झालों आहें व माझें पूर्व प्रकृतीस पावलों आहें. त्यानंतर भगवान ह्मणतात कीं,

सुदुर्दर्शमिदं रूपं दृष्टवानसि यन्मम ।
देवा अप्यस्य रूपस्य नित्यं दर्शनकांक्षिणः ॥ ५२ ॥

अर्थ.–तूं जें माझें रूप पाहिलें तें कितीही कष्ट केले तरी कोणासही दिसावयाचें नाहीं. हें रूप पाहण्याची देवांनाही नेहमीं इच्छा असते.

**नाहं वेदैर्न तपसा न दानेन न चेज्यया ।**
**शक्यं एवं विधोद्रष्टुं दृष्टवानसि मां यथा ॥ ५३ ॥**

**अर्थ.**—तूं ज्याप्रमाणें माझें रूप पाहिलेंस तसें रूप वेदपठण केल्यानें, तप केल्यानें, दानधर्म केल्यानें, अथवा यज्ञ केल्यानेंही कोणास दिसणें शक्य नाहीं.

**टीका.**—याप्रमाणें पूर्वींच भगवंतांनीं अर्जुनास सांगितलें असून आतां पुन्हां तेंच कां सांगतात याचें कारण असें कीं, पूर्वीं हें सांगितलें, तेव्हां अर्जुनाचें मन भीतीनें अस्वस्थ होतें, तें आतां स्वस्थ झालें आहे असें पाहून तेंच पुन्हां त्यास सांगितलें आहे.

**भक्त्या त्वनन्यया शक्य अहमेवंविधोऽर्जुन ।**
**ज्ञातुं द्रष्टुं च तत्वेन प्रवेष्टुं च परंतप ॥ ५४ ॥**

**अर्थ.**—हे अर्जुना, तत्वदृष्टीनें याप्रमाणें मला जाणण्यास, पाहण्यास व मजमध्यें प्रवेश करण्यास एका अनन्यभक्तीवांचून कोणीही समर्थ होत नाहीं.

**टीका.**—अनन्यभक्तीचें लक्षण सप्तमाध्यायांत "**वासुदेवः सर्वमिति**" या चरणानें सांगितलें आहे. अशा भक्तीनें युक्त असणारा ज्ञानी सर्वांत श्रेष्ठ आहे हेंही यापूर्वीं स्पष्ट करून दाखविलें आहे. तेंच मुंडमुंडण करण्याची जरूर नाहीं. प्रथम अद्वैत तत्व जाणून त्याप्रमाणें पाहण्याचा अभ्यास केल्यावर ती दृष्टि कायमची होते. तदनंतर भक्त भगवत्स्वरूपीं प्रवेश करितो असा क्रम आहे. हें अर्जुनास ज्या क्रमानें उपदेश केला आहे त्यावरून स्पष्ट सिद्ध होतें. अष्टमाध्यायीं अर्जुनास प्रथम अक्षरब्रह्मरूपाचा बोध करून देऊन जडीं चैतन्याचाही अनुभव दिला. नंतर नववे अध्यायांत तेंच ज्ञान पुन्हां सांगून दृश्य मायाभासही भगवंताचें रूप

आहे, असा अनुभव दिला. याप्रमाणें स्पष्ट सिद्ध झालें असूनही कोणी ज्ञानाभिमानी सगुणभक्तीची ज्ञानोत्तर काळीं जरूर नाहीं असा गीतेचा अर्थ करितात. झोंपीं गेलेल्यास हालवून अगर ओरडून जागें करितां येतें. पण जागा असून झोंपीं गेल्याचें ढोंग करितो त्यास अशा रीतीनें जागें करण्याचा यत्न व्यर्थ होतो. अस्तु. यापुढील श्लोकानें भगवान् सगुणभक्तांचें लक्षण सांगून चालू अध्यायाचा शेवट करितात.

**मत्कर्मकृन्मत्परमो मद्भक्तः संगवर्जितः ।**
**निर्वैरः सर्वभूतेषु यः स मामेति पांडव ॥ ५५ ॥**

**अर्थ.**–हे अर्जुना, जो मजप्रीत्यर्थ कर्म करितो व मीच ज्यास परमगति वाटतों, जो माझा भक्त असतो, जो वासनारहित असतो व जो सर्व भूतांचे ठायीं निर्वैर असतो तो मला पावतो.

**टीका.**–हें जीवन्मुक्त दशेचेंच वर्णन होय. वासनारहित झाल्यावर लिंगदेहाचा नाश होतो. ज्यास वासना नाहीं त्याला रागद्वेषही असत नाहींत, ह्मणून त्याची दृष्टि सम राहते. "**संगवर्जितः**" या शब्दानें मुक्तदशा दर्शविली आहे. अशी स्थिति प्राप्त झाली असतांही जो भगवंताकरितांच कर्म करितो व त्यासच परमगति समजतो तोच सगुणभक्त ह्मणावा.

एथें या अध्यायाची टीका संपली ती विश्वरूप भगवंतास अनन्यभावें अर्पण असो.



श्री.

# अध्याय १२ वा.

ॐ नमो भगवते वासुदेवाय.

भगवंताचे मुखानें आतांपर्यंत ज्ञानी भक्तांचें श्रेष्ठत्व ठिकठिकाणीं अर्जुनास समजलें. त्याचप्रमाणें निर्गुणोपासक ज्ञान्यांचेंही श्रेष्ठत्व ऐकिलें. ज्ञानहीन भक्तांहून ज्ञानवान् भक्त श्रेष्ठ आहे असें भगवंत स्पष्ट बोलले. परंतु निर्गुणोपासक ज्ञानी आणि सगुणोपासक ज्ञानी या दोघांमध्यें कोण श्रेष्ठ हें अर्जुनास स्पष्ट कळलें नाहीं. ह्मणून या अध्यायाचे आरंभीं तोच प्रश्न त्यानें केला आहे.

**एवं सततयुक्ता ये भक्तास्त्वां पर्युपासते ।**
**ये चाप्यक्षरमव्यक्तं तेषां के योगवित्तमाः ॥ १ ॥**

**अर्थ.**—नेहमीं योगयुक्त होत्साते जे भक्त तुझी उपासना करितात व जे अक्षर आणि अव्यक्त यांची उपासना करितात या दोहोंमध्यें अधिक योगवेत्ते कोण समजावे?

**टीका.**—जे सगुणचरणीं अनुरक्त असतात त्यांसच अर्जुनानें "**भक्त**" व "**सततयुक्त**" असें ह्मटलें आहे. "**एवं**" ह्मणजे याप्रमाणें. एथपर्यंत ज्यांना भक्त ह्मटलें आहे, ते योगयुक्त आहेतच, असा पूर्वार्धावरून स्पष्ट बोध होतो. योगाचे दोन प्रकार आहेत. एक निर्विकल्प व दुसरा सविकल्प. पूर्वार्धांत दर्शविलेले सगुणोपासक भक्त व उत्तरार्धांत दर्शविलेले अव्यक्तोपासक हे दोघेही हे दोन्ही योग जाणतात. तथापि या दोघांपैकीं कोण श्रेष्ठ आहे असा अर्जुनाचा प्रश्न

आहे. हे दोन प्रकारचे उपासक दोन्ही योग जाणतात असें ह्मणण्यास काय प्रमाण आहे अशी एथें सहज शंका उत्पन्न होते. तिचें निराकारण झालें पाहिजे. निर्गुणोपासक दोन्हीही योग जाणतात असें उत्तरार्धानें सुचवून पूर्वार्धानें भक्त सुचविले आहेत; व या दोघांमध्यें अधिक योगवेत्ते कोण असे चतुर्थ चरणांत ह्मटलें आहे. शिवाय या प्रश्नाचें उत्तर देतांना भगवान् दोन्हीही योगरीती स्पष्ट बोलले आहेत, ह्मणून पूर्वार्धांत दर्शविलेले भक्तही हे दोन्ही योगांचे जाणते आहेत असें समजून अर्जुनानें प्रश्न केला आहे हें उघड दिसतें. अक्षराची उपासना करितात त्याचप्रमाणें अव्यक्ताचीही उपासना करितात, असा अर्थबोध होण्याकरितां "**ये चाप्यक्षरमव्यक्तमुपासते**" असा अन्वय जुळविला पाहिजे. "**अक्षर**" शब्दानें निर्विकल्प योग सुचविला आहे व "**अव्यक्त**" शब्दानें सविकल्प योग सुचविला आहे. हें स्पष्ट करून दाखविण्यापूर्वी, पूर्वार्धाचा आणि उत्तरार्धाचा अन्वय कसा जुळवावा हें समजण्यापुरता अन्वय येथें दिला पाहिजे. तो असा:—"**भक्तास्त्वां पर्युपासते, अव्यक्तमपि उपासते ये च अक्षरमुपासते.**" यावरून "**अक्षर**" आणि "**अव्यक्त**" हीं दोन्ही पदें "**अपि**" शब्दानें आणि "**च**" कारानें दोघांकडेही लागतात. अस्तु. क्षरभागावेगळें जें निखळ ब्रह्म बुद्धीनें जाणतां येतें तेंच "**अक्षर**" होय. याचा अनुभव असतेवेळीं सविकल्प क्षरांचें मुळींच स्फुरण नसतें, कारण त्या वेळीं चित्त तदाकार बनतें. हीच अक्षरोपासना होय व हिलाच निर्गुणोपासना अथवा निर्विकल्पयोग ह्मणतात. दोघां उपासकांत कोणता अधिक योगवेत्ता असा प्रश्न आहे, यावरून दोघेही निर्विकल्पयोग जाणणारे असतात हें उघड दिसतें. निर्गुणोपासक केवळ निर्गुणाची उपासना करितात, पण भक्त हा योग जाणूनही सगुणभक्ति करितात, ह्मणून त्यांस "**भक्त**" ह्मटलें आहे, व निर्गुणोपासकांस "**अव्यक्तोपासक**" ह्मटलें आहे. ज्ञानी भक्त कोणी एक उपास्य अवतार व सर्व चराचर,

अक्षर सुवर्णाचे द्विविध अलंकार आहेत अशी भावना करून भक्तियोग करितात. त्यामुळें साकारीं जी जडत्वभावना असते तिचा सहज नाश होतो. हा फायदा निर्गुणोपासकांस नसतो असा अर्जुनाचे प्रश्नापासून बोध होतो. आतां "**अव्यक्त**" शब्दाकडे वळूं. व्यक्ति दिसूनही ज्यास व्यक्ति असत नाहीं तें अव्यक्त होय. व्यक्त दिसणारा सर्व प्रपंच अव्यक्त ब्रह्मच आहे. अलंकारास मुळींच स्वतःचें अस्तित्व नाहीं. जो आकार दिसतो तें सर्व सोनेंच आहे, असें विचाराअंतीं समजतें. याप्रमाणें सर्व प्रपंच इंद्रियांस व्यक्त असूनही तो अव्यक्त ब्रह्मच आहे असें बुद्धीनें पाहणें हीच अव्यक्तोपासना होय, व हिलाच सविकल्पयोग ह्मणतात. आतां दोघांत अधिक योगवेत्ते कोण असा अर्जुनाचा प्रश्न आहे. यावरून हे दोघेही सविकल्पयोग जाणतात हें सिद्ध होतें. विश्वरूप मायाभास आहे ह्मणून निर्गुणोपासक त्यास त्याज्य समजतात, पण भक्त त्यास भगवंताचा ऐश्वरयोग समजून भगवद्रूप पाहतात. एवढाच काय तो दोघांमध्यें फरक असतो. "**योगवित्**" ह्मणजे योगाचा जाणता व "**योगवित्तम**" ह्मणजे योगाचा अधिक जाणता असा अर्थ आहे. आतां दोघांत कोण अधिक योगवेत्ता असें ह्मटल्याबरोबर, दोघेही योगवेत्ते आहेत हें सांगणें नको. असा न्यायसिद्ध अर्थ होत असून, कित्येक निर्गुणाभिमानी टीकाकार या श्लोकाचा असा अर्थ करित नाहींत. कारण आत्मज्ञान झाल्यावर सगुणोपासना करण्याची गरज नाहीं असें जें त्यांचें मत आहे, त्यास या अर्थानें अजिबात बोळ बसतो. एक पक्षीं ज्ञानहीन सगुणोपासक व दुसरे पक्षीं निर्गुणोपासक, या दोघांत योगवित्तम कोण, असा या श्लोकाचा ते अर्थ करितात. आतां दोघांत योगवित्तम कोण, असें ह्मटल्यानें सगुणोपासकही योगी होऊं पाहतो म्हणून तो ज्ञानयोगी नव्हे, पण सगुणोपासना हाच त्याचा योग आहे असें ते म्हणतात. दोघांचा योग एक असल्याशिवाय त्यांची तुलना होऊं शकत नाहीं हें एक, व दुसरें, उत्तर श्लोकीं भगवंतच म्हणतील

कीं सगुणतत्पर भक्त निर्गुणोपासकाहून श्रेष्ठ आहे. या दोन गोष्टींनीं हा अर्थ साधत नाहीं. हा सगुणभक्त आत्मयोगयुक्त नाहीं असाच त्यांचे म्हणण्याचा भाव असला पाहिजे. असेंच खरें असतें तर ज्ञानहीन सगुणभजन करणारा निर्गुणोपासक ज्ञान्याहून श्रेष्ठ आहे असें मूर्खपणाचें उत्तर सर्वज्ञ भगवंत कधींच न देते. या टीकाकारांचा अर्थ खरा मानिला, तर आतांपर्यंत जी ज्ञान्याची प्रशंसा भगवंतांनीं केली ती सर्व व्यर्थ होते. या पूर्वापर विरोधाचा धोंडा त्यांचे छातीवर बसतो. तो काढण्यास त्यांस मुळींच युक्ति सांपडत नाहीं. तथापि अभिमानामुळें धडपड करून, कुयुक्तीनें आपला जरत्कारु सिद्धांत पुष्ट करण्याचा यत्न करण्यास ते चुकले नाहींत. कोणी असें म्हणतात कीं, अनधिकारी लोक सगुणभजन टाकून निर्गुणोपासनेकडे वळतील व त्यामुळें त्यांचें नुकसान होईल म्हणून भगवंत सगुणभक्तांस थोर म्हणतात. परंतु या अध्यायाचे शेवटीं भगवंत असें बोलले आहेत कीं, या अध्यायांत सांगितल्याप्रमाणें जो " यथोक्त " उपासना करील तो त्यास प्रिय आहे. ज्याप्रमाणें शब्दांचा प्रवाह असेल त्याप्रमाणें अर्थ आणि भावार्थ असला म्हणजे त्यास " यथोक्त " म्हणावें. असें असून, भगवंत भक्तास थोर म्हणत असतां, त्यास ते हीनपण देतात तेव्हां एथें यथोक्तपण कोठें उरलें ? एक विरोध काढून टाकण्याकरितां कुयुक्ति योजण्यास गेले तर त्याहून जबर विरोध गंचाडी धरून बसला. या सर्व करणांवरून त्यांचा अर्थ बरोबर नाहीं असें सिद्ध होतें, व हा त्यांचा केवळ दुरभिमान आहे असेंच म्हणणें भाग पडतें. ज्ञान झाल्यावर सगुणभक्ति केल्यानें कांहीं बिघड होत असता तर निराळी गोष्ट होती. श्रीशुकासारिखे पूर्ण योगीही सगुणभक्ति करित होते. मग यांना त्याची लाज कां वाटावी हें कळत नाहीं. एवंच जिकडून पहावें तिकडून त्यांचे पाठीमागें शुष्ककाष्ठ आहेच. म्हणून या टीकेंत सांगितलेला अर्थच यथार्थ होय. वर सांगितलेल्या टीकाकारांचा अर्थ याच अध्यायांतील

पुढचे कांहीं श्लोकांस बाधक होतो. परंतु त्यांचें विवेचन करीत बसलों तर ग्रंथ वाढतो म्हणून तो अर्थ खरा नाहीं अशी खात्री होण्यापुरतीं महत्वाचीं कारणें देऊन हा वाद पुरा केला आहे.

आतां, भक्तांस " **सततयुक्त** " म्हटलें आहे. " **सततयुक्त** " म्हणजे " **नित्ययुक्त** " असा अर्थ आहे हें उत्तरश्लोकीं, या श्लोकांत केलेल्या प्रश्नाचें **उत्तर** भगवंतांनीं दिलें आहे त्यावरून उघड दिसतें. भक्त नित्ययुक्त राहूं शकतो, पण निर्गुणोपासक तसा राहूं शकत नाहीं, या विषयाचें " **तेषां ज्ञानी नित्ययुक्तः** " या सप्तमाध्यायांतील श्लोकाचे टीकेंत प्रतिपादन केलें आहे तें वाचून पहावें.

या प्रश्नाचें उत्तर भगवंत यापुढील श्लोकांत देणार आहेत.

**मय्यावेश्य मनो ये मां नित्ययुक्ता उपासते ।**
**श्रद्धया परयोपेतास्तेमे युक्ततमा मताः ॥ २ ॥**

**अर्थ.**–माझे ठायीं मनाचा प्रवेश करून जे नित्ययुक्त, उत्कृष्ट श्रद्धेंकरून युक्त होत्साते, माझी उपासना करितात, ते अधिक योग जाणणारे होत असें माझें मत आहे.

**टीका.**–पूर्व श्लोकीं ज्यांना " **सततयुक्त** " ह्मटलें आहे तेच या श्लोकीं " **नित्ययुक्त** " शब्दानें सुचविले आहेत. भगवान् ह्मणतात कीं, जे नित्ययुक्त भक्त वर सांगितल्याप्रमाणें उपासना करितात आणि जे अक्षर आणि अव्यक्त यांची उपासना करितात, या दोहोंमध्यें भक्तच अधिक योगवित्तम होत. " **योगवित्तम** " आणि " **युक्ततम** " या शब्दांचा अर्थ एकच आहे. अर्जुनानें प्रश्न करितांना दोहोंमध्यें योगवित्तम कोण असें विचारिलें आहे; आणि त्याचें उत्तर देतांना भगवंतांनीं " **युक्ततम** " शब्दाचा उपयोग केला. या श्लोकीं भगवंतांनीं मोघम उत्तर दिलें आहे, त्याचीं कारणें दिलीं नाहींत. तीं यापुढें " **क्लेशोऽधिकतरस्तेषां** " आणि " **तेषामहं समुद्धर्ता** " या श्लोकांत सांगितलीं

आहेत. एक भीक मागून धन मिळवितो व दुसरा राजदरबारीं राहून धन मिळवितो. दोघेही धनवान् होतात. पण पहिल्यास धन मिळवितांना अति क्लेश होतात व दुसरा तें काम अनायासें करितो. तद्वत् सगुणभक्तांचा योग पक्क होण्यास फार थोडे श्रम लागतात व अव्यक्तोपासकांस अति क्लेश होतात. ह्मणून भक्त युक्ततम होत असें भगवान् ह्मणतात. सगुण भगवंताचे प्रसादावांचून अद्वैतबोध होत नाहीं हें सर्वांस कबूल आहे. तो झाल्यावर कोणी सगुणभजन टाकितात ह्मणून त्यांचे भक्तीस खंड पडतो; तसा ज्ञानी सगुणभक्तांच्या भक्तीस पडत नाहीं, ह्मणून त्यांस नित्ययुक्त ह्मटलें आहे. ज्यास अधिक योग बाणतो तोच अधिक योग जाणतो असें म्हणतां येतें, म्हणून "**योगवित्तम**" "आणि **युक्ततम**" या दोन्ही शब्दांची योजना एकाच अर्थी केली आहे हें स्पष्ट आहे. ज्ञान होण्यापूर्वी सर्वच सगुणभक्ति करितात. परंतु ज्ञान झाल्यावर कांहीं लोक सगुणभजन कां टाकतात व कांहीं त्याचा आश्रय कां करितात, याचें कारण "**श्रद्धया परयोपेता**" या चरणानें सांगितलें आहे. सगुणभजनानें जसें ज्ञान प्राप्त झालें तशीच योगसिद्धिही होईल अशी ज्यांस श्रद्धा असते ते ज्ञानी सगुणभक्ति चालूं ठेवितात. पण ज्यांचे अंगांत ज्ञानाचें वारें शिरतें, ते सगुणभजन तुच्छ मानून त्याचा अव्हेर करितात. सगुणभक्त मुंगी होऊन साखर खातात, निर्गुणोपासक हत्ती होऊन लांकडें फोडीत बसतात. उत्तम वस्तूचे प्राप्तीकरितां एखादे गांवास जाण्याचा कांहीं लोक निश्चय करितात व त्या गांवाची वाट माहित नसल्यामुळें कोणी माहितगार वाटाड्या बरोबर घेतात. तथापि तो गांव दिसूं लागल्याबरोबर त्यांपैकीं कांहींजण त्या वाटाड्यास सोडून देतात व कांहीं त्याचा आश्रय सोडित नाहींत. गांव दिसूं लागल्यापासून तेथें जाऊन पोंचेपर्यंत मध्यंतरीं नालेखोले वगैरे अनेक अडचणी असतात. त्यांतून पार पडण्याकरितां अनेक प्रसंगीं अनेक प्रकारचा त्रास, वाटाड्याविर-

हित मार्ग कंठणाऱ्या प्रवाशांस सोसावा लागतो; तसा वाटाड्याची सोबत ठेवणाऱ्यांस सोसावा लागत नाहीं. एखादे ठिकाणीं नदी भेटली म्हणजे ती दिसण्यांत लहानशी दिसते व तिच्यांत थोडें पाणी असावेंसें वाटतें; पण आंत निराळाच प्रकार असल्यामुळें अति फजीतो होते. या दृष्टांताप्रमाणें सगुणभक्ति टाकणाऱ्या निर्गुणोपासकास मुक्कामास पोंचेपर्यंत अति क्लेश होतात; तितके सगुणभक्तांस होत नाहींत. ज्ञान होण्यापूर्वीं ते ईश्वरास न जाणतां भक्ति करितात. पण ज्ञानोत्तर काळीं सर्व भगवद्रूप आहे असें समजून सर्वात्मभावानें ते त्याची भक्ति करितात. अशा भजनानें त्यांचें मन निर्विकार होतें. साकारीं निराकार चित्स्वरूप पाहणें यासच मनाचा प्रवेश भगवंताचे ठायीं करणें असें ह्मणतात. अशा रीतीनें मनाचा प्रवेश करून साकार तितकें भगवदाकार आहे असें सगुणभक्त पाहतात. यावरून या श्लोकाचे पूर्वार्धानें निर्गुणानुभवें सगुणभक्ति सुचविली आहे. व तशी भक्ति करणारा ज्ञानी नुसत्या ज्ञान्याहून श्रेष्ठ होय असें भगवंत सांगतात. एवंच सगुणोपासक आणि निर्गुणोपासक दोघेही ज्ञानी होत; परंतु पहिला दुसऱ्याहून श्रेष्ठ आहे असें सिद्ध झालें. आतां हे निर्गुणोपासक कोणत्या न्यूनतेमुळें कनिष्ठ झाले तें भगवान् सांगतात.

**ये त्वक्षरमनिर्देश्यमव्यक्तं पर्युपासते ।**
**सर्वत्रगमचिंत्यं च कूटस्थमचलं ध्रुवम् ॥ ३ ॥**
**संनियम्येन्द्रियग्रामं सर्वत्र समबुद्धयः**
**ते प्राप्नुवंति मामेव सर्वभूतहिते रताः ॥ ४ ॥**

**अर्थ.**—अक्षर, अनिर्देश्य, अव्यक्त, सर्वव्यापक, अचिंत्य, निर्विकार, अचल, व ध्रुव अशा ब्रह्माची, इंद्रियसमुदायाचें नियमन करून, सर्वत्र समबुद्धि ठेवून, व सर्व प्राणिमात्रांचे हिताचे ठायीं रत होत्साते, जे उपासना करितात ते मलाच येऊन मिळतात.

**टीका.**–क्षर भागाचा नाश होऊन जें प्रलयशेष उरतें त्यास अक्षर ब्रह्म म्हणावें. या ब्रह्माचें लक्षण नुसते शब्दांनीं ऐकून त्याची उपासना होऊं शकत नाहीं; तर त्याचा साक्षात्कार झाला पाहिजे, तेव्हां त्याची उपासना घडूं शकते. हें दर्शविण्याकरितां "**अनिर्देश्य**" शब्दाची योजना केली आहे. "**शब्दांनीं न सांगतां येण्याजोगें**" असा "**अनिर्देश्य**" शब्दाचा अर्थ आहे. अशा ब्रह्माची उपासना म्हणजे शब्दाच्या पलीकडची स्थिति होय हें उघड दिसतें व त्यासच आत्मसाक्षात्कार म्हणतात. अशा प्रकारचे उपासनेस निर्विकल्पयोग म्हणतात. आत्मसाक्षात्कार झाला तरी पूर्व संस्कारांमुळें मन स्वरूपीं स्थिर राहत नाहीं. तें तसें राखण्याचा यत्न केला पाहिजे. यासच "**योग**" म्हणतात. असा योग करितांना निखळ निर्गुणोपासकांस सगुणभक्तीचें साह्य नसल्यामुळें फार क्लेश होतात, तसे सगुणोपासकांस होत नाहींत, असें भगवंत यापुढें सांगणार आहेत; याच कारणाकरितां सगुणोपासक योगवित्तम होत असें म्हटलें आहे. आत्मसाक्षात्कारावांचून निर्विकल्पयोग होऊं शकत नाहीं. त्याचप्रमाणें निर्विकल्पयोग साधल्याशिवाय सविकल्पयोग होऊं शकत नाहीं, हें "**अव्यक्त**" शब्दानें सुचविलें आहे. अव्यक्तोपासना म्हणजे सविकल्पयोग होय हें प्रथम श्लोकाचे टीकेंत स्पष्ट करून दाखविलें आहे. या अव्यक्तोपासनेचेंच विशद रूप "**अचिंत्य**" शब्दानें दाखविलें आहे. चिंत्य साकार जडांत अचिंत्य रूप पाहणें यासच सविकल्पयोग म्हणतात. ही अचिंत्य चित्सत्ता सर्वव्यापक आहे. याचाच अंशभूत जीव आहे, त्यास भोग होतात. सर्वव्यापक चैतन्यास भोग घडत नाहींत. तें सर्वव्यापक चैतन्य या चिदंशाहून निराळें राहतें हें दर्शविण्याकरितां "**कूटस्थ**" शब्दाची योजना केली आहे. या चिदंशाचें वर्णन यापुढें पंधरावे अध्यायांत होईल. ज्या चैतन्याची उपासना करितात त्यास भोक्तृत्व नाहीं

हें दाखविण्याकरितां "अचल" आणि "ध्रुव" या विशेषणांची योजना केली आहे. अशा उपासनेनें समबुद्धि होते; व ती झाली म्हणजे सर्व प्राणिमात्रांचें सारिखें हित करितां येतें. असे उपासक यत्नांतीं निर्गुण-मोक्ष पावतात. परंतु,

**क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम् ।**
**अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ॥ ५ ॥**

**अर्थ.**–अव्यक्ताचे ठायीं चित्ताची आसक्ति ठेवणाऱ्या अव्यक्तोपासकास अधिक क्लेश होतात. देहवंतास अव्यक्तगति दुःखानें मिळते.

**टीका.**–निर्गुणोपासकांस कोणते क्लेश व कां होतात हें यापूर्वी बहुत वेळ सांगितलें आहे, म्हणून याचा पुनरुच्चार करित बसण्याची जरूर नाहीं. असे उपासक भगवंताचे अव्यक्त रूपाची उपासना करितात म्हणून ते त्याच रूपास पावतात. निर्गुण निर्धर्म आहे म्हणून त्याचे ठायीं कृपाळुत्व नाहीं. याकरितां निर्गुणोपासकांस ईशकृपेचा लेश न मिळाल्यामुळें ते कष्टी होतात. रात्रीं मार्ग चालणाऱ्यांस किंवा दिवांधांस जसा सूर्याचे मैत्रीचा कांहीं उपयोग होत नाहीं, त्याप्रमाणें अव्यक्तोपासकांची गति होय. पाण्याचे अंगीं आधारशक्ति नसते व पाषाणाचें अंगीं तरण्याची शक्ति नसते. या दोहोंचा जोड जमून जो थाट उडतो तोच देहवंतांची आणि अव्यक्तोपासनेची जोडी जमल्यानें होतो. त्रिगुणात्मक देहाचा आश्रय असून निर्गुणाची उपासना करण्यानें क्लेश होतील यांत नवल तें कोणतें ? नदीचें पाणी नीच भूमीकडे वाहतें. तसे त्रिगुण विषयांकडे ओढ घेतात. आपण त्यास उलट गति देऊं लागलों तर तें काम अति क्लेशदायक होतें. पण भगवद्भक्तांस ईशकृपेचें साह्य असल्यामुळें त्यांस असे क्लेश होत नाहींत हें आतां भगवान् सांगतात.

**ये तु सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य मत्पराः ।**
**अनन्येनैव योगेन मां ध्यायंत उपासते ॥ ६ ॥**

**तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसारसागरात् ।**
**भवामि न चिरात्पार्थ मय्यावेशितचेतसाम् ॥ ७ ॥**

**अर्थ.**–सर्व कर्में माझे ठायीं अर्पण करून जे मत्परायण राहतात व अनन्यभक्तीनें माझें ध्यान करून जे माझी उपासना करितात, अशा माझे ठायीं चित्त ठेवणाऱ्या भक्तांचा, मृत्युसंसारसागरापासून मी फार लौकर उद्धार करितों.

**टीका.**–या श्लोकांत सगुणभक्तांचीं लक्षणें दाखवून त्यांचा उद्धार-कर्ता मी आहें असें छातीस हात लावून भगवान् सांगतात. भक्त आपलीं सर्व कर्में भगवच्चरणीं अर्पण करितो व त्यास भगवंतच थोर वाटतो. कर्म समर्पण करणें हा प्रथम भागवतधर्म आहे. हा आचरण्यानें ज्ञान प्राप्त होतें. ज्ञानोत्तर काळींही भक्त आपलें सर्व कर्म पहिल्याप्रमाणेंच अर्पण करितो. त्यामुळें तें विशेषें लय पावतें, असें चतुर्थाध्यायांतील " **गतसंगस्य मुक्तस्य** " या श्लोकांत सांगितलें आहे. त्याचाच विस्तार येथें केला आहे. निर्विकल्प आणि सविकल्प हे दोन्ही योग अद्वैतयोग आहेत; व ते, जसे निर्गुणोपासक उपासितात, तसेच सगुणभक्तही आचरतात, असें "**एव**" शब्दानें सुचविलें आहे. अशा अनन्ययोगानें युक्त होत्साते भक्त भगवंताचें सगुण-ध्यान करितात. "**सगुणध्यान**" म्हणजे भगवंताच्या कोणत्या तरी अवतारस्वरूपाचें आणि सगुणविश्वाचें भगवद्रूपें ध्यान होय. "**मां ध्यायंत उपासते**" म्हणजे माझें ध्यान करित असतां उपासना करितात असें म्हटलें आहे. यावरून सगुणध्यान आणि सगुणउपासना निर-निराळीं आहेत व भक्त ते दोन्हीही एकाच वेळेस आचरतो असें दर्शविलें आहे. निर्गुणोपासकांस निर्गुणावांचून उपास्य नसतें म्हणून त्यांचा योगच त्यांची उपासना असते. तो उपासनारूप अनन्ययोग यापूर्वीं वर्णन करून सांगितला. त्याच योगेंकरून सगुणभक्तही

भगवंताचें ध्यान करितो, व उपासना करितो असें " **अनन्येव योगेन** " या चरणानें सांगितलें आहे. यावरून निर्गुणोपासक व सगुणोपासक या दोघांचा योग एकच असतो हें स्पष्ट सिद्ध होतें. असें असून, निर्गुणाभिमानी टीकाकार या " **अनन्य** " शब्दाचा असा अर्थ करितात कीं, विष्णूवांचून इतर कोणास न भजणें हाच भक्तांचा अनन्ययोग होय. पण हा अर्थ नुसता " **अनन्य** " शब्द घातला असता तरी झाला असता. मग " **एव** " शब्दाची येथें काय जरूरी होती बरें ? ज्या अर्थी हा " **एव** " शब्द येथें आहे, त्या अर्थी त्यांचें म्हणणें वाजवी दिसत नाहीं. खोटा सिद्धांत घेऊन चालले म्हणजे ठिकठिकाणीं अडचणी येणारच. अस्तु. सर्व जगाचा आदि सगुण भगवंत आहे, आणि आपल्या कल्पनेनें सर्व विश्व तोच बनला आहे, असें त्याचें श्रेष्ठत्व जाणून त्याचीच कांस धरणाऱ्या भक्तांस " **मत्पर** " ह्मटलें आहे. अशा प्रकारें ज्यांनीं आपला सर्व भार भगवंतावर टाकला आहे त्यांचा उद्धार कृपाळु भगवंत करणार नाहीं असें कसें होईल ? अर्थात् भगवंत त्यांचा उद्धार करितो व फार लौकर करितो. नश्वर प्रपंचच मृत्युसंसारसागर होय, यातच सर्व जीवगण वासनापाषाण कंबरेस बांधून घेऊन बुडतात. त्यांतून भगवंत त्यांस तारून पैलथडीस नेतो. असें साह्य निर्गुणोपासकांस मिळत नाहीं, म्हणून त्यांस अत्यंत क्लेश होतात; आणि म्हणूनच निर्गुणोपासकांहून सगुणोपासक श्रेष्ठ आहेत असें भगवान् म्हणतात. या सगुणभक्तांस " **मय्यावेशितचेतसम्** " म्हटलें आहे. त्याचा असा भाव आहे कीं, सर्व सगुण विश्व व भगवंताचे लीलादेह चित्स्वरूप आहेत असें भक्त पाहतात. यासच निर्गुणैक्यें सगुणभजन ह्मणावें. असें सगुणभजन करण्याविषयीं पुढील श्लोकांत उपदेश केला आहे.

**मय्येव मन आधत्स्व मयि बुद्धिं निवेशय ।**
**निवसिष्यसि मय्येव अत ऊर्ध्वं न संशयः ॥ ८ ॥**

अर्थ.–माझ्या ठायींच मन ठेव व मजमध्यें बुद्धीचा प्रवेश कर ह्मणजे देहांत झाल्यावर तूं मजमध्यें प्रवेश करशील.

टीका.–मन आकाराची कल्पना करितें व बुद्धि त्याचा निश्चय करिते. सोन्याचा हत्ती पाहिल्याबरोबर मन त्याचे आकाराचें चिंतन करितें व बुद्धि तो हत्ती आहे असा निश्चय करिते. हें सामान्य बुद्धीचें लक्षण झालें. पण विचारवंत बुद्धि ह्मणेल कीं, तो हत्तीचा आकार सर्व सोनेंच व आकाराचा नुसता नश्वर भास आहे. या भावानें भगवान् अर्जुनास ह्मणतात कीं, "मजमध्यें" मन ठेव ह्मणजे चराचरांचा आकार भगवद्रूप आहे असें चिंतन कर व या चराचरांचें प्रकाशक जें आत्मस्वरूप आहे त्याचे ठायीं बुद्धीचा निश्चय ठेव. यासच भक्तियोग ह्मणतात. अष्टमाध्यायीं भगवंतांनीं अर्जुनास ब्रह्मानुभव दिला. नवमीं सगुणभक्तीचा अनुभव दिला. व आतां जडभ्रम नाहींसा होण्याकरितां हा भक्तियोग करण्याचा उपदेश करित आहेत. भगवंतासारिखा गुरु व अर्जुनासारिखा शिष्य असूनही अर्जुनानें भक्तियोग करण्याची जरूरी भगवंतास दिसली. मग आह्मां सारख्यांनीं अभिमानानें तो न करणें बरें किंवा वाईट, याचा विचार करण्याचें काम सुज्ञ वाचकांकडे सोंपवितों. याप्रमाणें योग बाणला ह्मणजे देहपातानंतर भगवत्स्वरूपीं प्रवेश होतो. तो असा कीं, पुन्हां तेथून परतणें घडत नाहीं असा अर्थ "**एव**" पद "**निवसिष्यसि**" याचेपुढें जोडलें असतां होतो. ज्यांत प्रवेश व्हावयाचा तो आत्मा होय, ह्मणून देहपातानंतर आत्म्याचा प्रवेश होतो असें ह्मणतां येत नाहीं. याकरितां बुद्धीचा प्रवेश होतो असें ह्मटलें पाहिजे. आतां बुद्धीचा प्रवेश तर देह असतांनाच झाला असतो. मग पुन्हां प्रवेश कां सांगितला असा एथें संशय उत्पन्न होतो. त्याचें समाधान असें आहे कीं, देह असतांना बुद्धीचा प्रवेश होतो तो कायमचा नसतो. कारण प्रारब्धभोगाचे वेळीं बुद्धि स्वरूपापासून निराळी होते.

प्रारब्धाचा क्षय झाल्याबरोबर देह पडतो व त्यानंतर बुद्धीस स्वरूपापासून निघण्याचें कारण राहत नाहीं. ह्मणून तो तिचा कायमचा प्रवेश होय.

याप्रमाणें या श्लोकाचा अर्थ असून, मागें सांगितलेले निर्गुणाभिमानी टीकाकार स्वमत स्थापित करण्याकरितां असा अर्थ करितात कीं, सगुणींच मन ठेवावें व सगुणींच बुद्धि प्रवेशवावी, ह्मणजे ज्ञान होईल व त्या ज्ञानानें मुक्ति मिळेल. भगवंतांनीं अर्जुनास ज्ञान देऊन अनुभवही दिला व आतां तें विंबण्याकरितां योग सांगत आहेत. अशा प्रसंगीं या टीकाकारांचा अर्थ केवळ अनर्थ करित आहे. अर्जुनास ज्ञान दिल्याची भगवंतास भ्रांति पडली काय ? एक तर भगवंत भ्रांत असले पाहिजेत किंवा हे टीकाकार तरी भ्रांत असले पाहिजेत. या दोहोंपैकीं खरोखर कोण भ्रांत आहेत हें वाचकांनींच पहावें. अस्तु.

यांप्रमाणें साकारीं चित्स्वरूपाची खूण धरितां आली नाहीं तर काय करावें, तें भगवान् यापुढें सांगतात.

**अथ चित्तं समाधातुं न शक्नोषि मयि स्थिरम् ।**
**अभ्यासयोगेन ततो मामिच्छाप्तुं धनंजय ॥ ९ ॥**

**अर्थ.**–यांप्रमाणें माझे ठायीं चित्त ठेऊन त्यास समाधानवृत्तींत न ठेवूं शकशील तर, हे अर्जुना, अभ्यासयोगानें माझी प्राप्ति करून घेण्याची इच्छा धर.

**टीका.**–मागील श्लोकांत सांगितल्याप्रमाणें चित्ताची स्थिरता होत नसेल तर आत्मस्वरूपीं पुनःपुनः चित्ताची योजना करण्याचा अभ्यास ठेवावा. असा अभ्यास करितांना सगुणनिष्ठा कायम ठेवली पाहिजे. नाहीं तर तो मनुष्य निर्गुणोपासकांच्या कोटींत जाऊन पडेल व त्यामुळें भगवत्कृपेस अंतरेल. असा अभ्यास करून चैतन्यसंस्कार बाणल्याबरोबर पुन्हां भक्तियोग सुरू करावा. हा अभ्यासयोग करणें

तो सगुणप्राप्तीचे इच्छेनें करावा असा या श्लोकांत उपदेश केला आहे, याचें इंगित हेंच होय. भगवंताचा ऐश्वर्ययोगच त्याचें सगुणरूप होय; या रूपीं चिदात्मत्वें मन स्थिर न होईल तर प्रत्यगात्म्याला प्रत्यग्वृत्ति करून पुनःपुनः स्वरूपीं योजावें. या पद्धतीस अभ्यासयोग म्हणतात. व विश्वाकार केवळ चिद्रूप पाहणें यास सगुणभजन म्हणतात. या श्लोकांत सांगितलेला अभ्यासयोग होऊं शकत नसेल तर काय करावें हें पुढच्या श्लोकीं सांगितलें आहे.

**अभ्यासेऽप्यसमर्थोऽसि मत्कर्मपरमो भव ।**
**मदर्थमपि कर्माणि कुर्वन्सिद्धिमवाप्स्यसि ॥ १० ॥**

**अर्थ.**–अभ्यासयोग करण्यासही तूं असमर्थ होशील तर मत्कर्मपर हो. मजकरितांच कर्मे करून सिद्धि पावशील.

**टीका.**–"**मत्कर्मपर**" या शब्दानें निरनिराळ्या प्रकारच्या श्रवणकीर्तनादि भक्ति सुचविल्या आहेत. त्या केल्यानें हळु हळु चित्ताचा चित्स्वरूपीं उपरम होतो. हाच परिणाम कर्मार्पणानेंही होतो. हा परिणाम झाला म्हणजे पुन्हां अभ्यासयोग करावा, व तो साधला म्हणजे ज्ञानयुक्त सगुणभक्ति करावी, म्हणजे ती सिद्धीस जाईल.

मागें दशमाध्यायांत "**एतां विभूतिं योगं च**" या श्लोकानें भगवंतांनीं सांगितलें आहे कीं, या विभूति आणि योग जो तत्वतः जाणतो त्यास अविकंप योग बाणतो त्याची अर्जुनास आठवण झाली आणि त्यास वाटलें कीं, ज्ञानप्राप्तीचे पूर्वीं जें भजन करावयाचें तें करण्यास लावण्यापेक्षां या विभूति आणि योग यांस अनुलक्षून एखादा उपाय भगवंत कां सांगत नाहींत ? हें भगवंतानीं जाणून यापुढचा श्लोक प्रवर्तविला आहे.

**अथैतदप्यशक्तोऽसि कर्तुं मद्योगमाश्रितः ।**
**सर्वकर्मफलत्यागं ततः कुरु यतात्मवान् ॥ ११ ॥**

**अर्थ.**—हेंही तुजकडून होऊं शकणार नाहीं तर माझ्या योगाचा आश्रित होऊन व आपलें चित्त स्ववश करून सर्व कर्म व विषयवासना यांचा त्याग कर.

**टीका.**—श्लोकाचा शब्दार्थ वरप्रमाणें झाला. परंतु स्पष्टार्थ करूं जातां "**सर्वकर्मफलत्याग**" याचा विचार जुळवितांना घोडें अडतें. बहुतेक टीकाकारांनीं या शब्दाचा सरळ अर्थ होतो तोच घेतला आहे. तसा अर्थ घेऊन चाललों तर पदोपदीं विरोध लागतो. अर्जुनास सर्व कर्मफलाचा त्याग यापूर्वींच उपदेशून त्यास निष्काम केलें व त्यानंतर ज्ञानाचा उपदेशही केला, तो बिंबण्याकरितां भगवान् हल्लीं त्यास उपाय सांगत आहेत. अशा प्रसंगीं कर्मफलत्याग सांगणें अप्रशस्त दिसतें. ध्यानीं बुद्धि स्थिर होण्याकारितां हा कर्मफलत्याग सांगितला आहे, यांत कांहींच शंका नाहीं. कारण "**मयि बुद्धिं निवेशय**" असा यापूर्वीं उपदेश केला आहे. तसें घडूं शकणार नाहीं तर अभ्यासयोग करावा. तेंही होऊं शकत नसेल, तर "**मत्कर्मपर**" व्हावें असें सांगितलें. तोही उपाय साधणार नाहीं तर या श्लोकांत सांगितलेला उपाय करण्यास सांगतात. अद्याप ध्यानीं बुद्धि स्थिर झाली नाहीं म्हणून अर्जुनास साधक समजून मनाचे शुद्धीकरितां कर्मफलत्याग सांगितला असें एक पक्षीं म्हणतां येईल. परंतु यापुढील श्लोकीं ज्ञान बिंबल्यावरही हाच कर्मफलत्याग सांगितला आहे. या दोहोंचा विरोध परिहार होईल तर असा अर्थ कदाचित् येथें घेतां येईल. पुढच्या श्लोकीं म्हटलें आहे कीं, "**ध्यानात्कर्मफलत्यागः**" यावरून ध्याननिष्ठासही हा कर्मफलत्याग उचित आहे असें स्पष्ट दिसतें. तेव्हां अशा योग्यतेस चढलेल्या पुरुषास कर्माच्या फळाचा त्याग भगवान् सांगतील हें संभवत

नाहीं. भात शिजल्यावर तांदुळ कांडावे असें सांगण्याप्रमाणें हा उपदेश होतो. म्हणून या ठिकाणीं बहुतेक टीकाकार दुश्चित्त झाले व कर्मफलत्यागाचें महत्व वाटावें याकरितां भगवंतांनीं त्याची मिथ्या स्तुति केली आहे असें बोलून जसा तसा निर्वाह करून गेले. त्या बिचाऱ्यांनीं "**यथोक्त**" शब्दाचा अगदींच बोजवार केला आहे. अस्तु. आतां ज्या अर्थानें सर्व नीट जमेल असा अर्थ शोधून काढला पाहिजे. "**सर्वकर्मफलत्याग**" या शब्दाचे सर्वकर्मत्याग व सर्वफलत्याग असे दोन विभाग करावे. ध्याननिष्ठांस कर्मत्याग योग्यच आहे, तेव्हां यासंबंधानें कांहीं अडचण राहिली नाहीं. आतां "**फल**" शब्दाचा विचार केला पाहिजे. या "**फल**" शब्दाचा "**विषयसुख**" असा अर्थ घ्यावा, ध्यानसुख बाणल्यावांचून विषयसुख टाकणें केवळ बलात्कारच होय. म्हणून ध्याननिष्ठ झाल्यावर विषयवासना टाकण्याचा उपदेश युक्त आहे. पुढील श्लोकांत ध्यान बाणल्यावर फलत्याग सांगितला हें तर जुळलें. पण या श्लोकांत ध्यान बिंबण्याकरितां हा उपाय सांगितला आहे, तेव्हां सिद्धांनीं करण्याचा त्याग सिद्ध होण्याकरितां कसा सांगितला असा पूर्वपक्ष उत्पन्न होतो. त्याचें समाधान झाल्यावेरीज हा अर्थ रुचणार नाहीं, म्हणून त्याजकडे आपण वळूं. ध्यान बिंबल्यावर साहजिकपणें शांति राहते. पण तें ध्यान बिंबण्याकरितां यत्नानें शांति धरिली पाहिजे. त्याप्रमाणें सर्वात्मध्यान बिंबण्याकरितां प्रथम जबरदस्तीनेंच फलत्याग केला पाहिजे, तेव्हां ध्यान बिंबेल व नंतर तो त्याग सहज होईल. आतां सकल सृष्टि भगवंताचा योग आहे असें नवव्या अध्यायांत सांगितलें आहे. त्या योगाचा आश्रित होऊन "**सर्वकर्मफलत्यागं ततः कुरु**" असें म्हटलें आहे. "**ततः कुरु**" "याचा "**याकारणें कर**" असा अर्थ घ्यावा म्हणजे सर्व सृष्टि भगवद्रूप पाहण्याचा योग सिद्ध होण्याकरितां सर्व कर्म आणि विषयसुख यांचा त्याग करावा असा या श्लोकांतून भाव निघतो. अतां "**फल**" शब्दाचा "**सुख**"

असा अर्थ कसा होतो हें पाहूं. ज्या कर्मानें सुख होत नाहीं तें निष्फळ झालें असें आपण ह्मणतों. यावरून सुखच फळ होय. कोणतेंही कर्म आपण करितों तें सुखासाठींच करितों. ह्मणून सर्व कर्मांचा आणि विषयसुखाचा त्याग करावा असा सर्व "**सर्वकर्मफलत्याग**" याचा खरा अर्थ सिद्ध झाला. "**फल**" शब्दानें विषयसुखच कां घ्यावें असें कोणी ह्मणेल तर त्याचें उत्तर असें आहे कीं, सुखाचे दोनच प्रकार आहेत; एक विषयसुख व दुसरें मोक्षसुख. त्यांपैकीं मोक्षसुखाचे प्राप्तीकरितां ज्या सुखाचा त्याग सांगितला आहे तें विषयसुख असलेंच पाहिजे. यावरून एकंदर श्लोकाचा असा अर्थ होतो कीं, आपलें चित्त वश करून सर्व कर्मांचा आणि विषयसुखाचा त्याग करून भगवंताचे ऐश्वरयोगाचा आश्रय करावा. सर्व कर्मांचा त्याग करून दांभिकही बकध्यान धरून बसतो ह्मणून विषयसुखाचा त्याग सुचविला आहे. विषयसुखाचा त्याग केवळ विषयांचा उपभोग न घेतल्यानें होत नाहीं, ह्मणून विषयसुखाची इच्छा टाकली पाहिजे असा भगवंताचे बोलण्यांतील भाव आहे. एवंच "**कर्मत्याग**" शब्दानें सर्व वेदोक्त कर्मांचा त्याग सुचविला आहे व "**फलत्याग**" शब्दानें लौकिक कर्मांचा त्याग सुचविला आहे. याप्रकारें त्याग करून "**वासुदेवः सर्वमिति**" एवढाच अभ्यास करावा असा अर्जुनास उपदेश केला आहे. चैतन्य कारण आणि जड जग त्याचें कार्य आहे. या जडाचे ठायीं चैतन्याचें स्फुरण होणार नाहीं तर हें जड जग भगवंताचा आकार आहे असें पहावें. यासच भगवद्योगाचा आश्रय ह्मटलें आहे. सर्व विश्व भगवंताचें रूप आहे अशी नेहमीं आठवण राहण्याकरितां सर्व कर्मांचा त्याग केलाच पाहिजे. सर्व कर्मांचा त्याग करूनही विषयवासनेमुळें योगभंग होण्याचा संभव आहे, ह्मणून तीही टाकून दिली पाहिजे. पण असा त्याग चित्त स्वाधीन राहिल्याखेरीज होऊं शकत नाहीं ह्मणून "**यतात्मवान्**" शब्दाची योजना केली

आहे. यावरून सर्वकर्मफलत्याग योगारूढांस किंवा ऐश्वरयोगाचे आश्रितांसच सांगितला आहे असें स्पष्ट सिद्ध झालें. **"एतां विभूतिं योगं च"** या श्लोकीं योग आणि विभूति या दोहींचे ज्ञानानें अविकंप योग बाणतो असें ह्मटलें आहे. यावरून या श्लोकांत नुसता **"योग"** शब्द आहे तरी त्यांत विभूतींचाही समावेश होतो असें गृहित केलें पाहिजे. एवंच **"मद्योगमाश्रितः"** या पदानें विभूतिसहित योगाचा आश्रय सुचविला आहे.

**"मय्येव मन आधत्स्व मयि बुद्धिं निवेशय"** हा भगवंताचा मूळचा उपदेश आहे. या श्लोकानें असें सांगितलें कीं, आकारवंत विश्वरूपीं मन ठेवून बुद्धीचा निश्चय चित्स्वरूपीं ठवावा. असें होऊं शकत नसेल तर अभ्यासयोग करावा व भगवत्स्वरूपास पावावें असें त्यापुढील श्लोकानें सांगितलें आहे. एथें अर्जुनास अशी शंका उपजली कीं. सगुणीं निर्गुण स्फुरूं लागलें ह्मणजे साधक भगवत्स्वरूपास पावतो असें जर आहे तर त्याच निर्गुणस्वरूपीं राहण्याचा अभ्यास केल्यावर पुन्हां सगुणभजन कां करावें ? या शंकेचा परिहार करण्याकरितां उत्तर श्लोकाची योजना केली आहे.

**श्रेयो हि ज्ञानमभ्यासाज्ज्ञानाद्ध्यानं विशिष्यते ।**
**ध्यानात्कर्मफलत्यागस्त्यागाच्छांतिरनंतरम् ॥ १२ ॥**

**अर्थ.**–अभ्यासाहून ज्ञान श्रेष्ठ होय, ज्ञानाहून ध्यान श्रेष्ठ होय. आणि ध्यानाहून कर्मफलत्याग श्रेष्ठ होय. त्यागानंतर शांति मिळते.

**टीका**–चित्ताची वृत्ति बहिर्मुख होऊन विषयांकडे जाते तिला पराक्वृत्ति म्हणतात. तीच तिकडून काढून अंतर्मुख करून आत्मस्वरूपीं लाविली म्हणजे तिला प्रत्यग्वृत्ति म्हणतात. अशा प्रत्यग्वृत्तीच्या अभ्यासाहून ज्ञान श्रेष्ठ आहे. जड जग चिन्मय पाहणें यास ज्ञान म्हणतात,

व तेंच खरें अद्वैतज्ञान होय. जडनिषेधानें आत्म्याचें ज्ञान झालें, पण जड देखील चित्स्वरूप आहे हें ज्ञान झालें नाहीं, तर अद्वैत ज्ञान होण्याचें राहिलें आहे असेंच म्हटलें पाहिजे. या भावानें अभ्यासाहून ज्ञान श्रेष्ठ आहे असें भगवान् म्हणतात. अविद्येचीं दोन रूपें आहेत; एक आवरण आणि दुसरें विक्षेप. व्यतिरेकानें आवरणाचा नाश होतो व अन्वयानें विक्षेप नाहींसा होतो. या अन्वयज्ञानासच "**ज्ञान**" म्हणून या श्लोकीं म्हटलें आहे. व व्यतिरेकज्ञान झाल्यावर अंतःकरण पुनःपुनः स्वरूपीं योजणें यास अभ्यास ह्मटलें आहे. असा अभ्यास करणाऱ्यांस जड द्वैत भासत असतें म्हणून त्यांस ज्ञान झालें असें ह्मणतां येत नाहीं. साळीस भात ह्मणतात त्याप्रमाणें व्यतिरेकास ज्ञान म्हणण्याचा परिपाठ पडला आहे. वास्तविक खरें ज्ञान अन्वयज्ञानच होय, कारण या ज्ञानानें द्वैताचा नाश होतो. केवळ ब्रह्म जसें अनादि आहे तसें त्याचें प्रपंचाकार होणेंही अनादि आहे. ह्मणून केवळ ब्रह्म कळून सर्व प्रपंचही ब्रह्माचें रूप आहे असें कळलें पाहिजे. तेव्हांच सर्वात्मक ज्ञानरूप भगवंत विश्वरूपानें दिसत आहे व हाच त्याचा ऐश्वरयोग होय असें ज्ञान होतें. या ऐश्वरयोगाचें ज्ञान अभ्यासाहून श्रेष्ठ होय असें भगवान् म्हणतात. म्हणूनच अभ्यास करून या सगुणज्ञानरूपास पावण्याची इच्छा करावी असा यामागें उपदेश केला आहे. यावरून असें सिद्ध झालें कीं, विश्वब्रह्मास जे पावतात तेच खरे ज्ञानी होत. व्यतिरेकज्ञान झालें म्हणजे कर्तव्य संपलें असें समजणारे पोकळ ज्ञानाभिमानी लोक या श्लोकांतील "**अभ्यास**" शब्दाचा अर्थ "**शास्त्राभ्यास**" असा करितात. स्वरूपीं प्रत्यग्वृत्ति योजणें, असा ते करित नाहींत. कारण व्यतिरेकज्ञान झाल्याखेरीज तसा अभ्यास होऊं शकत नाहीं व येथें तर अभ्यासाहून ज्ञान श्रेष्ठ आहे असें ह्मटलें आहे. परंतु हा त्यांचा अर्थ, हा प्रसंग कोणता याचा विचार केला ह्मणजे

बांया जातो. ज्ञानाचा अनुभव मिळाल्यावर योगसिद्धीकरितां हा अभ्यास भगवंत अर्जुनास सांगत आहेत. तेव्हां शास्त्राभ्यासाहून ज्ञान थोर आहे असें बोलण्यास निमित्तच नाहीं. मताभिमानामुळें त्यांस खरा अर्थ समजला नाहीं हें उघड दिसतें. अस्तु. "**ज्ञान**" ह्मणजे "**सर्वात्मत्वें सगुणज्ञान**" असाच खरा अर्थ आहे. यास श्रीमद्भागवतांत व योगवासिष्ठांतही प्रमाणें आहेत. पण इतकें लांब जाण्यापेक्षां गीतेंतच आधार आहे तिकडे वाचकांचें लक्ष पोंचविलें तरी पुरे होईल. चवथ्या अध्यायांत "**तद्विद्धि प्रणिपातेन**" या श्लोकांत, संतांपासुन ज्ञान मिळेल असें सांगून, तें ज्ञान कोणतें, हें लागलीच दुसऱ्या श्लोकांत सांगितलें आहे कीं, "**येन भूतान्यशेषेण द्रक्ष्यस्यात्मन्यथो मयि.**" हें जें ज्ञान तेंच सगुणब्रह्म होय व त्यासच पावण्याकरितां चालू उपदेश होत आहे.

आतां श्लोकाचे दुसरे चरणाकडे वळूं. या ज्ञानाहूनही ध्यान श्रेष्ठ होय असें भगवान् ह्मणतात. सर्वात्मक ज्ञान झालें आणि त्याचें ध्यान घडलें नाहीं तर त्याचा विसर पडून मनुष्य पदच्युत होईल. ह्मणून या ज्ञानाचे परिपक्वतेकरितां ध्यानाची आवश्यकता आहे. ज्ञानाहून ध्यानाचें श्रेष्ठत्व दाखविण्याकरितां उत्तरार्धाचीही योजना केली आहे. ध्यान केल्यानें विहित कर्माचा त्याग घडूं शकतो व विषयसुखाचीही इच्छा नाहींशी होते. विहित कर्म न केल्यानें प्रत्यवाय दोष लागतो. परंतु ध्यान बिंबून ज्याचे चित्ताचें समाधान झालें आहे त्यास तें न केल्यानें प्रत्यवाय दोष लागत नाहीं. व ध्यानामुळें ज्याचे चित्ताचें समाधान होतें तो मुक्तिसुखाचा अनुभव घेतो ह्मणून विषयसुखाची वासनाही नष्ट होते. अशेष वासना नष्ट झाली ह्मणजे लिंगदेहाचा नाश होतो व अक्षय्य शांतिसुख मिळतें. या स्थितीसच जीवन्मुक्ति ह्मणतात. हिची प्राप्ति होण्यास ध्यानच कारणीभूत आहे. ह्मणून ज्ञानाहून तें

श्रेष्ठ आहे असें ह्मटलें आहे. शांति तीन प्रकारची आहे. एक अज्ञान-दशेंतील, दुसरी जिज्ञासुदशेंतील व अपक्क ज्ञान असते वेळची ह्मणजे साधक दशेंतील, व तिसरी ज्ञान परिपक्क झाल्यावरची ह्मणजे सिद्ध दशेंतील. आपल्या लाडक्या मुलानें प्रेमानें लाथ मारिली तरी शांति राहते ती अ-ज्ञानदशेंतील शांति होय. अपक्कज्ञानी व जिज्ञासु यत्नानें शांति धरितात ती दुसरे प्रकारची शांति होय. पक्कज्ञान्याचे ठायीं वासनेचा लेशही उ-रत नाहीं ह्मणून त्याची शांति साहजिक असते ती तिसरे प्रकारची शांति होय. अशी निःसीम सहज शांति प्राप्त झाली ह्मणजे त्यास जीवन्मुक्त ह्मणतात. अशा पुरुषास कर्माचा आणि विषयसुखेच्छेचा त्याग सहज घडतो व अपक्क ज्ञान्यास तो यत्नानें करावा लागतो; ह्मणून या-मागचे श्लोकीं " **सर्वकर्मफलत्यागं ततः कुरु यतात्मवान्** " असें भगवान् बोलले आहेत. वर सांगितल्या प्रमाणें ज्यास पूर्ण शांति बाणली असते अशा पक्क सगुणभक्तांचीं लक्षणें भगवान् आतां सांगतात.

**अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः करुण एव च ।**
**निर्ममो निरहंकारः समदुःखसुखः क्षमी ॥ १३ ॥**
**संतुष्टः सततं योगी यतात्मा दृढनिश्चयः ।**
**मय्यर्पितमनोबुद्धिर्यो मे भक्तः स मे प्रियः ॥ १४ ॥**

**अर्थ.**—ज्यास कोणाचा द्वेष नसतो, जो मित्र असतो व दयाळु असतो, ज्याला माझेपणा नसतो व अहंकार नसतो, जो सुख आणि दुःख समान समजतो व जो क्षमाशील असतो ॥ १३ ॥ जो सर्वकाळ संतुष्ट असतो, जो स्थिरचित्त असतो, ज्याच्या मनाचा संयम झाला असतो, ज्याचा निश्चय दृढ असतो व माझे ठायीं ज्यानें आपलें मन आणि बुद्धि अर्पण केलीं असतात असा माझा भक्त प्रिय असतो.

**टीका.**—ज्याचा सर्वत्र भगवद्भाव झाला आहे त्याजकडून को-णाचाही द्वेष घडणें संभवत नाहीं. जो सर्वत्र सम झाला तो निरुपयोगी

झाला असें ह्मणावयास जागा होईल ह्मणून त्यास मित्र आणि करुण ह्मटलें आहे. त्याचा कोणाशीं द्वेष नसतो पण—मोक्षाधिकारी लोकांचा तो मित्र असतो व इतर भूतांस तो कृपापात्र समजतो. या श्लोकाचे उत्तरार्धानें त्याची समता दर्शविली आहे कीं तो ममता व अहंकार यावांचून असतो ह्मणजे त्याचे ठायीं आपपरभाव वास करित नाहीं. अशा पक्क ज्ञान्यासही देह असेपर्यंत प्रारब्धभोग सुटत नाहीं. त्या भोगकाळीं त्यास तेवढ्यापुरतें अहंस्फुरण होतें हें खरें आहे; तथापि सुख झालें असतां तें पुन्हां होओ व दुःख झालें असतां तें पुन्हां न होओ अशी तो इच्छा करित नाहीं. ह्मणून दोहोंच्याही ठायीं त्याची बुद्धि सारखी असते. मोठा वारा सुटून एकदां झाड हललें ह्मणजे वारा बंद झाल्यावरही तें कांहीं वेळ तसेंच हलत राहतें. त्याप्रमाणें ज्ञान होऊनही प्रारब्धभोगकाळीं तेवढ्यापुरतें अहंस्फुरण होतें. दुःख दोन प्रकारचें आहे. एक अदृष्टकृत व दुसरें परापराधकृत. अदृष्टदुःख—पाहिले प्रकारचें दुःख कोणीही सोसतो. परंतु दुसरे प्रकारचें दुःख झालें ह्मणजे क्रोध आल्यावांचून राहत नाहीं. तथापि ज्ञानी भक्त क्षमाशील असतो ह्मणून तो तें निमुटपणें सोसतो. आपल्या दांतांनीं आपली जीभ आपणच चावतों तेव्हां दांत पाडतों काय ? नाहीं. ज्ञानी भक्त सर्वच आत्मवत् पाहतो ह्मणून तो परापराध सहन करितो.

तो निजलाभानें उत्तम प्रकारें तुष्ट असतो ह्मणून त्यास "**संतुष्ट**" ह्मटलें आहे. त्याचें चित्त सर्वदा चिदात्मसंयोगीं स्थिर असतें ह्मणून त्यास "**योगी**" आणि "**यतात्मा**" ह्मटलें आहे. स्वरूपाचे ठायीं त्याचा दृढ निश्चय असतो. हीं सर्व लक्षणें निर्गुणोपासकांचेही अंगीं असतात ह्मणून स्वभक्तप्रीति दर्शविण्याकरितां "**मय्यर्पितमनोबुद्धिर्यो मे भक्तः स मे प्रियः**" असें ह्मटलें आहे. सगुणीं मन आणि निर्गुणीं बुद्धि

ठेवणें हीच सगुणभक्ति होय असें यापूर्वींच सांगितलें आहे. अशी सगुण-भक्ति करणारा ज्ञानी भक्त आपल्यास प्रिय आहे असें भगवान् सांगतात.

**यस्मान्नोद्विजते लोको लोकान्नोद्विजते च यः ।**
**हर्षामर्षभयोद्वेगैर्मुक्तो यः स च मे प्रियः ॥ १५ ॥**

अर्थ.—ज्याचेपासून लोकांस भीति नसते व जो कोणास भीत नाहीं, व हर्ष, मत्सर, भय आणि विषाद यांपासून जो मुक्त असतो तो मला प्रिय आहे व मी त्याला प्रिय असतों.

टीका.—जो कोणाचा द्वेष करित नाहीं व सर्वांवर ज्याची सारखी दया असते त्याला लोक कां भितील? भगवद्भक्त ह्मणून ज्यांची प्रसिद्धि असते असे लोक धनप्राप्तीचे इच्छेनें कोणाकडे जातात, तेव्हां या स्वामीस काय द्यावें असें त्यांस संकट पडतें; त्यामुळें त्यांस भेटण्यास ते भितात. तसा कांहींच प्रकार या भक्तांजवळ नसतो ह्मणून याही कारणाकरितां त्याची भीति बाळगण्याचें कारण नसतें. कोणी अपमान केला अथवा दुःख दिलें तरी तो सहन करितो. अशा मनुष्यापासून कोणासही भीति उत्पन्न होणार नाहीं हें उघड आहे. तो निरपेक्ष असतो ह्मणून तोही कोणास भीत नाहीं व त्यास हर्षामर्ष नसतात ह्मणून त्यास भय आणि चिंता हीं नसतात. असा भक्त भगवंतास प्रिय वाटतो, कारण भगवंत त्यास प्रिय वाटत असतो, असा अर्थ "च" कारानें होतो. या "च" कारानें "तोही माझा प्रिय असतो" असा अर्थ करणें युक्त नाहीं. कारण पूर्व श्लोकीं जो भक्त वर्णन केला, त्याहून हा निराळा मानिला तर याचें वर्णन करितांना जीं लक्षणें सांगितलीं तीं त्याचे ठायीं नाहींत असें होईल.

ध्यानयोग बिंबून ज्यास अढळ शांति प्राप्त झाली असते अशा पक्क ज्ञानी भक्ताचें या तीन श्लोकांनीं वर्णन केलें आहे. आतां सर्वकर्म

आणि फलत्याग करून जो केवळ भगवद्योगाचा आश्रय करून असतो अशा भक्ताचें वर्णन भगवान् करितात.

**अनपेक्षः शुचिर्दक्ष उदासीनो गतव्यथः ।**
**सर्वारंभपरित्यागी यो मद्भक्तः स मे प्रियः ॥ १६ ॥**

अर्थ.–जो अपेक्षारहित, शुचि, दक्ष, उदासीन व खेदरहित असतो व ज्यानें सर्व कर्मारंभ टाकले आहेत असा माझा भक्त मला प्रिय असतो.

टीका.–"सर्वारंभपरित्यागी" ह्मणजे सर्व वेदोक्त कर्मांचे व बाह्य सुख मिळविण्याकरितां यत्न करण्याचे आरंभाचा ज्यानें त्याग केला आहे तो होय. ज्याचें चित्त ध्यानीं स्थिर होत नाहीं असा अपक्क योगी प्रभूला सर्वात्मभावें शरण होऊन तदेकनिष्ठ व्हावें ह्मणून असा त्याग करितो, तोही भगवंतास प्रिय असतो. कारण तो व्यतिरेक आणि अन्वय जाणणारा असतो, किंबहुना पक्क योग्यापेक्षां भगवंतास याची जास्त काळजी वहावी लागते. कारण त्याचा योग पक्क करण्याचा भार भगवंतांवर असतो, असें भगवंतांनीं द्यापूर्वीं "अनन्याश्चिंतयंतो मां" या श्लोकानें सांगितलें आहे. अशा भक्तास कशाचीही अपेक्षा नसते ह्मणून तो शुचि आणि दक्ष असतो ह्मणजे प्रारब्ध भोगूनही तो त्यानें लिप्त होत नाहीं. याचाच विशद भाव "उदसीन" शब्दानें दर्शविला आहे कीं, त्यास स्त्रीपुत्रादिकांची ममता अथवा अहंकार असत नाहीं. यामुळें भोग भोगतांना तो उदासीन असतो; व ह्मणूनच त्याचे मनास कोणतेही प्रकारची व्यथा होत नाहीं. कारण सर्व व्यथा आशेमुळें होते, ती त्यास मुळींच नसते. असा सर्वकर्मत्यागी अनायासें पक्क योगी होतो. अशा पक्क योग्याचें लक्षण भगवान् यापुढें सांगतात.

**यो न हृष्यति न द्वेष्टि न शोचति न कांक्षति ।**
**शुभाशुभपरित्यागी भक्तिमान्यः स मे प्रियः ॥ १७ ॥**

अर्थ.—जो हर्ष वाहत नाहीं, कोणाचा द्वेष करित नाहीं, शोक करित नाहीं, कशाची इच्छा करित नाहीं, शुभ आणि अशुभ या दोहींचाही ज्यानें त्याग केला आहे व जो सगुणभक्तिमंत असतो, असा पुरुष मला प्रिय असतो.

टीका.—पक्क ज्ञान्याचीं जीं लक्षणें या श्लोकांत व यापुढील श्लोकांत सांगितलीं आहेत तींच श्लोक १३, १४ व १५ यांतही सांगितलीं आहेत, ह्मणून द्विरुक्ति वाटेल. पण तशी गोष्ट नाहीं. हे दोन निरनिराळे प्रसंग आहेत. मागील श्लोकीं जो सर्वकर्मपरित्यागी अपक्क योगी वर्णिला त्याची पक्क दशा एथपासून सांगितली आहे. ज्ञान पक्क होण्याचे निरनिराळे मार्ग आहेत. कोणी अभ्यासानेंच सिद्ध होतात, कोणी भागवतधर्मानें भक्तियोग करून सिद्धि पावतात, व कोणी सर्व धर्म टाकून केवळ सर्वात्मभावानें प्रभूस शरण जाऊन मुक्त होतात. या सर्वांचीं लक्षणें बहुतेक सारखींच असतात. अस्तु. आतां श्लोकाचे अर्थाकडे पाहूं. प्रारब्धानें चांगला विषय प्राप्त झाला तर तो हर्ष मानीत नाहीं व वाईट विषय मिळाल्यामुळें त्याचा तो द्वेष करित नाहीं. लाभ झाला नाहीं किंवा हानि झाली तर तो शोक करित नाहीं. जें नाहीं त्याचे प्राप्तीची तो इच्छा करित नाहीं. त्यानें पूर्वजन्मार्जित पापपुण्याचा त्याग केला असतो व या जन्मीं होणाऱ्या क्रियमाणांनींही तो लिप्त होत नाहीं. पूर्व श्लोकीं ज्यास "सर्वारंभपरित्यागी" ह्मटलें आहे त्यासच या श्लोकीं "शुभाशुभपरित्यागी" असें ह्मटलें आहे. ह्मणून या श्लोकांत त्याचीच सिद्धावस्था वर्णन केली आहे हें उघड दिसतें.

समः शत्रौ च मित्रे च तथा मानापमानयोः ।
शीतोष्णसुखदुःखेषु समः संगविवर्जितः ॥ १८ ॥

अर्थ.—शत्रु आणि मित्र यांचे ठायीं, मान आणि अपमान यांचे

ठायीं, शीत आणि उष्ण व सुख आणि दुःख यांचे ठायीं तो सम असतो, कारण त्यास विषयसंग नसतो.

**टीका.**—जे कोणी त्याचें शत्रुत्व करितात व जे त्यास मित्रभाव दाखवितात त्या सर्वांस तो समभावानें पाहतो. त्याचप्रमाणें तो मान आणि अपमान सारखे पाहतो, कारण त्याचा सर्वत्र भगवद्भाव असतो. प्रारब्धानें सुखदुःख प्राप्त होतें. तें, ज्या कर्मांमुळें होतें त्यांचा भोगानें क्षय होत असतो, ह्मणून दोन्ही प्रसंगीं त्याचा भाव समान असतो. विषयसंग असला तर असा समभाव राहू शकत नाहीं ह्मणून यास **"संगविवर्जित"** असें विशेषण दिलें आहे.

**तुल्यनिंदास्तुतिर्मौनी संतुष्टो येन केनचित् ।**
**अनिकेतः स्थिरमतिर्भक्तिमान्मे प्रियो नरः ॥ १९ ॥**

**अर्थ.**—ज्यास निंदा आणि स्तुति सारख्या वाटतात, जो मौनी असतो, जें कांहीं मिळेल त्यानें जो संतुष्ट असतो, ज्यास नेमकें ठिकाण नसतें, ज्याची बुद्धि स्थिर असते व जो भक्तिमान् असतो, असा पुरुष मला प्रिय असतो.

**टीका.**—देहाभिमान नसला ह्मणजे निंदा आणि स्तुति सारख्याच वाटतात. अध्यात्म किंवा भगवत्कथा याशिवाय जीभ हलविली नाहीं ह्मणजे त्यास मौनीच ह्मणावें; कारण त्याचें चित्त स्वरूपीं लीन असतें. कशाही रीतीनें निर्वाह झाला तरी तो संतुष्ट असतो. ममता नसल्यामुळें कोठेंही राहिलें तरी त्यास सारखेंच असतें. विषयवासना नसल्यामुळें त्याची बुद्धि कधीं चंचल होत नाहीं. असा भगवद्भक्त भगवंतास प्रिय असतो.

**ये तु धर्म्यामृतमिदं यथोक्तं पर्युपासते ।**
**श्रद्दधाना मत्परमा भक्तास्तेतीव मे प्रियाः ॥ २० ॥**

**अर्थ.**–जे श्रद्धधान् आणि मत्परम भक्त हें धर्म्यामृत यथोक्त उपासितात, ते मला अत्यंत प्रिय होत.

**टीका.**–"धर्म्यामृत" आणि "धर्मामृत" हे शब्द एकाच अर्थाचे आहेत. पाठभेदामुळें कोणी धर्म्यामृत व कोणी धर्मामृत ह्मणतात. "मृत" ह्मणजे मरणार असा नश्वर जडभाग होय. हे नश्वर चराचर चित्स्वरूपीं नाहींतच असें नवव्या अध्यायांत भगवान् बोलले. अमृत शब्द त्याच चैतन्याचा दर्शक होय. एवंच चैतन्य अमृत होय. परंतु तें निर्गुण निर्धर्म आहे. ह्मणून ज्या चैतन्यांत भूतें दिसूनही नाहींशींच असतात, त्यास "धर्म्यामृत" ह्मणावें. या चराचररूपानें भासणाऱ्या चैतन्यासच ऐश्वरयोग ह्मटलें आहे व तोच विश्वरूप जगदीश्वर होय. नवमाध्यायारंभीं "प्रत्यक्षावगमं धर्म्यं" या चरणानें धर्म्यज्ञान सांगतों असें ह्मणून आपणांत भूतें दाखविलीं व तीं नाहींतच असाही सिद्धांत भगवंतांनीं सांगितला. मृत जड जग नाहींच, परंतु दोराचे ठायीं भ्रमामुळें जसा मिथ्या सर्प दिसतो तसें तें चित्स्वरूपीं दिसतें. हा देखावा मायागुणधर्मेंकरून युक्त अशा चैतन्याचा आहे, ह्मणून त्यास "धर्म्यामृत" ह्मटलें आहे. तें सगुण भगवंताचें रूप होय. अशा सगुणाची जे उपासना करितात ते मला प्रिय आहेत असें भगवान् ह्मणतात. अर्जुनाच्या प्रश्नास अनुसरून या अध्यायांत सर्वत्र सगुणाचेंच विवेचन केलें आहे, ह्मणून "धर्म्यामृतमिदं" असें ह्मटलें आहे. मधून मधून अव्यक्तोपासकांचें वर्णन केलें आहे तें भक्तांचें श्रेष्ठत्व दाखविण्याकरितां करणें जरूरच होतें. अभिमानामुळें निर्गुणोपासक या अध्यायाचा ओढून ताणून भलता अर्थ करितील हें भविष्य सर्वज्ञ भगवंत जाणत होते, ह्मणून त्यांनीं "यथोक्त" शब्दाची योजना केली आहे. जे भक्त असतील तेच यथोक्त अर्थ करतील व तेच भगवंतास प्रिय होतात. भक्त आणि अव्यक्तोपासक या दोघांत कोण श्रेष्ठ असा अर्जुनाचा प्रश्न होता

त्याचें भक्त श्रेष्ठ, असें भगवंतानीं उत्तर दिलें; असें असूनही अव्यक्तोपासकांनीं भक्तांस ज्ञानहीन ठरविलें, तेव्हां ते भगवंताचे वचनास मान देतील काय ? जे भक्त असतील तेच भगवंताचे वचनास मान देतील. यावरून जे तसा मान देत नाहींत ते अभक्त ठरतातच. ह्मणून भक्तांस श्रद्धधान ह्मटलें आहे; कारण त्यांस सगुण भगवंतच परमप्राप्ति वाटतो.

या अध्यायाची टीका करितांना निर्गुणाभिमानी लोकांस बरीच दूषणें देणें भाग पडलें. त्यासंबंधानें पंडितांची उक्ति येथें दिली असतां खरा उद्देश कळून येईल.

**ओंव्या.**

“ तत्वता अर्थ ठायीं पडो न पडो। सर्वांस टीका आपुली आवडो ।
हा भाव असे तरी झडो । जिव्हाच हे ॥
कीं भक्ति थोर करूनी । माझ्या भक्तवृंदांत जो विवरुनी ।
गीता सांगेल तो मज आवडे ह्मणोनी। “ य इदं परमं गुह्यं ” या श्लोकें बोलेल॥
त्या भगवंताचीया वचना । लक्षूनिया टीकेची रचना ।
करितों जे मत्सरयुक्त जनां । आवडेचि ना ॥
माझ्या आत्मया भगवंता आवडो । त्याची कृपादृष्टि मजवरी पडो ।
वरकड घडणार तें घडो । वामन ह्मणे ॥

अशी ही द्वादशाध्यायाची टीका भगवत्प्रसादानें निर्विघ्नपणें सिद्धीस गेली ती त्याच भगवच्चरणीं समर्पण असो.



श्री.

# अध्याय १३ वा.

ॐ नमो भगवते वासुदेवाय.

नवव्या अध्यायांत धर्म्यामृत असा ऐश्वरयोग ज्ञानदृष्टीनें अर्जुनास दाखविला, व तोच दिव्य दृष्टीनें अकरावे अध्यायांत दाखविला. बारावे अध्यायांत त्याचे उपासनेचे निरनिराळे प्रकार वर्णन करून सांगितले. आतां, या अध्यायांत अमृत ह्मणजे पुरुष व धर्मरूपिणी प्रकृति यांचें पृथक्त्वें विवेचन करून, त्यांचें ऐक्यही दाखविलें आहे. श्रीभगवान् ह्मणतात कीं,

**इदं शरीरं कौंतेय क्षेत्रमित्यभिधीयते ।**
**एतद्यो वेत्ति तं प्राहुः क्षेत्रज्ञ इति तद्विदः ॥ १ ॥**

**अर्थ.**—हे अर्जुना, या शरिरास "क्षेत्र" ह्मटलें आहे आणि या क्षेत्रास जो जाणतो त्यास तत्त्ववेत्ते "क्षेत्रज्ञ" असें ह्मणतात

**टीका.**—क्षेत्र ह्मणजे शेत. शेतांत जें पेरावें तें उगवतें. त्याप्रमाणें नरदेह कर्माचीं फळें उत्पन्न करितो ह्मणून त्यास क्षेत्र असें ह्मटलें आहे. नरदेहीं जें कर्म होतें त्यास क्रियमाण ह्मणतात. देहपातानंतर याचेंच संचित होतें व त्यांतून प्रारब्ध निवडलें जातें. या देहास अन्नमय कोश ह्मणतात. तामस अहंकाराचा आश्रय करून, हा देहच आपण आहों असें मानितो तोच क्षेत्रज्ञ होय व त्यासच चिदंशजीव ह्मणतात. हा जीव सत्वप्रतिबिंबित चैतन्य होय व यासच भोक्तृत्व घडतें. यासंबंधानें पुढें

पंधराव्या अध्यायांत स्पष्टीकरण होईल. बिंबरूप चैतन्याचें ज्ञान झाल्याशिवाय या क्षेत्रज्ञाचें ज्ञान झालें असें समजतां येत नाहीं. पाण्यांत सूर्याचें प्रतिबिंब दिसत तें वास्तविकपणें नसतेंच. कारण जवळच्या उपाधीचा अवलंब करून प्रतिबिंबरूपानें सूर्यच त्यांत दिसतो. आरशांत आपलें प्रतिबिंब आपण पाहतां, त्यांत आपलें नाक हातांत धरिल्याशिवाय प्रतिबिंबाचें नाक हातांत सांपडत नाहीं. त्याप्रमाणें बिंबरूप चैतन्याचें ज्ञान झाल्याशिवाय क्षेत्रज्ञाचें खरें ज्ञान होत नाहीं. पाण्यांत दिव्याचें प्रतिबिंब पडतें, तें फक्त पाण्यासच प्रकाशित करितें; पण दिव्याचा उजेड घरांत सर्वत्र असतो. त्याप्रमाणें प्रतिबिंबरूप जीव, ज्या चैतन्याचें प्रतिबिंब असतो, तें चैतन्य सर्वगत आहे. या सर्वगत चैतन्याचें ज्ञान होणें अवश्य आहे. आणि तेंच खरें ज्ञान होय, असें यापुढील श्लोकांत भगवान् सांगतात.

**क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि सर्वक्षेत्रेषु भारत ।**
**क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्ज्ञानं यत्तज्ज्ञानं मतं मम ॥ २ ॥**

**अर्थ.**—हे अर्जुना, सर्व क्षेत्रांचे ठायीं क्षेत्रज्ञही मीच आहें, असें समज. क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ यांच्या ज्ञानाचें ज्ञान मला संमत आहे.

**टीका.**—"**क्षेत्रज्ञं चापि**" यांतील "**च**" कार आणि "**अपि**" शब्दानें क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ या दोहोंचाही बोध केला आहे. पूर्व श्लोकीं हीं दोन्ही भिन्नत्वें सांगितलीं आणि या श्लोकाचे पूर्वार्धानें त्यांचें ऐक्य सुचविलें आहे. तत्पद ईश्वर आणि त्वंपद कूटस्थ यांचें आयतें ऐक्य जसें "**तत्वमसि**" या महावाक्यानें दर्शविलें आहे, तसें हें ऐक्य नाहीं. सर्वसृष्टिव्यापक चित्स्वरूपास ईश्वर व देहांतील सर्वगतचैतन्यास कूटस्थ ह्मणतात. हीं दोन्ही चैतन्यें एकच आहेत ह्मणून "**असि**" पदानें सांगितलें आहे. याचा बरोबर समज होण्याकरितां श्रुति-

प्रसिद्ध आकाशाचा दृष्टांत आहे तो एथें सांगण्याची आवश्यकता आहे. सर्वगत सृष्टिव्यापक चैतन्य महाकाश, देहव्यापक चैतन्य घटाकाश व प्रतिबिंबरूपी जीव घटांतील जलप्रतिबिंबित जलाकाश होत असें गृहण करावें. घट आणि मठ यांचा लोप झाला ह्मणजे त्या दोन्हीं आकाशांचें ऐक्य करावें लागत नाहीं, तें आयतेंच असतें. हीं दोन्हीं आकाशें अचल असतात; परंतु जलप्रतिबिंबित आकाश वाऱ्यानें डळमळ करितें, त्याप्रमाणें ईश्वर आणि कूटस्थ यांचें ऐक्य आहेच. तथापि निरानिराळे अवकाशांस व्यापिल्यामुळें ते भिन्न दिसतात. त्या अवकाशांचा ह्मणजे देह आणि सृष्टीचा लय झाला ह्मणजे त्यांचें निर्गुणीं आयतेंच ऐक्य होतें; तशी जीवांची गोष्ट नाहीं. सत्वोपाधि कायम आहे तोंपर्यंत त्यांचें आणि ईश्वराचें ऐक्य असून नसल्याप्रमाणें असतें. तें यत्नानेंच केलें पाहिजे. चैतन्याचे असे तीन भेद झाले आहेत. प्रतिबिंबरूप चैतन्य केवळ आभास मात्र आहे, व कर्तृत्व या आभासयुक्त बुद्धीचें आहे. याप्रमाणें पूर्वार्धांत जीवेश्वरैक्य सुचवून उत्तरार्धानें तेंच तत्व स्पष्ट करून सांगितलें आहे. क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ या दोहींचें प्रकाशक जें ज्ञान त्या ज्ञानाचें ज्ञान खरें ज्ञान होय व तें आपल्यास संमत आहे, असें भगवंत उत्तरार्धानें सांगतात. कित्येक टीकाकार या उत्तरार्धाचा अर्थ असा करितात कीं, क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ यांचें ज्ञान संमत आहे. असा अर्थ करण्यास "यतज्ज्ञानं" या पदाची जरूर नव्हती. सर्वप्रकाशक ज्ञान (चैतन्य) बुद्धिजलांत (सत्वांत) प्रतिबिंबित होऊन तें त्या सत्वाच्या अवलंबनानें क्षेत्रास जाणतें. यावरून उघड दिसतें कीं, क्षेत्रास जाणणारें ज्ञान बिंबरूपाचेंच होय. ह्मणून क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ यांत जें ज्ञान आहे, तें ज्या सर्वप्रकाशक ज्ञानामुळें आहे, तें ज्ञान आपणांस संमत आहे असें भगवान् ह्मणतात. तें सर्वप्रकाशक ज्ञान निर्धर्म आहे, आणि क्षेत्र जाणणें हा सत्त्ववृत्तीचा धर्म आहे; ह्मणून सत्त्ववृत्तियुक्त चैतन्य देहास जाणतें,

त्यासच क्षेत्रज्ञ अशी संज्ञा आहे. वर सांगितलेल्या विवेचनानें क्षेत्रज्ञांत ज्ञान आहे असें स्पष्ट समजतें; परंतु क्षेत्रांत तें ज्ञान कसें आहे याचा बोध होत नाहीं. तें ज्ञान, काष्ठांत जसा अग्नि गुप्त असतो तसें क्षेत्रांत गुप्त असतें.

पिंडांत जीं तत्वें आहेत तींच ब्रह्मांडांत आहेत व हें ब्रह्मांड ईश्वराचा विराट देहच होय. या ब्रह्मांडांत ज्ञानदृष्टीनें पाहतां येतें असें जें कारणरूपी ज्ञान आहे त्याचें ज्ञान ह्मणजे अन्वयज्ञान व क्षेत्रज्ञाचें ज्ञान ह्मणजे व्यतिरेकज्ञान. या दोन्ही प्रकारांचें ज्ञान संमत आहे असा उत्तरार्धाचा भावार्थ आहे.

**तत्क्षेत्रं यच्च यादृक् च यद्विकारि यतश्च यत् ।**
**स च यो यत्प्रभावश्च तत्समासेन मे शृणु ॥ ३ ॥**

**अर्थ.**—तें क्षेत्र आणि त्याचे निरनिराळे भेद, तें क्षेत्र ज्यामुळें विकारवंत आहे, तें ज्यापासून उत्पन्न होतें तें, त्याचप्रमाणें क्षेत्रज्ञाचा प्रभाव यांचें विवेचन मी संक्षेपानें करितों तें ऐक.

**टीका.**—या श्लोकाचा भावार्थ असा आहे कीं, क्षेत्र हें कारण-रूपिणी प्रकृतीचें कार्य आहे. ती प्रकृति अनादिपणें चित्स्वरूपापासून पुनःपुनः उत्पन्न होते. यावरून हें क्षेत्र चैतन्यापासूनच उत्पन्न झालें आहे. परंतु प्रकृतिगुणामुळें तें जड झालें आहे. या जडीं कारणरूप ज्ञान गुप्त असतें. या सर्वांचें विवेचन व चिदंश असल्यामुळें क्षेत्रज्ञांचे अंगीं जो प्रभाव आहे त्याचें विवेचन करण्याचें वचन भगवान् या श्लोकानें देतात, व तें या प्रसंगीं संक्षेपानें सांगतों असें ह्मणतात. जरूर असल्यास याचा विस्तार कोठें सांपडेल हें आधीं पुढील श्लोकानें सांगतात.

**ऋषिभिर्बहुधा गीतं छंदोभिर्विविधैः पृथक् ।**
**ब्रह्मसूत्रपदैश्चैव हेतुमद्भिर्विनिश्चितैः ॥ ४ ॥**

**अर्थ व टीका.**–वसिष्ठादिक ऋषींनीं या विषयाचें विवेचन केलें आहे. वेदांतही निरनिराळ्या शाखांतून, त्याचप्रमाणें श्रीमन्नारायणावतार व्यास यांणीं ब्रह्मसूत्रें केलीं आहेत त्यांत या विषयाचें विवेचन केलें आहे, आणि या ज्ञानप्राप्तीच्या निश्चयात्मक युक्तीही त्यांत सांगितल्या आहेत. आतां पुढच्या श्लोकानें क्षेत्राचें लक्षण सांगतात.

**महाभूतान्यहंकारो बुद्धिरव्यक्तमेव च ।**
**इंद्रियाणि दशैकं च पंच चेंद्रियगोचराः ॥ ५ ॥**

**अर्थ.**–महाभूतें, अहंकार, बुद्धि, अव्यक्त, देहादि इंद्रियें आणि अकरावें मन व इंद्रियांचें पांच विषय ( हे सर्व मिळून क्षेत्र होय. )

**टीका.**–क्षेत्र ह्मणजे देह. या देहांत चोवीस तत्वें आहेत. तीं अशीं:–पंचतत्वें, पृथ्वी, आप्, तेज, वायु आणि आकाश. हीं तत्वें तामस अहंकारापासून उत्पन्न होतात. अहंकार महत्तत्वापासून उत्पन्न होतो, हें "महा" शब्दानें दर्शविलें आहे. त्यानंतर महत्वरूपिणी बुद्धि सांगितली आहे. हें महत्तत्वच ब्रह्मदेवाचें रूप होय. तो बुद्धीचें दैवत होय. महत्तत्व अव्यक्त मायेपासून उत्पन्न होतें. या अव्यक्त तत्वाचाच अंश चित्त होय. त्याचें दैवत वासुदेव होय व अहंकाराचें दैवत रुद्र होय. पूर्वार्धांतील "एव च" या पदानें चित्ताची सूचना करून तें अव्यक्ताचा अंश आहे असें सुचविलें आहे. पांच ज्ञानेंद्रियें आणि पांच कर्मेंद्रियें अशीं दहा इंद्रियें होत. "एकं" या शब्दानें मन सुचविलें आहे, आणि इंद्रियगोचर पंचतत्वांचे पांच विषय चतुर्थ चरणानें सुचविले आहेत. एवंच पांच भूतें, त्यांचे पांच विषय, दहा इंद्रियें, बुद्धि, अहंकार मन आणि अव्यक्त तत्वाचा अंश चित्त अशा चोवीस तत्वांचा हा देह बनला आहे. याप्रमाणें या श्लोकांत हीं तत्वें सांगून तीं कोणकोणत्या अहंकारापासून उत्पन्न झालीं आहेत हेंही दर्शविलें आहे. पंचतत्वें

आणि त्यांचे विषय तामस अहंकारापासून, दहा इंद्रियें राजस अहंकारापासून व मन, चित्त आणि बुद्धि सात्विक अहंकारापासून उत्पन्न झाले आहेत. आतां पुढच्या श्लोकांत या देहाचे विकार सांगितले आहेत.

**इच्छा द्वेषः सुखं दुःखं संघातश्चेतना धृतिः ।**
**यत्तत्क्षेत्रं समासेन सविकारमुदाहृतम् ॥ ६ ॥**

**अर्थ.**—इच्छा, सुख, दुःख, संघात, चेतना, व धारणा या विकारांसहित क्षेत्राचें याप्रमाणें संक्षेपानें वर्णन केलें आहे.

**टीका.**—मनाचा व इंद्रियांचा संयोग होऊन त्यांस पंच विषयांची अपेक्षा होते ती इच्छा होय. इंद्रियांस विषय गोड वाटले ह्मणजे सुख होतें व वाईट वाटले ह्मणजे द्वेष उत्पन्न होतो. वास्तविक सुख ह्मणून आत्म्याचेंच असतें, पण तें विषयभोगानें होतें असें वाटतें. यावरून हीं दोन्हींही क्षेत्रविकारांतच गणिलीं आहेत. कस्तुरीची बाहुली असते तिचा सुगंध येतो. तो सुगंध बाहुलीचा आहे असें अज्ञान मुळें ह्मणतात; पण समजदार मनुष्य तो सुगंध कस्तुरीचा आहे आणि आकाररूप बाहुली नाहींच असें समजतो. त्याप्रमाणें सुख आत्म्याचें आहे व क्षेत्र मुळींच नाहीं असें तत्ववेत्ते समजतात. सुगंधित पुष्पांचा हारही भ्रांतीमुळें सर्पाकार वाटून भय उत्पन्न होतें. पण तो सर्प नसून हार आहे जसें समजल्याबरोबर भय नाहींसें होतें. असें भय वाटत असतांनाही पुष्पाचा सुगंध येतच असतो. तद्वत् सुख आणि दुःख हीं दोन्हीं आत्म्यांतच आहेत, पण सुख खरें आहे व दुःख भ्रांतीमुळें उत्पन्न होतें. सुगंध पुष्पाचा व भय मिथ्या सर्पाचें असूनही हे दोन्हीही गुण व्यवहारांत सर्पाकडेच लावले जातात. तशा व्यवहारदृष्टीनें सुख आणि दुःख क्षेत्राचेच विकार आहेत, असें ह्मटलें आहे. इंद्रियांचीं गोलकें

आणि अंतःकरण, मन, चित्त, बुद्धि आणि अंहकार या पंचकाचा संयोग झाल्याखेरीज विकार उत्पन्न होत नाहीं. ह्मणून या सर्वांच्या समुदायास ह्मणजे संघातासही विकारांत गणलें आहे. हा तत्वसमुदाय चेतनावृत्तीनें सचेतन होतो. सत्ववृत्तिही शरीराप्रमाणेंच जड आहे. परंतु चित्त आत्म्याचे सन्निधानामुळें आधीं सचेतन होऊन नंतर तें सर्व समुदायास चेतवितें, ह्मणून ही चित्ताची चेतनाही विकारांत घेतली आहे. ओलें गच्च लांकूड जसें वाळल्या लांकडाच्या मदतीमुळें जळतें, तसा चित्ताचे चेतनेनें इतर जडसमुदाय सचेतन होतो. चित्तास विषयांची स्मृति झाल्याखेरीज विकार उत्पन्न होत नाहींत. अशी स्मृति सूक्ष्म रीतीनें अंतःकरणांत असते तिला धारणा ह्मणतात. याप्रमाणें क्षेत्राचें वर्णन एथपर्यंत झालें. या क्षेत्रांत ज्ञान आणि अज्ञान हीं दोन्हींही असतात, ह्मणून मनुष्यदेहच मुक्तीचें आणि नाशाचें साधन होय. या देहांत असतांना भोगलेलें कर्म इतर देहांत भोगिलें जातें. आपले शेतांत पिकलेलें धान्य देशांतरीं जाऊन आपण खातों, तद्वत् मनुष्यदेहांत केलेलें कर्म इतर योनींत असतां भोगिलें जातें. एथें कोणी असें ह्मणतील कीं, ज्ञान तर सर्व योनींत असतेंच, मग इतर योनींत असतां मुक्ति मिळत नाहीं हें कसें ? याचें उत्तर असें कीं, जेथें दिवस उगवतो तेथें तमास रात्र ह्मणतात. पण जेथें दिवस उगवतच नाहीं, तेथें सर्वच तमोमय असतें. तद्वत् मी कोण हें समजण्याचा विचार मनुष्यदेहाखेरीज होत नाहीं, ह्मणून इतर योनींतील ज्ञानास अज्ञानच ह्मटलें पाहिजे. अस्तु. आतां यापुढें क्षेत्रज्ञ प्रतिबिंबाचें बिंब शुद्ध चैतन्य, ज्यास **ज्ञेय** ह्मणतात, त्याचें विवेचन भगवान् करणार आहेत. त्यापूर्वी येथून पांच श्लोकांनीं ज्ञानाचीं लक्षणें सांगून तद्विलक्षण अज्ञानाचें लक्षण होय, असें शेवटीं “ **अज्ञानं यदतोऽन्यथा** ” या चरणानें सांगितलें आहे.

**अमानित्वमदंभित्वमहिंसाक्षांतिरार्जवम् ।**
**आचार्योपासनं शौचं स्थैर्यमात्मविनिग्रहः ॥ ७ ॥**

**अर्थ.**–अमानित्व, अदंभित्व, अहिंसा, क्षांति आर्जव आचार्योपासन शौच, स्थैर्य, आत्मविनिग्रह [ हे ज्ञान होत ].

**टीका.**–ज्ञानप्राप्तीनंतर ज्ञानाचा गर्व होतो त्यास मानित्व ह्मणावें, तो गर्व नसणें या लक्षणास "**अमानित्व**" म्हटलें आहे. हें ज्ञान व तद्विलक्षण "**मानित्व**" अज्ञान होय. ज्ञान नसून भगवद्भजन करीत असतांना तें ज्ञान आपल्या अंगीं आहे असें जगास खोटेंच भासविणें, यास "**दंभित्व**" म्हणावें. हें अज्ञानाचें लक्षण होय व तद्विपरीत "**अदंभित्व**" हें ज्ञानाचें लक्षण होय. परपीडा करणें "**हिंसा**" होय. ती न करणें "**अहिंसा**" होय. हिंसा हें अज्ञानाचें लक्षण आहे आणि अहिंसा ज्ञानाचें लक्षण आहे. अहिंसा ज्ञानाचें लक्षण असून ज्ञानाचें साधनही आहे, कारण देहधारी जीवात्मा परमेश्वराचा अंश आहे असें समजून जो त्यास पीडा करीत नाहीं, त्याजवर परमेश्वराची कृपा होते व त्यामुळें त्यास ज्ञान प्राप्त होतें. "**क्षांति**" ह्मणजे क्षमा होय. ही क्षमा ज्ञानाचें लक्षण होय. आपपरभाव नाहींसा झाल्याशिवाय हें लक्षण प्राप्त होत नाहीं. याचें महत्व दाखविण्याकरितांच भगवंतांनीं भृगूचे लाथेचें चिन्ह आपल्या हृदयावर धरलें आहे. "**आर्जव**" ह्मणजे सरळ भावानें वागणें. काया, वाचा आणि मन इहींकरून कोणासही दु:ख न होईल अशा रीतीनें वर्तन करणें हें ज्ञानाचें लक्षण होय. आपला गुरु ईश्वरच आहे असा भाव धरून त्याची सेवा करणें यास "**आचार्योपासन**" असें ह्मटलें आहे. गुरूचें सांनिध्य असलें तर अशी उपासना घडूं शकते, परंतु इतर प्रसंगीं तसें घडूं शकत नाहीं, अशी या ठिकाणीं शंका उत्पन्न होते. परंतु ती व्यर्थ आहे. सर्वत्र चित्स्वरूप

आहे असा श्रीगुरूचा उपदेश असतो. तर्‍हां चित्स्वरूप राहणें ही गुरूची सेवाच होय. निश्चळ चित्स्वरूपीं चित्त लाविलयानें, आणि सर्व जड जग चित्स्वरूप पाहिल्यानें अशा दों प्रकारें चित्स्वरूपीं राहतां येतें. म्हणून निर्विकल्प आणि सविकल्प समाधीचा अभ्यास करणें गुरूची सेवाच होय. आतां शुद्धतेस "शौच" म्हणतात, म्हणून मनाचे शुद्धीस ज्ञान म्हटलें आहे. "स्थैर्य" या शब्दानें बुद्धीची चित्स्वरूपीं स्थिरता सुचविली आहे. हेंही ज्ञानाचें लक्षण होय. भगवद्भजनीं स्थैर्य असणें हें साधकाचें साधनही होय. याउपरांत नववें लक्षण "आत्मविनिग्रह" याचें स्पष्टीकरण केलें पाहिजे. "आत्मा" शब्दाचा अर्थ मन असा आहे. या मनाचा निग्रह करून विषयांचें चिंतन टाकल्याशिवाय स्वरूपस्थितीचा अनुभव राहत नाहीं, म्हणून तें ज्ञानाचें लक्षण होय.

**इंद्रियार्थेषु वैराग्यमनहंकार एवच ।**
**जन्ममृत्युजराव्याधिदुःखदोषानुदर्शनम् ॥ ८ ॥**

**अर्थ.**—विषयांचे ठायीं वैराग्य, अहंकार नसणें, जन्म, मृत्यु, म्हातारपण व व्याधि हे दुःखप्रद आहेत अशी आठवण ठेवणें ( हीं ज्ञान होत. )

**टीका.**—रजोगुणात्मक इंद्रियांचे तमोगुणात्मक पांच विषय होत. त्या विषयांचे ठायीं वैराग्य असणें हें ज्ञानाचें लक्षण होय. अर्थात् अवैराग्य हें अज्ञानाचें लक्षण आहेच. सत्व, रज आणि तम या तीन गुणांचा आश्रय करणारे जे तीन प्रकारचे अहंकार आहेत ते नसणें हें ज्ञानाचें लक्षण होय. देह मी असें समजणें हा तामस अहंकार, इंद्रियें मी आहें असें समजणें हा राजस अहंकार, व केवळ मीपणाची अंतःकरणस्फूर्ति सात्विक अहंकार होय. हे तीन्ही अहंकार

नाहींसे झाल्याशिवाय ज्ञान झालें असें म्हणतां येत नाहीं. असें ज्ञान प्राप्त झालें असतां जन्म, मृत्यु, जरा आणि शरीरव्याधि यांचें दुःख वाटत नाहीं. हीं दुःखें आपल्या कर्मामुळें आपणास भोगावीं लागतात म्हणून हा आपलाच दोष आहे असें समजणें, हें ज्ञानाचें लक्षण होय. व ह्या दुःखाचें दर्शन दोषरूप न पाहणें हें अज्ञान होय, असें भगवान् सांगतात.

**असक्तिरनभिष्वंगः पुत्रदारगृहादिषु ।**
**नित्यं च समचित्तत्वमिष्टानिष्टोपपत्तिषु ॥ ९ ॥**

**अर्थ.**–वासनारहित होऊन स्त्रीपुत्र आणि गृह इत्यादिकांच्या ठायीं आसक्ति न ठेवणें, इष्ट आणि अनिष्ट भोगांचे ठायीं समानांतःकरण असणें ( हीं ज्ञान होत. )

**टीका.**–एखादा वाटसरू मुक्कामाकरितां दुसऱ्याचे घरीं राहतो व पुन्हां आपला मार्ग धरितो. त्याप्रमाणें पूर्व कर्मामुळें पुत्रदारादि प्राप्त झाले आहेत असें समजून त्या प्रारब्ध कर्मास मान देऊन जो त्यांमध्यें आसक्ति न ठेवितां राहतो तो ज्ञानी होय व त्याचें असें वागणें ज्ञानाचें लक्षण होय. सुख सर्वांस इष्ट असतें आणि दुःख इष्ट नसतें. या दोहींच्याही उपभोगाचे वेळीं चित्ताचें समाधान असणें हेंही ज्ञानाचें लक्षण आहे. अशीं एथवर चौदा लक्षणें सांगितलीं.

**मयि चानन्ययोगेन भक्तिरव्यभिचारिणी ।**
**विविक्तदेशसेवित्वमरतिर्जनसंसदि ॥ १० ॥**

**अर्थ.**–अनन्ययोगानें युक्त होऊन माझे ठायीं अव्यभिचारिणी प्रीति ठेवणें, जनसंसर्गाची अनावड उपजून एकांतवासाचें अवलंबन करणें ( हीं ज्ञान होत )

टीका.—भगवंताखेरीज दुसरें कांहींच नाहीं असें समजून सर्वां ठायीं भगवद्भाव ठेवून, भगवंताची एकनिष्ठ भक्ति करणें हें ज्ञानाचें लक्षण आहे. यासंबंधाचें विवेचन, यापूर्वी अनेक वेळ झालें आहे, ह्मणून तें एथें पुन्हां करण्याचें कारण नाहीं. पूर्वार्धानें सगुणभक्ति दर्शविली आहे. ती करणें हें ज्ञान होय. आतां, सर्व जगच भगवद्रूप आहे असें "अनन्ययोग" शब्दानें सुचविलें आहे. ह्मणून कोणी इतर देवताभक्ति करितील तर तें बरोबर नाहीं, हें दर्शविण्या करितां "अव्यभिचारिणी" ह्मणजे एकट्या भगवंताचीच भक्ति करावी, असें ह्मटलें आहे. यावरून इतर देवताभजन करणें, अज्ञानाचें लक्षण आहे, असें ठरतें. तसेंच भगवंताची भक्ति द्वैत भावानें करणें, हेंहि अज्ञानाचें लक्षण आहे, असें "अनन्ययोग" शब्दानें सुचविलें आहे. एकांत वासांत असणें, हें ज्ञानाचें लक्षण आहे पण नुसता एकांत सेवन करणें, हें ज्ञानाचें लक्षण नाहीं. असें चतुर्थ चरणानें दर्शविलें आहे. सकाम लोकहि जनसभेंत प्रतिष्ठा मिळावी अशी इच्छा ठेवून एकांतवास करितात. पण त्यांचा तो एकांतवास ज्ञानाचें लक्षण आहे असें ह्मणतां येत नाहीं. ह्मणून जनसमूहांत असणें न आवडतां ज्यास एकांतवास आवडतो, तोच ज्ञानी होय असें भगवान् ह्मणतात. "जनसभा" या शब्दानें सामान्य जनसभा असा भाव दर्शविला आहे. हरिकीर्तनसभेस जनसभा ह्मणतां येत नाहीं.

**अध्यात्मज्ञाननित्यत्वं तत्वज्ञानार्थदर्शनम् ।**
**एतज्ज्ञानमिति प्रोक्तमज्ञानं यदतोऽन्यथा ॥ ११ ॥**

अर्थ.—आपण कोण या ज्ञानाचें नित्यत्व समजणें व जड तत्वांतील ज्ञानरूप तत्व पाहणें, या सर्वांस ज्ञान ह्मटलें आहे. याखेरीज सर्व अज्ञान होय.

टीका.—"स्वभावोध्यात्ममुच्यते" असें अष्टमाध्यायीं भगवंत बोलले आहेत. "स्वभाव" ह्मणजे आपला भाव. आपण चित्स्वरूप आत्मा आहों हा आपला भाव असून अज्ञानामुळें तो झांकून जाऊन, देहइंद्रियादि आपण आहों असा अन्यथा भाव उत्पन्न होतो. आपण भाव ह्मणजे चिदात्मभाव नित्य आहे, व इतर भाव नश्वर आहेत, हें समजणें ज्ञान होय. यावरून प्रथम चरणानें व्यतिरेकज्ञान सुचविलें आहे. आतां जडावेगळा आत्मा समजल्यावर, त्या जडींहि आत्मस्वरूपपाहणें, हें अन्वयज्ञान दुसऱ्या चरणानें सुचविलें आहे. या अध्यायांतील दुसरे श्लोकाचे उत्तरार्धांत क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ यांत जें ज्ञान असतें त्याचें ज्ञान सांगण्याविषयीं भगवंतांनीं वचन दिलें आहे. त्यांपैकीं क्षेत्रज्ञांत असलेलें ज्ञान प्रथम चरणानें दाखवून क्षेत्रांत असलेलें ज्ञान दुसऱ्या चरणानें सांगितलें आहे. जडतत्वांमध्यें ज्ञानरूप अर्थ पाहणें, असा दुसऱ्या चरणाचा अर्थ आहे. या प्रमाणें साक्षात्कार झाला तरच खरें ज्ञान झालें असें ह्मणतां येईल. अस्तु. या प्रमाणें पांच श्लोकांनीं अठरा ज्ञानलक्षणें सांगितलीं. हींच अठरा लक्षणें या गीतेच्या अठरा अध्यायांत वर्णिलीं आहेत, व त्यांचेच स्पष्टीकरणाकरितां व्यासांनीं अठरा पुराणें लिहिलीं आहेत.

एथपर्यंत क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ यांचें विवरण झालें आतां ज्याचा अंश हा क्षेत्रज्ञ आहे तें "ज्ञेय" तत्व भगवान् सांगतात.

**ज्ञेयं यत्तत्प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वामृतमश्नुते ॥**
**अनादिमत्परं ब्रह्म न सत्तन्नासदुच्यते ॥ १२ ॥**

अर्थ.—जें ज्ञेय जाणलें असतां मोक्ष मिळतो, तें मी सांगतों. हें ज्ञेय आदिरहित परब्रह्म होय. तें सत् आणि असत् यांहून निराळें आहे असें ह्मणतात.

**टीका.**—ज्या वस्तूंच्या ज्ञानानें ज्ञान प्राप्त होतें, त्यास ज्ञेय ह्मणावें. या ज्ञेयाचें ज्ञान झालें ह्मणजे मोक्षसुखाचा अनुभव होतो. अमृत ह्मणजे शाश्वत आत्मा व मृत ह्मणजे नश्वर जड भाग होय. देहात्मता जाऊन आत्मसुखाची प्राप्ति होणें हाच मोक्ष होय. मायेचा निषेध करून जें शेष राहतें तें अक्षर ब्रह्म ज्ञेय वस्तु होय असें तृतीय चरणानें सांगून, तें सदसद्विलक्षण आहे असें चतुर्थ चरणानें सांगितलें आहे. " **सत्** " शब्दें क्षेत्रज्ञ सुचविला आहे, कारण तो चिदंश आहे; व असत् शब्दें जड भाग दर्शविला आहे. या दोहींवेगळें जें चित्स्वरूप तें ज्ञेय होय, असें भगवान् ह्मणतात. चिदंश क्षेत्रज्ञास भोग होतात, सर्व गत चैतन्यास होत नाहींत. एवंच या बाराव्या श्लोकांत व्यतिरेक-द्वारा सदसद्विलक्षण ज्ञेय सांगून तेंच अन्वय ज्ञानानें हि ज्ञेय आहे, असें भगवान् यापुढें सांगतात.

**सर्वतः पाणिपादं तत्सर्वतोऽक्षिशिरोमुखम् ।**
**सर्वतः श्रुतिमल्लोके सर्वमावृत्य तिष्ठति ॥ १३ ॥**

**अर्थ.**—ज्यास सर्वत्र हात, पाय, डोळे, डोकें, मुख आणि श्रवणेंद्रिय आहेत, असें " **तें** " या लोकाचे ठायीं सर्व व्यापून राहिलें आहे.

**टीका.**—पूर्वार्धानें पाणिपाद वगैरे तेंच आहे, असा अन्वयबोध केला आहे. त्या अन्वयांतहि उत्तरार्धानें व्यतिरेक सुचविला आहे. तें ज्ञेय श्रवणेंद्रिययुक्त आहे, तसेंच पाणिपादादियुक्त आहे. आणि पाणिपादादिकाहि तेंच आहे, तसें श्रवणेंद्रियाहि तेंच आहे. याप्रमाणें व्यतिरेक आणि अन्वय सांगून त्याचें उपादानत्व सुचविलें आहे. तें उपपादन कारण असल्याशिवाय त्यास ऐक्य व भिन्नत्व अशीं दोन्हीं लक्षणें लागत नाहींत, नगाचें उपपादन कारण सोनें आहे. परंतु विल-

क्षणत्वें त्यास भिन्नपण येतें. तथापि व्याप्यव्यापक लक्षणेंकरून त्यास ऐक्य आहे, असें ह्मणणें भाग पडतें. तद्वत् प्रथम अन्वयानें त्याचें व जडाचें ऐक्य दाखविलें. व व्यतिरेकानें त्या दोहींचें युक्तत्व दाखविलें; तेव्हां या प्रसंगीं व्याप्यव्यापकत्व दाखविणें भाग पडलें, तें चतुर्थ चरणांत सांगितलें आहे. याचेंच स्पष्टीकरण, यापुढें केलें आहे.

**सर्वेंद्रियगुणाभासं सर्वेंद्रियविवर्जितम् ।**
**असक्तं सर्वभृच्चैव निर्गुणं गुणभोक्तृ च ॥ १४ ॥**

**अर्थ.**—सर्व इंद्रियसमुदाय व त्यांचे विषय यांच्या रूपानें तें भासमान होतें व तें या सर्व इंद्रियांहून निराळेंहि असतें. तें कोठेंहि सक्त राहत नाहीं, तथापि तें सर्वांचा आधार आहे. तेंच निर्गूण ब्रह्म ज्ञेय होय. तेंच विषयांचें सेवन करितें.

**टीका.**—अन्वयानें सर्व त्याचेंच रूप आहे आणि व्यतिरेकानें तें सर्वांहून वेगळें आहे असें कळतें. असा अन्वय आणि व्यतिरेक पूर्वार्धानें दाखविला आहे. तें निर्गुण असून प्रतिबिंब रूपानें त्यास विषयांचा भोग घडतो.

**बहिरंतश्च भूतानामचरं चरमेव च ।**
**सूक्ष्मत्वात्तदविज्ञेयं दूरस्थं चांतिके च तत् ॥ १५ ॥**

**अर्थ.**—सर्व भूतांच्या आंतबाहेर पाणी असतें व सर्व चराचरहि तेंच आहे. सूक्ष्मत्वामुळें तें जाणतां येत नाहीं. तें दूर आहे व जवळहि आहे.

**टीका.**—तरंगाच्या आंत बाहेर पाणि असतें व तरंगहि पाण्याचेंच रूप असतें. तसें ब्रह्म सर्व भूतांच्या आंतबाहेर असून तीं भूतेंहि तेंच झालें आहे. असें सर्वत्र सर्व होऊन राहिलेलें ब्रह्म सर्वांस कां दिसूं नये असा या ठिकाणीं संदेह उत्पन्न होतो. त्याचे निरसनार्थ उत्तरार्धाची

योजना केली आहे. निर्गुण ब्रह्म इंद्रियांस गोचर होत नाहीं, ह्मणून तें सूक्ष्म आहे असें ह्मणतात. इंद्रियगणांचा संबंध घडल्याबरोबर बुद्धिदृष्टीस स्थूलपण येतें. या स्थूलदृष्टीनें निर्गुण ब्रह्म दिसत नाहीं. बुद्धिदृष्टि नेत्र आहे व इंद्रियें तिचें उपनेत्र आहे. नेत्रास जें पांढरें दिसतें, तेंच रंगाच्या उपनेत्रांतून रंगदार दिसतें. तद्वत् इंद्रियांचे भावानुरूप सृष्टि भासते. त्या इंद्रियाव्यतिरिक्तबुद्धीनें सर्व सृष्टि चिद्रूप दिसते. गुरुकृपेशिवाय अशी सूक्ष्म दृष्टि होत नाहीं. ती तशी झाली ह्मणजे ब्रह्मानुभव होतो. असें श्रुतिवाक्यहि आहे. श्रुतिः—दृश्यते त्वग्रया बुद्ध्या सूक्ष्मया सूक्ष्मदर्शिभिः—बुद्धीनें ब्रह्म जाणतां येतें, यावरून ब्रह्म बुद्धीचा विषय आहे, असें द्वैतवादी ह्मणतात. बुद्धिगत चैतन्य दुसरें असतें तर असें ह्मणतां आलें असतें. तरंग समुद्रांत समरसतो ह्मणून समुद्र तरंगाचा विषय होऊं शकत नाहीं. तरंगाहि समुद्राचेंच रूप आहे याकरितां समुद्र समुद्रांत मिळाला असेंच ह्मणणें भाग पडतें. तद्वत् बुद्धि चैतन्याचेंच रूप आहे, ह्मणून चैतन्य निराळें व बुद्धि निराळी असें ह्मणतां येत नाहीं. व याच कारणाकरितां एक दुसऱ्याचा विषय होऊं शकत नाहीं. अस्तु याप्रमाणें सूक्ष्म बुद्धीनें ब्रह्म जाणल्यावर त्याच दृष्टीनें जवळचें व लांबचें सर्व चराचर ब्रह्मरूप दिसतात.

एथें एक जबर शंका उपजते. ती अशी कीं, चराचर आणि ब्रह्म यांचें ऐक्य आहे असें मानावें तर त्यांस व्याप्यव्यापकभाव लागत नाहीं व व्याप्यव्यापकभाव आहे असें धरिलें तर त्यांचें ऐक्य बिघडतें. या शंकेचा परिहार उत्तर श्लोकानें केला आहे कीं, वस्तुतः त्यांचें ऐक्यच आहे परंतु भिन्नत्वाचा नुसता भास आहे.

**अविभक्तं च भूतेषु विभक्तमिव च स्थितं ।**
**भूतभर्तृ च तज्ज्ञेयं ग्रसिष्णु प्रभविष्णु च ॥ १६ ॥**

**अर्थ.**-भूतांचे ठायीं तें अविभक्त असूनहि विभक्त असल्या प्रमाणें तें भूतांत राहतें. सर्व भूतांचें धारण करणारें, त्यांना गिळून टाकणारें आणि त्यांच्या रूपानें उद्भव पावणारें हेंच ज्ञेय होय.

**टीका.**-मेघाच्या धारांबरोबर ज्या गारा पाण्याच्या डोहांत पडतात त्या वास्तविक उदकरूपच असतात, पण आकारामुळें त्या डोहांतील पाण्याहून भिन्न दिसतात. तद्वत् सर्व चराचरांचें उपादान कारण ब्रह्मच आहे. तें चराचरांत अविभक्त असतें, पण चराचरांचे आकारामुळें तें विभक्त आहेसें वाटतें, अशा रीतीनें एकत्व असूनहि भिन्नत्व दिसतें ह्मणून त्यांचें व्याप्यव्यापकत्व वेद बोलतात.

तेंच ज्ञेय भूताकारें स्थितिकाळीं भासतें तो भास त्या ज्ञेयाकरितांच होतो, ह्मणून स्थितिकाळीं तें ज्ञेय भूतांस धारण करितें, संहारकाळीं त्यांस गिळून टाकितें, व सृष्टिकाळीं पुन्हा तेंच नानारूपांनीं प्रगट होतें. सोनें अलंकारांस धरितें. व त्यांस प्रकाशित करितें ह्मणून तें अलंकारकार्याचें उपादान कारण होय. तसेंच ब्रह्म सर्व चराचर कार्यांचें उपादानकारण आहे, ह्मणून तें त्यांस धरितें व प्रकाशित करितें, त्यांचेच ठायीं चराचरांचा लय होतो, व त्यापासूनच ते पुन्हा उद्भवतात. याप्रमाणें तें ज्ञेय कालत्रयीं एकत्वें विद्यमान असतें, पण स्थितिकाळीं मात्र भेद नसूनहि भेदाचा भास होतो.

**ज्योतिषामपि तज्ज्योतिस्तमसः परमुच्यते ।**
**ज्ञानं ज्ञेयं ज्ञानगम्यं हृदि सर्वस्य धिष्ठितम् ॥ १७ ॥**

**अर्थ.**-चंद्रसूर्यादिकांच्या ठायीं जी ज्योति असते तिच्यांतहि त्याची ज्ञेय ज्योति असते. ती चंद्रसूर्यांच्या ज्योतीहून व तमाहून परती आहे. ज्ञान तेंच ज्ञेय तेंच आणि ज्ञानगम्य तेंच होय.

टीका.—सर्व ज्योतींच्या आंत ही ज्योति असते व तमाहून ती भिन्न असते. एवढेंच श्लोकांत ह्मटलें आहे. आतां ही ज्योति अंधकारांत हि असते व चंद्रसूर्यांच्या ज्योतीहून निराळीहि असते असा श्लोकांतून अर्थ निघाला पाहिजे. "ज्योतिषामपि तज्ज्योति" यांतील "अपि" शब्दानें सर्व ज्योतींतहि ज्योति आहे तशी अंधकारांतहि आहे असें दर्शविलें आहे. सुखदुःखादि विलक्षण द्वंद्वें आहेत त्या प्रमाणेंच तेज तमाचेंहि द्वंद्व आहे. सुख घ्यावें असें ज्यास ह्मटलें त्याला दुःखहि मिळणारच आहे. त्याप्रमाणें चंद्रसूर्यांच्या ज्योतींतहि ज्योति आहे, असें ह्मणून लागलीच ती अंधकारापरती आहे असें येथें ह्मटलें आहे. यावरून ती ज्योति चंद्रसूर्यांच्या ज्योतीपरती आहे व ती अंधकारांत आहे व त्यापरतीहि आहे असें सुचविलें आहे. ज्योतींत ती ज्योति आहे तशी तमांतहि आहे. तेव्हां तमापरती आहे ह्मणून ज्योतीपरती हि ती आहे. ज्योतीसारखें ब्रह्म आहे असें या श्लोकाचे शब्दरचनेवरून वाटण्याचा संभव आहे. तशी कोणाची समजूत होऊं नये, ह्मणून इतक्या खटपटीनें वर सांगितलेला अर्थ सिद्ध केला आहे. ही ज्ञेय ज्योति सर्व जगतास प्रकाशित करिते, हें दाखविण्याकरितां अंधकारांतहि ती आहे असें "अपि" शब्दानें दर्शविलें आहे. या ज्ञेय ज्योतीचीं लक्षणें उत्तरार्धानें सांगितलीं आहेत. हें ज्ञेय ज्ञानस्वरूप आहे व ज्ञान-गम्य आहे ह्मणजे गुरुकृपेनें त्याचा बोध होतो. इंद्रियांस गोचर अस-णाऱ्या सर्व वस्तु जड होत, ह्मणून सूर्यचंद्रांची ज्योति जड वस्तु होय. हें ज्ञानज्ञेय आणि ज्ञानगम्य इंद्रियांस अगोचर आहे, व तें हृदय ह्मणजे चित्ताचे ठायीं वास करितें. वास्तविक तें सर्वत्रच आहे परंतु तें प्रथम चित्तास प्रकाशित करितें व नंतर चित्त सर्वांस प्रकाशितें ह्मणून चित्ताचे ठायीं तें स्थित आहे असें ह्मटलें आहे.

एथपर्यंत ज्ञेय वस्तूचें विवरण झालें. आतां तें जाणल्यापासून काय फळ मिळतें हें उत्तर श्लोकीं सांगितलें आहे.

**इति क्षेत्रं तथा ज्ञानं ज्ञेयं चोक्तं समासतः ।**
**मद्भक्त एतद्विज्ञाय मद्भावायोपपद्यते ॥ १८ ॥**

**अर्थ.**—या प्रमाणें क्षेत्र आणि ज्ञान व ज्ञेय यांचें संक्षेपानें वर्णन झालें. माझा भक्त हें सर्व जाणून माझ्या स्वरूपास पावतो.

**टीका**—"**तथा**" या शब्दानें असें सुचविलें आहे कीं पूर्वीं सांगितल्या प्रमाणें क्षेत्राचे ठायीं विकार आहेत त्या प्रमाणें ज्ञानहि त्यांतच आहे ह्मणून तें उत्तमहि आहे आणि वाईटहि आहे. पूर्वाध्यायांत जें धर्मामृत सांगितलें त्याचाच विचार या अध्यायांत केला आहे. धर्म तेवढे प्रकृतीचे व क्षेत्र तिची आकृति होय. पुरुष चिन्मात्र अमृत असून त्यास आकृति अथवा विकृति नाहीं. क्षेत्रांत हा पुरुष बिंब व प्रतिबिंब या दोन रूपानें असतो. प्रकृतीचेहि याच प्रमाणें दोन भेद आहेत. एक शुद्ध प्रकृति व दुसरी त्रिगुणात्मिका प्रकृति. या त्रिगुणात्मिका प्रकृतीस विद्या ह्मणतात. विद्येनें अविद्येचा नाश होतो ह्मणून विद्या अमृत होय व अविद्या धर्मरूप होय. या दोन्ही प्रकारच्या प्रकृति क्षेत्रांत आहेत ह्मणून त्यास धर्मामृत ह्मटलें आहे. या दोन्ही प्रकृतींहून बिंबरूप पुरुष निराळा आहे. तो कसा हें आतां पाहूं. सर्पावेगळा जसा रज्जु असतो तसा धर्मावेगळा पुरुष असतो. पण रज्जुवेगळा सर्प आहे असें ह्मणतां येत नाहीं, कारण रज्जूच सर्पाकारानें भासतो. तद्वत् पुरुषच प्रकृतिधर्मरूपें दिसतो. असें जाणून ज्ञानी भक्त सकल विश्व भगवानरूप पाहतात. या ज्ञानासच "**धर्मामृत**" ह्मणावें याचें सेवन ज्ञानी भक्त करितात व निर्गुणोपासक नुसते अमृताचें सेवन करितात. याप्रमाणें "**यथा**" शब्दानें पूर्वानुसंधान जुळ-

वून उत्तरार्धानें भगवान् सांगतात कीं असें धर्मामृत जाणून भक्त भगवत्स्वरूपास फार लौकर पावतो.

एथ पर्यंत क्षेत्र आणि ज्ञेय वस्तूंचें निरूपण झालें. आतां क्षेत्रज्ञाच्या भोक्तृत्वाचें वर्णन भगवान् करितात.

**प्रकृतिं पुरुषं चैव विध्द्यनादि उभावपि ।**
**विकारांश्च गणांश्चैव विध्दि प्रकृतिसंभवान् ॥ १९ ॥**

**अर्थ.**—प्रकृति आणि पुरुष हे दोन्ही अनादि आहेत असें तूं जाण व विकार आणि गुण प्रकृतीपासून उत्पन्न होतात असें समज.

**टीका.**—हे प्रकृति आणि पुरुष अनादि आहेत कारण अनादि ब्रह्मापासून ते उपजतात. त्या ब्रह्मांतच ते असतात व त्यांतच ते लय पावतात. लहान मोठ्या उदकांत ज्याप्रमाणें सूर्याचीं निरनिराळीं प्रतिबिंबें होतात त्याप्रमाणें अंनंत जीवोपाधि प्रगट होतात. असा हा अनादिप्रवाह आहे. यामुळें भगवंताकडे वैषम्य लागत नाहीं. असें उत्तर श्लोकानें स्पष्ट करून सांगितलें आहे.

**कार्य कारण कर्तृत्वे हेतुः प्रकृतिरुच्यते ।**
**पुरुषः सुखदुःखानां भोक्तृत्वे हेतुरुच्यते ॥ २० ॥**

**अर्थ.**—कार्य, कारण आणि कर्तृत्व यांचें कारण प्रकृति होय, व पुरुष हा सुख दुःखाचा भोगणारा आहे असें ह्मटलें आहे.

**टीका.**—कार्य ह्मणजे प्रयोजन. हें वासना संकल्पानें होतें. त्याचीं कारणें बुद्धि इंद्रियें आणि मन हीं होत. कर्तृत्व अहंबुद्धिचें होय. या सर्वांस प्रकृति निमित्तमात्र आहे. यांचें स्फुरण पुरुषावांचून होत नाहीं, ह्मणून प्रकृतीस "हेतु" असें ह्मटलें आहे. स्फटिक स्वतः सिद्ध शुद्ध असतो. त्यास कोणताही रंग नसतो. परंतु त्यावर जो रंग

ठेवावा तसा तो दिसतो तद्वत् पुरुष स्वतः कांहींच करित नाहीं. या कार्यादिकांची उत्पत्ति अनादि प्रकृतीमुळें होते. हें कार्य कारण व कर्तृत्व धर्म कर्मामुळें उत्पन्न होतात व कर्माच्याच योगानें सुखदुःखरूप फळें उत्पन्न होतात. या सुखदुःखाचा भोग देहीं होतो. हा देह प्रकृतीच झाली आहे, पण तो जड असल्यामुळें त्यास भोग घडूं शकत नाहीं. ह्मणून या जडाच्या सगंतीमुळें पुरुषासच भोग घडतो. या विषयाचें स्फुट विवरण पुढें पंधराव्या अध्यायांत होईल. एवंच देहास पुरुषाचा योग आहे तोंवरच देहास भोग होतात. ह्मणून भोक्तृत्वीं पुरुष हेतु आहे, असें ह्मटलें आहे, कारण तत्वतां पुरुषासच भोग घडतो.

**पुरुषः प्रकृतिस्थो हि भुंक्ते प्रकृतिजान्गुणान् ।**
**कारणं गुणसंगोऽस्य सदसद्योनिजन्मसु ॥ २१ ॥**

**अर्थ.**–पुरुष प्रकृतींत राहून तिचे पासून उत्पन्न होणाऱ्या गुणांचा उपभोग घेतो, ह्मणून या गुणांच्या संगामुळें बऱ्या वाईट योनींत त्यास जन्म होतो.

**टीका.**–सत्व, रज व तम हे तीन गुण आहेत. सत्वात्मक मन, रजोगुणात्मक इंद्रियें आणि तमोगुणात्मक विषय होत. मन बुद्धि यांचे योगानें तो मीपणा धरितो व इंद्रियद्वारा विषयास जाणतो हें त्याचें या दोन गुणांचें भोगणें होय. विषयांचा भोग तर आहेच. याप्रमाणें तिन्ही गुणांचा उपभोग पुरुष प्रकृतींत राहून घेतो. पुरुष प्रकृतिस्थ उपभोग घेतो असें ह्मटलें आहे यावरून जितका भोग तितकीच प्रकृति असते असें स्पष्ट दर्शविलें आहे. पाया पासून डोक्यापर्यंत जें शरीर असतें तेंच सुखःदुखः भोगितें. ह्मणून तेंच त्याची प्रकृति होय. अशा शरीरांत राहून, सुखदुःखाचा उपभोग पुरुष घेतो असें भगवान् ह्मणतात. हे गुण

आणि अहंकार यांचा संयोग होतो तेव्हां अहंकर्तृत्व उत्पन्न होतें. हा गुणसंग चित्प्रतिबिंबास घडूं शकत नाहीं, ह्मणून सत्वयोगें तो पुरुष ज्या जीवभावास पावतो त्यास तो घडतो. ती सत्ववृत्ति अहंकार योगें प्रवृत्ति धरिते, आणि आत्मप्रत्ययें निवृत्तीचें अवलंबन करितें, व पुरुष या दोहींचाही भोक्ता असतो. चित्त हें पराप्रकृति होय असें सप्तमाध्यायीं "अपरेयमितस्त्वन्यां" याश्लोकीं सांगितलें आहे. तीच जीवभावास पावते, कारण पाण्यांत सूर्याचें प्रतिबिंब पडतें, तेव्हां तें पाणीच सूर्यरूपीं दिसतें, तथापि सूर्यबिंबामुळें तसें होतें ह्मणून जीव पुरुषाचा अंश आहे असें ह्मटलें आहे. अस्तु. अहंकारामुळें सत्वास कर्म स्फुरण होतें व त्या कर्मामुळें पुरुषास नानायोनी भोगाव्या लागतात.

**उपद्रष्टानुमंता च भर्ता भोक्ता महेश्वरः ।**
**परमात्मेति चाप्युक्तो देहेऽस्मिन्पुरुषः परः ॥ २२ ॥**

अर्थ.—या देहाचे ठायीं, जवळ राहून पाहणारा, अनुमंता, ह्मणजे कर्मानुरूप फळ देणारा, पालन करणारा, भोक्ता, ज्याला परमात्मा ह्मणतात व जो पुरुषाहून निराळा आहे असा महेश्वर राहतो.

टीका.—या देहांत पुरुष, जीव आणि ईश्वर या रूपानीं आहे असें या श्लोकानें सांगितलें आहे. सर्वसाक्षी कर्मानुरूप फळदेणारा, कर्मानुरूप पालन करणारा व सर्वांचा धनी ह्मणून भोक्ता, असा महेश्वर या देहांत असतो, त्याला परमात्मा ह्मटलें आहे. आणि "चकारानें" आणि "अपि" शब्दानें असें सुचविलें आहे कीं परमात्मस्वरूपानें राहून याच देहीं तो भोक्ताही होऊन राहिला आहे. श्रुतींतही याचप्रमाणें सांगितलें आहे. श्रुतिः—तस्य प्रकृतिलीनस्य यः परःस महेश्वरः ।. भोक्ता पुरुष प्रकृतिस्थ ह्मणून पूर्व श्लोकीं वर्णिला आहे. अशा प्रकृतिलीन पुरुषाहून पलीकडे राहणारा महेश्वर होय, असें श्रुति ह्मणते ह्मणून या

श्लोकांत " भोक्ता " शब्दाच्या पुढें महेश्वर शब्दाची योजना केली आहे. एवंच भर्ता आणि भोक्ता दोन्ही याच देहांत राहतात हें सिद्ध झालें. यावरून " द्वा सुपर्णा " ही श्रुतिही येथें सुचविली आहे. या श्रुतींत असें ह्मटलें आहे कीं एका पिंपळाचे वृक्षावर दोन पक्षी राहतात. त्यांत एक कांहींच भक्षित नाहीं व एक त्या वृक्षाचें भक्षण करितो. हा पिंपळाचा वृक्ष प्रपंच होय. व्यष्टि रूपानें तो देह होय व समष्टिरूपानें तो चराचर प्रपंच होय. एका देहास व्यष्टि ह्मणतात, व सर्व देहसमूहास समष्टि ह्मणतात. कांहींच भक्षण न करणारा ह्मणजे विषयांचें सेवन न करणारा ईश्वर होय व विषयांचें सेवन करणारा जीव होय. हे दोघेही या देहांतच असतात असा या श्रुतींतील भावार्थ आहे. अशा द्विविध रूपानें या पुरुषास जो जाणतो त्याला प्रवृत्तींत राहून ही निवृत्ति बाणते असें आतां भगवान् सांगतात.

य एवं वेत्ति पुरुषं प्रकृतिंच गुणैः सह ।
सर्वथा वर्तमानोऽपि न स भूयोऽभिजायते ॥ २३ ॥

अर्थ.—या प्रमाणें, प्रकृति आणि तिचे गुण यांसह जो या पुरुषास जाणतो तो कोणत्याही रीतीनें वागत असला तरी पुन्हां जन्मास येत नाहीं.

टीका—पूर्वश्लोकीं सांगितलेले दोघेही पुरुष एकच आहेत. हें व गुणसमुदायासहित प्रकृतीचें स्वरूप जो गुरूपासून नीट समजून घेऊन जाणतो तो सर्व प्रकारचे व्यवहार करून ही बद्ध होत नाहीं. यावरून असें समजूं नये कीं शब्द ज्ञानानें मुक्ति मिळते. हें ज्ञान अभ्यासानें अपरोक्ष झालें तरच मनुष्य मुक्ति पावतो असें भगवान् आतां सांगतात.

ध्यानेनात्मनि पश्यंति केचिदात्मानमात्मना ।
अन्ये सांख्येन योगेन कर्मयोगेन चापरे ॥ २४ ॥

अन्ये त्वेवमजानंतः श्रुत्वान्येभ्य उपासते ।
तेऽपि चातितरंत्येव मृत्युं श्रुतिपरायणाः ॥ २५ ॥

अर्थ.–कोणी ध्यानाचे योगानें बुद्धींतच बुद्धीनें आत्मस्वरूप लक्षितात, कोणी सांख्य मार्गानें, कोणी योगमार्गानें व कोणी कर्मयोग करून आत्मा पाहतात. ॥ २४ ॥ व कोणी हे प्रकृति पुरुषाचें ज्ञान न जाणतां दुसऱ्याचे मुखानें श्रवण करून उपासना करितात, असे श्रवण तत्पर लोकही मृत्युसागरास तरून जातात.

टीका.–प्रथमश्लोकांत ज्ञान परिपाकाच्या चार रीति सांगितल्या आहेत. बुद्धींत तिचें प्रकाशक चित्स्वरूप आहे. ती बुद्धि तद्रूप करून कोणी त्याचें ध्यान करितात. कोणी सांख्याचा अभ्यास करितात. आपण ब्रह्म आहों असें समजणें हा प्रकृतीचा शुद्धसत्वगुण आहे. याचा आश्रय करून व सर्व कर्तृत्व प्रकृतीचें आहे असें जाणून आपण साक्षीत्वानें निराळें राहणें यास सांख्यमार्ग ह्मणतात. जड आणि चैतन्य यांचें ऐक्य पाहणें यास योग ह्मणतात. असा योग कोणी करितात. व कोणी कर्माच्या ठायीं ब्रह्म पाहण्याचा, चवथ्या अध्यायांत "ब्रह्मार्पणं ब्रह्महविः" या श्लोकांत सांगितलेला कर्मयोग करितात. या चारी मार्गांचें पर्यवसान एकेच ठिकाणीं होतें. गुरुकृपेनें साक्षात्कार होऊन या प्रमाणें अभ्यास केला असतां संसारसागरापासून मनुष्य मुक्त होतो. इतकेंच नाहीं तर साक्षात्कार नसूनही श्रवणमात्रें करून उपद्रष्टा, अनुमंता भर्ता अशा भगवंतास जाणून जे त्याचें श्रवणादिभक्तीनें भजन करितात तेही तरून जातात. याचा असा भाव आहे कीं, अशा भजनानें ते आत्मगुण पावतात व मुक्त होतात. ज्ञानाचा परिपाक होऊन अज्ञानाचा पूर्ण नाश झाल्याशिवाय जन्म मृत्यु टळत नाहींत असें आतां भगवान् सांगतात.

**यावत्संजायते किंचित्सत्वं स्थावरजंगमम् ।**
**क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात्तद्विद्धि भरतर्षभ ॥ २६ ॥**

**अर्थ.**–हे अर्जुना उत्तमाधम कोणतेंही स्थावर जंगम शरीर असो तें क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ यांच्या संयोगा पासून होतें असें जाण.

**टीका**–देहधारी क्षेत्रज्ञ, देह मी ह्मणून जोंवर त्याचा अभिमान धरितो, तोंवर क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोग आहे असें ह्मणावें. या जड देहाचा आणि अजड क्षेत्रज्ञाचा संयोग झाला ह्मणजे त्यापासून कर्म उपजतें व कर्मामुळें चराचर देह उत्पन्न होतात. परंतु या " क्षेत्र " शब्दानें असें सुचविलें आहे कीं, नरजन्मांतच केलेलें कर्म फलप्रद होतें व त्यामुळें नानायोनी प्राप्त होतात. एवंच देहाभिमानच अज्ञानाचें स्वरूप होय, तो नाहींसा झाला ह्मणजे स्वतः सिद्ध आत्मा उरतो.

आतां, क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ यांचें वेगळेपण कळणें यास ज्ञान ह्मटलें आहे. मग सर्व भूतीं भगवद्भाव ठेवण्याचें प्रयोजन काय ? याचें उत्तर पुढच्या श्लोकीं दिलें आहे.

**समं सर्वेषु भूतेषु तिष्ठंतं परमेश्वरम् ।**
**विनश्यत्स्वविनश्यंतं यः पश्यति स पश्यति ॥ २७ ॥**

**अर्थ.**–सर्व भूतांचे ठायीं समान राहणाऱ्या अविनाशि परमेश्वरास नश्वर भूतांचे ठायीं जो पहातो तोच डोळस होय.

**टीका.**–जो सर्वात्मयोग जाणतो तोच क्षेत्र व क्षेत्रज्ञाचा वियोग जाणतो. कारण देहमात्रांचा वियोग कळल्यानें क्षेत्र क्षेत्रज्ञाचे संयोगाचा ह्मणजे देहाभिमानाचा नाश होत नाहीं. क्षेत्र जड शरीर व क्षेत्रज्ञ त्याचा जाणता यांचा वियोग मुडदा पाहिल्यानें समजतो. या समजण्यानें अज्ञानाचा नाश होत नाहीं. निर्जीव मुडद्यांत त्यास व्यापून जो ईश्वर असतो, त्याचें ज्ञान झालें पाहिजे. तोच ईश्वर प्र-

तिबिंब रूपानें क्षेत्रज्ञ ह्मणविला जातो. पण मुख्य क्षेत्रज्ञ तो विश्वात्मा होय. मुडद्यांत जीव नसतो. पण तो क्षेत्रज्ञ असतोच. त्या क्षेत्रज्ञाचें वियोगाचें व क्षेत्राचें वैभव कळेल. तरच क्षेत्र क्षेत्रज्ञाचा वियोग बरोबर कळला असें ह्मणतां येईल. देह दिसूनही आपण आत्माच आहे असें जो पाहतो त्यास क्रिया आणि कर्तृत्व मिथ्या आहेत व ते मिथ्या शरीरीं असतात असें निश्चयात्मक समजतें. ज्याची अशी दृष्टि होते तोच सर्वत्र समता ठेऊं शकतो. सर्व आकारात्मक सृष्टि मिथ्या भास आहे व वास्तविकपणें सर्वत्र आपणच आहों असा सर्वात्मयोग जो पहातो त्याचाच क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोग मोडतो. विश्वात्मा परमेश्वर आपला आत्मा आहे असें जाणून त्या सम व अविनाशी परमेश्वरास नश्वर जडांमध्यें जो पहातो तोंच देहाभिमानापासून मुक्त होतो, ह्मणजे क्षेत्र क्षेत्रज्ञाचा वियोग जाणतो असें भगवान् या श्लोकानें सुचवितात. या ज्ञानासच सगुणभक्ति ह्मणतात. अशी सगुणभक्ति जो करितो. तोच स्वहित करितो. इतर लोक आत्मघातक होत, असें उत्तर श्लोकानें भगवंत सांगतात.

**समं पश्यन्हि सर्वत्र समवस्थितमीश्वरम् ।**
**न हिनस्त्यात्मनात्मानं ततो याति परां गतिम् ॥ २८ ॥**

**अर्थ**–सर्वत्र सम ईश्वरास जो समान दृष्टीनें पाहतो तो आत्मघातक होत नाहीं; ह्मणून तो उत्तम गतीस पावतो.

**टीका.**–क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ यांचा संयोग जन्ममरणास कारणीभूत होतो व या दोहींचा वियोग जो पाहतो तो मुक्त होतो. असा वियोग तोच पहातो कीं, जो ईश्वरास सर्वत्र पहातो, व तोच आपला घात करित नाहीं असें भगवान् ह्मणतात. यावरून असा सर्वात्मयोग न करणारे आत्मघातकी होत असें सुचविलें आहे हें सांगणें नको.

**प्रकृत्यैव च कर्माणि क्रियमाणानि सर्वशः ।**
**यः पश्यति तथात्मानमकर्तारं स पश्यति ॥ २९ ॥**

**अर्थ**—प्रकृतीमुळेंच होणारीं सर्व कर्में घडतात व आत्मा अकर्ता आहे असें जो पहातो तोच पहातो असें ह्मणावें.

**टीका**—जसें प्रकृतीचें कर्तृत्व पहावें तसेंच आत्म्याचें अकर्तृत्वही पहावें तेंच खरें पहाणें होय असें भगवान् ह्मणतात. एकटें प्रकृतीचें कर्तृत्व पाहिल्यानें निभत नाहीं. तर त्या बरोबर साक्षित्व धर्मापरता चिदात्मा ही पाहिला पाहिजे. सत्ववृत्ति चिन्मय झाली ह्मणजे आत्मा अनुभवास येतो. तेव्हांच आत्म्याचे अकर्तृत्व पाहतां येते. जो ईश्वरास सर्व भूतीं पाहील तोच आत्म्याचें असें अकर्तृत्व पाहूं शकतो असा भाव मनांत धरून भगवान् ह्मणतात कीं, या ज्ञानावांचून मुक्ति नाहीं.

**यदा भूतपृथग्भावमेकस्थमनुपश्यति।**
**तत एव च विस्तारं ब्रह्म संपद्यते तदा ॥ ३० ॥**

**अर्थ**—जेव्हां नाना भूतांचा वेगळाला भाव एका ईश्वरांत कोणी पाहील तेव्हां तो परिपूर्ण ब्रह्म पावेल.

**टीका.**—आकारमात्र निरनिराळीं भूतें चित्स्वरूपापासून उत्पन्न झालीं. तीं त्या अद्वय चित्स्वरुपींच जो " अनुपश्यति " ह्मणजे अनुभव युक्त पाहील, तो ब्रह्म पावतो. हें तत्व यापूर्वीं अनेक प्रसंगीं स्पष्ट करून सांगितलें आहे, ह्मणून त्याचें पुनः विवरण करण्याची जरुरी नाहीं. ब्रह्म सृष्टीचें उपादान कारण आहे, ह्मणून त्या एकत्वीं भूतांचें अनेक भाव राहतात असें ह्मटलें आहे.

**अनादित्वान्निर्गुणत्वात्परमात्मायमव्ययः ।**
**शरीरस्थोऽपि कौंतेय न करोति न लिप्यते ॥ ३१ ॥**

**अर्थ.**—हे अर्जुना, हा अव्यय असा परमात्मा अनादित्वामुळें व निर्गुणत्वामुळें शरीरांत राहूनहि कांहीं करित नाहीं व कर्मानें लिप्तहि होत नाहीं.

**टीका.**—ज्यास आदि आहे तें त्रिगुणात्मक होय. व या त्रिगुणांतच कर्तेपण आहे. ह्मणून हा अनादि आणि निर्गुण असा परमात्मा अकर्ता आहे. हा अकर्ता आहे इतकेंच सांगितल्यानें तो कर्मांनीं लिप्त होत नाहीं हें स्पष्ट दिसतें. असें असून तो कर्मांनीं लिप्त होत नाहीं असें पुनः ह्मटलें यांत विशेष अर्थ आहे. चिदंश जीवहि शरीरांतच असतो व उपाधीवांचून तोहि अकर्ताच असतो, पण उपाधियोगें तो लिप्त होतो. तसा शरीरस्थ निर्गुण परमात्मा लिप्त होत नाहीं असें दर्शविण्याकरितां "न लिप्यते" असें ह्मटलें आहे. असा अकर्ता आणि अलिप्त आत्मा सर्व भूतांत जो पाहील, त्यासच तत्वतः आपलें स्वतःचें अकर्तृत्व दिसेल. अन्यथा क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोग त्यास जडलेलाच असतो व त्यामुळें त्यास जन्मांतर घडणारच.

**यथा सर्वगतं सौक्ष्म्यादाकाशं नोपलिप्यते ।**
**सर्वत्रावस्थितो देहे तथात्मा नोपलिप्यते ॥ ३२ ॥**

**अर्थ.**—सूक्ष्मत्वामुळें जसें सर्वगत आकाश अलिप्त असतें. तसा देहांत सर्वत्र असलेला आत्मा लिप्त होत नाहीं.

**टीका.**—या दृष्टांतानें आत्मा आणि जीवात्मा यांचा फरक दाखवून जीवात्मा कां लिप्त होतो, हें दाखविलें आहे. क्षेत्रज्ञ एका देहांत असतो ह्मणून त्यास सर्वगत ह्मणतां येत नाहीं. जळांतलें प्रतिबिंब जळापुरतेंच असतें व तें उपाधियोगें हलतें. परंतु घटामध्यें स्वतःसिद्ध आकाश असतें तें उपाधीनें चंचल होत नाहीं, तद्वत् सर्वगत आत्मा अलिप्त राहतो. पण त्याचें प्रतिबिंब जीव सर्वगत नसतो व उपाधियोगें तो भोग-

काळीं लिप्त झाल्यासा दिसतो. तथापि जड देहास आत्मा प्रकाशित करितो ह्मणून त्याजकडे क्रिया लागूं पहाते. ह्मणून दुसऱ्या दृष्टांतानें भगवान् या पूर्व पक्षाचें निराकरण करितात.

यथा प्रकाशयत्येकः कृत्स्नं लोकमिमं रविः ।
क्षेत्रं क्षेत्री तथा कृत्स्नं प्रकाशयति भारत ॥ ३३ ॥

अर्थ व टीका.–हे अर्जुना एकच सूर्य सर्व चराचरांस प्रकाशित करितो. परंतु त्या प्रकाशाच्या साह्यानें लोक जें पापपुण्य करितात, त्यानें तो लिप्त होत नाहीं. याप्रमाणें क्षेत्रांत राहणारा आत्मा सर्व क्षेत्रांस प्रकाशित करूनहि कर्मांनीं लिप्त होत नाहीं.

क्षेत्रक्षेत्रज्ञयोरेवमंतरं ज्ञानचक्षुषा ।
भूतप्रकृतिमोक्षं च ये विदुर्यांति ते परम् ॥ ३४ ॥

अर्थ.–क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ यांमधील अंतर ज्ञानचक्षूनें जे जाणतात, व भूतप्रकृतीपासून मोक्ष कसा होतो हें जे जाणतात ते परमपदास पावतात.

टीका.–या मागें अकर्त्रात्मपणें निर्गुण ब्रह्माचेंच वर्णन केलें. असा निर्गुण निर्धर्म आत्मा अकर्ता आहे असें जो पाहील तोच अकर्त्रात्मत्वें राहील हें वर्म भगवंतांनीं सांगितलें आहे. क्षेत्र प्रकृति होय. या प्रकृतीहून वेगळा असा क्षेत्रज्ञ ह्मणजे आत्मा होय. या आत्म्याचें आणि प्रकृतीचें अंतर ज्ञानचक्षूनें जे पाहतील, ते परमपद पावतील, असें भगवान् ह्मणतात. सर्वात्मदृष्टीसच ज्ञानचक्षु ह्मटलें आहे कारण मागें चवथ्या अध्यायांत भगवंत बोलले कीं, "येन भूतान्यशेषेण द्रक्ष्यस्यात्मन्यथो मयि" यावरून क्षेत्रज्ञ भोक्ता क्षेत्राचे वेगळा पाहणें, ज्ञानचक्षु नव्हे असें उघड दिसतें. आत्म्यांत भूतसमुदाय पाहणें हाच ज्ञानचक्षु होय. "एवं" ह्मणजे या प्रकारें क्षेत्रज्ञ (आत्मा) आणि क्षेत्र

यांजमधील अंतर जे पाहतील ते मुक्त होतील असें सिद्ध झालें. आतां या दोहोंमधील अंतर पाहणें याचा अर्थ स्पष्ट झाला पाहिजे. रज्जु व सर्पाचा योग होतो तसाच क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ यांचा योग होय. रज्जूचा आणि सर्पाचा वियोग होणें हेंच त्या दोहोंमधील अंतर होय. तद्वत् क्षेत्रक्षेत्रज्ञ-वियोगच त्या दोहोंमधील अंतर होय. एवंच क्षेत्रप्रकृतीहून आत्मा निराळा आहे असें ज्ञानदृष्टीनें वर सांगितल्याप्रमाणें जे पाहतील व भूतप्रकृतिमोक्ष जाणतील ते मुक्त होतील असें भगवान् ह्मणतात. क्षेत्राचा आणि क्षेत्रज्ञाचा वियोग जाणण्यानें मुक्ति मिळते असें समजून श्रोता शब्दज्ञानीच होईल ह्मणून तृतीय चरणाची योजना केली आहे. भासणारीं सर्व भूतें मिथ्या आहेत इतकें समजल्यानें जडत्वसं-स्कार जात नाहीं. ध्यानाभ्यासानें सर्व भूतें चित्स्वरूप दिसूं लागतील तेव्हां तो संस्कार मोडतो. या जडत्वसंस्कारासच "भूतप्रकृति" म्हटलें आहे. यापासून जे सुटतात तेच भूतप्रकृतिमोक्ष जाणतात. एवंच व्यतिरेकाचें आणि अन्वयाचें ज्ञान होऊन चिद्रूपें चराचरांचें ध्यान बाणेल तेव्हां परम पद मिळतें असें सिद्ध झालें.

**एथें या अध्यायाची टीका संपली ती भगवान्**
**गोपाळकृष्णचरणीं समर्पण करितों.**

श्री.

# अध्याय १४ वा.

ॐ नमो भगवते वासुदेवाय.

बाराव्या अध्यायांत जें धर्मामृत सांगितलें, त्याचेंच विशद वर्णन तेरावे अध्यायांत केलें. क्षेत्र ( धर्म ) व क्षेत्रज्ञ ( अमृत ) यांचें ज्ञान सांगून, त्या ज्ञानाचें फळ "**य एवं वेत्ति पुरुषं**" या श्लोकानें सांगितलें. तें असें कीं, द्विविध पुरुष आणि गुणांसह प्रकृति यांचें ज्ञान झालें ह्मणजे सर्व व्यवहार करूनंहि पुनर्जन्म होत नाहीं. यांपैकीं पुरुष आणि प्रकृति यांचें ज्ञान मागील अध्यायीं सांगितलें. आतां भगवान् या अध्यायांत त्रिगुणांचें विवेचन करून सांगतात, व तन्निमित्त प्रथम श्लोकानें अर्जुनास सावध करितात.

**परं भूयः प्रवक्ष्यामि ज्ञानानां ज्ञानमुत्तमम् ।**
**यज्ज्ञात्वा मुनयः सर्वे परां सिद्धिमितो गताः ॥ १ ॥**

**अर्थ.**–सर्व ज्ञानांत अत्यंत उत्तम असें ज्ञान मी पुन्हां सांगतों. हें ज्ञान जाणून सर्व मननशील पुरुष परमसिद्धीतें पावले.

**टीका.**–गुणत्रयाचें ज्ञान ज्ञान्यांस फारच उपयोगी आहे. आत्मा ओळखल्यावर प्रारब्धभोगाचे वेळीं व कर्म करित असतां या गुणत्रयाच्या ज्ञानानें ज्ञानी आपलें अकर्तृत्व व अभोक्तृत्व पाहतो. अकर्तृत्व व अभोक्तृत्व प्रकृतीच्या "पर" ह्मणजे पलीकडचें आहे. ह्मणून "**परां सिद्धिं**" व "**परं ज्ञानं**" असें ह्मटलें आहे. चतुर्थ चरणांतील "**इतः**"

शब्द प्रकृतिसूचक आहे. यावरून असा अर्थ होतो कीं प्रकृतीचे पलीकडचें ज्ञान होऊन मुनिजन प्रकृतीच्या स्थितीस पोंचतात. परंतु कोणी टीकाकार "इतः" शब्दाचा देहादि बंधनापासून असा अर्थ करितात. तसा अर्थ या शब्दावांचूनहि होऊं शकतो. म्हणून येथें दिलेल्या अर्थानें "इतः" शब्दाची पुनरुक्ति शोभते, व अर्थहि प्रौढ होतो. आतां सर्व ज्ञानांहून उत्तम ज्ञान कोणतें तें सांगतों असें म्हटल्यानें, या मागें सांगितलेल्या ज्ञानाचें मातेरें झाल्यासारखें दिसतें. पण तसें नसून तेंच ज्ञान या अध्यायांत सांगितलें आहे, हें दर्शविण्याकरितां "भूयः" शब्दाची योजना केली आहे. सर्व कर्तृत्व प्रकृतीचें आहे, व आत्मा अकर्ता आहे असें साक्षित्वानें पाहीपर्यंत अकर्तृत्व बाणत नाहीं, असें यामागें ठिकठिकाणीं सांगितलें आहे. परंतु प्रकृतिगुणवृत्तींचें स्पष्ट विवेचन झालें नाहीं, तें या अध्यायांत भगवान् करणार आहेत. "परां सिद्धिं" या पदानें निर्गुण मोक्ष दर्शविला आहे. एवढेंच या ज्ञानाचें फळ आहे, असें कोणीं समजूं नये, ह्मणून उत्तरश्लोकानें सांगितलें आहे कीं, याच ज्ञानानें सगुण मोक्षाहि मिळतो.

**इदं ज्ञानमुपाश्रित्य मम साधर्म्यमागताः ।**
**सर्गेऽपि नोपजायन्ते प्रलये न व्यथन्ति च ॥ २॥**

**अर्थ.**—याच ज्ञानाचा आश्रय करून जे माझें साधर्म्य पावतात ते सृष्टिकाळीं पुन्हां उपजत नाहींत व प्रलयकालीं व्यथा पावत नाहींत.

**टीका**—सगुणभक्ति करणारे ज्ञानी मुक्त होऊन भगवंताचें साधर्म्य पावतात. सगुण भगवंत मायाशबलित ब्रम्हच होय. त्यास अखंड ब्रह्मानुभव असतो. हा धर्म त्याच्या ठायीं असतो. असें त्याचें साधर्म्य सगुणभक्त पावतात. मुक्ति देणारें ज्ञान होऊनहि जे सगुणभक्ति करितात, त्यांसच हें साधर्म्य प्राप्त होतें. असें साधर्म्य सगुणभक्त

पावतात. या वचनानें जीवेश्वरऐक्य सुचविलें आहे. प्रारब्धकर्मजनित देह असेपर्यंत अखंडानुभव राहूं शकत नाहीं. देह पडल्यावर तसा अनुभव सगुणभक्तांस राहतो. एथें अशी शंका उद्भवते कीं, प्रलय-कालीं ईश्वराचेंहि साधर्म्य उरत नाहीं, तेव्हां या सगुणभक्तांचें साधर्म्य राहत नाहींच. अशा प्रसंगीं त्यांची गति कशी होते ? या शंकेचा परि-हार उत्तरार्धानें केला आहे कीं, सृष्टिकाळीं ते भक्त जन्म पावत नाहींत व प्रलयकाळींहि त्यांस मृत्यूची व्यथा होत नाहीं. सृष्टिकाळीं ज्याप्रमाणें ईश्वर व त्याच्या मूर्ति प्रगट होतात, त्याच प्रमाणें भक्तांच्या मूर्ति प्रगट होतात, म्हणून त्यांस जन्म आहे असें ह्मणतां येत नाहीं; व प्रलयकाळीं भक्तांच्या मूर्ति ईश्वरप्रमाणेंच निर्गुणीं लय पावतात, ह्मणून यांस प्रळयाची व्यथा होत नाहीं. ज्याला कर्मानुरूप देह असतो, त्या-सच जन्ममृत्यु असतो; कर्म अविद्येपासून उत्पन्न होतें. विद्येनें अवि-द्येचा नाश झाल्यावर कर्म मुळींच राहत नाहीं. तेव्हां जन्ममृत्यूची बाधाच खुंटते. योगनिद्रेपासून सगुण भगवंताची अभिव्यक्ति होते, तसेंच सर्व भक्त प्रगट होतात. ज्ञानाचें फळ मुक्ति आहे. हें ज्ञान सगुणभक्तांस असतें, तेव्हां त्यांस मोक्ष नाहीं असें ह्मणणें अप्रशस्त आहे. जयविजय वैकुंठाहून परतले, या गोष्टीनें कित्येकांचें मन शंकित असेल, परंतु तसें होण्यास कांहींच कारण नाहीं. ज्ञान नसतांहि अंतकाळीं सगुणध्यान घडल्यामुळें सगुणप्राप्ति होऊं शकते. असें—"यं यं वापि स्मरन् भावं" या आठव्या अध्यायांतील श्लोकांत सांगितलें आहे. असे भक्त प्रसंगानुसार पुनरावृत्ति पावतात पण ज्ञान होऊन ज्यांस भगवत्साधर्म्य प्राप्त झालें आहे, असे भक्त पुनरावृत्ति पावत नाहींत ह्मणून भगवान् या श्लोकांत साफ सांगतात. असें असूनहि कोणी साशंक होईल तर ज्ञानाचें महत्वच नाहींसें होतें. मग निर्गुणमोक्ष झालेल्यास पुनरावृत्ति होणार नाहीं याचा तरी काय भरंवसा ? अस्तु. या जयविजयांचे पतनाचा निर्गुणाभिमान्यांनीं

मोठा भाऊ करून ठेविला आहे. जयविजय वैकुंठीं होते व तेथून ते च्यवले, या दोन्हीहि गोष्टी खऱ्या आहेत; ते कां च्यवले, व कोठून च्यवले, याची बरोबर माहिती झाल्याशिवाय सगुणमोक्षासंबंधाचा संशय निर्बीज होणार नाहीं, ह्मणून त्यांचा इतिहास सांगणें अत्यावश्यक आहे.

या जयविजयांची कथा पद्मपुराणांत आहे. ती अशी:—जयविजय हे जन्मांतरीं ब्राह्मण असून सख्खे भाऊ होते. यज्ञदक्षिणेच्या संबंधांत दोघांचें भांडण झालें, तेव्हां त्या दोघांनीं रागाच्या झपाट्यांत एकमेकांस शाप दिले. एक भाऊ दुसऱ्यास ह्मणाला कीं, 'तूं नक्र होशील'; तेव्हां दुसरा त्यास ह्मणाला कीं, 'तूं हत्ती होशील, व पाणी पीत असतां मी तुला धरीन', त्याप्रमाणें एक भाऊ गंडकी नदींत नक्र झाला; व दुसरा भाऊ हत्ती होऊन त्या नदींत पाणी पिण्यास गेला; तेव्हां त्या नक्रानें हत्तीस धरिलें. अशा प्रसंगीं त्या गजेंद्रानें विष्णूचा धांवा केला. ह्मणून विष्णूनें येऊन आपले चक्रानें त्या नक्राचें मुख विदारण करून गजेंद्रास सोडविलें. तेव्हांपासून गंडकी नदींत चक्रांकित शिळा झाल्या. त्यांचीच हल्लीं लोक पूजा करितात. नक्र आणि गजेंद्र झालेले दोघे ब्राह्मण भगवत्परायण होते म्हणून त्यांस वैकुंठलोकीं जयविजय द्वारपाळ केले होते. हें वैकुंठ भगवंतानें आपल्या वैकुंठअवतारीं लक्ष्मीच्या प्रार्थनेवरून निर्माण केलें. ज्ञानहीन भक्त या वैकुंठास जातात. पण ज्ञानी भक्त ज्या वैकुंठास जातात, तें अनाद्यंत वैकुंठ निराळेंच आहे. वैकुंठावतारीं ज्ञानहीन भक्तांकरितां वैकुंठ उत्पन्न केलें त्यावेळीं रैवत नांवाच्या मनूचें मन्वंतर होतें. ब्रम्हदेवाचे एका दिवसांत चवदा मनु होऊन जातात. तशा तीनशें साठ दिवसांचें एक वर्ष, या मानानें ब्रह्मदेवाचीं पन्नास वर्षें होऊन गेल्यावर एकावन्नावे वर्षाच्या पहिले दिवसांतील पांचवें मन्वंतर हें रैवत मन्वंतर होय. या मन्वंतरीं विकुंठेच्या उदरीं विष्णूनें अवतार घेतला. तेव्हां,

लक्ष्मीच्या प्रार्थनेवरून हें वैकुंठ निर्माण केलें. ज्ञानसंपन्न भक्त ज्या शुद्धसत्वात्मक वैकुंठास जातात तें अनाद्यंत आहे. ज्ञानहीनां-करितां जें वैकुंठ निर्माण केलें तें हें नव्हे असें पुराणावरून सिद्ध होतें. या नूतन निर्माण केलेल्या वैकुंठाहून जय विजय च्यवले. आतां या पुराणकथेवर जर कोणी भरंवसा ठेवणार नाहींत तर जयविजय पत-नहि पुराणांतरींच सांगितलें आहे, तेव्हां त्याजवर तरी भरंवसा कां ठेवावा बरें ?

**अस्तु.** आतां त्रिगुणांचें वर्णन करण्यापूर्वी त्यांचा भोक्ता कोण व तो कसा उत्पन्न होतो हें भगवान् सांगतात.

**मम योनिर्महद्ब्रह्म तस्मिन्गर्भं दधाम्यहम् ।**
**संभवः सर्वभूतानां ततो भवति भारत ॥ ३ ॥**

**अर्थ.**—हे अर्जुना, मी जो भोक्ता पुरुष त्या माझें महत्तत्व उत्पत्ति-स्थान होय. त्या महत्तत्वांत मी ब्रह्मगर्भ ठेवितों व त्यापासून सर्व तत्त्वांची उत्पत्ति होते.

**टीका.**—निर्गुण ब्रम्हापासून प्रथम अव्यक्त प्रकृति उत्पन्न होते. तिच्या उपाधीनें निर्गुण ब्रह्म सगुण होतें; त्या सगुण सर्वेश्वरास सृष्टि करावयाची इच्छा उत्पन्न होते, तीच त्रिगुणमयी माया होय. तिला महत्तत्व ह्मणतात. या तीन गुणांपैकीं सत्वांमध्यें ईश्वर प्रतिबिंबित होतो. तोच चिदंश जीव होय. जड देहाचा भोग यासच घडतो. या चिदंशाची योनि म्हणजे उत्पत्तिस्थान, महत्व होय असें "**मम योनिर्महत्**' या पदांनीं सुचविलें आहे. कोणी टीकाकार बिंबाची योनि महत् होय असा अर्थ करितात. तो अर्थ तेवढ्या चरणापुरता होऊं शकतो परंतु पुढें अर्थास बाध येतो. "**ब्रह्म अहं तस्मिन् गर्भं दधामि**" असें म्हटलें आहे. स्त्रियेच्या उदरांत पति गर्भ ठेवितो तसा महत्तत्वीं ईश्वर

गर्भ ठेवितो. यावरून ईश्वराचे जीवभावाची महत्तत्व योनि म्हणजे उत्पत्तिस्थान होय. याप्रमाणें पुढील श्लोकींहि **"तासां ब्रह्म महद्योनिरहं बीजप्रदः पिता"** असें भगवान् ह्मणतात. पुरुषाचें रेत बीज होय. तेंच आकार पावतें. तसा चिदंश जीव प्रतिदेहीं ईश्वराचा गर्भ होय. तो गर्भ महत्तत्वाचे ठायीं ठेविला जातो ह्मणून महत्तत्व जननी व ईश्वर पिता असें ह्मटलें आहे. हा भाव लक्षांत ठेवून माझी ह्मणजे माझ्या चिदंशाची महत्तत्वयोनि म्हणजे उत्पत्तिस्थान होय असें म्हटलें आहे. **"मम"** या शब्दानें बिंब घेतलें तर माता, पिता आणि गर्भ हे तीन भाव होऊं शकत नाहींत. या महत्तत्वीं चिदंशाची स्फूर्ति झाली ह्मणजे २४ तत्वांची उत्पति होते, म्हणून **"भूत"** शब्दानें तत्वें सुचविलीं आहेत. **'भूत'** शब्दाचा शरीर असाहि अर्थ आहे, पण उत्तर श्लोकीं **"मूर्तयः"** असें म्हणून त्यांचें वर्णन झालें आहे, म्हणून या श्लोकांत त्याचा तसा अर्थ करणें चुकीचें होईल.

**सर्वयोनिषु कौंतेय मूर्तयः संभवन्ति याः ।**

**तासां ब्रह्म महद्योनिरहं बीजप्रदः पिता ॥ ४ ॥**

**अर्थ**—हे अर्जुना, सर्व योनींत ज्या मूर्ति उपजतात त्यांची योनि ब्रह्म महत् होय, व मी बीजप्रद पिता होय.

**टीका**—ब्रह्म ह्मणजे ब्रह्मदेव. तो महत्तत्वाची प्रतिमाच आहे. क्षेत्रांत बुद्धि महत्तत्वाचा अंश आहे ह्मणून बुद्धीचें दैवत ब्रह्मदेव आहे. महत्तत्वापासून सृष्टीची उत्पत्ति होते व ब्रह्मदेवच सृष्टिकर्ता आहे ह्मणून **"ब्रह्ममहत्"** असें ह्मटलें आहे. ज्याकरितां भोगांची स्फूर्ति होते तो प्रतिबिंब पुरुष ईश्वराचा अंश होय. तो अंश महत्तत्वांत प्रतिबिंबला तेव्हां चतुर्मुख ब्रह्मा झाला व असाच क्रम पुढें चालला आहे. स्त्रीच्या उदरांत पुरुषाचा रेतप्रवेश झाला ह्मणजे मूर्ति उत्पन्न होते व त्या मूर्तींत

ते दोवे मातापिता होतात. त्याप्रमाणेंच चिदंश महत्तत्वांत प्रवेशला ह्मणजे चराचर मूर्ति उत्पन्न होऊं लागतात. ह्मणून माता महत्तत्व व पिता भगवंत होय असें या श्लोकांत ह्मटलें आहे.

या प्रमाणें भोक्ता पुरुष कोण व तो कसा उत्पन्न होतो हें सांगितलें. आत्मा अकर्त्ता आहे आणि सर्व कर्तृत्व प्रकृतीचें आहे हेंहि पूर्वाध्यायांत स्पष्ट करून दाखविलें आहे. आतां निरनिराळ्या प्रकृतिगुणांचें लक्षण सांगण्यास भगवान् आरंभ करितात.

**सत्त्वं रजस्तम इति गुणाः प्रकृतिसंभवाः ।**
**निबध्नन्ति महाबाहो देहे देहिनमव्ययम् ॥ ५ ॥**

अर्थ—हे अर्जुना, सत्व, रज व तम असे तीन गुण प्रकृतीपासून उत्पन्न झाले आहेत. हे अव्यय अशा देह धारण करणाऱ्यास या देहीं बांधून टाकितात.

टीका—हे तीन्ही गुण कर्मफल उत्पन्न करून देहांत असणाऱ्या देहधाऱ्यास बांधितात. हा देहधारी जीव होय. हा चिदंश आहे ह्मणून त्यास अव्यय म्हटलें आहे. देहाचा अभिमान धरिल्यामुळें त्यास सुख-दुःख भोगावें लागतें.

**तत्र सत्त्वं निर्मलत्वात्प्रकाशकमनामयम् ।**
**सुखसंगेन बध्नाति ज्ञानसंगेन चानघ ॥ ६ ॥**

अर्थ—हे निष्पापा अर्जुना, या तीन्ही गुणांत सत्व गुण निर्मल आहे, म्हणून तो प्रकाशक व अनामय आहे. हा सत्व गुण सुखसंगा-मुळें व ज्ञानसंगामुळें बद्ध करितो.

टीका—एक आत्माच प्रकाशक आहे, तथापि निर्मलत्वामुळें जड अशा सत्वगुणास प्रकाशक म्हटलें आहे. अग्नीची ज्योति मुख्यत्वें

प्रकाशक होय. तथापि तैलयुक्त वातीस प्रकाशक म्हणतात. अग्नीचा इंगोळ स्वतःची दीप्ति दाखवितो, परंतु त्याचे उजेडानें घर व घरांतील वस्तु प्रकाशित होत नाहींत. तेंच तेलानें भिजविलेल्या वातीचा आणि त्याचा संयोग केला असतां सर्व घरांत प्रकाश पडतो. त्याप्रमाणें शुद्ध चित्स्वरूप प्रकाशक आहे खरें, तथापि सत्वावांचून तें प्रत्ययास येत नाहीं. म्हणून त्या योगें तें (सत्व) प्रकाशक आहे, असा भाव दर्शविला आहे. रजतमांचे अंगीं निर्मलत्वाचा गुण नाहीं. तो सत्वाच्या अंगीं आहे ह्मणून या तीन गुणांमध्यें सत्व प्रकाशक आहे असें समजलें पाहिजे. अंधारांत डोळे, हात, पाय, नाक दिसत नाहींत. तोच दिवा आणिला ह्मणजे डोळ्यानें हात, पाय, नाक वगैरे दिसूं लागतात. दिव्याच्या उजेडानें जसे डोळे इतर अवयवांस पाहूं शकतात, त्या-प्रमाणें इतर अवयव एकमेकांस पाहूं शकत नाहींत. हे सर्व दिव्याच्या उजेडानेंच प्रकाशित होतात. तथापि डोळे पाहूं शकतात व इतर अवयव पाहूं शकत नाहींत. तद्वत् तीन्ही गुणांस चैतन्य प्रकाशित करित असून रजतमांस तें कळत नाहीं, पण सत्वास त्याचा बोध होतो. दिव्याच्या उजेडानें डोळे दिव्यास व इतर पदार्थांस पाहतात त्या प्रमाणें चित्प्रकाशानें सत्व चैतन्यास पाहतें व इतर जडांसहि पाहतें. यावरून या त्याचे निर्मलत्वाच्या विशेष धर्मामुळें त्यास प्रकाशक ह्मटलें आहे असें स्पष्ट झालें. या सत्वास "**अनामय**" ह्मटलें आहे, कारण तें रजतमांच्या दोषांपासून मुक्त असतें. अविद्यावरणामुळें हेंच शुद्ध सत्व रजतमयुक्त होऊन सर्व सृष्टि जड दृष्टीनें पाहतें. गुरुकृपेनें अविद्यावरणाचा नाश झाल्याबरोबर त्यासच सर्व जड जग चिन्मय दिसूं लागतें. हा प्रकार कसा घडतो, याचें स्पष्टीकरण द्वितीयाध्यायांतील "**त्रैगुण्यविषया वेदाः**" या श्लोकाचे टीकेंत "**नित्यसत्व**" शब्दाची व्याख्या करितांना केलें आहे तें वाचकांनीं कृपा करून पहावें. असें

शुद्धसत्व देखील अविद्यावरणामुळें कसें बंधक होतें, हें उत्तरार्धानें सांगितलें आहे. हें सत्व, सुखसंगामुळें व ज्ञानसंगामुळें बद्ध करितें असें ह्मटलें आहे. याचें स्पष्टीकरण करूं. 'सुखसंग' शब्दानें विषयसुखसंग समजतां येत नाहीं, कारण तो रजतमांचा धर्म होय. व हा प्रसंग शुद्ध सत्वाचा आहे. अनित्यसुख कोणतें, व नित्यसुख कोणतें, हें कांहींच न जाणतां, आपणास सुख व्हावें व दुःख होऊं नये अशी निवळ सुखापेक्षा असणें यास सुखसंग ह्मटलें आहे. आत्माच सुख होय व तोच सर्वांस प्रिय असतो, परंतु अविद्यायोगें ती सुखापेक्षा बद्धक होते. ही सत्ववृत्ति सर्वांमध्यें असते, परंतु विषयवासनेमुळें ती झांकली असते. अशी सुखापेक्षा नित्यसुख समजल्यावर, त्याचे अपेक्षेनें नाहींशी होते. सत्व तर जड आहे, तेव्हां त्यास सुखापेक्षा कशी घडूं शकते, अशी एथें शंका उत्पन्न होते. तिचें समाधान असें आहे कीं, देहांत आत्मत्वाचा अभिमान असतो तोच मला सुख होवो, असें ह्मणतो. पण हें केवळ अज्ञानाचें लक्षण होय. वास्तविकपणें, जो कोणी सुख मागतो, तो आत्म्याकरितांच मागतो. आतां, हें सत्व जड आहे खरें, तथापि लोखंड चुंबकाच्या सान्निध्यानें जसें सचेतन होतें, तसें चैतन्याचे प्रभावानें तें सचेतन होतें. मादक द्रव्य अचेतन असतें. पण सचेतन मनुष्यानें त्याचें सेवन केल्यानें तो कसा टणाटण उडूं लागतो, हें बहुतेकांस माहित आहेच. आतां हे विकार सचेतन पुरुषहि नव्हे व अचेतन मादक द्रव्यहि नव्हे, परंतु या दोहींच्या संयोगाचा हा प्रकार होय. तद्वत् चैतन्य निर्विकार आहे व विकार करण्याची शक्ति प्रकृतीच्या अंगीं आहे. या दोहोंचा संयोग झाला ह्मणजे वृत्तिव्यवहार सुरू होतो. समुद्रांत जसे तरंग उठतात, तसे चित्स्वरूपीं हे वृत्तिव्यवहार होतात, पण ते सर्व मिथ्याच होत. या चित्सागरांत, सुख व्हावें अशी निराळी लहरी कोठून असणार? चिदात्म्याची प्रीति तीच शुद्ध

सत्ववृत्ति होय. त्याहून ती निराळी नाहीं. अस्तु. आपणास सुख होवो अशी केवळ सुखापेक्षा असणें हा सुखसंग होय. या सुखापेक्षेनें सत्वगुण बद्धक होतो. आतां "ज्ञानसंग" ह्मणजे काय याचा विचार करूं. अलंकारांत जसें सुवर्ण असतें, तसें जडीं ज्ञानस्वरूप ब्रह्म आहे. त्यास ज्ञानदृष्टीनें जे पाहतात, ते मुक्त होतात. अविद्यावृत चित्तास हें चित्कनक जडालंकारांत दिसत नाहीं, परंतु सर्व विषय, विषयरूपच दिसतात. अशा या विषयज्ञानाच्या संगानें जीव बद्ध होतो. हें ज्ञान देखील सत्वप्रकाशानेंच होतें, ह्मणून या ज्ञानसंगानें सत्व जीवास बद्ध कारितें, असें म्हटलें आहे.

**रजो रागात्मकं विद्धि तृष्णासंगसमुद्भवम् ।**
**तन्निबध्नाति कौंतेय कर्मसंगेन देहिनम् ॥ ७ ॥**

अर्थ–हे अर्जुना, रजोगुण प्रीतिरूप आहे असें समज. यापासून तृष्णा आणि कामना उत्पन्न होतात. तो देहधाऱ्याकडून कर्म करवून त्यास बद्ध कारितो.

टीका–हा रजोगुण विषयप्रीतिस्वरूप आहे. 'तृष्णा' म्हणजे विषयवासना. जो विषय दुर्लभ असतो त्याचीहि वासना असते पण त्याची आठवण होत नाहीं. परंतु जो विषय लभ्य होण्यासारखा असतो त्याचा भोग व्हावा अशी अंतःकरणांत इच्छा उत्पन्न होते अशा इच्छेस 'संग' म्हटलें आहे. व दुर्मिळ विषयाचे गुप्त इच्छेस तृष्णा म्हटलें आहे. या दोहींचाहि उद्भव रजोगुणापासूनच आहे. इच्छित विषयाची प्राप्ति होण्याकरितां हाच कर्म करवितो व त्यामुळें जीव बद्ध होतो.

**तमस्त्वज्ञानजं विद्धि मोहनं सर्वदेहिनाम् ।**
**प्रमादालस्यनिद्राभिस्तन्निबध्नाति भारत ॥ ८ ॥**

**अर्थ**–हे अर्जुना, अज्ञानापासून तमोगुणाची उत्पत्ति आहे असें समज. सर्व देहधाऱ्यांना हा मोह उत्पन्न करितो व प्रमाद, आलस्य आणि निद्रा या तिहींच्या योगानें तो त्यांस बद्ध करितो.

**टीका**–तम अज्ञानापासून उत्पन्न होतो, या वाक्याचा फार गहन भाव आहे. रज म्हणजे अज्ञान, त्यापासून तम उत्पन्न होतो असें सुचविलें आहे. तमोगुणापासून सर्व विषयांची उत्पत्ति आहे हें खरें आहे, तथापि रजोगुणात्मक इंद्रियांखेरीज ते कांहींच करूं शकत नाहींत. इंद्रियांचा आणि त्यांचा संयोग होईल तेव्हांच ते मोह उत्पन्न करितात. मन, चित्त, बुद्धि हे सत्वात्मक आहेत. यांच्या साह्याखेरीज ही दृश्य विषयांची इंद्रियांस खूग मिळत नाहीं. असें असून एकट्या रजास अज्ञानरूप देऊन, तम त्यापासून उत्पन्न झालें, असें भगवान् सुचवितात. तेव्हां हा सर्व घोंटाळा दृष्टांतरूपानें स्पष्ट केल्याशिवाय कळणार नाहीं. रज्जूचे ठायीं मिथ्या सर्प दिसतो, तसे ब्रम्हाचे ठायीं विषय दिसतात. पण चैतन्य रज्जूवांचून विषयसर्प भासत नाहीं. रज्जूस दृष्टि स्पर्शली असते परंतु दृष्टिभ्रमामुळें रज्जु न कळतां सर्पाभास होतो. हा भ्रम रज्जूच्या अज्ञानामुळें उत्पन्न होतो. सर्व विषय आणि भूतें तामस होत. हा विषय आणि भूतरूप सर्प रजोगुणी इंद्रियरूप भ्रमास दिसतो. दृष्टि सत्वगुण होय. ही सत्वरूप दृष्टि, रज्जु ब्रम्ह, इंद्रियभ्रम व विषयसर्प या तिहींसहि स्पर्शलेली असते. आतां दृष्टींत रज्जुच असतो, दृष्टिभ्रमांतहि सर्परूपें रज्जुच राहतो, आणि मिथ्या सर्पाहि तोच दिसतो. परंतु दृष्टीस रज्जु कळला ह्मणजे तिला सर्प दिसत नाहीं, कारण दृष्टिभ्रमांतच तो सर्प असतो. यावरून दृष्टिभ्रमापासूनच सर्प झाला आणि त्या भ्रमामुळेंच दृष्टींत दोराचें अज्ञान होतें असें ह्मटलें पाहिजे; कारण दोराच्या अज्ञानावांचून दृष्टींत भ्रम उपजत नाहीं व भ्रमावांचून मिथ्या सर्प दिसत नाहीं. आतां रज्जु ह्मणजे ब्रह्म, सत्व

ह्मणजे दृष्टि, इंद्रियें ह्मणजे भ्रम आणि भासणारें विश्व ह्मणजे सर्प होय. हा विश्वरूपसर्प इंद्रियरूप दृष्टिभ्रमास दिसतो, म्हणून तमविषय अज्ञानापासून उत्पन्न झाले, असें म्हणतां, रजोगुणास अज्ञानपण आलें. दृष्टिरूप सत्वासाहि अज्ञान लागतें, पण तें रजोगुणरूपानें प्रगट होऊन तमास उपजवितें. दृष्टि रज्जूस जाणून त्यास पाहते, तेव्हां भ्रम नसतो व सर्पाभासहि नाहींसा होतो. याप्रमाणें ब्रम्ह जाणून विषयांस सत्व पाहतें, तेव्हां इंद्रियभ्रम राहत नाहीं व विषयभासहि नाहींसा होतो. दृष्टींतील भ्रम नाहींसा झाल्यावर सर्प दिसत नाहीं, तरी सर्पपणीं जो दोर दृष्टींत होता तोच भ्रम गेल्यावरहि असतो. याप्रमाणें जड भ्रमाचें निरसन झालें, म्हणजे दृश्य विषय जडत्वें भासत नाहींत, तथापि भ्रम असतांना सत्वांत जें ब्रम्ह स्फुरत होतें तेंच भ्रम गेल्यावरहि स्फुरतें. ह्मणून सत्व वेगळें केलें व रजास अज्ञान समजून त्यापासून दृश्यरूप तम उत्पन्न झालें असें म्हटलें आहे. हा तमोगुण देहधारी चिदंशास मोह उत्पन्न करितो, असें म्हटलें आहे. यावरून तो मोह बुद्धीस होतो. असें समजलें पाहिजे, कारण प्रतिबिंब हालविलें तरी खरोखर उदकच हालतें व त्यामुळें प्रतिबिंब हालल्यासारखें दिसतें. जोंपर्यंत उदकाची डळमळ असते तोंपर्यंत प्रतिबिंब डळमळतें. म्हणून बुद्धींत प्रतिबिंबित चिदंश बुद्धिमोहामुळेंच मोह पावतो, असें समजलें पाहिजे. शेंकडों मुडदे पाहूनहि देहाभिमानामुळें देहच मी आहे असें आपण म्हणतों, व त्याची व तत्संबंध्यांची प्रीति करितों, त्याचप्रमाणें विषयांचीहि प्रीति करितों. हा देह व विषय तमोगुण होत, व हेच मोह म्हणजे अविवेक उत्पन्न करितात. '**प्रमाद**'' म्हणजे स्वहिताविषयीं असावधपण होय, सावध असूनहि स्वहिताचरण न करणें तो "आळस" होय, व '**निद्रा**' म्हणजे झोंप किंवा लय होय. हीं तीन मोहाचीं लक्षणें आहेत. या तिहींच्या योगानें तमोगुण जीवास बद्ध करितो.

सत्वं सुखे संजयति रजः कर्मणि भारत ।
ज्ञानमावृत्य तु तमः प्रमादे संजयत्युत ॥ ९ ॥

अर्थ–हे अर्जुना, सुखाचे ठायीं सत्व, कर्माचे ठायीं रज, व ज्ञानास झांकून प्रमादाचे ठायीं तम, उत्कर्षेंकरून वर्ततात.

टीका–सुखसंभोगाचे वेळीं कर्माची आठवण होत नाहीं व निद्रा अथवा आळस येत नाहींत, म्हणजे रज आणि तम त्या वेळीं निर्बळ होतात व सत्वगुण प्रबळ होतो. "सुखसंगेन बध्नाति" असें सत्व गुणाचें लक्षण दिलेंच आहे. सुखाचे दोन प्रकार आहेत. एक विषयरूप व दुसरें निर्विषय. यांपैकीं विषयरूपसुख मिश्रसत्वानें होतें व निर्विषयसुख शुद्धसत्वेंकरून होतें. विषयसुख भोगितेवेळीं रजोरूप इंद्रियें व तमोरूप विषय असतात. तीं सुखार्थ उपयोगी वाटतात. परंतु त्यांचें कार्य, म्हणजे कर्माचे ठायीं अथवा निद्रालस्यांचे ठायीं प्रवृत्ति नसते. याप्रमाणें निर्विषयसुखाचे उपभोगकाळीं रजोरूप इंद्रियें आणि तमोरूप विषय यांचा पत्ताच नसतो, कारण त्या वेळीं चित्त चिन्मय होऊन जातें व नुसता आत्माच स्फुरत असतो. दिव्याचे उजेडानें नेत्र जसे दिव्यास पाहतात, तसें सत्व स्वरूपास पाहतें. आतां सत्व जेव्हां सर्व विश्व भगवद्रूप पाहतें तेव्हां रजतमांचें जडत्व गिळून तें केवळ चैतन्य पाहत असतें. यावरून विषय आणि निर्विषय हीं दोन्हीं सुखें भोगितांना, सत्व बलवंत असतें हें उघड झालें. कर्माचे ठायीं रजोगुणाचा उत्कर्ष असतो व सत्व आणि तम शिथिल होतात. उदाहरणार्थ–एकादा वकील घेऊं. मेमहिन्याचे सुटींत दुपारीं जेवण करून आपल्या प्रियेसह आपल्या रमणीय बंगल्यांत तो आराम करित असतो. सर्व दरवाज्यास वाळ्याच्या ताट्या लाविलेल्या असतात, पंख्याचा वारा चालला असतो, अशा सुखांत असतांना एखादा पक्षकार येऊन भक्कम फी देतो आणि म्हणतो कीं, येथून दहा कोसांवर माजिस्त्रेटाचा मुक्काम

आहे तेथें तावडतोब गेलें पाहिजे. पैसा मिळण्याच्या आशेनें विचारा उठतो, बायको, घर, वाळ्याची ताटी, पंखा टाकून भर उन्हाळ्यांत झळा घेत व खटारे गाडीचे धक्के खात, निघून जातो. अशा प्रसंगीं सुखाचा त्याग होतो, झोंप नाहींशी होते, व आळसहि पळून जातो. असा रजोगुणाचा सपाटा असतो, जेव्हां प्रमाद, निद्रा आणि आळस यांचा जोर असतो, तेव्हां ही सुखाची अपेक्षा नसते व कर्माचीहि इच्छा होत नाहीं. प्रमाद होतो तेव्हां तम ज्ञानास झांकून टाकतें, ज्ञान म्हणजे ज्ञानानुभव होय. मनुष्य असावध झाला म्हणजे विक्षेप अथवा लयामुळें समाधि भंग होतो. 'लय' ह्मणजे निद्रा आणि 'विक्षेप' ह्मणजे कल्पना होय. कसाहे ज्ञानि असला तरी प्रमाद त्याचे अनुभवाचें मातेरें करून टाकतो. याप्रमाणें सर्व काळ कोणता तरी एक गुण प्रबळ असतो व बाकीचे दोन गुण बलहीन असतात.

**रजस्तमश्चाभिभूय सत्त्वं भवति भारत ।**
**रजः सत्त्वं तमश्चैव तमः सत्त्वं रजस्तथा ॥ १० ॥**

**अर्थ**—हे अर्जुना, सत्वगुण रज आणि तम यांस दाबून टाकून प्रबल होऊं पहातो. रजोगुण सत्वास आणि तमास व तमोगुण सत्वास आणि रजास दाबून टाकून आपआपलें वर्चस्व करूं पाहतात.

**टीका**—शास्त्र आणि संत यांच्या संगानें सत्व प्रबल होतें व रज आणि तम दबतात. सत्व प्रबल झालें ह्मणजे मुमुक्षा उत्पन्न होते व शांति येते. विषयभोगच सर्व पुरुषार्थ होय व धनमान परम अर्थ होय, असा निश्चय झाला कीं, तेथें मुमुक्षा अथवा शांति कोठून राहणार ? अशा प्रसंगीं निद्रा, आळस, आणि प्रमादहि नाहींसे होतात. त्याचप्रमाणें तमोगुण बाकीच्या दोन गुणांस क्षीण करितो. गुणांची आपसांत नेहमीं अशी झटपट चालू असते.

**सर्वद्वारेषु देहेऽस्मिन्प्रकाश उपजायते ।**
**ज्ञानं यदा तदा विद्याद्विवृद्धं सत्त्वमित्युत ॥ ११ ॥**

**अर्थ**—या देहांत सर्व द्वारांमधून ज्ञानाचा प्रकाश उत्पन्न होतो, तेव्हां सत्वाची विशेष वृद्धि झाली असें समजावें.

**टीका**—निर्मलत्वामुळें, सत्व प्रकाशक आहे, असें यापूर्वीं सांगितलें आहे. वास्तविकपणें प्रकाश ह्मणून चैतन्याचा असतो, तथापि सत्वयोगें तो प्रकाश प्रत्ययास येतो, ह्मणून रजतमांहून तें प्रकाशक आहे असें समजावें. या सत्वाचा जेव्हां रज आणि तम अपजय करितात, तेव्हां मन कर्माचे ठायीं, भोगाचे ठायीं, आळसांत अथवा निद्रेंत लीन होतें. असें झालें ह्मणजे तें असावध होतें व विषयवृत्तीचें ज्ञान नाहींसें होतें. जेव्हां रजतमांचें विशेष प्राबल्य नसते, तेव्हां इंद्रियद्वारा पुरुषास विषयांचें ज्ञान होतें व तीं इंद्रियें आपआपल्या विषयांचें सेवन करण्यास तयार असतात. असा प्रकाश सर्व द्वारीं ह्मणजे इंद्रियांत दिसेल तेव्हां सत्व वाढलें असें समजावें. हें मिश्रसत्वाच्या वृद्धीचें लक्षण होय. आतां शुद्धसत्वाच्या वृद्धीचें लक्षण सांगितलें पाहिजे. जेव्हां आत्मबोधीं किंवा सर्वात्मबोधीं चित्त निमग्न असतें, तेव्हां केवळ शुद्धसत्व असतें. अभ्यासानें हळू हळू जशी जशी जडत्वभ्रांति कमी होत जाते तसें तसें शुद्ध सत्व वाढत आहे असें समजावें.

**लोभः प्रवृत्तिरारंभः कर्मणामशमः स्पृहा ।**
**रजस्येतानि जायन्ते विवृद्धे भरतर्षभ ॥ १२ ॥**

**अर्थ**—हे अर्जुना, रजोगुणाची वृद्धि झाली ह्मणजे लोभ, कर्माची प्रवृत्ति, कर्माचा आरंभ, अशांति आणि इच्छा उत्पन्न होतात.

**टीका**—रजोगुण वाढला ह्मणजे मानाचा लोभ उत्पन्न होतो. त्याकरितां मनुष्य कर्म करण्यास प्रवृत्त होतो, व करूंहि लागतो.

त्यामुळें त्याचें चित्त व्यग्र होतें व शांतीचा ऱ्हास होऊन सदा तरफड चालू असते.

**अप्रकाशोऽप्रवृत्तिश्च प्रमादो मोह एव च ।**
**तमस्येतानि जायन्ते विवृद्धे कुरुनंदन ॥ १३ ॥**

**अर्थ व टीका**–सत्ववृद्धि झाली ह्मणजे जो प्रकाश होतो त्याचेच उलट अप्रकाशाचें रूप होय. व रजोगुणाची वृद्धि झाली असतां जी प्रवृत्ति होते तिचे उलट अप्रवृत्ति होय. प्रमाद ह्मणजे गैरसावधपणा व मोह ह्मणजे विचारशून्यता. हे सर्व तमाची वृद्धि झाली ह्मणजे उत्पन्न होतात.

**यदा सत्त्वे प्रवृद्धे तु प्रलयं याति देहभृत् ।**
**तदोत्तमविदां लोकानमलान्प्रतिपद्यते ॥ १४ ॥**

**अर्थ**–सत्ववृद्धि असतां देहधाऱ्याचा मृत्यु झाला तर, तो सत्यलोकाप्रत जातो.

**टीका**–मागें आठव्या अध्यायांत, ज्ञान होऊन योगाभ्यास न करितां हठयोगाचा आश्रय करून ब्रह्मरंध्र भेदून अपक्व ज्ञानी सत्यलोकांस जातो, असें सांगितलें आहे. तो उत्तमविद ह्मणजे तत्वज्ञान जाणता असल्यामुळें, तेथून परतत नाहीं. ज्ञानहीन पुरुष सत्ववृद्धि असतां मेला तर त्याच लोकांस जातो, परंतु तेथून त्यास पुनरावृत्ति होते.

**रजसि प्रलयं गत्वा कर्मसंगिषु जायते ।**
**तथा प्रलीनस्तमसि मूढयोनिषु जायते ॥ १५ ॥**

**अर्थ**–रजोगुणाची वृद्धि असतां मरण पावला तर, कर्माच्या ठायीं आसक्ति ठेवणाऱ्यांमध्यें तो जन्म घेतो. त्याचप्रमाणें तमोवृद्धि असतां मेला तर, मूढ योनींत जन्म घेतो.

**टीका**–श्लोकांचा भावार्थ स्पष्ट असल्यामुळें टीका करण्याचें प्रयोजन नाहीं.

कर्मणः सुकृतस्याहुः सात्विकं निर्मलं फलम् ।
रजसस्तु फलं दुःखमज्ञानं तमसः फलम् ॥ १६ ॥

**अर्थ**—सात्विक कर्माचें फळ सात्विक आणि निर्मळ असतें. रजाचें फळ दुःख व तमाचें फळ अज्ञान होय असें ह्मणतात.

**टीका**—सत्वगुणानें युक्त होऊन जें कर्म होतें त्यास सुकृत ह्मणावें. त्याचें फळ निर्मळ सात्विक असतें, असें ह्मणतात. जेथें रजतमांचा मळ नाहीं, असें निर्मळ परब्रह्म होय. तेंच सात्विक कर्माचें फळ होय. आतां रजोगुणाचें फळ दोन प्रकारचें आहे एक इहलौकिक व दुसरें पारलौकिक. काम्यकर्म करून स्वर्गसुख मिळणें, तें देखील दुःखच होय असें "तु" शब्दानें दर्शविलें आहे. सुख तेथें दुःख आहेच. सर्व नश्वर फळांचे आदीं, मध्यें आणि अंतीं दुःख असतें. कर्म करितांना तें सिद्धीस जातें न जातें असा नेहमीं धोका असतो, कर्माचे फळाची प्राप्ति झाल्यावर त्याचे नाशाची भीति असते, व नाश झाल्यावर तर दुःख सर्व परी होतें. ही स्वर्गसुखाची वाट. मग ऐहिक सुखासंबंधानें तर बोलणेंच नको. या भावानें रजाचें फळ दुःख होय असें भगवान् ह्मणतात. तमाचें फळ अज्ञान होय. ह्मणजे मनुष्यजन्म प्राप्त होऊनहि पशूप्रमाणें तो विचारशून्य होतो.

सत्वात्संजायते ज्ञानं रजसो लोभ एव च ।
प्रमादमोहौ तमसो भवतोऽज्ञानमेव च ॥ १७ ॥

**अर्थ**—सत्वापासून ज्ञान उत्पन्न होतें रजापासून लोभ आणि तमापासून प्रमाद, मोह आणि अज्ञान उत्पन्न होतात.

**टीका**—ईश्वरार्पित निष्काम कर्मास सात्विक कर्म ह्मणावें. अशा कर्माचें फळ ज्ञान होय. राजस कर्माचें फळ लोभ होय. राजस कर्म करणारा संतसंगतीनें सुधरतो कारण त्याचे अंगीं सावधानता असते.

पण तामस कर्म करणारा अति निकृष्ट होय, कारण तो अमावश असतो. विवेकहीन असल्यामुळें त्यास विषयध्यान असतें, तणेंकरून ज्ञान व्हावें अशी इच्छाहि त्यास होत नाहीं.

**ऊर्ध्वं गच्छन्ति सत्त्वस्था मध्ये तिष्ठन्ति राजसाः ।**
**जघन्यगुणवृत्तिस्था अधो गच्छन्ति तामसाः ॥ १८ ॥**

**अर्थ व टीका**—सत्वगुणाचे ठायीं स्थिर असणारे लोक उर्ध्व लोकांस ह्मणजे जन, तप आणि सत्य लोकांस जातात. राजस लोक स्वर्गलोकास जातात. या दोहींच्या गति अधम नव्हत. पण निंद्य अशा वृत्तीचे तामस लोक अधम गति पावतात.

अशा प्रकारें त्रिगुणांच्या वृत्ति, त्यांचे प्रकार, त्यांचें फल आणि त्यांपासून होणारी गति यांचें एथपर्यंत वर्णन झालें. आतां आपलें अकर्तृत्व कसें पहावें व त्यापासून काय फळ प्राप्त होतें; हें भगवान् सांगतात.

**नान्यं गुणेभ्यः कर्तारं यदा द्रष्टानुपश्यति ।**
**गुणेभ्यश्च परं वेत्ति मद्भावं सोऽधिगच्छति ॥ १९ ॥**

**अर्थ**—गुणापरता दुसरा कोणी कर्त्ता नाहीं असें द्रष्टा पाहतो, तेव्हां तो गुणापरता आत्मा जाणतो व माझ्या भावाप्रत ह्मणजे सगुण-मोक्षाप्रत पावतो.

**टीका**—या श्लोकांतील भाव असा आहे कीं असा ज्ञानी देह असे तोंपर्यंत गुणातीत होऊन वर्तन करित असतो, व देह पडल्यावर दुसऱ्या श्लोकांत सांगितलेलें भगवत्साधर्म्य पावतो.

**गुणानेतानतीत्य त्रीन्देही देहसमुद्भवान् ।**
**जन्ममृत्युजरादुःखैर्विमुक्तोऽमृतमश्नुते ॥ २० ॥**

अर्थ–देहापासून उत्पन्न होणाऱ्या या तीन्ही गुणांचें अतिक्रमण करून जन्म, मृत्यु आणि जरा यांचे दुःखापासून मुक्त होत्साता तो देही मोक्षाचा उपभोग घेतो.

टीका–त्रिगुणांपासून देह उत्पन्न होतो असें असून या श्लोकांत तर 'देहापासून उत्पन्न होणारे त्रिगुण' असें ह्मटलें आहे. हा विरोध दिसतो. याचे भयानें कित्येक टीकाकारांनीं असा अर्थ केला आहे कीं, ' ज्या गुणापासून देह उत्पन्न होतो त्याचें अतिक्रमण देही करितो. ' "देहसमुद्भवान्" या पदाचा असा समास होत नसून बलात्कारानें त्यांनीं तसा केला आहे, ' देहापासून उद्भवलेले त्रिगुण ' असा समास करून विरोध न होतां खरा अर्थ होतो. तो समजला ह्मणजे वरप्रमाणें बलात्काराचा अर्थ कोणीहि कबूल करणार नाहींत. बीजापासून वृक्ष उत्पन्न होतो व त्या वृक्षापासूनच पुढें होणारे वृक्षांचें बीज उत्पन्न होतें. त्याप्रमाणें त्रिगुणांपासून देह उत्पन्न होतो, व त्या देहापासून, अहंकारानें युक्त असल्यामुळें, पुढें जन्म देणारें त्रिगुणात्मक कर्म उत्पन्न होतें. ज्ञान्याचे संचितकर्माचा नाश झाला असतो. पण प्रारब्ध कर्म देह असेपर्यंत असतें. ह्मणून त्यास प्रारब्धभोग भोगावे लागतात. हे प्रारब्ध-भोग त्रिगुणात्मक असतात. व ते या देहींच उपजतात. ह्मणून त्या भोगांसच ' त्रिगुण ' ह्मटलें आहे. त्यांचें अतिक्रमण करून, ह्मणजे प्रारब्धाचा देह पडल्यावर, तो मोक्ष पावतो, असा या श्लोकाचा आशय आहे. प्रारब्धभोग भोगतांना ज्ञानी पुरुषासहि अहंकार उत्पन्न होतो, पण त्या अहंकारासहि तो साक्षित्वानें पाहतो. ' मी आत्मा आहें ' असें साक्षित्व, बुद्धीमुळें असतें. ती बुद्धि तर भोगकाळीं अहंकारयुक्त असते. तेव्हां अशा वेळीं बुद्धीनें साक्षित्व कसें ठेवितां येतें, अशी शंका उत्पन्न होते. तिचा परिहार होण्याकरितां मागें दिलेला जिभेचा दृष्टांत फार उत्तम आहे. 'मी निःशब्द आहें' असें जिभेनेंच जिभेचा चालक बोलतो.

जिभेवांचून बोलणें घडत नाहीं, हें खरें, तथापि तिच्याच योगानें आपलें बोलणें आपण बोलतों. त्याप्रमाणें बुद्धीवांचून भोग घडत नाहीं, तरी त्याच बुद्धीच्या योगानें भोगकाळीं आपलें अकर्तृत्व आपणास पाहतां येतें. आतां, गुणांचें अतिक्रमण केलेल्या ज्ञानी पुरुषासंबंधानें अर्जुन प्रश्न करित आहे.

**कैर्लिंगैस्त्रीन्गुणानेतानतीतो भवति प्रभो ।**
**किमाचारः कथं चैतांस्त्रीन्गुणानतिवर्तते ॥ २१ ॥**

**अर्थ**—अर्जुन ह्मणाला—हे प्रभो, प्रत्येक गुणाची काय खूण समजून त्या गुणाचें तो अतिक्रमण करितो? त्याचा आचार काय? व तो गुणांचें अतिक्रमण कशा प्रकारें करितो?

**टीका**—श्लोकाचा भावार्थ स्पष्ट आहे म्हणून टीका करण्याचें कारण नाहीं.

या प्रश्नाचें उत्तर यापुढें भगवान् देतात.

**प्रकाशं च प्रवृत्तिं च मोहमेव च पांडव ।**
**न द्वेष्टि संप्रवृत्तानि न निवृत्तानि कांक्षति ॥ २२ ॥**

**अर्थ**—हे अर्जुना, तीं लक्षणें प्रकाश, प्रवृत्ति आणि मोह हीं होत. तो प्रवृत्तिकर्मांचा द्वेष करित नाहीं व निवृत्तिकर्मांची इच्छा करित नाहीं.

**टीका**—सत्वाची खूण प्रकाश, रजाची खूण प्रवृत्ति आणि तमाची खूण मोह आहे, असें जाणून ज्ञानी पुरुष त्यांचें अतिक्रमण करितो असें भगवान् सांगतात. सत्व इंद्रियास व विषयांस प्रकाशित करितें, ह्मणून प्रकाश त्याची खूण आहे, रजोगुण कर्माची प्रवृत्ति करवितो ह्मणून प्रवृत्ति त्याची खूण आहे, व तम अविवेक उत्पन्न करितो, ह्मणून मोह त्याची खूण आहे, या तीन्हीं लक्षणांचें विवरण यापूर्वीं झालें आहे, तें पहावें. ज्ञान्यास प्रारब्ध भोगाखेरीज इतर प्रसंगीं गुणांचा संबंध नसतो. त्या वेळीं तो असें समजतो कीं, इंद्रिय आणि विषय यांस सत्व प्रका-

शित करितें, ह्मणून चिदंशास भोग घडतो; व आपण त्या सत्वाचा साक्षी होऊन राहतो. अशा रीतीनें सत्वाचा अतिक्रम करितो. भोगकाळीं इंद्रियें विषयांचा भोग घेतात, तेव्हां आपण अकर्त्ता आहों, असें समजून इंद्रियांचे कर्मांचा तो साक्षी होऊन राहतो, अशा रीतीनें तो रजोगुणाचें अतिक्रमण करितो. भोगकाळीं 'मी सुखी वा दुःखी' असा प्रत्यय असतो, पण त्या प्रत्ययानें त्यास मोह उत्पन्न होत नाहीं, कारण तो आपल्यास चित्स्वरूप आत्मा समजत असतो, व भोग चिदंशास घडत आहे अशी त्याची खात्री असते. अशा रीतीनें तो तमाचें अतिक्रमण करितो. याप्रमाणें प्रत्येक गुणाची खूण काय व त्याचें अतिक्रमण कसें होतें या पहिल्या प्रश्नाचें उत्तर पूर्वार्धानें दिलें आहे. दुसऱ्या प्रश्नाचें उत्तर उत्तरार्धानें दिलें आहे कीं, तो ज्ञानी प्रवृत्तिकर्मांचा द्वेष करित नाहीं व निवृत्तिकर्मांची इच्छा करित नाहीं. प्रारब्ध भोगाचे वेळीं इतर लोकांसारिखा तोहि प्रवृत्तिकर्में करित असतो. तेव्हां आपणा विरक्तांस असें कर्म करावें लागतें, ह्मणून त्याचा तो द्वेष करित नाहीं, व निवृत्तिमार्गाचें कर्म आपले हातून घडावें अशी त्यास इच्छाहि नसते, प्रवृत्तीचा निषेध होण्याकरितां निवृत्तिमार्ग केला पाहिजे, हा तर प्रवृत्तिमार्गच करित नाहीं, तेव्हां त्यास निवृत्तिमार्गाची अपेक्षा कशाकरितां असावी? एवंच तो निर्विकार असतो, ह्मणून कांहींच करित नाहीं. हें अर्जुनाच्या दुसऱ्या प्रश्नाचें उत्तर होय.

**उदासीनवदासीनो गुणैर्यो न विचाल्यते ।**
**गुणा वर्तन्त इत्येव योऽवतिष्ठति नेंगते ॥ २३ ॥**

अर्थ—तो उदासीन मनुष्याप्रमाणें स्वस्थ असतो. गुणांमुळें तो स्वस्थतेपासून चळत नाहीं, कारण गुणांचीं स्वाभाविक कार्यें आपोआप घडतात, असें समजून, तो स्वस्थ राहतो, चळत नाहीं.

**टीका**—जड आणि चैतन्य यांची गांठ पडली ह्मणजे अहंकार उत्पन्न होतो. व तो ममता उत्पन्न करितो. हा तर सर्वच चैतन्य आहे असें पहात असल्यामुळें, याचे ठायीं ममतेचा लेश देखील नसतो, ह्मणून तो उदासीनासारिखा असतो, ह्मणजे तिऱ्हाइत होऊन गुण आपआपलीं कार्यें करित आहेत व आपला त्यांच्याशीं कांहींच संबंध नाहीं असें जाणून तो तसें पाहतो.

पुढच्या दोन श्लोकांनीं अर्जुनाचें " **कथं अतिवर्तते** " या तिसऱ्या प्रश्नाचें उत्तर दिलें आहे.

**समदुःखसुखः स्वस्थः समलोष्टाश्मकांचनः ।**
**तुल्यप्रियाप्रियो धीरस्तुल्यनिंदात्मसंस्तुतिः ॥ २४ ॥**
**मानापमानयोस्तुल्यस्तुल्यो मित्रारिपक्षयोः ।**
**सर्वारंभपरित्यागी गुणातीतः स उच्यते ॥ २५ ॥**

**अर्थ**—जो सुख आणि दुःख यांचे ठायीं समचित्त असतो, स्वस्थ ह्मणजे स्वरूपीं स्थिर असतो, ज्याला मातीचें ढेंकूळ, धोंडा आणि सोनें सारखीं वाटतात, ज्याला प्रिय आणि अप्रिय वस्तु सारख्या वाटतात, ज्याचे अंगीं धैर्य असतें व ज्याला आपली निंदा व स्तुति, मान व अपमान, मित्र आणि शत्रु, यांचे दोन्ही पक्ष सारखे असतात व ज्यानें सर्व कर्मारंभाचा त्याग केला आहे, अशा पुरुषास गुणातीत ह्मणतात.

**टीका**—भोगानें प्रारब्धाचा क्षय होतो, ह्मणून तो कसा तरी सारावा लागतो असें ज्ञानी पुरुष जाणत असल्यामुळें त्यासंबंधाचें सुख अगर दुःख तो मानीत नाहीं. ज्ञान्यास सुखदुःख वाटल्याखेरीज राहत नाहीं तथापि तो सुखानें फुगत नाहीं व दुःखानें घाबरा होत नाहीं, ह्मणून त्यास "**धीर**" ह्मटलें आहे. त्यास सुखाची इच्छाच नसते, ह्मणून सुखाचें साधन जें द्रव्य तें तो मातीच्या ढेंकळाप्रमाणें अथवा लांकडा-

प्रमाणें समजतो. याकरितां त्यास प्रिय आणि अप्रिय दोन्ही समान असतात, असें ह्मटलें आहे. त्याचप्रमाणें निंदा आणि स्तुति, मान आणि अपमान, त्यास सारखे वाटतात, कारण प्रारब्ध असेपर्यंत हा देह आहे, असें जाणून तो त्यास स्वप्नवत् पहातो. अशा पुरुषास शत्रु आणि मित्र हा भाव कोठून असणार? कोणत्याहि गोष्टीची त्यास अपेक्षा नसते, ह्मणून त्यास कर्म करण्यास हेतु नसतो. अशा वैराग्य-शील ज्ञानी पुरुषास गुणातीत ह्मणतात. अशी श्रेष्ठ स्थिति प्राप्त करून घेण्याचा उपाय कोणता हें भगवान् पुढील श्लोकीं सांगतात.

**मां च योऽव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते ।**
**स गुणान्समतीत्यैतान् ब्रह्म भूयाय कल्पते ॥ २६ ॥**

**अर्थ**—अव्यभिचारी भक्तियोगानें जो माझी सेवा करतो तो गुणांचें सम्यक् प्रकारें अतिक्रमण करून ब्रह्म व्हावया योग्य होतो.

**टीका**—सगुण भगवंतच विश्वरूपानें व्यक्त झाला आहे व तो सगुण भगवंत आपला आत्मा होय असा भाव ठेऊन त्याची उपासना करणें यास अव्यभिचारी भक्तियोग ह्मणावें; हें यापूर्वी सांगितलें आहे व त्याचें विवेचनहि बाराव्या अध्यायांत झालें आहे. असा भक्ति-योग जो करितो तो गुणातीत होऊन ब्रह्म व्हावयास योग्य होतो असें भगवंत ह्मणतात.

ब्रह्म ह्मणजे सगुण ब्रह्म असा अर्थ या श्लोकाचे रचनेवरून स्पष्ट होतो. गुणांचें अतिक्रमण झालें ह्मणजे तो निर्गुण ब्रह्म होतो असें निर्गुण ब्रह्म झाल्यावर मग ब्रह्म होणें तें सगुण ब्रह्मावेरीज दुसरें नाहीं असें मानणें भाग होतें.

याप्रमाणें त्रिगुणांचें वर्णन करून त्यांस जिंकल्यानें जें फळ मिळतें, तेंहि सांगितलें. आतां भगवान् आपल्या उत्कृष्ट स्वभावाचें वर्णन करून सांगतात.

**ब्रह्मणो हि प्रतिष्ठाहममृतस्याव्ययस्य च ।**
**शाश्वतस्य च धर्मस्य सुखस्यैकान्तिकस्य च ॥ २७ ॥**

**अर्थ**–वेदांची प्रतिष्ठा मीच आहें, निर्गुण आणि सगुण यांची प्रतिष्ठाहि मीच आहें. त्याचप्रमाणें शाश्वत धर्माची आणि एकांत सुखाचीहि प्रतिष्ठा मीच आहें.

**टीका**–सकाम अथवा निष्काम कर्माचें फळ जें वेद सांगतात तें सर्व भगवंतापासून मिळतें. '**अमृत**' ह्मणजे निर्गुण मोक्ष भगवत्कृपेनेंच मिळतो, कारण तो ज्ञानाशिवाय मिळत नाहीं व ज्ञान सगुणकृपेवांचून होत नाहीं. प्रळयकाळीं सर्वांचा व्यय होतो त्यांतहि भगवत्साधर्म्ये अव्यय राहतें, ह्मणून "**अव्यय**" शब्दानें सगुण मोक्ष सुचविला आहे. तोहि भगवत्कृपेनेंच मिळतो. जो भागवत धर्म आचरल्यानें शाश्वत मोक्ष मिळतो तोच शाश्वत धर्म होय. त्याची प्रतिष्ठाहि भगवंत होय. सगुण मोक्षांत अखण्डानंदाचा अनुभव असतो, ह्मणून त्यास शाश्वत ह्मटलें आहे. सकळ वृत्तींचा ज्या एका चित्स्वरूपीं अंत होतो असा निर्गुणानुभवहि भगवंतच होय. या मोक्षप्रकरणासंबंधानें दोन्ही मोक्ष व त्यांचीं साधनें आपण आहों एवढेंच भगवंतांनीं येथें सांगितलें. परंतु या पुढचे अध्यायांत सर्वच आपण आहों असें ते सांगणार आहेत.

याप्रमाणें चवदाव्या अध्यायाची टीका संपूर्ण झाली. तिची प्रतिष्ठाहि तोच गोविंद होय. त्याचे चरणीं दास्यभावानें तिचें अर्पण करितों.

---

श्री.

# अध्याय १५ वा.

ॐ नमो भगवते वासुदेवाय.

सर्व जग जड व त्याचा साक्षी आपण चित्स्वरूप आत्मा अशा रीतीचा व्यतिरेकानुभव मागील अध्यायांत सांगितला, व या अध्यायांत अन्वयज्ञानाचा विशिष्टानुभव भगवान् वर्णन करून सांगणार आहेत. असा विशिष्टानुभव झाल्याशिवाय ज्ञान पक्क होत नाहीं ह्मणून यामागें वारंवार सांगितलेंच आहे.

ऊर्ध्वमूलमधःशाखमश्वत्थं प्राहुरव्ययम् ।
छंदांसि यस्य पर्णानि यस्तं वेद स वेदवित् ॥ १ ॥

अर्थ—प्रपंच हा एक अश्वत्थ वृक्ष आहे. त्याचें मूळ वर आहे, शाखा खालीं आहेत व वेद त्याचीं पानें आहेत. अशा अश्वत्थास जो अव्यय समजतो तोच वेदवेत्ता होय.

**टीका**—श्लोकाचा उत्तानार्थ इतकाच आहे. पण यांतील भावार्थ फार खोल आहे. काळेंकरून मुलाहून बाप जसा ऊर्ध्व असतो तसें ब्रह्म सर्वांहून ऊर्ध्व आहे असें "ऊर्ध्व" शब्दानें सुचविलें आहे. त्या ऊर्ध्व ब्रह्मीं, प्रपंचाचें मूळ माया उत्पन्न होते. त्या मायेपासून जीव उत्पन्न होतात. ते चराचर जीव "अधः" शब्दानें सुचविले आहेत. "शाखा" शब्दानें जीवांचे देहांचा बोध केला आहे. या प्रपंचाश्वत्थाचीं वेद हीं पानें होत. कारण अंधःकारांत झाड दिसत नाहीं, तरी त्याचे पानांचे आवाजावरून तें आहे असें वाटतें; त्याप्रमाणें अविद्यांधःकारामुळें ब्रह्मानुभव होत नाहीं तरी वेदांच्या शब्दानीं तें आहे असें सम-

जतें. प्रपंच नश्वर आहे हें दर्शविण्याकरितां त्यास " अश्वत्थ " अशी संज्ञा दिली आहे. "श्वः" ह्मणजे उद्यां, " त्थ " ह्मणजे राहणें, आणि "अ" ह्मणजे नाहीं. यावरून उद्यां राहील न राहील याचा भरंवसा नाहीं असा हा प्रपंच नश्वर आहे, ह्मणून त्यास अश्वत्थ ह्मटलें आहे. तो नश्वर असूनहि त्यास अव्यय ह्मटलें आहे, हें कसें? अलंकाराचा आकार नश्वर आहे, पण ज्याचा तो बनविला असतो तें सोनें नित्य आहे. अलंकाराच्या आकारासंबंधानें विचार करित असतांना मात्र त्याचें नश्वरत्व आढळतें. तद्वत् प्रपंचाचे ठायीं जो जडभाव आहे तो नश्वर आहे, परंतु अलंकारास प्रकाशित करणारें सोनें जसें नित्य असतें तसें जड प्रपंचास प्रकाशित करणारें अधिष्ठानात्मक ब्रह्म अव्यय आहे असें वेद ह्मणतात. ब्रह्म कारण व प्रपंच त्याचें कार्य आहे. ह्मणून कार्यरूपें तें अनित्य आहे पण कारणरूपें तें नित्य आहे. यावरून प्रपंच आणि ब्रह्म कार्यकारणत्वें अभेद आहेत असें स्पष्ट दिसतें, कारण या दोहोंस वेगळे करितां येत नाहीं. असा प्रपंचाश्वत्थ नश्वर आहे तथापि त्याचे अव्ययत्वाची खूण वेदांत सांपडते. ह्मणून प्रपंचाचे नश्वरत्वीं ज्यास अव्ययत्व वाणतें तो वेदवेत्ता होय असें भगवान् ह्मणतात. यावरून जो सर्वत्र चैतन्य पाहतो, तोच ज्ञानी होय असें सिद्ध होतें.

**अधश्चोर्ध्वं प्रसृतास्तस्य शाखा**
**गुणप्रवृद्धा विषयप्रवालाः ।**
**अधश्च मूलान्यनुसंततानि**
**कर्मानुबंधीनि मनुष्यलोके ॥ २ ॥**

**अर्थ**—वरच्या आणि खालच्या अशा दोन्हीं बाजूंनीं या प्रपंचवृक्षास गुणांनीं वाढलेल्या व विषयरूप फांद्यांनीं युक्त अशा शाखा आहेत. त्या शाखांस कर्मरूप अनेक मुळया फुटतात. त्यामुळें या लोकीं जीव बद्ध असतात.

टीका–"शाखा" शब्द देहदर्शक आहे हें पूर्व श्लोकाचे टीकेंत सांगितलें आहे. "अध" ह्मणजे जीव व "ऊर्ध्व" ह्मणजे ब्रह्म या दोहोंसहि देह आहेत. मायायोगें झालेले अवतारदेह ब्रह्माचे देह होत व जीवांचे देह कर्माचे बनलेले देह होत. हे देह "गुणप्रवृद्ध" ह्मणजे गुणांनीं वाढलेले असतात असें ह्मटलें आहे. जीवांचे देह त्रिगुणात्मक असतात व भगवदवतारदेह शुद्धसत्वगुणात्मक असतात. जीवदेहास विषय सत्यत्वें भासतात, पण अवतारदेहास ते आपली कल्पना ह्मणून मिथ्या वाटतात. अवतारदेहास गुण आणि विषय यांचा संबंध असतो तरी त्यांचा गुण शुद्ध सत्व असल्यामुळें रजतमात्मक अविद्येचा त्यांस स्पर्श नसतो, ह्मणून त्यांस अखंडस्वरूपस्फुरण असतें. तसें जीवांचे देहांस नसतें, कारण त्रिगुणांपासून उत्पन्न झालेल्या कर्मांनीं जीव बद्ध असतात. हेंच उत्तरार्धानें सांगितलें आहे. यावरूनच स्पष्ट सिद्ध होतें कीं, भगवदवतारदेह नित्यमुक्त असतात. दोन्ही देहांचें उपादान निर्गुण ब्रह्मच असतें, तरी उपाधिभेदामुळें अवतारदेह सर्वज्ञ व सर्वशक्तिमान् असतात व जीव किंचिज्ञ व शक्तिहीन असतात.

झाडाच्या फांद्यांना जशा पारंब्या फुटतात तशा जीवदेहांचे ठायीं कर्मरूप पारंब्या फुटतात. त्या योगानें जीव बद्ध होतात असें ह्मटलें आहे. हीं कर्मबंधमुळें कर्मांचींच फळें होत. यावरून माया जशी अनादि आहे तशी लिंगदेहरचनाहि अनादि आहे. मनुष्याचे स्थूळदेहीं कर्म उपजतें व त्याचा बंध लिंगदेहीं होतो. दृश्य स्थूळदेहाचे आंत पंचप्राण, मन, आणि बुद्धि, ज्ञानेंद्रियें व कर्मेंद्रियें असतात, त्यांस लिंगदेह ह्मणतात. बाह्य दृष्टीनें इंद्रियांचा आकार दिसतो तीं फक्त शोलकें होत. त्यांत असणाऱ्या शक्तीस इंद्रियें ह्मणतात. या १७ तत्वांचे समूहास लिंगदेह अशी संज्ञा आहे. मनुष्यदेहीं जें जें कर्म होतें तें तें संस्काररूपानें प्राणांबरोबर जाऊन लिंगदेहांत त्याचें संचित बनतें.

नरदेहीं जें कर्म घडतें त्यास "क्रियमाण" ह्मणतात. देहांतीं या क्रियमाणाचें संचित बनतें व त्यांतूनच प्रारब्ध तयार केलें जातें. या विषयाचें विवेचन यापूर्वीं झालें आहे. अस्तु. असे लिंगदेह जीवशाखांचीं मुळें होत. त्यांपासून स्थूलदेह उत्पन्न होतो. हीं बंधक कर्में मनुष्यदेहाखेरीज इतर देहांत होत नाहींत असें "कर्मानुबंधीनि मनुष्य लोके" या चरणानें दर्शविलें आहे. आतां, या प्रपंचाचे अव्ययत्वाचें भगवान् वर्णन करितात.

**न रूपमस्येह तथोपलभ्यते**
**नान्तो न चादिर्न च संप्रतिष्ठा ।**
**अश्वत्थमेनं सुविरूढमूल-**
**मसंगशस्त्रेण दृढेन छित्वा ॥ ३ ॥**

**अर्थ**—या अश्वत्थास रूप नाहीं. याकरितां उपादानकारणरूपें त्यांत अव्ययत्व सांपडतें. याला अंत नाहीं, आदि नाहीं व प्रतिष्ठाहि नाहीं. अशा खोल गेलेल्या मूळांनीं युक्त असलेल्या अश्वत्थास ज्ञानशस्त्रानें तोडून टाकावें.

**टीका**—या प्रपंचास अव्यय ह्मटलें आहे ह्मणून त्यास रूप नाहीं असें भगवंत ह्मणतात. पण या बोलण्यांत विरोध दिसतो; कारण प्रपंचास रूप आहे व तें आपण पाहतों. त्यांत गूढ भावार्थ आहे. तो समजला ह्मणजे विरोधाचा परिहार होईल. या प्रपंचास रूप नाहीं, या ह्मणण्याचा हेतु असा आहे कीं, त्यास स्वतःसिद्ध रूप नाहीं. जें रूप दिसतें तें उपादानकारणाचें कार्यरूप होय. या उपादानाचें ज्ञान कसें करून घ्यावें हें " **तथोपलभ्यते** " या पदानें सुचविलें आहे. यांतील " **उप** " शब्दानें उपादानकारण दर्शविलें आहे. " **उपलभ्यते** " ह्मणजे समीप मिळतें. घटांत माती, पटांत तंतु व अलंकारांत सोनें हे समीप सांपडतात, ह्मणजे त्यांस ते व्यापूनच असतात. त्याप्रमाणें जड कार्यांत

अजड उपादानकारण अति समीप सांपडतें व त्या चित्स्वरूपामुळें त्याचें कार्यरूपहि समीपच दिसतें. हा प्रपंच अव्यय चैतन्याचें कार्य-रूप आहे व तें चैतन्य प्रपंचाचें कारणरूप आहे, ह्मणून "**अश्वत्थं प्राहुरव्ययं**" असें ह्मटलें आहे. या उपादानकारणास आदि, अंत नाहीं ह्मणून विवर्तरूप कार्यासहि आदि, अंत नाहीं. दोराचे ठायीं सर्पाचा भास होतो त्यास विवर्त ह्मणतात. तो भास दोरा एवढाच होतो. तद्वत् प्रपंचाभास ब्रह्माचे ठायीं विवर्तरूप आहे; व ब्रह्म अनंत आहे ह्मणून विवर्तरूप प्रपंचहि अनंत आहे. हें अनंतत्व दोन प्रकारचें आहे. एक कालपरत्वें व दुसरें देशपरत्वें; ह्मणजे हा प्रपंच अमुक काळापासून उत्पन्न झाला व अमुक काळपर्यंत राहील, अथवा अमुक स्थळापासून उत्पन्न झाला व अमुक स्थळापर्यंत पसरला आहे असें सांगतां येत नाहीं. सृष्टिकाळीं प्रपंचाची उत्पत्ति होते व प्रळयकाळीं त्याचा लय होतो. पण ही उत्पत्ति व हा लय त्याचा आदि व अंत ह्मणतां येत नाहीं, कारण प्रळयकाळीं जो प्रपंच लय पावतो तोच सृष्टिकाळीं उत्पन्न होतो. मध्यंतरीं तो ब्रह्मीं लीन असतो. याचें विवेचन यापूर्वी बहुत स्थळीं झालें आहे. अस्तु. या प्रपंचास प्रतिष्ठा ह्मणजे ठाव नाहीं असें भगवान् ह्मणतात, यावरून तो विवर्त आहे असें सुचविलें आहे. असा हा प्रपंचाश्वत्थ दुःखरूप आहे व याचीं लिंगदेहरूपी मुळें फार पसरलीं आहेत असें या पूर्वीचे श्लोकीं "**कर्मानुबंधीनि मनुष्यलोके**" या चरणानें सांगितलें आहे. त्याचा नाश करण्यास असंगशस्त्राचें साधन सांगितलें आहे. या "**असंगशस्त्र**" शब्दाचा अर्थ बहुतेक टीकाकार "**वैराग्य**" असा करितात. पण तो बरोबर नाहीं, कारण ज्ञानावांचून इतर कशानेंहि प्रपंचाचा नाश होऊं शकत नाहीं. देहाविषयीं अहंकार हाच सकळ अनर्थास कारणीभूत आहे. असा अहंकार ह्मणजे संग ज्यानें सोडिला त्यास "**असंग**" ह्मणावें. अशा असंगाचें शस्त्र ह्मणजे ज्ञान होय. या ज्ञानाचे साधनानें

प्रपंचाश्वत्थाचा नाश करावा असें सांगितलें आहे. या " असंगशस्त्र " शब्दाचा " ज्ञान " असा अर्थ न करण्यास कारण झालें आहे. तें असें कीं, उत्तर श्लोकीं भगवान् ह्मणतात कीं, या श्लोकांत सांगितल्याप्रमाणें अश्वत्थाचा नाश केल्यावर अद्वय अशा ब्रह्मपदाचा शोध लावावा. परंतु ज्ञानेंकरून प्रपंचाचा नाश केल्यावर अद्वयपद धुंडण्याचें कारणच उरत नाहीं. या विरोधाचे भीतीनें " **असंगशस्त्र** " याचा " **ज्ञान** " असा अर्थ केला नाहीं. हा विरोध अपरिहार्य नाहीं. याचा परिहार असा कीं, ज्ञानाचे दोन प्रकार आहेत. एक व्यतिरेक आणि दुसरा अन्वय. अश्वत्थाचा छेद करावा या उपदेशानें जडावेगळें चैतन्य ओळखण्याचा व्यतिरेकयोग सुचविला आहे असें गृहण केलें ह्मणजे विरोध राहत नाहीं. कारण व्यतिरेकज्ञान झाल्यावरच जडांत चैतन्य पाहण्याचा अन्वययोग करितां येतो व तोच योग यापुढील श्लोकांत भगवान् सांगतात.

**ततः पदं तत्परिमार्गितव्यं**
**यस्मिन्गता न निवर्तन्ति भूयः ।**
**तमेव चाद्यं पुरुषं प्रपद्ये**
**यतः प्रवृत्तिः प्रसृता पुराणी ॥ ४ ॥**

**अर्थ**—त्यानंतर तेंच पद धुंडावें. त्या पदास गेलें असतां तेथून पुनरावृत्ति नाहीं. ज्यापासून अनादि प्रवृत्ति विस्तारली आहे त्या आद्य पुरुषास म्हणजे सगुण स्वरूपास पावेन अशी भावना ठेवून तें पद धुंडावें.

**टीका**—तें पद म्हणजे जडावेगळें जें अक्षर ब्रम्ह मागील श्लोकांत सांगितलें तें होय. तेंच त्या अश्वत्थांत शोधावें म्हणजे जड प्रपंचांत निर्गुण ब्रम्ह ओळखावें असें भगवान् सांगतात. यावरून प्रथम व्यतिरेकज्ञान करून घेऊन नंतर अन्वयज्ञान मिळवावें असा भाव सुचविला आहे. चैतन्य जडावेगळें केल्यानें जणू अश्वत्थ छेदून पाडला असें

समजावें. मग त्या जडांतच चैतन्य शोधावें, असा क्रम या दृष्टांतानें सुचविला आहे. अशा प्रकारें ज्ञान परिपक्क झालें ह्मणजे त्याच अक्षर ब्रह्मास जाऊन जीव मिळतो व तेथून तो उलट खात नाहीं असें दुसऱ्या चरणानें सांगून, निर्गुण मोक्ष सुचविला आहे. जे नुसते निर्गुणास भजतात ते जरी केवळ निर्गुण धुंडितात, व निर्गुण मोक्ष पावतात पण जे सगुणभक्तियुक्त होत्साते निर्गुण धुंडितात त्यास सगुणमोक्ष मिळतो असें उत्तरार्धानें सांगितलें आहे. सगुण भगवंत सर्वांचे आधीं प्रगट होतो ह्मणून त्यास "**आद्य**" ह्मटलें आहे. तो प्रगट झाल्यावर जीवाच्या रूपानें पुरांत ह्मणजे देहांत प्रवेश करितो, असा "**पुरुष**" शब्दानें बोध केला आहे. तो सगुण पुरुष निर्गुणच आहे असें "**तमेव च**" या पदांतील "**च**" कारानें सुचवून, तृतीय चरणांतील "**आद्यं पुरुषं प्रपद्ये**" या पदांनीं उपदेश केला आहे कीं आद्य पुरुष जो सगुण भगवंत त्यास पावेन अशी श्रद्धा ठेवून प्रपंचाश्वत्थांत निर्गुण धुंडावें; कारण निर्गुणज्ञानाशिवाय सगुणभक्ति घडत नाहीं. या प्रपंचाश्वत्थांत निर्गुण धुंडून सगुण कसें पावावें हें चतुर्थ चरणांत सगुण जगत्कारणाची खूण सुचवून सांगितलें आहे. "**यतः**" ह्मणजे ज्या सगुण जगत्कारणापासून अनादि प्रवृत्ति पसरली आहे त्यास पावावें असा चतुर्थ चरणांतील भाव आहे. ईश्वराची कल्पनारूपवृत्तीच मायेची प्रवृत्ति होय. ही ईश्वराची कल्पनावृत्ति अनादि आहे असें "**पुराणी**" शब्दानें सुचविलें आहे. या विषयाचें विवेचन सातव्या अध्यायांतील "**अपरेयमितस्त्वन्यां**" या श्लोकाचे टीकेंत केलें आहे, तें पहावें. एकंदरींत या चतुर्थ चरणानें असें दर्शविलें आहे कीं, सर्व सृष्टि ईश्वर कल्पितो व ती तो आपणच होतो, ह्मणून सर्व विश्व भगवद्रूप पाहिल्यानें आद्य पुरुष जो सगुण भगवंत त्याची प्राप्ति होते.

असें पद ज्यास प्राप्त झालें त्याचीं लक्षणें या पुढील श्लोकांत दिलीं आहेत.

**निर्मानमोहा जितसंगदोषा**
**अध्यात्मनित्या विनिवृत्तकामाः ।**
**द्वंद्वैर्विमुक्ताः सुखदुःखसंज्ञैः**
**र्गच्छन्त्यमूढाः पदमव्ययं तत् ॥ ५ ॥**

**अर्थ**–ज्यांचा अभिमान आणि मोह गेला आहे, ज्यांनीं वासनादोष जिंकिला आहे, जे अध्यात्मनिष्ठ असतात, ज्यांच्या कामना विशेषेंकरून नाहींशा झाल्या असतात व सुखदुःखरूपी द्वंद्वांपासून जे मुक्त झाले आहेत, असे ज्ञाते पुरुष त्या अव्ययपदास पोंचतात.

**टीका**–देहाभिमान नाहींसा झाला ह्मणजे ममता नाहींशी होते. तेंच निर्मोहाचें लक्षण होय. विषयवासना नाहींशी झाल्याशिवाय मोह जात नाहीं. " **संग** " शब्दानें विषयसंग समजावा. " **अध्यात्मनिष्ठ** " ते होत कीं, ज्यांची निष्ठा अध्यात्माचे ठायीं असते. अध्यात्म ह्मणजे स्वभाव असें यापूर्वी सांगितलेंच आहे. स्वभाव ह्मणजे आपणच सर्वत्र आहों अशी भावना होय. ती झाली ह्मणजे कामना मुळींच राहत नाहींत. कामना नाहींशा झाल्या ह्मणजे सुखदुःख, मानापमानादि द्वंद्वांपासून मनुष्य मुक्त होतो व तो अव्यय ह्मणजे प्रलयकाळीं ज्यास व्यथा होत नाहीं अशा भगवत्साधर्म्यपदास पावतो. त्या पदाचें वर्णन उत्तर श्लोकीं केलें आहे.

**न तद्भासयते सूर्यो न शशांको न पावकः ।**
**यद्गत्वा न निवर्तन्ते तद्धाम परमं मम ॥ ६ ॥**

**अर्थ**–सूर्य, चंद्र व अग्नि हे ज्यास प्रकाशित करीत नाहींत व जेथें गेल्यावर पुनरावृत्ति नाहीं, तें माझें उत्कृष्ट धाम होय.

टीका—या श्लोकांतील "तत्" शब्दानें पूर्वोक्ति सुचविली आहे. ती उक्ति "सर्गेपि नोपजायन्ते प्रलये न व्यथन्ति च" ही होय. यावरून "तद्धाम" शब्दानें सगुण मोक्ष सुचविला आहे. असें समजण्यास दुसरेंहि एक सबळ कारण आहे. सगुण मोक्ष ह्मणजे शुद्धसत्वरूप होय. सत्व प्रकाशमय आहे हें यापूर्वीं सांगितलेंच आहे. तें स्वतःच प्रकाशवंत आहे. ह्मणून सूर्यचंद्रादिकांच्या प्रकाशाची त्यास जरूर नाहीं, असें पूर्वार्धांत ह्मटलें आहे. शिवाय अर्जुनानें जेव्हां हें सगुणरूप पाहिलें तेव्हां त्यानें ह्मटलें आहे कीं, "**किरीटिनं गदिनं चक्रिणं च तेजोराशिं सर्वतो दीप्तिमंतं। पश्यामि त्वां दुर्निरीक्ष्यं समंताद् दीप्तानलार्कद्युतिमप्रमेयम्**" यावरून तर "**तद्धाम**" शब्दानें शुद्धसत्वरूप वैकुंठ सुचविला आहे, याविषयीं किंचित्‌हि शंका राहत नाहीं.

आतां, हा मोक्ष ज्या जीवास मिळतो त्याचें स्वरूप काय हें या पुढील श्लोकांत स्पष्ट करून सांगितलें आहे.

**ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः।**
**मनः षष्ठानींद्रियाणि प्रकृतिस्थानि कर्षति ॥ ७ ॥**

**अर्थ**—जीवलोकांत जीव झालेला माझा अंश सनातन आहे. प्रकृतींत असणारीं पांच इंद्रियें आणि सहावें मन यांस आकर्षण करून तो त्यास देहांतरास नेतो.

**टीका**—जीव ज्याचा अंश आहे तो सगुण भगवंतच होय, व त्यावेगळे इतर देव त्याचेच अंश आहेत असें "**ममैवांशः**" यांतील "**एव**" शब्दानें सुचविलें आहे. आतां, हा अंश भगवंताशीं ऐक्यानें आहे किंवा वेगळा आहे याचा विचार केला पाहिजे. "**अंश**" हा शब्दच ऐक्य दर्शवितो. अंशाचा आणि ज्याचा तो भाग आहे त्याचा धर्म समान

असतो. सोन्याचा अंश सोनेंच असतें; तांबें अथवा पितळ कधींहि होणार नाहीं. याकरितां, जीव सनातन आहे असें ह्मटलें आहे. आतां चैतन्य अनाद्यंत आहे. त्याचा अंश कसा समजावा ही अडचण येते. कारण मूळापासून अंश वेगळा असल्याखेरीज त्याचें ज्ञान होऊं शकत नाहीं. आकाशाप्रमाणें चैतन्य सर्वव्यापक आहे. त्यांत त्याचे अंशास कोठें ह्मणून पहावें? यावरून चैतन्य आणि त्याचा अंश यांचें ऐक्य आहे असें ह्मटलें पाहिजे. असें असून "माझा अंश" ह्मटल्यानें भिन्नत्व-हि सुचविलें आहे. हें भिन्नत्व कशा प्रकारें घडूं शकतें असा गूढ प्रश्न एथें उत्पन्न होतो. चैतन्य तर अनाद्यंत आहे. त्यावांचून रितें स्थळच नाहीं. असें स्थळ असतें तर त्याचा वेगळा तुकडा तेथें पाहतां आला असता. बरें, त्याचा अंश वेगळा होऊन त्यांतच असतो अशी क्लिष्ट कल्पना करावी तर तीहि सिद्ध होऊं शकत नाहीं, कारण चैतन्य अपरिच्छिन्न आहे ह्मणजे सबंध आहे. आतां जें छिन्नच होऊं शकत नाहीं त्याचा भिन्न अंश तरी कसा समजावा असें कोडें उत्पन्न होतें. यावर आणखीहि एक कल्पना करितां येते. आकाशाचा तुकडा पाडतां येत नाहीं तरी घट, मठ, इत्यादिकांमुळें घटाकाश, मठाकाश असा त्याचा भेद होऊं शकतो तशा भेदानें देहांत जीव असतो असें समजलों तरी त्यासहि बाध येतो. कारण हलविल्यानें त्यांतील आकाश हलत नाहीं, तथापि उपाधियोगें जीवास सुखदुःखाचा भोग होतो, तेव्हां तो चलन पावतो. ह्मणून याहि युक्तीनें त्या अंशाचा चांगला बोध होत नाहीं. घटकाशाप्रमाणें जो सर्वगत चैतन्यांश देहांत असतो, तो कूटस्थ भगवंत होय. त्यास भोग घडूं शकत नाहीं व जड उपाधीसहि तो होऊं शकत नाहीं. तेव्हां या तत्वास वचावून जीवाचें रूप करण्यास एकच मार्ग उरतो. तो हा कीं. घटांत आकाश असतें त्याप्रमाणें देहांत कूटस्थ चैतन्य आहे असें समजावें. व घटामध्यें पाणी असतें तसें जीवोपाधिसत्व

आहे असें समजावें. घटांतील जळांत जसें सूर्याचें प्रतिबिंब पडतें तसें या सत्वोपाधींत कूटस्थाचें प्रतिबिंब पडतें असें मानावें. सूर्याचें प्रतिबिंब पाण्यापुरतेंच असतें, तसें चिदंशप्रतिबिंबहि सत्वोपाधीपुरतें असतें. असें प्रतिबिंब जीवाचें रूप होय, व यासच भोग घडतात. हें सत्वरूप जळ उपाधीमुळें हललें ह्मणजे प्रतिबिंब चंचळ होतें. या सत्वांत तमाचा कर्दम मिळाला ह्मणजे तें गढूळ होतें, व त्यामुळें प्रतिबिंब नाहींसें होऊन कूटस्थ बिंबांत मिळून जातें. या स्थितीस सुषुप्ति अथवा गाढ झोंप ह्मणतात. हा तमरूपी गाळ खालीं बसून सत्वजळ निर्मळ झालें ह्मणजे ती जागृति होय. सत्वाचें आणि तमाचें साधारण ह्मणजे कांहीं गढूळ व कांहीं निवळ असें मिश्रण होतें ती स्वप्नावस्था होय. या अवस्थेंत रजोगुणेंकरून प्रतिबिंब स्वप्न भोगितें. सुषुप्तीचें आणि प्रळयकाळाचें लक्षण एकच आहे. तेव्हां जीव ब्रह्मीं लीन होतात, पण अविद्येसहित असतात ह्मणून पुन्हां त्यांची उत्पत्ति होते. या विषयाचें स्पष्टीकरण नवव्या अध्यायांतील "**सर्व भूतानि कौंतेय प्रकृतिं यान्ति मामिकां**" या श्लोकाचे टीकेंत केलें आहे. जेव्हां तें सत्व बिंबरूप चैतन्यास ओळखतें व बिंबासच सर्वदा धरून राहतें, तेव्हां त्यांचें ऐक्य होतें. या स्थितीसच मुक्ति ह्मणतात. अशी मुक्ति या जीवास मिळते व तो सनातन आहे या दोन्ही गोष्टी "**ममैवांशः**" पदानें सुचविल्या आहेत. बिंबांत प्रतिबिंबाचे मिसळण्यानें प्रतिबिंबाचा नाश होत नाहीं. सत्व हा कांचेचा आरसा आहे. कांचेंत प्रतिबिंब दिसण्याकरितां त्याचे मागें लेप लाविला असतो. तसा सत्वरूप कांचेस रजतमाचा लेप असला ह्मणजे प्रतिबिंबरूप जीवभाव उत्पन्न होतो. रजतमरूप लेपाचा नाश झाला म्हणजे जीवरूप प्रतिबिंबाचा उदय होत नाहीं व मग सर्वत्र चित्स्वरूपाचा अनुभव होतो. निर्गुणोपासकांचें सत्वहि नाहींसें होतें, म्हणून ते निवळ निर्गुण बनतात व त्यांस कोणतेच प्रकारचा अनुभव राहत नाहीं. अस्तु. याप्रमाणें

चिदंश भोक्त्याचें रूप स्पष्ट झालें. परंतु एथें एक पूर्वापर विरोध दिसतो त्याचा निकाल केला पाहिजे. तो विरोध असा कीं, सातव्या अध्यायांत " अपरेयमितस्त्वन्यां " या श्लोकांत जी पराप्रकृति वर्णन केली आहे. तिलाच " जीवभूता " असें म्हटलें आहे; व या ठिकाणीं चिदंशास " जीवभूत " म्हटलें आहे. या विरोधाचा परिहार झाला म्हणजे प्रतिबिंबन्यायें जीवाचे स्वरूपाचा निर्विवाद निश्चय झाला असें म्हणण्यास कांहींच हरकत राहत नाहीं. पाण्यामध्यें सूर्याचें मंडळ प्रतिबिंबित होतें. तें पाणीच तद्रूप होतें. त्याप्रमाणें सत्वरूपी परा प्रकृतिच जीव होते. म्हणून तिला " जीवभूता " म्हटलें आहे. पण तिला एकटीलाच जीवभूता ह्मणतां येत नाहीं, कारण उदक आणि सूर्य या दोहींचा संयोग झाल्याखेरीज प्रतिबिंब दिसत नाहीं. तद्वत् सत्वरूपी पराप्रकृति व कूटस्थ चिदंश यांचा संयोग झाल्याखेरीज प्रतिबिंबरूपी जीव उत्पन्न होत नाहीं. म्हणून चिदंशासहि जीवभूत म्हटलें आहे. या चिदंशास भोक्तृत्व आहे म्हणून त्यास बंध होतो. त्याचें लक्षण उत्तरार्धानें सांगितलें आहे. पांच इंद्रियें आणि मन त्याचे भोगाचें साधन होत. हीं प्रकृतींत असतात व त्यांस चिदंश जीव आकर्षण करितो असें म्हटलें आहे. या ठिकाणीं देहास प्रकृति ह्मटलें आहे. या देहांत असणाऱ्या या विकारांस आकर्षण करून जीव देहांतरास जातो, असा या उत्तरार्धाचा अर्थ आहे. यासहित जीव देहांतरास जातो म्हणजे तो आपला बंध आपल्या बरोबर घेऊन जातो. बंधक कर्मांचे संस्कार लिंगदेहांत राहतात असें यामागें " कर्मानुबंधीनि मनुष्यलोके " या चरणाचे टीकेंत सांगितलें आहे. त्या लिंगदेहास घेऊन जीव देहांतरास जातो. लिंगदेहांत १७ तत्वें असतात. त्या सर्वांचा बोध या सहा तत्वांनींच केला आहे. तो असाः—मन शब्दानें बुद्धिहि सुचविली आहे. पांच ज्ञानेंद्रियें ह्मणतां पांच कर्मेंद्रियेंहि सुचविलीं आहेत, कारण कर्मेंद्रियांशिवाय ज्ञानेंद्रियें

कांहींच करूं शकत नाहींत. त्याचप्रमाणें पंचप्राणांशिवाय कर्मेंद्रियेंहि कांहीं करूं शकत नाहींत. अशीं हीं १७ तत्वें सुचविलीं आहेत. अशा लिंगदेहासहित जीव देहांतरास जातो. हेंच तत्व पुढील श्लोकानें जास्त स्पष्ट करून सांगितलें आहे.

**शरीरं यदवाप्नोति यच्चाप्युत्क्रामतीश्वरः ।**
**गृहीत्वैतानि संयाति वायुर्गंधानिवाशयात् ॥ ८ ॥**

**अर्थ**–पुष्पांपासून वायु जसा सुगंध घेऊन जातो तसा हा देहाचा स्वामी जीव त्यास टाकून दुसऱ्या देहांत जातो, तेव्हां या लिंगदेहास बरोबर घेऊन जातो.

**श्रोत्रं चक्षुः स्पर्शनं च रसनं घ्राणमेव च ।**
**अधिष्ठाय मनश्चायं विषयानुपसेवते ॥ ९ ॥**

**अर्थ**–कान, डोळे, त्वचा, जीभ आणि नाक व मन यांचे ठायीं राहून तो शब्दादिविषयांचें सेवन करितो.

**टीका**–चिदंश जीवच भोक्ता आहे. तो इंद्रियें आणि मन यांचे ठायीं राहून, त्यांचे साधनानें विषयांचा उपभोग घेतो. पूर्वार्धांत पांच ज्ञानेंद्रियेंच सांगितलीं आहेत, तथापि "एव च" यांतील "च" कारानें कर्मेंद्रियें सुचविलीं आहेत. इंद्रियांप्रमाणें मनाहि भोगांचें साधन आहे. चमचाचे साह्यानें आपण जिभेनें रसाचा स्वाद घेतों. त्याप्रमाणें मनाचे साह्यानें जीव इंद्रियद्वारा विषयांचा उपभोग घेतो, असें भगवान् ह्मणतात. कित्येक गृहस्थ मनाकडे भोक्तृत्व लावतात. पण तें भगवदुक्ती-विरुद्ध आहे हें सांगणें नको. मनास भोक्तृत्व आहे असें समजणारे लोक चांगल्या अधिकाराचे होते. यामुळें पुष्कळ लोकांस हें त्याचें मत खरें वाटत आहे. ती गैरसमजूत निघावी एवढ्याच हेतूनें त्या

मताचे साधकबाधक प्रमाणांचा विचार करून, खरें तत्व समजावून देण्याचा यत्न केला पाहिजे. मनाप्रमाणें इंद्रियांसहि अधिष्ठून जीव विषयांचा उपभोग घेतो असें या श्लोकांत ह्मटलें आहे. यावरून इंद्रियें आणि मन हीं चिदंशाचीं भोगसाधनें होत. त्यांचे ठायीं राहून चिदंश विषयांचा उपभोग कसा घेतो हें दृष्टांतानें स्पष्ट करितांनाच, तो हे उपभोग कोणते रूपानें घेतो हें दाखवितां येईल. चिदंशास अग्नि मानावें व इंद्रियें आणि मन यांस लोखंड समजावें. तापविलेल्या लोखंडाचे संगतीनें अग्निसहि पिटितात, तरी घणाचे घावांचा परिणाम लोखंडावर मात्र होतो. त्याप्रमाणें विषयोपभोगांचा परिणाम मनावर व इंद्रियांवर होतो. यावरून चिदंशास भोक्तृत्व नाहीं असें मानिलें तर या श्लोकाचा ओघ असा होईल कीं चिदंशास अधिष्ठून मन आणि इंद्रियें विषयांचा उपभोग घेतात. परंतु हें भगवदुक्तीस विरुद्ध होतें. तो विरोध एके बाजूस ठेवून तरी मनास भोग घडतो हें मत टिकतें कीं काय हें पाहूं. मनास भोक्तृत्व आहे असें मानिलें, तर श्लोकांतील शब्दरचनेवरून इंद्रियांसहि तें आहे असें म्हटलें पाहिजे. प्रत्यक्षप्रमाणानें पाहूं गेलों तर मनास भोग होतो असें म्हणण्यापेक्षां इंद्रियांस तो होतो हें म्हणणें जास्त चांगलें दिसतें. धनुष्यावांचून बाण दुसऱ्याचा जीव घेऊं शकत नाहीं, तसें मनाच्या साह्यावांचून ज्ञानेंद्रियें विषयांचा भोग घेऊं शकत नाहींत. म्हणून धनुष्याप्रमाणें मनासच थोरपण देऊन त्यासच भोग घडतो असें म्हणावें, तर तसें निभतां दिसत नाहीं. एक म्हणतो कीं बाणच प्राणांचें हरण करितो. दुसरा म्हणतो, छीः धनुष्यावांचून बाण व्यर्थ आहे, म्हणून धनुष्यच प्राणांचें हरण करितें. एका हिशोबीं ते दोघेहि खरे दिसतात व दुसरे हिशोबीं ते दोघेहि खोटे ठरतात कारण खरें पाहूं गेलें असतां बाण हाणणाराच प्राणहर्ता आहे असें म्हटलें पाहिजे. बाण जसे अचेतन आहेत तसें धनुष्यहि अचे-

तन आहे; व इंद्रियें जशीं जड आहेत तसेंच मनहि जड आहे; आतां मनावांचून इंद्रियें व्यर्थ आहेत, त्याप्रमाणें धनुष्यावांचून बाणहि व्यर्थ आहेत. मन सर्व इंद्रियांस जाणतें तसें धनुष्याहि सर्व बाणांस हाणितें. अशी या दृष्टांताची सर्व प्रकारें साम्यता घडते, तेव्हां निदानहि सारखेंच घेतलें पाहिजे. ह्मणजे बाण हाणणारा जसा प्राणहर्ता समजला जातो, तसा मनास आणि इंद्रियांस स्फूर्ति देणारा चिदंश भोक्ता आहे असें समजलें पाहिजे. आतां, एकाचे जेवणानें दुसऱ्यास तृप्ति होत नाहीं या न्यायानें इंद्रियांस भोग घडतो तो मनास घडत नाहीं अशी कल्पना केली तर तीहि व्यर्थ होते. गर्भिणी जेऊन तृप्त झाली ह्मणजे आंतील गर्भासहि तृप्ति असते. पण तेंच बालक गर्भाबाहेर आलें ह्मणजे मातेच्या खाण्यानें त्याचे भुकेची शांति होत नाहीं. याप्रमाणें इंद्रियांबाहेर मन निराळें असतें, तर त्यास इंद्रियांचे भोगानें तृप्ति झाली नसती. पण तें त्यांतच आहे ह्मणून इंद्रियद्वारा त्यास विषयतृप्ति होते. तथापि तें जड आहे, ह्मणून चिदंशास भोग घडतो असें भगवान् ह्मणतात. एवंच मनास भोक्तृत्व आहे असें ह्मणणें प्रमाणविरुद्ध व अनुभवविरुद्ध आहे. आतां, भोगच मिथ्या आहे असें म्हटलें, तरी तो मनास घडूं शकत नाहीं. स्वप्न जरी मिथ्या आहे तरी तें असेपर्यंत स्वप्न पाहणाऱ्यास तें खरेंच वाटतें व त्याचा सुखदुःखयोगहि त्यास घडतो. दोराचे ठायीं भासणारा सर्प खोटा असतो, तरी भयकम्पादि परिणाम द्रष्ट्यास सोसावे लागतात. ज्यास असा अनादि भोगसंबंध असतो त्यालाच अनादि अज्ञानबंध असतो, व ज्यास बंध होतो तोच मोक्ष पावतो असें म्हटलें पाहिजे. मनास भोग आहे असें मानिलें, तर मोक्षाचा योगहि त्यासच होतो असें मानिलें पाहिजे. ज्यास मोक्ष ह्मणजे सुटका मिळते त्याला नाश नसावा. परंतु कैवल्यमोक्षांत मनाचा नाश होतो. मिथ्या सर्पास पाहून भयकंप पावतो अथवा स्वप्नांतील सुखदुःखानें सुखी दुःखी होतो असा चिद्रूप चित्स्वरूपाचा अंश या मिथ्याभासाचा द्रष्टा असतो. त्यास गुरुकृपेनें

जागृति होते, तेव्हां तो मिथ्या बंधापासून मुक्त होतो. तो प्रकृतिशृंखलेनें बद्ध असतो. अशुद्ध मन त्या शृंखलेचा खिळा होय हें सत्वरूपी मन रजतमावेगळें झालें ह्मणजे शुद्ध होतें. तेव्हां त्या चिदंशास मोक्ष मिळतो. अशा रीतीनें हें मनच बंधास आणि मोक्षास कारणीभूत आहे, असें "**मन एव मनुष्याणां कारणं बंधमोक्षयोः**" या सुप्रसिद्ध उक्तीनें सांगितलें आहे. या सर्व कारणांवरून मनास भोग नाहीं, बंध नाहीं व मोक्षहि नाहीं व ते प्रतिबिंबरूपी चिदंशास आहेत. हें सिद्ध झालें. या पूर्वी सांगितलेल्या अग्निलोहदृष्टांतानें सर्वगत चिदंशास भोग घडत नाहीं असेंच सिद्ध होतें; परंतु जड मनास अथवा इंद्रियांसहि तो घडूं शकत नाहीं, ह्मणून तो त्याचे प्रतिबिंबास घडतो असें म्हणणें भाग पडतें. चैतन्यास भोग घडूं शकत नाहीं व जड मन आणि इंद्रियें यासहि तो घडूं शकत नाहीं, या परस्परविरुद्ध दिसणाऱ्या तत्वांची एकवाक्यता समजविण्याकरितां प्रतिबिंबदृष्टांताची केवळ प्रक्रिया आहे. म्हणजे या दोन्ही गोष्टी खऱ्या असणें कसें शक्य आहे हें दाखविण्याकरितां दृष्टांतरूपानें स्पष्टीकरण केलें आहे; असें समजावें. उपाधीमुळें अहंकार उत्पन्न होतो तोच जीव होय. तो अहंकार नाहींसा झाला म्हणजे प्रतिबिंबरूपी जीवाचें चैतन्यरूपी बिंबाशीं ऐक्य होतें असें म्हटलें आहे. हा सर्व खटाटोप निःसंशय शब्दज्ञान होण्याकरितां करावा लागतो. जीवाचे आणि ईश्वराचे स्वरूपाचा खरा बोध अनुभवाशिवाय होणें नाहीं असें पक्कें समजावें.

**उत्क्रामन्तं स्थितं वापि भुंजानं वा गुणान्वितम् ।**
**विमूढा नानुपश्यन्ति पश्यन्ति ज्ञानचक्षुषः ॥ १० ॥**

**अर्थ**—तो देह सोडून कसा जातो, देहांत कसा राहतो, गुणांनीं युक्त होत्साता भोग कसे भोगितो, हें मूढांस दिसत नाहीं. परंतु ज्यांस ज्ञानदृष्टि आहे ते पाहतात.

टीका–प्राणप्रयाणकाळीं लिंगदेहासहित हा जीव एक देह सोडून दुसऱ्या देहांत जातो, तें त्याचें उत्क्रमण होय. हें उत्क्रमण कसें होतें हें चर्मचक्षूनें दिसत नाहीं, तरी विचारदृष्टीनें याची खात्री करून घेतां येते. ती कशी करावी याचें विवेचन यापूर्वी झालें आहे. हें अज्ञ जनांचे जीवांचें उत्क्रमण होय. पण जो ज्ञानी जिताच ब्रह्म झाला, त्याला जीवाचें भिन्नत्व दिसतच नाहीं. तोच या जीवाचें उत्क्रमण खरे रीतीनें जाणतो. नदीतटाचें प्रतिबिंब नदीचे जळांत पडतें. पण नदीचें पाणी वाढून तटावर चढलें म्हणजे प्रतिबिंब दिसेनासें होतें. तद्वत् आपले देहांत जो आत्मा आहे तो सर्वत्र दिसूं लागला म्हणजे उपाधिरूप सत्व चिन्मय होऊन जातें व प्रतिबिंबरूपी जीव चैतन्यबिंबांत मिळून जाऊन त्यांचें ऐक्य होतें. प्रारब्धभोगाचे वेळीं जीवभाव उत्पन्न होतो व भोग सरला म्हणजे जीवभाव नाहींसा होतो. अशा रीतीनें ज्ञानी पुरुष जीवाचें उत्क्रमण वारंवार पाहतो. प्रारब्ध सरून देहपात झाला म्हणजे त्याचे जीवाचें आणि चैतन्यरूपी ईश्वराचें कायमचें ऐक्य होतें. प्रारब्धभोग-काळीं जीवभाव उत्पन्न होतो तो कोठून बाहेरून येत नाहीं, तो देहांतच असतो. भोगकाळ आला म्हणजे ज्ञानदृष्टीनें त्यास पाहतां येतें, एकच बुद्धि या भोक्त्या चिदंशास व सर्वगत चिदंशास पाहते. घरांत दिवा असतो त्याचा उजेड सर्व घरांत पडतो, पण दिव्याखालीं पाणी ठेविलें असलें तर त्यांत जें त्याचें प्रतिबिंब पडतें त्याचा प्रकाश त्या पाण्यापुरताच असतो. उपाधीमुळें पाण्यांतील प्रतिबिंब हलतें, पण दिव्याचा प्रकाश अचळ असतो. दिव्याच्या प्रकाशानें आपले डोळे त्या दिव्यास व प्रतिबिंबास एकाच वेळीं पाहतात. तद्वत् देहांतील सर्वगत चैतन्य व भोगकाळीं उत्पन्न झालेला प्रतिबिंबरूपी जीवभाव या दोहोंसहि एकच बुद्धि एकसमयावच्छेदेंकरून पाहते. आत्मानुभवाचे वेळीं पुरुष अभोक्ता दिसतो व भोगकाळीं तो भोक्ता दिसतो. अशीं हीं चैतन्याचीं

दोन रूपें विचारदृष्टीनें दिसतात. आत्म्याचें ज्ञान होऊनहि जड मनाकडे जे भोक्तृत्व लावितात त्यांस विमूढ म्हणजे विशिष्ट मूढ म्हटलें आहे. भोगकाळ आला म्हणजे अहंप्रत्यय धरून चिदंश जीव गुणमय होतो व विषय सेवन करितो. हेंहि विचारदृष्टीनेंच पाहतां येतें.

**यतंतो योगिनश्चैनं पश्यन्त्यात्मन्यवस्थितम् ।**
**यतंतोऽप्यकृतात्मानो नैनं पश्यन्त्यचेतसः ॥ ११ ॥**

**अर्थ**—यत्न करणारे योगी या चिदंशास आपले देहांत पाहतात. परंतु असा यत्न करित असूनहि जे त्यास पाहत नाहींत ते अकृतात्मे बुद्धिहीन होत.

**टीका**—ज्ञानयुक्त योगी या चिदंशास भोगकाळीं पाहतात असें पूर्वार्धानें सांगितलें आहे. परंतु सर्वगत आत्म्याचें ज्ञान होऊन, तें ज्ञान पक्क होण्याकरितां यत्न कारित असूनहि जे या चिदंशास पहात नाहींत ते "**अचेतसः**" ह्मणजे बुद्धिहीन होत असें ह्मणून त्यांस "**अकृतात्मनः**" असेंहि ह्मटलें आहे. "आत्मा" ह्मणजे "बुद्धि" व "अकृत" ह्मणजे "केली नाहीं" असा या पदाचा अर्थ आहे. यावरून ज्यांनीं आपली बुद्धि निःसंदेह केली नाहीं ते अकृतात्मे होत असा बोध होतो. जड मनास भोग होऊं शकत नाहीं व सर्वगत चैतन्यासहि तो घडूं शकत नाहीं, तेव्हां तो कोणास होतो या संदेहाची ज्यांनीं निवृत्ति केली नाहीं ते "**अकृतात्मे**" होत असें भगवान् या श्लोकानें सुचवितात. यावरून स्पष्ट होतें कीं, ज्यास या भोक्त्या चिदंशाचें ज्ञान झालें आहे तोच खरा ज्ञानी होय.

हे जीवप्रकरण "**न तद्भासयते सूर्यो**" या श्लोकापासून सुरू होऊन येथें संपलें. त्या श्लोकांत असें सांगितलें आहे कीं, सूर्य, चंद्र ज्या स्थळास प्रकाशित करित नाहींत तें भगवद्धाम ह्मणजे वैकुंठ होय.

सर्व जगतास सूर्य, चंद्र प्रकाश देतात पण वैकुंठास कां देऊं शकत याचें स्पष्टीकरण उत्तर श्लोकानें केलें आहे.

**यदादित्यगतं तेजो जगद्भासयतेऽखिलम् ।**
**यच्चंद्रमसि यच्चाग्नौ तत्तेजो विद्धि मामकम् ॥ १२ ॥**

**अर्थ**—सूर्यांत जें तेज आहे, चंद्र आणि अग्नि यांत जें तेज आहे व इतर तेजस्वी वस्तूंत जें तेज आहे, तें अखिल जगास प्रकाशित करणारें माझें तेज आहे असें समज.

**टीका**—"सर्व जगास प्रकाशित करणारें जें तेज सूर्यांत आहे" असा बहुत टीकाकार या पूर्वार्धाचा अर्थ करितात, परंतु तो चुकीचा आहे. अखिल जग ह्मणजे अशेष जग होय. सकळ इंद्रियें आणि विषय मिळून असें अखिल जग आहे. सूर्य, चंद्र व अग्नि सर्व इंद्रियांस व त्यांचे विषयांस प्रकाशित करूं शकत नाहींत. फक्त रूप आणि नेत्र यांचा प्रत्यय सूर्य, चंद्र आणि अग्नि यांकरितां होतो. यांचे तेजावांचून सर्व कर्मेंद्रियें आणि नेत्र खेरीज करून बाकीचीं चार ज्ञानेंद्रियें आपआपळीं कर्में करूं शकतात, हें सामान्य बुद्धीसहि कळतें. आतां नेत्र आणि रूप यांचा प्रत्यय सूर्य, चंद्र अथवा अग्नि यांचे तेजावांचून होतच नाहीं असें ह्मणावें, तर नेत्रांस अंधाराचें रूप सूर्यतेजावांचून दिसतें. तें कोणते तेजानें दिसतें बरें ? नेत्रांचा अभिमानी सूर्य आहे, ह्मणून त्याचेच तेजानें अंधाराचें रूप दिसतें असें ह्मणावें, तर नेत्रांत असलेल्या सूर्यानें अंधाराचा नाश कां होऊं नये ! एवंच ज्या तेजानें अंधारहि भासतो असें अखिल जगास भासविणारें तेज निराळें आहे असें उघड सिद्ध होतें. तें तेज चित्प्रकाश होय. "**यच्चाग्नौ**" यांतील "**च**" कारानें इतर तेजरूप वस्तूंतील तेजांची सूचना केली आहे. यावरून या टीकेंत केलेला अर्थच यथार्थ आहे हें

कोणाहि विचारवंत मनुष्यास दिसल्याखेरीज राहणार नाहीं. प्रसंगो-पात्त या श्लोकानें आपला ऐश्वरयोगहि भगवंतांनीं सांगितला आहे. या पुढील दोन श्लोकांत ते विभूति सांगतात.

**गामाविश्य च भूतानि धारयाम्यहमोजसा ।**
**पुष्णामि चौषधीः सर्वाः सोमो भूत्वा रसात्मकः ॥ १३ ॥**

**अर्थ**—मी पृथ्वीमध्यें प्रवेश करून स्वबळानें सर्व प्राण्यांचें धारण करितों, आणि रसमय सोम होऊन औषधींचें पोषण करितों.

**टीका**—श्लोकाचा भावार्थ स्पष्ट असल्यामुळें टीका करण्याचें प्रयोजन नाहीं.

**अहं वैश्वानरो भूत्वा प्राणिनां देहमाश्रितः ।**
**प्राणापानसमायुक्तः पचाम्यन्नं चतुर्विधम् ॥ १४ ॥**

**अर्थ**—मी जठराग्नि होऊन प्राण्यांचे शरीरांचा आश्रय करितों व प्राण आणि अपान यांच्याशीं युक्त होत्साता चारी प्रकारचें अन्न पचवितों.

**टीका**—अन्नाचे चार प्रकार आहेत. भक्ष्य, भोज्य, लेह्य आणि चोष्य. दांतांनीं चावून खाण्याचे अन्नास "**भक्ष्य**" ह्मणतात. दांतांवांचून नुसते गिळण्याचे अन्नास "**भोज्य**" ह्मणतात. "लेह्य" ह्मणजे चाटण्याचें अन्न व "**चोष्य**" ह्मणजे चोंखून खाण्याचें अन्न होय. प्राण आणि अपान हे जठराग्नीचे भाते होत. त्यांचे साह्यानें जठराग्नि प्रदीप्त होऊन अन्नास पचवितो.

**सर्वस्य चाहं हृदि सन्निविष्टो मत्तः स्मृतिर्ज्ञानमपोहनं च ।**
**वेदैश्च सर्वैरहमेव वेद्यो वेदांतकृद्वेदविदेव चाहम् ॥ १५ ॥**

**अर्थ**—सर्वांच्या हृदयांत मी प्रवेश करून असतों. मजपासूनच स्मृति ज्ञान, आणि विस्मरण उत्पन्न होतात. वेदांच्या साधनानें जाणण्याची वस्तु मीच आहें. वेदांताचा कर्त्ता मी आहें, व वेदजाणताहि मीच आहें.

**टीका**—सर्वांच्या हृदयांत भगवंत आहे. तो अनंत असून सूक्ष्म अशा हृदयांत त्याचा प्रवेश कसा झाला? जळामध्यें अंतरहित आकाश प्रतिबिंबरूपानें प्रवेश करितें. त्याप्रमाणें सत्वरूप अंतःकरणांत प्रतिबिंब-रूपानें ईश्वर प्रवेश करितो. तोच चिदंश जीव होय. हा जीवात्मा आपलीच विभूति आहे असें "**अहमात्मा गुडाकेश**" या श्लोकानें दहाव्या अध्यायांत सांगितलें आहे. या मागील दोन श्लोकांनीं जड भाग आपण आहों व या श्लोकानें चिदंशहि आपणच आहों असें भगवान् सांगतात. "**स्मृति**" म्हणजे आत्मस्मृति, "**ज्ञान**" म्हणजे सर्वात्मकज्ञान, व "**अपोहन**" म्हणजे आत्मस्मृतीची विस्मृति होय. हे सर्व भगवंतापासूनच मिळतात, असें दुसरे चरणानें सांगितलें आहे. "जडदेह नव्हे, सर्वव्यापक आत्मा आहे" अशा स्मृतीस "**आत्म-स्मृति**" म्हणावी. सर्व जड प्रपंच आत्मस्वरूप आहे अशा ज्ञानास "**ज्ञान**" म्हणावें. वेदवचनानें जाणावयाची वस्तु भगवंतच होय, असें तिसऱ्या चरणांत सांगून, चवथ्या चरणांत सांगितलें आहे कीं, वेदान्तकर्ता **व्यास** भगवद्विभूति आहे.

**द्वाविमौ पुरुषौ लोके क्षरश्चाक्षर एव च ।**
**क्षरः सर्वाणि भूतानि कूटस्थोऽक्षर उच्यते ॥ १६ ॥**

**अर्थ**—या लोकीं दोन प्रकारचे पुरुष आहेत; एक क्षर आणि दुसरा अक्षर. सर्व भूतें क्षर पुरुष होय व कूटस्थ अक्षर पुरुष होय असें म्हणतात.

**टीका**—"**पुर**" म्हणजे शरीर. त्यांत राहणारा तो पुरुष होय. नश्वर भाग एके प्रकारचा पुरुष व अक्षर जीव दुसरे प्रकारचा पुरुष होय, असें भगवान् म्हणतात. हा अक्षर पुरुष सर्व देहास व्यापून असतो. तो उपाधीच्या मानानें सूक्ष्मांहून सूक्ष्म असतो व मोठ्यांहून

मोठा असतो. शरीराचे कोणत्याहि भागांत सुखदुःख झालें तरी जीवास त्याचा अनुभव होतो, हें सर्वांच्या अनुभवांत आहे. ह्मणून या संबंधांत जास्त स्पष्टीकरण करण्याचें प्रयोजन दिसत नाहीं. या दोन प्रकारच्या पुरुषांहून श्रेष्ठ असा पुरुष आहे तो या पुढच्या श्लोकानें सांगितला आहे.

**उत्तमः पुरुषस्त्वन्यः परमात्मेत्युदाहृतः ।**
**यो लोकत्रयमाविश्य बिभर्त्यव्यय ईश्वरः ॥ १७ ॥**

**अर्थ**—या दोन पुरुषां सारिखाच असून त्यांहून निराळा म्हणविला जातो असा उत्तम पुरुष आहे. त्याला "**परमात्मा**" ह्मणतात. तो लोकत्रयांत प्रवेश करून त्यांचें धारणपोषण करितो. तोच अव्यय ईश्वर होय.

**टीका**—क्षर पुरुषाहून अक्षर पुरुष श्रेष्ठ होय. हा अक्षर पुरुष एकच देह व्यापून असतो. पण हा उत्तम पुरुष तीन्हीं लोकीं प्रत्येक देहीं प्रवेश करून त्यांचें धारणपोषण करितो. ह्मणून तो सर्वांहून श्रेष्ठ होय. प्रतिबिंब जीव त्याचाच अंश आहे.

**यस्मात्क्षरमतीतोऽहमक्षरादपि चोत्तमः ।**
**अतोऽस्मि लोके वेदे च प्रथितः पुरुषोत्तमः ॥ १८ ॥**

**अर्थ**—मी क्षर पुरुषाहून अतीत व उत्तम आहें, तसाच अक्षर पुरुषाहूनहि उत्तम आहें. ह्मणून लोकांत व वेदांत पुरुषोत्तम या नांवानें मी प्रसिद्ध आहें.

**टीका**—सोनें अलंकाराहून वेगळें असतें तसा क्षर भागापासून ईश्वर निराळा आहे; व सोनें अलंकाराहून उत्तम असतें तसा क्षरभागाहून ईश्वर उत्तम आहे. अक्षर पुरुष जीव ईश्वराचा अंशच आहे, तथापि तो ईश्वरासारखा मुक्त नसून बद्ध आहे हें दाखविण्याकरितां "अक्ष-

**रादपि च** " असें म्हटलें आहे. वेदार्थ जाणणारे लोक तर ईश्वर आहे असें ह्मणतातच, पण अडाणी लोक देखील त्यास जाणत नसतांहि त्याचें अस्तित्व कबुल करितात. निदान दुःखाचे वेळीं तरी " देवा देवा " ह्मणतात, असें " **लोके प्रथितः** " या पदांनीं दर्शविलें आहे. लोक म्हणजे मनुष्य लोक असा अर्थ आहे. यावरून अनीश्वरवादी मनुष्य नव्हत, पशु आहेत, असा भगवंताचे बोलण्याचा भाव दिसतो. पुष्कळ पाप झालें म्हणजे पशु योनींत जन्म होतो असें शास्त्र सांगतें. त्याप्रमाणें पापसंचयामुळें अनीश्वरवादी उत्पन्न होतात. आतां त्यांमध्यें पांडित्य-बळ असतें तें पुण्याचें फळ असतें. तें पुण्य नसतें तर ते केवळ पुच्छ-युक्त पशुच झाले असते.

**यो मामेवमसंमूढो जानाति पुरुषोत्तमम् ।**
**स सर्वविद्भजति मां सर्वभावेन भारत ॥ १९ ॥**

**अर्थ**–हे अर्जुना, जो ज्ञानी मनुष्य याप्रमाणें मज पुरुषोत्तमास जाणतो, तो सर्वज्ञ होत्साता सर्व भावेंकरून मला भजतो.

**टीका**–" **सर्ववित्** " म्हणजे सर्व ब्रह्म आहे असें जाणणारा पुरुष होय. असा पुरुष " **वासुदेवः सर्वमिति** " या भावानें भगवं-ताचें भजन करितो. " **एवं** " शब्दानें यामागें सांगितल्याप्रमाणें क्षरांहून अतीत व उत्तम अशा पुरुषोत्तमास जो जाणतो तोच ज्ञानी होय असें सुचविलें आहे. या सर्व श्लोकाचा मथितार्थ असा आहे कीं, क्षराक्षर सर्वच भगवंत आहे, अशा अद्वैताचें अवलंबन करून व तोच भगवंत सर्वांत श्रेष्ठ आहे असें त्याचें उत्तमत्व जाणून जो त्याचें भजन करितो तोच सुज्ञ होय. यावरून नुसतें अद्वैत धरून चालणारे व द्वैत-वादी या दोन्ही पक्षास दूषण दिलें आहे. द्वैतवाद्यांस दिलेलें दूषण रास्त आहे हें दाखविण्याकरितां विशेष विवेचन करण्याची जरूर नाहीं;

कारण सर्व गीतेंत भगवंतांनीं अद्वैतच सांगितलें आहे. पण अद्वैत मत धरूनहि जे भगवंताचें सर्वोत्तमत्व कबूल करित नाहींत त्यासंबंधानें थोडें तरी सांगितलें पाहिजे. जेथें सर्वत्र अद्वैत आहे तेथें उत्तमत्व अथवा अधमत्व कोठचें असा त्यांचा पूर्वपक्ष आहे. त्याचें उत्तर असें कीं, ज्या स्थितींत असें अद्वैत असतें तेथें अद्वैत बोलणेंहि नसतें. द्वैत वाटतें म्हणून अद्वैत बोलणें भाग पडतें. असें अद्वैत बोलून नित्यमुक्त ईश्वराचें भजन करावें तेव्हां त्या अद्वैताचा अनुभव होतो. ईश्वराची उपाधि विद्या आहे ह्मणून तो मुक्त असतो व चराचर अविद्यावृत असल्यामुळें ते बद्ध असतात. बद्धास बद्ध शरण गेला तर कांहींच उपयोग न होतां ते दोघे जोडीनें रडत मात्र बसतील. याकरितां नित्यमुक्त ईश्वराचें सर्वोत्तमत्व जाणून त्याचें भजन करणें जरूर आहे.

**इति गुह्यतमं शास्त्रमिदमुक्तं मयानघ ।**
**एतद्बुध्वा बुद्धिमान्स्यात्कृतकृत्यश्च भारत ॥ २० ॥**

**अर्थ**—हे अनघा अर्जुना, मी जें हें गुह्यांहून गुह्य असें शास्त्र बोललों तें जाणल्यानें मनुष्य बुद्धिमान् होऊन कृतकृत्य होईल.

**टीका**—ज्यास आत्मा सर्वत्र अपरोक्ष झाला तोच बुद्धिमान् होय. ही योग्यता येण्याकरितां या अध्यायांत सांगितलेलें अति गुह्यज्ञान झालें पाहिजे. याप्रमाणें जो बुद्धिमान् होतो त्यानें कर्तव्य ह्मणून जें कांहीं असतें, तें सर्व केलें असें समजावें, ह्मणून भगवंत सांगतात.

या अध्यायांतील विषय फारच गहन आहे. त्याची ही झालेली टीका केवळ भगवत्कृपेचें फळ आहे असें जाणून ती प्रेमपुरःसर त्याचे चरणीं अर्पण करितों.

श्री.

# अध्याय १६ वा.

ॐ नमो भगवते वासुदेवाय.

पूर्वाध्यायाचे अंतीं भगवान् असें बोलले कीं, त्या अध्यायांत सांगितलेले गुह्यज्ञानाची अपरोक्षप्राप्ति ज्यास होते तो कृतकार्य होय. अशा ज्ञानास अधिकारी कोण याचें विवेचन या अध्यायांत केलें आहे. दैवी संपत्तीचे पुरुष या ज्ञानास अधिकारी होत, व आसुरी संपत्तीचे लोक अनधिकारी होत. यांपैकीं दैवी संपत्तीचे पुरुषांचीं लक्षणें नवव्या अध्यायांत सविस्तर सांगितलीं आहेत, तरी याहि अध्यायांत तीं संक्षेपानें सांगून, आसुरी संपत्तीचे मनुष्यांचे लक्षणांचें वर्णन विस्तारानें केलें आहे. श्रीभगवान् ह्मणतात.

अभयं सत्त्वसंशुद्धिर्ज्ञानयोगव्यवस्थितिः ।
दानं दमश्च यज्ञश्च स्वाध्यायस्तप आर्जवम् ॥ १ ॥
अहिंसा सत्यमक्रोधस्त्यागः शांतिरपैशुनम् ।
दया भूतेष्वलोलुप्त्वं मार्दवं ह्रीरचापलम् ॥ २ ॥
तेजः क्षमा धृतिः शौचमद्रोहो नातिमानिता ।
भवन्ति संपदं दैवीमभिजातस्य भारत ॥ ३ ॥

अर्थ—अभय, सत्वसंशुद्धि, ज्ञानयोगव्यवस्थिति, दान, दम, यज्ञ, स्वाध्याय, तप, आर्जव, अहिंसा, सत्य, अक्रोध, त्याग, शांति, अपैशुन, भूतांचे ठायीं दया, अलोलुप्त्व, मार्दव, लाज, अचपलत्व, तेज, क्षमा, धृति, शौच, अद्रोह, थोरपणाचा गर्व नसणें हे सर्व गुण दैवी संपत्तीस अभिमुख झालेल्या पुरुषास मिळतात.

**टीका**–जन्ममरणाचें भय नसणें यास "**अभय**" ह्मणतात. "**सत्त्वसंशुद्धि**" ह्मणजे, चित्ताची शुद्धि होय. ज्ञान प्राप्त होण्याकरितां शास्त्रांत जे जे उपाय सांगितले आहेत, त्यांचा आश्रय करणें यास "**ज्ञानयोगव्यवस्थिति**" असें ह्मणतात. धनधान्यादि सत्पात्रीं अर्पण करणें ह्मणजे वित्तलोभ नसणें यास "**दान**" ह्मटलें आहे. "**दम**" ह्मणजे इंद्रियनिग्रह. "**यज्ञ**" ह्मणजे अधिकारानुरूप सत्कर्म करणें. "**स्वाध्याय**" ह्मणजे वेदाध्ययन व हरिगुणकीर्तन. तप तीन प्रकारचें आहे. कायिक, वाचिक आणि मानसिक. सर्व तपांत भगवद्भजनासारिखें तप नाहीं. "**आर्जव**" म्हणजे सरळ वर्तन. परपीडा न करण्यास "**अहिंसा**" ह्मणतात. "**सत्य**" म्हणजे खरें बोलणें, "**अक्रोध**" म्हणजे राग नसणें. "**त्याग**" शब्दानें विषयवासनेचा त्याग सुचविला आहे. विवेकबळानें कामादिक बिकारांचा क्षोभ न होऊं देणें, यास येथें "**शांति**" म्हटलें आहे. "**अपैशुन**" म्हणजे दुसऱ्याची निंदा न करणें. "**भूतेषु दया**" म्हणजे प्राणिमात्राचे ठायीं दया ठेवणें, "**अलोलुप्त्व**" म्हणजे अनासक्ति "**मार्दव**" म्हणजे कोमलपणा, ईश्वर सर्व साक्षी आहे असें जाणून कोणतेंहि वाईट कर्म करण्याची लाज ठेवणें यास "**ह्री**" म्हणावी, "**अचापल**" म्हणजे बुद्धीचें स्थैर्य. "**तेज**" म्हणजे श्रेष्ठत्वलक्षण. "**क्षमा**" म्हणजे परापराधाविषयीं सहनशीलता. "**धृति**" म्हणजे धैर्य अथवा स्वहिताची धारणा. "**शौच**" म्हणजे मनाची व शरीराची शुद्धता. "**अद्रोह**" म्हणजे दुसऱ्याचा घात न करण्याची इच्छा. घात केला म्हणजे त्यास हिंसा म्हणावी. "**नातिमानिता**" म्हणजे स्वतःचे श्रेष्ठत्वाविषयीं गर्व नसणें. जो मनुष्य दैवी संपत्तीस अभिमुख असतो त्यास हे सर्व गुण प्राप्त होतात.

**दंभो दर्पोऽभिमानश्च क्रोधः पारुष्यमेव च ।**
**अज्ञानं चाभिजातस्य पार्थ संपदमासुरीम् ॥ ४ ॥**

अर्थ व टीका–अंतर्यामीं श्रद्धा नसून लोकांनीं बरें म्हणावें ह्मणून सन्मार्गाचरण करणें यास "**दंभ**" ह्मणावा. "**दर्प**" म्हणजे गर्व. "**अभिमान**" व "**क्रोध**" हे माहितींतलेच शब्द आहेत. "**पारुष्य**" म्हणजे सर्व प्रकारची निष्ठुरता. "**अज्ञान**" म्हणजे स्वहित न जाणणें. आसुरी संपत्तीस जो अभिमुख असतो त्यास हे गुण प्राप्त होतात, असें भगवान् अर्जुनास सांगतात.

**दैवी संपद्विमोक्षाय निबंधायासुरी मता ।**
**मा शुचः संपदं दैवीमभिजातोऽसि पांडव ॥ ५ ॥**

अर्थ–दैवी संपत्ति मोक्षास कारण होते आणि आसुरी संपत्ति बंधास कारण होते, असें माझें मत आहे. हे अर्जुना, तूं दुःख मानूं नकोस कारण तूं दैवी संपत्तीसच अभिमुख झाला आहेस.

टीका–या ठिकाणीं "**मोक्ष**" आणि "**बंध**" शब्दांची योजना न करितां "**विमोक्ष**" आणि "**निबंध**" शब्द घातले आहेत. असें करण्यांत कांहीं विशेषार्थ सुचविण्याचा हेतु आहे, हें उघड दिसतें "**विमोक्ष**" शब्दापासून विपरीत भावनेपासून मोक्ष असा बोध होतो. अविद्येच्या योगानें जड देहच आपण आहों असें मनुष्यास वाटतें. वास्तविकपणें, तो आत्मस्वरूप असून अशा प्रकारची विपरीत भावना होते. त्या भावनेपासून सुटका होण्यास "**विमोक्ष**" म्हटलें आहे. त्याचप्रमाणें आत्मा जड जगास व्यापून असतांहि त्या जगाचें जडपण सत्यत्वें भासतें, ही देखील विपरीत भावना आहे. हिजपासूनहि सुटका होणें यास "**विमोक्ष**" ह्मटलें आहे. आपण देह ही विपरीत भावना व्यतिरेकज्ञानानें नाहींशी होते, व जगाचे जडत्वाची विपरीत भावना अन्वयज्ञानानें नाहींशी होते. आतां, अनादि अविद्यासंबंधास बंध ह्मणावा. त्या अनादि बंधास आसुरी संपत्ति जास्त दृढ करिते

असा "निबंध" शब्दापासून बोध होतो. आसुरी संपत्तीमुळें भगवद्भक्तांचा द्रोह घडतो. असा द्रोह करणाऱ्यास मोक्ष मिळणें अति दुर्घट होतें, असें भगवान् यापुढें सांगणार आहेत. सहज अनादिभवपाशाचा भगवत्प्रसादेंकरून कधीं तरी नाश होतो. परंतु भक्तद्रोह करणाऱ्यास भगवत्तत्वाचा कधींच बोध होत नाहीं. ह्मणून आसुरी संपत्ति "निबंध" करणारी आहे, असें म्हटलें आहे. आसुरी संपत्तीचीं जीं लक्षणें सांगितलीं त्यांपैकीं क्रोध, अभिमान वगैरे लक्षणें आपणांत आहेत, असें जाणून अर्जुनास मोठें भय वाटलें. हें भगवंतांनीं जाणिलें. ह्मणून उत्तरार्धानें त्याचें सांत्वन केलें आहे. उत्तम कुळांत जन्मलेला मनुष्य सहसा आसुरी संपत्तीस अभिमुख नसतो. क्रोध व अभिमान हे आसुरी संपत्तींत गणले जातात, तरी त्यामुळें, जात्या जो दैवी संपत्तीस अभिमुख असतो, त्यास धोका घडत नाहीं. ते अवगुण लवकर नाहींसे होतात. सोन्यास कोळसा लागून तें काळें होतें, त्यामुळें त्याचे सोनेपणास कायमचा बट्टा लागत नाहीं. जरा घासलें कीं पुनः तें पूर्ववत् होतें. त्याप्रमाणें उत्तम कुळांत जन्म झालेल्या मनुष्याचे अंगीं उत्तम गुण असतातच. त्यांबरोबर एखादा क्षुद्र दुर्गुण असला तरी त्याचें महत्व नसतें. भगवद्भक्तीकडे बुद्धिवृत्ति असणें ही दैवी संपत्तीच होय असें भगवंतांनीं नवव्या अध्यायांत स्पष्ट सांगितलें आहे. हा भगवद्भक्तीनें भारलेला ताईत गळ्यांत असल्यावर क्रोधाभिमानादि क्षुद्र पिशाचांस घालवून देण्यास कितीसा वेळ लागणार बरें? याप्रमाणें मनांत भाव धरून भगवंतांनीं अर्जुनाचें शांतवन केलें आहे.

**द्वौ भूतसर्गौ लोकेऽस्मिन्दैव आसुर एव च ।**
**दैवो विस्तरशः प्रोक्त आसुरं पार्थ मे शृणु ॥ ६ ॥**

अर्थ—हे अर्जुना, सर्व भूतसृष्टि दैव किंवा आसुर या दोहोंपैकीं एक प्रकारची असते. दैवाचें विस्तृत वर्णन यापूर्वीं केलें आहे. आतां आसुरीचें वर्णन मजपासून ऐक.

**टीका**–आसुरी प्रकृतीचे राक्षसी, आसुरी, आणि मोहिनी असे तीन भेद आहेत, ह्मणून यापूर्वीं सांगितलें आहे. हे सर्व भेद "**आसुर**" शब्दापुढें " **एव** " शब्द जोडल्यानें सुचविले आहेत. आणि त्यापुढील " **च** " कारानें चार्वाकादि, अनीश्वरवादी व दांभिक वैदिक यांची सूचना केली आहे. या सर्वांचा समावेश " **आसुर** " शब्दांत केला आहे. त्यांपैकीं वेदास न मानणारे चार्वाकादि यांचें वर्णन पुढील श्लोकांत केलें आहे.

**प्रवृत्तिं च निवृत्तिं च जना न विदुरासुराः ।**
**न शौचं नापि चाचारो न सत्यं तेषु विद्यते ॥ ७ ॥**

**अर्थ**–असुरजन प्रवृत्ति जाणत नाहींत, व निवृत्तिहि जाणत नाहींत. त्यांचे ठायीं शौच, आचार आणि सत्य यांपैकीं काहींच नसतें.

**टीका**–वेदांत "**प्रवृत्ति**" आणि "**निवृत्ति**" असे दोन प्रकारचे मार्ग सांगितले आहेत, काम्य कर्म करण्याचे मार्गास प्रवृत्ति ह्मणावी व निष्काम कर्ममार्गास निवृत्ति ह्मणावी. अनीश्वरवाद्यांस या दोहोंपैकीं एकहि मार्ग नसतो. शुचिर्भूतपणा व सदाचार हीं प्रवृत्तिमार्गाचीं लक्षणें होत व सत्य ह्मणजे ब्रह्म जाणणें हें निवृत्तिमार्गाचें लक्षण होय. शौचाचारानें चित्तशुद्धि झाली ह्मणजे सत्यस्वरूपाचा शोध करितां येतो. अनीश्वरवाद्यांत शौचाचार नसतो व सत्यस्वरूप ब्रह्महि त्यांचे बुद्धींत नसतें. कर्मातीत झालेले परमहंस देखील शौचाचारहीन असतात. त्यांसहि अनीश्वरवाद्यांप्रमाणेंच कोणी समजतील, ह्मणून "**न सत्यं तेषु विद्यते**" असें भगवंतांनीं म्हटलें आहे. ज्यांच्या बुद्धींत सत्य स्वरूपाशिवाय इतर कशाचाच बोध नसतो, अशा मुक्त पुरुषांस कर्म करण्याची आवश्यकता नाहीं, कारण ते कर्मातीत झालेले असतात. अशा पुरुषांचे ठायीं शौचाचार नसतो तरी सत्य असतें, परंतु अनीश्वरवाद्यांत सत्य नसून शौचाचारहि नसतो. म्हणून ह्या दोन्ही प्रकारचे

पुरुषांत महदंतर असतें. याकरितां या दोषांस सारिखें समजतां येत नाहीं, अशी चतुर्थ चरणानें विशेष सूचना केली आहे. आतां, असुरांच्या ठायीं सत्य नसतें तसें वेदप्रतिपादित प्रवृत्तिमार्गानें जाणारे लोकांतहि तें नसतें ह्मणून त्यांसहि कोणी असुर समजतील एवढ्याकरितां तिसऱ्या चरणाची योजना केली आहे. एकंदरींत या श्लोकानें असा भाव दर्शविला आहे कीं, वेदविरुद्ध ज्यांचें मत अथवा वर्तन असतें, ते असुर होत.

**असत्यमप्रतिष्ठं ते जगदाहुरनीश्वरम् ।**
**अपरस्परसंभूतं किमन्यत्कामहैतुकम् ॥ ८ ॥**

**अर्थ**—जगताला ईश्वर नाहीं, जगत ब्रह्म नव्हे, ब्रह्म त्यास अधिष्ठानभूत नाहीं, प्रकृतिपुरुषांच्या संयोगापासून तें उत्पन्न झालें नाहीं, केवळ कामवासना त्याचें कारण होय, दुसरें कांहीं नाहीं, असें ते ह्मणतात.

**टीका**—" **सत्य** " शब्दाचा अर्थ ब्रह्म ह्मणून पूर्व श्लोकाचे टीकेंत सांगितला आहे. " **सर्वं खल्विदं ब्रह्म** " असें वेद ह्मणतात. भेदवादी लोक या " **असत्य** " शब्दाचा " लटिकें " असा अर्थ करून जग मिथ्या आहे असें समजणारे अद्वैतमती लोकांस ते असुर ह्मणतात. गीतेंत सर्वत्र अद्वैत प्रतिपादन केलें आहे, यावरून त्यांचे या ह्मणण्यांत कितपत तथ्य आहे, हें विचारी मनुष्यास सहज कळून येईल. " **असत्य** " शब्दाचा ते जो अर्थ करितात, त्याशिवाय दुसरा योग्य अर्थ होत नसता, तर त्यांचें म्हणणें रास्त दिसतें. अस्तु. जग ब्रह्म आहे, असें जो समजत नाहीं, तो ब्रह्म जाणत नाहीं या भावानें **"न सत्यं तेषु विद्यते"** असें पूर्वीचे श्लोकीं म्हटलें आहे. ते जगास " **अप्रतिष्ठ** " ह्मणतात, ह्मणजे अधिष्ठानरूप ब्रह्माचे ठायीं तें विवर्तरूपानें स्थित आहे, असें ते मानित नाहींत. उपादान कारण ब्रह्मासच ते मानित नाहींत

तेव्हां निमित्यकारण ईश्वरास ते कोठून मानणार? बापास बाप न ह्मणणारा चुलत्यास काका म्हणेल काय? प्रकृतिपुरुषांचा परस्पर योग होऊन सृष्टि उत्पन्न होते असें वेद बोलतात व ते जगास " **अपरस्परसंभूत** " ह्मणतात. पंचतत्वात्मक जग अनादि आहे व तें आपल्या आपणच झालें आहे, असें त्याचें मत आहे. स्त्रीपुरुषांपासून शरीर उपजतें तरी त्यास ते कामहैतुक आहे, म्हणजे त्याचे उत्पत्तीस केवळ कामच कारणीभूत आहे, असें ते ह्मणतात. ईश्वर दिसत नाहीं, पूर्वकर्म दिसत नाहीं, जन्मांतर दिसत नाहीं, ह्मणून हीं सर्व मिथ्या होत, प्रत्यक्ष दिसतें तेवढेंच खरें; त्या प्रत्यक्षावांचून आणखी काय असणार? असें ते ह्मणतात. हा अर्थ " **किमन्यत्** " पदानें दर्शविला आहे. असे हे अनीश्वरवादी असुर होत ह्मणून भगवान् सुचवितात. त्यांना ईश्वराचें भय नसल्यामुळें, ते वाटेल तें निंद्य कर्म करण्यास चुकत नाहींत, असें उत्तर श्लोकानें दाखविलें आहे.

**एतां दृष्टिमवष्टभ्य नष्टात्मानोऽल्पबुद्धयः ।**
**प्रभवन्त्युग्रकर्माणः क्षयाय जगतोऽहिताः ॥ ९ ॥**

अर्थ–अशा दृष्टीचा स्वीकार करून नष्टचित्त व अल्पबुद्धि होत्साते जगाचे वैरी होऊन ते क्रूर कर्में करितात.

**काममाश्रित्य दुष्पूरं दंभमानमदान्विताः ।**
**मोहाद्गृहीत्वासद्ग्राहान्प्रवर्तन्तेऽशुचिव्रताः ॥ १० ॥**

अर्थ–तृप्ति न पावणारे कामाचा आश्रय करून व दंभ, मान, मद इहीं करून युक्त होऊन अविवेकामुळें नश्वर धन, भूमि इत्यादिकांचे प्राप्तीचा निश्चय करून वाटेल तें ओंगळ कर्म करण्यास ते प्रवृत्त होतात.

**चिंतामपरिमेयां च प्रलयांतामुपाश्रिताः ।**
**कामोपभोगपरमा एतावदिति निश्चिताः ॥ ११ ॥**

अर्थ–त्यांस मरेतोंपर्यंत अपरमित चिंता असते. विषयोपभोगच काय तो पुरुषार्थ, त्यांहून अन्य कर्तव्य कांहींच नाहीं, असा त्यांचा निश्चय असतो.

टीका–प्रत्यक्षाशिवाय सर्व खोटें असें त्यांचें मत असतें, ह्मणून त्यास मरणाची नेहमीं चिंता वाटत असते याकरितां देहास विषय-सुख देणें हेंच इतिकर्तव्य असें ते समजतात.

आशापाशशतैर्बद्धाः कामक्रोधपरायणाः ।
ईहन्ते कामभोगार्थमन्यायेनार्थसंचयान् ॥ १२ ॥

अर्थ–शेंकडो आशापाशांनीं बांधले गेले असतात व कामक्रोधांचे आश्रित असतात, ह्मणून विषयसुखाकरितां अन्यायानें द्रव्य जमविण्याची ते इच्छा धरितात.

इदमद्य मया लब्धमिमं प्राप्स्ये मनोरथम् ।
इदमस्तीदमपि मे भविष्यति पुनर्धनम् ॥ १३ ॥
असौ मया हतः शत्रुर्हनिष्ये चापरानपि ।
ईश्वरोऽहमहं भोगी सिद्धोऽहं बलवान्सुखी ॥ १४ ॥
आढ्योऽभिजनवानस्मि कोऽन्योऽस्ति सदृशो मया ।
यक्ष्ये दास्यामि मोदिष्य इत्यज्ञानविमोहिताः ॥ १५ ॥
अनेकचित्तविभ्रांता मोहजालसमावृताः ।
प्रसक्ताः कामभोगेषु पतन्ति नरकेऽशुचौ ॥ १६ ॥

अर्थ–आज मी हें मिळविलें, हा मनोरथ साध्य करीन, हें धन मजपाशीं आहे, आणखीहि धन मला मिळेल, हा शत्रु मी मारला, दुसरे आणखी मारीन, मी मोठा समर्थ आहें, उपभोग घेणारा कायतो मीच आहें, मी सिद्ध आहें, मी बलवान् आहें, मी सुखी आहें, मी धनाढ्य

आहें, मी कुलीन आहें, मजसारखा दुसरा कोण आहे? मी यज्ञ करीन, मी दान करीन, मी लोकांस संतुष्ट करीन, अशा प्रकारें अज्ञानानें मूढ झाल्यामुळें त्यांचें चित्त अनेक मनोरथांनीं विक्षिप्त झालें असतें; मोह-जालानें ते वेढलेले असतात, व कामभोगामध्यें अत्यंत आसक्त झाले असतात, ह्मणून ते अमंगळ नरकांत पडतात.

**टीका**—पंधराव्या श्लोकाच्या पूर्वार्धापर्यंत अवैदिक चार्वाकादि असुर यांचें वर्णन केलें आहे व उत्तरार्धानें वैदिक असुरांचें वर्णन केलें आहे. अवैदिकांस नरकभोग प्राप्त होतो हें ठीक आहे, पण वैदिक काम्य करणारांस नरक कां व्हावा अशी येथें सहज शंका उत्पन्न होते. तिचें समाधान असें आहे कीं, धनमानादिक मिळविण्याच्या हेतूनें जे दांभिकपणानें कर्माचरण करितात, त्यांचें वर्णन येथें केलें आहे हें यापुढें स्पष्ट होणार आहे.

**आत्मसंभाविताः स्तब्धा धनमानमदान्विताः ।**
**यजन्ते नामयज्ञैस्ते दंभेनाविधिपूर्वकम् ॥ १७ ॥**

**अर्थ व टीका**—आपण होऊन आपणास मान घेतात त्यांस "आत्मसंभावित" ह्मणावें. अथवा आत्मा ह्मणजे देह, त्या देहाची सदन्नवस्त्रालंकार इत्यादिकेंकरून पूजा करणारास "आत्मसंभावित" ह्मणावें. असे आत्मसंभावित ताठ्यानें वागणारे व धनमानादिकेंकरून उन्मत्त झालेले लोक यज्ञादि कर्में करितात पण तीं दंभानें अविधिपूर्वक करितात. अशा लोकांस नरक प्राप्त होणें ठीकच आहे. असे हे असुर साधारण कोटींतच गणले पाहिजेत. यांहून सबके गुरु गोवर्धन-दास निराळेच आहेत. त्यांचें वर्णन पुढच्या श्लोकानें केलें आहे.

**अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं च संश्रिताः ।**
**मामात्मपरदेहेषु प्रद्विषन्तोऽभ्यसूयकाः ॥ १८ ॥**

**अर्थ**–अहंकार, बळ, गर्व, काम, आणि क्रोध यांचा आश्रय करून जे ज्ञानी भक्तांचा द्वेष करितात व त्यांची निंदा करितात ते माझाच द्वेष आणि माझीच निंदा करितात.

**टीका**–"**आत्मपरदेह**" ह्मणजे ज्ञानी भक्ताचा देह होय. ज्या देहीं आत्माच "**पर**" ह्मणजे परम आहे, तो "**आत्मपरदेह**" ह्मणावा. ज्या देहीं आत्मा प्रगटला तेथें जीवपणा राहत नाहीं. त्या देहास भगवदवतारदेहाची योग्यता येते. सर्व कांहीं आत्माच आहे असें ज्या बुद्धीस उमजलें, अशी बुद्धि ज्या शरीरांत असेल तोच "**आत्मपरदेह**" होय, कारण त्या बुद्धींत देहाचे परत्वाचा लेशदेखील नसतो. तथापि प्रारब्ध असेपर्यंत ज्ञानी भक्ताचा देहभाव जनदृष्टीस दिसतो, ह्मणून ज्ञानमार्गाचा द्वेष करणारे दांभिक याज्ञिक त्यांचा द्वेष व निंदा करितात. पण तो द्वेष व ती निंदा भगवंताचीच घडते असें त्या मूर्खांस समजत नाहीं. आपला आत्मा भगवंतच होय असें समजून, जे चराचर जग भगवत्स्वरूप पहातात असे सगुणभक्तच येथें सुचविले आहेत, असें उत्तर श्लोकावरून स्पष्ट सिद्ध होतें. उत्तर श्लोकांत भगवंत ह्मणतात कीं, अशा दुर्जनांस जन्मोजन्मीं आसुरी योनि देऊन अखेरीस अति अधमगति देतों व आपली प्राप्ति कधींच न होईल असें करितों. अशी ही शिक्षा सगुणद्वेषाचेंच फल होय, कारण निर्गुणपणीं निर्धर्मत्वामुळें द्वेष लागत नाहीं. आतां निर्गुण सगुण एकच आहे, तेव्हां निर्गुणभक्तांचा द्वेष केला असतां सगुण भगवंत शिक्षा करील असें कोणी ह्मणतील तर तसें घडूं शकत नाहीं, हें "**तेषामहं समुद्धर्ता**" व "**ये यथा मां प्रपद्यन्ते तां स्तथैव भजाम्यहं**" या भगवदुक्तीवरून स्पष्ट सिद्ध होतें. यावरून ज्या भक्तांचा द्वेष केला असतां भगवंत त्या द्वेषाचें फल द्वेष करणारास देतो, ते सगुण भक्तच होत हें सांगणें नको. निर्गुणास भजन कळत नाहीं तसा द्वेषहि कळत नाहीं; व तें भजन फळ देत

नाहीं ह्मणून द्वेषाचें फळही देत नाहीं असा अनादि धर्म आहे. या श्लोकांतून असा भावार्थ काढावा लागतो, यामुळें कोणास शंका येईल तर ती अजीबात नाहींशी करण्याकरितां याच अर्थाचा श्रीमद्भागवतांतील अकरावे स्कंधांतील श्लोक येथें देतों. त्यांत अशा अर्थाचे स्पष्ट शब्दच आहेत. '**श्रिया विभूत्याभिजनेन विद्यया त्यागेन रूपेण बलेन कर्मणा । जातस्मयेनांधधियः सहेश्वरान् सतोवमन्यंति** हरिप्रियान्खलाः ॥ या श्लोकांत "**सहेश्वर**" या शब्दानें सगुण ईश्वर व त्याचे भक्त स्पष्ट दर्शविले आहेत. अस्तु. "**अभ्यसूयकाः**" या शब्दाचा अर्थ नसता दोष लावणारे असा आहे. जे भगवद्भक्तांचा द्वेष करितात ते निंदाहि करितात कीं 'हें पहाहो हें जेवणारें, हगणारें व मुतणारें ब्रह्म कसें आहे तें'!!

कोणी टीकाकार "**आत्मपरदेहेषु**" या पदाचा असा अर्थ करितात कीं, आपल्या आणि इतर देहांत असलेल्या आत्म्याचा ह्मणजे भगवंताचा द्वेष करितात; व याचें स्पष्टीकरण करितांना सांगतात कीं, यापूर्वीं सांगितलेले दंभानें यज्ञ करणारे लोक पशुहिंसा करितात व तसें करून आपणहि कष्टतात. या टीकाकारांनीं केलेला अर्थ व्याकरणाप्रमाणें चुकीचा नाहीं. पण या कर्मास जो घोर दंड उत्तर श्लोकांत सांगितला आहे त्याचा सारासार विचार केला असतां तो तसा ठरतो. माता, पिता, गुरु इत्यादिकांचा वध करण्याचें पातकदेखील प्रायश्चितानें व ज्ञानानें नाहींसें होतें. मग यःकश्चित पशुहत्येकरितां जन्मोजन्मीं असुर योनि मिळून अखेर अंधतमांत घालण्याची कडक शिक्षा भगवंत सांगतील काय? बाळकाचे चोरीस फांशीची शिक्षा, याप्रमाणें हा न्याय होतो. शिवाय द्वेष शब्दानें हत्यारूप हिंसा घडूं शकत नाहीं. कदाचित् मारून मुटकून तसा अर्थ लावितां येईल पण "अभ्यसूयकाः" या पदाची वाट काय? पशुहत्येकडे तो शब्द लागूं शकत नाहीं, ह्मणून

या पदाचा अर्थ ते असा करितात कीं, जे सन्मार्गी प्रवर्ततात त्यावर ते दांभिक याज्ञिक दोषारोप करितात. यावरून ते देह आत्मपरच होतात. मग इतके आढेवेढे घेऊन खोल पाण्यांत शिरण्याचें कारण तरी कोणतें होतें हें कळत नाहीं. एवंच ज्ञानी भक्तांचा जे द्वेष करितात व निंदा करितात ते असुर होत, असा या श्लोकाचा अर्थ आहे, असें ह्मणणें भाग पडतें. अशा दुर्जनांस काय शासन मिळतें तें भगवंत आतां सांगतात.

**तानहं द्विषतः क्रूरान्संसारेषु नराधमान् ।**
**क्षिपाम्यजस्रमशुभानासुरीष्वेव योनिषु ॥ १९ ॥**

**अर्थ**—अशा द्वेष करणाऱ्या, क्रूर, पापी व अधम मनुष्यांस संसाराच्या फेऱ्यांत टाकून निरंतर आसुरी योनींतच मी घालतों.

**आसुरीं योनिमापन्ना मूढा जन्मनि जन्मनि ।**
**मामप्राप्यैव कौंतेय ततो यांत्यधमां गतिम् ॥ २० ॥**

**अर्थ**—हे अर्जुना, आसुरी योनी मिळून ते जन्मजन्मांतरीं मूढ होऊन राहतात व त्यानंतर माझी प्राप्ति न होतां अधम गतीस जातात.

**टीका**—अधम गति ह्मणजे अंधतम पावल्यावर कल्पक्षयांतीं प्रलय होईपर्यंत ते तसेच राहतात. पुन्हा सृष्टिकाळीं असुर योनींत जन्म घेऊन शेंकडों जन्म तसे राहून पुन्हा ते अंधतमास जातात. याप्रमाणें कोट्यानुकोटि कल्पपर्यंत ते भगवत्प्राप्ति न होतां राहतात. असे जे असुर जन वर्णन केले ते मनुष्यांतच जन्मतात, परंतु मूर्ख व दुर्गुणी होतात.

**त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः ।**
**कामः क्रोधस्तथा लोभस्तस्मादेतत्त्रयं त्यजेत् ॥ २१ ॥**

**अर्थ**—काम, क्रोध लोभ या तीन रूपांनीं ही आसुरी संपत्ति नरकाचें द्वारच आहे. यापासून आपला नाश होतो ह्मणून या तिहींचा त्याग करावा.

एतैर्विमुक्तः कौंतेय तमोद्वारैस्त्रिभिर्नरः ।
आचरत्यात्मनः श्रेयस्ततो याति परां गतिम् ॥ २२ ॥

अर्थ—हे अर्जुना, नरकाच्या या तीन्ही द्वारांपासून जो मोकळा होतो तो हित होईल असें आचरण करून परम गतीस पावतो.

यः शास्त्रविधिमुत्सृज्य वर्तते कामकारतः ।
न स सिद्धिमवाप्नोति न सुखं न परां गतिम् ॥ २३ ॥

अर्थ—जो शास्त्रविधि सोडून कामनायुक्त होत्साता बर्तन करितो, तो सिद्धि ह्मणजे स्वर्ग पावत नाहीं, या लोकींहि सुख पावत नाहीं व मोक्षहि पावत नाहीं.

तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ ।
ज्ञात्वा शास्त्रविधानोक्तं कर्म कर्तुमिहार्हसि ॥ २४ ॥

अर्थ—यास्तव कोणतें कर्म करावें, कोणतें न करावें याचा निर्णय करण्याचे कामीं शास्त्रच तुला प्रमाण आहे असें जाणून शास्त्रांत सांगितलेल्या विधीप्रमाणें तुला या लोकीं कर्म करणें योग्य आहे.

या प्रमाणें ही सोळाव्या अध्यायाची टीका संपूर्ण झाली ती भक्तपक्षपाती भगवंतास अर्पण असो.—

---

श्री.

# अध्याय १७ वा.

ॐ नमो भगवते वासुदेवाय.

शास्त्रविधि सोडून वर्तन करणाऱ्यांस गति नाहीं असें पूर्वाध्यायांत सांगितलें. त्या संबंधांत अर्जुन प्रश्न करित आहे.

**ये शास्त्रविधिमुत्सृज्य यजन्ते श्रद्धयान्विताः ।**
**तेषां निष्ठा तु का कृष्ण सत्वमाहो रजस्तमः ॥ १ ॥**

**अर्थ**–जे कोणी शास्त्रविधि सोडून पण श्रद्धेनें यजन करितात, त्यांची ती श्रद्धा कोणते प्रकारची? सात्विकी, राजसी किंवा तामसी?

**टीका**–शास्त्रोक्त निष्काम कर्म करणें कार्य होय, व सकाम कर्म करून ईश्वरीं अर्पण करणें अकार्य होय. या दोहींची व्यवस्था येथपर्यंत झाली. निष्काम कर्म करून कृष्णार्पण करणें हें असाधारण मोक्षसाधन होय व असें कर्म ज्या श्रद्धेनें होतें ती शुद्ध सत्वगुणयुक्त होय असें अर्जुनास कळलें. ह्मणून शास्त्रविधि सोडून श्रद्धेनें जे लोक कर्म करितात त्यांची श्रद्धा मिश्रसत्व, राजस आणि तामस यांपैकीं कोणत्या गुणांनीं युक्त ह्मणून समजावी असा प्रश्न केला आहे. त्याचें उत्तर भगवान् देतात कीं,

**त्रिविधा भवति श्रद्धा देहिनां सा स्वभावजा ।**
**सात्विकी राजसी चैव तामसी चेति तां शृणु ॥ २ ॥**

**अर्थ**–ज्याच्या त्याच्या स्वभावाप्रमाणें मनुष्याची श्रद्धा सात्विकी, राजसी अथवा तामसी असते. ती ऐक.

**सत्त्वानुरूपा सर्वस्य श्रद्धा भवति भारत ।**
**श्रद्धामयोऽयं पुरुषो यो यच्छ्रद्धः स एव सः ॥ ३ ॥**

**अर्थ**—हे अर्जुना, प्रत्येकाचे ठायीं जो सत्वांश असेल त्याला अनुसरून त्याची श्रद्धा असते. श्रद्धामय पुरुषाची जशी श्रद्धा असेल तसा तो होतो.

**टीका**—मूळ श्रद्धा शुद्ध सत्त्वरूप होय. तथापि मिश्रणाप्रमाणें ती निरनिराळ्या प्रकारची होते. शुद्धसत्त्वात्मक श्रद्धा निवृत्तिमार्ग धरिते व राजसतामसांची श्रद्धा प्रवृत्तिमार्ग धरिते, असा भाव "**सत्त्वानुरूपा श्रद्धा**" या चरणानें दर्शविला आहे. श्रद्धामय जीव जो जो भाव मनांत धरील तद्रूप तो होतो असा उत्तरार्धानें बोध केला आहे. याच प्रमाणें "**यं यं वापि स्मरन् भावं**" या श्लोकाचाहि आशय आहे. त्याचें विवरण त्या श्लोकाचे टीकेंत झालें आहे तें वाटल्यास पहावें. शुद्ध-सत्त्वात्मक श्रद्धा ज्यास असते, तो मुमुक्षु होऊन भगवंताचें सेवन करितो. आतां मिश्रसत्त्वात्मक, राजसी व तामसी श्रद्धेचे पुरुष कसें वर्तन करितात तें भगवान् सांगतात.

**यजन्ते सात्त्विका देवान्यक्षरक्षांसि राजसाः ।**
**प्रेतान्भूतगणांश्चान्ये यजन्ते तामसा जनाः ॥ ४ ॥**

**अर्थ**—जे सात्त्विक असतात ते देवांचें यजन करितात; जे राजस असतात ते यक्षराक्षस यांचें यजन करितात व यांहून इतर तामस जन प्रेत आणि भूतगण यांचें यजन करितात.

**टीका**—प्रेत ह्मणजे पिशाच व भूतगण ह्मणजे वेताळादि होत. जो मनुष्य ज्याचें यजन करितो तो देहांतीं त्याचेंच स्वरूप पावतो.

**अशास्त्रविहितं घोरं तप्यन्ते ये तपो जनाः ।**
**दंभाहंकारसंयुक्ताः कामरागबलान्विताः ॥ ५ ॥**

**कर्षयन्तः शरीरस्थं भूतग्राममचेतसः ।**
**मां चैवांतः शरीरस्थं तान्विद्ध्यासुरनिश्चयान् ॥ ६ ॥**

**अर्थ**—विषयप्रीतीमुळें बलात्कारें करून, व दंभानें आणि अहंकारानें युक्त होऊन, जे लोक शास्त्रविधिविरुद्ध घोर तप करितात ॥ ५ ॥ व तसें करून शरीरांतील पंचभूतांच्या समूहाला व मलाहि त्रास देतात त्यांचा निश्चय आसुरी आहे असें जाण.

**टीका**—सर्व प्रकारचे भोग भगवदंशास घडतात असें यापूर्वी सांगितलेंच आहे. त्या अंशरूपी भगवंतास अशास्त्रविहित क्लेश देणें रास्त नाहीं असें भगवान् ह्मणतात; कारण त्याचें फळ नरक आहे. शास्त्रविहित उपावासादि व्रतें करण्याचें फळ उत्तम असतें ह्मणून तीं करण्यास हरकत नाहीं, इतकेंच नाहीं, तर तीं करणें उक्त आहे.

**आहारस्त्वपि सर्वस्य त्रिविधो भवति प्रियः ।**
**यज्ञस्तपस्तथा दानं तेषां भेदमिमं शृणु ॥ ७ ॥**

**अर्थ**—प्रत्येकास आवडणारे आहारांचेहि तीन प्रकार आहेत. त्याचप्रमाणें यज्ञ, तप व दान यांचें प्रत्येकाचेहि तीन प्रकार आहेत. त्यांचे भेद ऐक.

**आयुःसत्त्वबलारोग्यसुखप्रीतिविवर्धनाः ।**
**रस्याः स्निग्धाः स्थिरा हृद्या आहाराः सात्त्विकप्रियाः ॥ ८ ॥**

**अर्थ**—देहपुष्टि देणारा, सत्त्व वाढवून मनास उल्हास देणारा, बळ, आरोग्य आणि सुख देणारा, रुचि वाढविणारा, रसयुक्त, स्निग्ध, पोषक व दृष्टीस चांगला दिसणारा व रुचीस बरा लागणारा असा आहार सात्त्विक जनांस प्रिय असतो.

**कट्वम्ललवणात्युष्णतीक्ष्णरूक्षविदाहिनः ।**
**आहारा राजसस्येष्टा दुःखशोकामयप्रदाः ॥ ९ ॥**

अर्थ-कडू, आंबट, खारट, अति उष्ण, तिखट, रुक्ष आणि तीव्र असे दुःख, शोक आणि रोग उत्पन्न करणारे आहार राजस जनांस इष्ट असतात.

यातयामं गतरसं पूति पर्युषितं च यत् ।
उच्छिष्टमपि चामेध्यं भोजनं तामसप्रियम् ॥ १० ॥

अर्थ-थंड झालेलें, नीरस ह्मणजे करपलेलें व जळालेलें अथवा कोंड्याचें केलेलें, दुर्गंधि देणारें, पर्युषित ह्मणजे कालचें शिळें, उष्टें आणि अपवित्र असें भोजन तामस जनांस आवडतें.

अफलाकांक्षिभिर्यज्ञो विधिदृष्टो य इज्यते ।
यष्टव्यमेवेति मनः समाधाय स सात्त्विकः ॥ ११ ॥

अर्थ-विधि पाळावा या हेतूनें फळाची अपेक्षा न करितां कर्तव्य ह्मणून समाधानयुक्त मनानें जो यज्ञ केला जातो, तो सात्त्विक यज्ञ होय.

अभिसंधाय तु फलं दंभार्थमपि चैव यत् ।
इज्यते भरतश्रेष्ठ तं यज्ञं विद्धि राजसम् ॥ १२ ॥

अर्थ-हे अर्जुना, फळाची अपेक्षा धरून आपण यज्ञकर्ता ह्मणून प्रसिद्ध व्हावें या हेतूनें केलेला यज्ञ राजस होय असें जाण.

विधिहीनमसृष्टान्नं मंत्रहीनमदक्षिणम् ।
श्रद्धाविरहितं यज्ञं तामसं परिचक्षते ॥ १३ ॥

अर्थ-विधीवांचून, अन्नदानावांचून, मंत्रावांचून, अथवा दक्षिणा दिल्यावांचून केलेला यज्ञ तामस ह्मणवितो.

देवद्विजगुरुप्राज्ञपूजनं शौचमार्जवम् ।
ब्रह्मचर्यमहिंसा च शारीरं तप उच्यते ॥ १४ ॥

**अर्थ**–देव द्विज, गुरु आणि विद्वान् यांचें पूजन, शुचिर्भूतपणा, सरळपणा, ब्रह्मचर्य व अहिंसा यांस कायिक तप ह्मणतात.

**टीका**–ब्रह्मचर्य दोन प्रकारें घडतें: एक स्त्रीसंग टाकून देणें ह्मणजे लग्न न करणें व दुसरें लग्न करून संतानार्थ फक्त ऋतुकाळीं स्त्री-संग करणें.

**अनुद्वेगकरं वाक्यं सत्यं प्रियहितं च यत् ।**
**स्वाध्यायाभ्यसनं चैव वाङ्मयं तप उच्यते ॥ १५ ॥**

**अर्थ**–कोणाच्या मनास न लागणारें, सत्य व प्रिय असें भाषण करणें व वेदाध्ययन करणें यास वाचिक तप ह्मणतात.

**टीका**–पूर्वार्धाचा अर्थ आत्मचर्चा करणें असा आहे. प्रापंचिक बोलण्याकडे त्याची योजना करणें अप्रशस्त होतें; कारण त्यांत सांगित-लेल्या तीन्ही गुणांनीं युक्त असें प्रापंचिक बोलणें घडूंच शकत नाहीं. याचा अनुभव सर्वांसच आहे ह्मणून त्याचें स्पष्टीकरण करण्याची जरूर नाहीं. " **वेदाध्ययन** " शब्दांत वेदांतपर सर्व भाषेंतील ग्रंथांचे श्रव-णाचाहि समावेश होतो, असें समजावें.

**मनःप्रसादः सौम्यत्वं मौनमात्मविनिग्रहः ।**
**भावसंशुद्धिरित्येतत्तपो मानसमुच्यते ॥ १६ ॥**

**अर्थ व टीका**–स्वहिताविषयीं मनांत उल्हास असणें व विषया-सक्तीमुळें होणारा प्रमाद नसणें यास मनाचा प्रसाद ह्मणावें. "**सौम्यत्व**" ह्मणजे अक्रूरत्व " **मौन** " ह्मणजे निःशब्दत्व होय. न बोलणें हा " **निःशब्दत्व** " शब्दाचा अर्थ नव्हे; तर परा, पश्यंती, मध्यमा आणि वैखरी या चारी वाणी बंद राहून चित्त चिन्मय करणें यास निःशब्दत्व ह्मणावें. " **आत्मविनिग्रह** " ह्मणजे मनाचा निग्रह. " **भावसंशुद्धि** " ह्मणजे चित्तशुद्धि हीं सर्व मानस तपाचीं लक्षणें होत.

**श्रद्धया परया तप्तं तपस्तत्त्रिविधं नरैः ।**
**अफलाकांक्षिभिर्युक्तैः सात्त्विकं परिचक्षते ॥ १७ ॥**

**अर्थ**–फळाची आशा न धरितां, स्थिरचित्त होऊन परम श्रद्धेनें केलेलें असें हें तीन प्रकारचें तप सात्त्विक तप होय असें ह्मणतात.

**सत्कारमानपूजार्थं तपो दंभेन चैव यत् ।**
**क्रियते तदिह प्रोक्तं राजसं चलमध्रुवम् ॥ १८ ॥**

**अर्थ**–आपण तपस्वी आहों असें लोकांस कळावें व त्यामुळें सन्मान आणि पूजा मिळावी ह्मणून दंभानें केलेलें चंचळ व अस्थिर तप राजस तप होय असें म्हटलें आहे.

**मूढग्राहेणात्मनो यत्पीडया क्रियते तपः ।**
**परस्योत्सादनार्थं वा तत्तामसमुदाहृतम् ॥ १९ ॥**

**अर्थ**–मूर्खपणानें आग्रह धरून स्वशरीरास दुःख देऊन; अथवा दुसऱ्यास दुःख देण्याचे हेतूनें केलेलें तप तामस तप ह्मणावितें.

**दातव्यमिति यद्दानं दीयतेऽनुपकारिणे ।**
**देशे काले च पात्रे च तद्दानं सात्त्विकं स्मृतम् ॥ २० ॥**

**अर्थ**–ज्याला दान द्यावयाचें त्यानें उलट उपकार करावा असें मनांत न आणितां, केवळ दान द्यावें एवढ्याच हेतूनें, देश, काळ आणि पात्र पाहून, जें दान दिलें जातें, त्यास सात्त्विक दान ह्मणतात.

**टीका**–सत्पात्रीं, सुक्षेत्रीं आणि पवित्र वेळीं केलेलें दान अत्यंत उत्तम होय. दान करण्यास या तीन्ही गोष्टी अनुकूळ असल्या तरच दान करावें, नाहीं तर करूं नये, असें कोणीहि समजूं नये याकरितां "च" कारें करून असें सुचविलें आहे कीं, तिन्हींपैकीं कोणतेहि एका प्रसंगीं दिलेलें दान सात्त्विकच समजलें जातें. हा द्रव्यदानाचा

प्रकार होय. अन्नादिकांचे दानास कोणतीहि शर्त लागू नाहीं. तें सर्वत्र करण्यास हरकत नाहीं.

**यत्तु प्रत्युपकारार्थं फलमुद्दिश्य वा पुनः ।**
**दीयते च परिक्लिष्टं तद्दानं राजसं स्मृतम् ॥ २१ ॥**

**अर्थ**–उपकाराची फेड करण्याकरितां, किंवा मोबदला मिळण्याकरितां, किंवा कष्टी होऊन, जें दान केलें जातें तें राजस दान म्हणवितें.

**अदेशकाले यद्दानमपात्रेभ्यश्च दीयते ।**
**असत्कृतमवज्ञातं तत्तामसमुदाहृतम् ॥ २२ ॥**

**अर्थ**–वाईट देशीं, वाईट काळीं व वाईट पात्रीं, अथवा सत्कार न करितां, तिरस्कारानें, जें दान केलें जातें, त्यास तामस दान म्हणावें.

**टीका**–देश, काल आणि पात्र उत्तम असूनहि सत्कारानें दान दिलें नाहीं तर तें तामस दान म्हणवितें. दान करूनहि एखादें अंग न्यून पडलें तर पूर्ण फळ मिळत नाहीं. तशीच सर्व यज्ञ व तपांचीहि गोष्ट आहे. असें जरी आहे, तरी प्रसंगवशात् कोणतेंहि कर्म अंगहीन झालें, तर भगवन्नामोच्चारेंकरून पूर्ण फळ मिळतें, असें या पुढें भगवान् सांगतात.

**ओं तत्सदिति निर्देशो ब्रह्मणस्त्रिविधः स्मृतः ।**
**ब्राह्मणास्तेन वेदाश्च यज्ञाश्च विहिताः पुरा ॥ २३ ॥**

**अर्थ**–ॐ, तत् आणि सत् अशा तीन नांवांनीं ब्रह्माचा निर्देश केला आहे. येणेंकरून उपनयन, वेदपठण व यज्ञ करावे असें प्राचीन विधान आहे.

**तस्मादोमित्युदाहृत्य यज्ञदानतपःक्रियाः ।**
**प्रवर्तन्ते विधानोक्ताः सततं ब्रह्मवादिनाम् ॥ २४ ॥**

अर्थ–ह्मणून "ॐ" या अक्षराच्या उच्चारानें ब्रह्मवेत्त्यांच्या विधानोक्त यज्ञदानतपक्रिया प्रवर्ततात.

टीका–ब्राह्मण, वेद आणि यज्ञ, या त्रिविध नामेंकरून निर्मिले गेले आहेत असें पूर्वश्लोकीं सांगून, यज्ञदानादि क्रिया ॐकाराच्या उच्चारानें प्रवर्ततात असें या श्लोकीं ह्मटलें आहे. यावरून सर्व सत्क्रिया या त्रिविध नामोच्चारानें सफळ होतात असें दर्शविलें आहे. ब्राह्मणपण उपनयनविधि केल्यानें येतें. तो उपनयनविधि, तसेंच वेदपठण व सर्व यज्ञक्रिया ॐकाराचा उच्चार करूनच करितात. ब्रह्मवादी क्रिया प्रवर्तवितात असें न ह्मणतां, ब्रह्मवाद्यांच्या क्रिया प्रवर्ततात असें ह्मटलें आहे. यावरून असें सुचविलें आहे कीं, हे स्वयमेवच प्रसिद्ध झाले आहेत. ॐ, तत् आणि सत् या त्रिविध नामांनीं ते उत्पन्न झाले ह्मणून त्या नामांनींच ते प्रवर्ततात व त्यांतील न्यूनहि पूर्ण होतें.

**तदित्यनभिसंधाय फलं यज्ञतपःक्रियाः ।**
**दानक्रियाश्च विविधाः क्रियन्ते मोक्षकांक्षिभिः ॥ २५ ॥**

अर्थ–मोक्षाची इच्छा करणारे लोक फळाची आशा न धरितां, यज्ञदानादिक्रिया "तत्" शब्दाचा उच्चार करून करितात.

टीका–"तत्" पदानें ब्रह्माचा बोध होतो. यज्ञतपादि क्रियाच ब्रह्म होय असें समजून मोक्षेच्छु फळाची इच्छा सोडून त्या आचरतात. असें समजण्याचें कारण हेंच कीं ॐ, तत् आणि सत् या नामत्रयानें सर्व कर्मांची उत्पत्ति झाली आहे. "तत्" ह्मणजे "तें" असा अर्थ आहे. यावरून जाणत्याहून "तें" निराळें आहे असें होतें. जाणता तर रूपातीत व ज्ञानस्वरूप आहे. ह्मणून त्यावेगळें जडस्वरूप "तें" होय. एवंच द्रष्टा जाणता जें चैतन्य त्यावेगळें जड "तें" होय असा प्रथम-

दर्शनी बोध होतो. अशा जडांच्या ठायीं सर्वत्र ब्रह्मच आहे; कारण तें त्यांचें उपादानकारण आहे. तो घट ह्मणतां मातीच दिसते व तो तरंग ह्मणतां समुद्रच दिसतो. त्याप्रमाणें तें जड ह्मणतां ज्ञान्यांस ब्रह्मच दिसतें. या रीतीनें द्रष्टा जडांस "तें" ह्मणतो व तसें ह्मणतांना आपणहि "तें" आहों असें जाणत असतो. तेव्हां जड नाहींच, सर्व चित्स्वरूप आहे, असा त्याचा अनुभव असतो. ह्मणून जड "तें" हें ब्रह्माचेंच नाम होय. यावरून "तत्पद" ब्रम्हनिर्देशात्मक आहे. जड हें ब्रह्माचें नांव आहे ह्मणून कर्महि ब्रम्हाचेंच नांव आहे असें सिद्ध होतें. असें आहे तरी ब्राह्मण, वेद आणि यज्ञादि कर्में त्रिविध नांवांनींच निर्मिलीं आहेत ह्मणून त्यांचा उच्चार केला पाहिजे. त्यापैकीं ॐकाराचा उच्चार करावा ह्मणून पूर्व श्लोकीं सांगितलें व या श्लोकीं तन्नामक कर्म ब्रह्मच आहे असें "तदिति" या पदानें सुचविलें आहे. असें समजून मोक्षाची इच्छा करणारे लोक कर्माचरण करितात असें भगवान् ह्मणतात. आतां सत्पदाचें विवेचन पुढील दोन श्लोकांनीं केलें आहे.

**सद्भावे साधुभावे च सदित्येतत्प्रयुज्यते ।**
**प्रशस्ते कर्मणि तथा सच्छब्दः पार्थ युज्यते ॥ २६ ॥**
**यज्ञे तपसि दाने च स्थितिः सदिति चोच्यते ।**
**कर्म चैव तदर्थीयं सदित्येवाभिधीयते ॥ २७ ॥**

**अर्थ**–"**सत्**" शब्दाचा उपयोग अस्तित्व ह्मणजे आहेपणा दाखविण्याकरितां करितात. आणि साधुभावहि दाखविण्याकरितां करितात. त्याचप्रमाणें प्रशस्त कर्माचे ठायींहि "**सत्**" शब्दाची योजना करितात; यज्ञ, तप व दान यांचे ठायीं मनाचें समाधान राहतें त्यालाहि "**सत्**" ह्मणतात. तत्पद कर्म सांगितलें त्यालाच "**सत्**" म्हणावें.

टीका–ॐ, तत् आणि सत् या तीन नांवांपैकीं " **सत्** " शब्द सद्भावीं व साधुभावींहि योजिला जातो. अध्यात्मशास्त्राप्रमाणें आहे तें सर्व ब्रह्मच आहे, जड मुळींच नाहीं; ह्मणून सद्भाव ब्रम्हाकडे येतो व असद्भाव जडांकडे लागतो. साधुभाव म्हणजे उत्तम भाव तोहि ब्रम्हाकडे लागतो. ज्या क्रमानें " **सत्** " शब्दाचा अर्थ २६ वे श्लोकाचे पूर्वार्धांत सांगितला आहे, त्याचप्रमाणें कर्माचे ठायींहि त्याची योजना होते, असें " **तथा** " शब्दानें सुचविलें आहे. प्रशस्तकर्मीं ब्रम्ह पाहणें हा सद्भाव होय. हाच पूर्वार्धाचा अर्थ आहे, व पुढील श्लोकाचे उत्तरार्धीं तोच विशेष खुलाशानें सांगितला आहे. ब्रम्हाचा सद्भाव प्रथम सांगून, २७ वे श्लोकाचे पूर्वार्धानें कर्माचा साधुभाव म्हणजे उत्तमभाव सांगतात. यज्ञदानतपादि निष्काम कर्माचे ठायीं मनाचें समाधान असतें तो साधुभाव होय. याप्रमाणें कर्माचे ठायीं सद्भाव आणि साधुभाव सांगितला. आतां, सत्कर्मीं सद्ब्रह्म पहावें अशी प्रशस्त कर्माचे ठायीं सद्भावाची योजना झाली, परंतु तच्छब्दवाचक जडाभासरूप जें ब्रम्ह, तेंच कर्म होय असें " **तदिति** " शब्दानें यापूर्वींच सांगितलें आहे, म्हणून ही द्विरुक्ति होते असें समजून पहिल्या " **सत्** " शब्दाचा अर्थ कोणी इतर प्रकारें करितील, तशी चुकी न करावी, याकरितां त्याच अर्थीं प्रथम " **सत्** " शब्द योजिला आहे, असें " **तदर्थीयं** " शब्दानें भगवान् सुचवितात. एवंच तत्पदवाच्य ब्रम्हरूपकर्म सत्पदवाच्य ब्रम्हच होय. अंगहीन कर्माचा दोष जावा म्हणून नामत्रयाचें हें विवेचन भगवंतांनीं केलें आहे. हीं तीन्हीं नांवें गहन भाव धरून सांगितलीं आहेत. ॐकार वेदांचें मूळ आहे, म्हणून "**गोविंद**" " **गोविंदांपति**" अशीं वेदार्थ दाखविणारीं अनंत भगवन्नामें " ॐ " शब्दानें सुचविलीं आहेत. ' **मंदर** ' ' **गोवर्धन** ' ' **वृंदावन** ' अशीं जडांचीं

नांवेंहि भगवन्नामेंच होत. तीं सर्व " तत् " शब्दानें सुचविलीं आहेत. " सत् " शब्दानें निवळ स्वरूपाची सूचना होते. तें दर्शविणारीं " सच्चिदानंद " " आत्मा " " परमात्मा " इत्यादि नांवें "सत्" शब्दानें सुचविलीं आहेत. या प्रकारें " ॐ तत् सत् " या तीन पदांचे विवरणानें नाममाहिमाच वर्णन केला आहे; व याच अर्थाची **"यस्य स्मृत्या च नामोक्त्या "** ही स्मृतिहि आहे.

**अश्रद्धया हुतं दत्तं तपस्तप्तं कृतं च यत् ।**
**असदित्युच्यते पार्थ न च तत्प्रेत्य नो इह ॥ २८ ॥**

अर्थ–हे अर्जुना, श्रद्धेवांचून केलेलें यज्ञ, दान, तप आणि कोणतेंहि कर्म यांना "असत्" ह्मणतात. तें या लोकीं व परलोकींहि निरुपयोगी होतें.

ॐ तत्सत्कृष्णार्पणमस्तु.



श्री.

# अध्याय १८ वा.

## ॐ नमो भगवते वासुदेवाय.

"**संन्यस्य श्रवणं कुर्यात्**" अशी श्रुति आहे. तथापि जनक, याज्ञवल्क्य, वसिष्ठ इत्यादि मोठमोठे ब्रह्मवेत्ते संन्यासावांचून श्रवणास कसे योग्य झाले अशी अर्जुनास शंका आली. तिचा परिहार "**अनाश्रितः कर्मफलं**" या सहाव्या अध्यायांतील श्लोकानें झाला. त्या श्लोकानें भगवंतांनीं कर्मयोगांतच संन्यास दाखविला आहे. परंतु हा संन्यास कर्माश्रित आहे व श्रुति तर ह्मणते कीं "**न कर्मणा न प्रजया धनेन त्यागेनैके अमृतत्व मानशुः**"; ह्मणजे कर्मानें किंवा प्रजेनें किंवा धनानें मोक्ष मिळत नाहीं, एका त्यागानेंच तो मिळतो. तेव्हां हें कसें? बरें, कर्मसंन्यासानें मोक्ष मिळतो असें भगवान् ह्मणतात व त्यागानें मोक्ष मिळतो अशी श्रुति बोलते. यावरून कर्मसंन्यास आणि त्याग एकच दिसतो. पण श्रुति तर कर्मास उडवून त्यागासच मोक्ष प्रधानांग देते. यामुळें कर्मसंन्यासाहून त्याग निराळा असावा असा भास होतो. या सर्व घोटाळ्याचा निकाल करून घ्यावा, ह्मणून या अध्यायारंभीं अर्जुन प्रश्न करितो कीं,

**संन्यासस्य महाबाहो तत्त्वमिच्छामि वेदितुम् ।**
**त्यागस्य च हृषीकेश पृथक्केशिनिषूदन ॥ १ ॥**

अर्थ—हे कृष्णा, संन्यास आणि त्याग या दोहींचें तत्व पृथक्त्वें ऐकण्याची माझी इच्छा आहे.

भगवान् ह्मणतात,

**काम्यानां कर्मणां न्यासं संन्यासं कवयो विदुः ।**
**सर्वकर्मफलत्यागं प्राहुस्त्यागं विचक्षणाः ॥ २ ॥**

**अर्थ**—काम्यकर्मांचे त्यागास पंडित "**संन्यास**" ह्मणतात, व वेद-विहित सर्व कर्मांचे फळाच्या त्यागास "**त्याग**" ह्मणतात.

**टीका**—चित्तशुद्धीवांचून काम्यकर्मांचा त्याग घडूं शकत नाहीं, आणि चित्तशुद्धि होण्यास निष्काम कर्म केलें पाहिजे, ह्मणून काम्य-कर्मांचा त्यागच संन्यास होय असें जाणते लोक समजतात. याच संन्यासेंकरून श्रवण करावें असें "**संन्यस्य श्रवणं कुर्यात्**" या श्रुतीचें तत्व आहे. चित्त निष्काम झालें ह्मणजे तीव्र मुमुक्षा उपजते व तेंव्हांच आत्मतत्व उमजतें. निष्काम चित्त असणें हेंच चतुर्थाश्रमाचें वैभव होय; केवळ डोकें बोडून जानवें तोडलें ह्मणजे संन्यास होत नाहीं. याच अर्थानें "**अनाश्रितः कर्मफलं**" हा श्लोक भगवान् बोलले. हें अर्जुनाच्या पहिल्या प्रश्नाचें उत्तर झालें. आतां, त्याग कशास ह्मणावें हा अर्जुनाचा दुसरा प्रश्न आहे. वास्तविकपणें "**संन्यास**" शब्दाचा व्याकरणसिद्ध अर्थ त्यागच होतो. तथापि मुमुक्षूंस दोन प्रकारचा त्याग पाहिजे. एक काम्य त्याग व दुसरा ईश्वरार्पणानें विहित कर्मांचे फळाचा त्याग. नुसत्या काम्यकर्मत्यागानें मोक्ष मिळूं शकत नाहीं. कारण निष्काम विहित कर्म केलें तरी तें बंधक होतें व तो बंध, तें कर्म ईश्वरार्पण केल्यानें नाहींसा होतो, असें तिसऱ्या अध्यायांत भगवंतांनीं स्पष्ट करून सांगितलें आहे. हाच दोन प्रकारचा त्याग या श्लोकांत सांगितला आहे. "**न कर्मणा न प्रजया**" या श्रुतीचेंहि तत्व हेंच आहे. "**न कर्मणा**" या पदानें काम्यकर्मानें मोक्ष मिळत नाहीं असें सांगितलें आहे; कारण काम्यकर्मानें पुनरावृत्ति टळत नाहीं, असें या गीतेंतच "**ते तं भुंक्त्वा स्वर्गलोकं विशालं क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति**" या श्लोकानें सांगितलें आहे. एका त्यागा-

नेंच मोक्ष मिळतो असें जें श्रुतीनें ह्मटलें आहे त्याचा भाव असा आहे कीं, काम्य कर्म न करितां नित्य कर्मफळाचा ईश्वरीं कर्मार्पण करून त्याग केला तरच मोक्ष मिळतो. यावरून "**न कर्मणा अमृतत्वमानशुः**" हें तत्व या श्लोकाचे पूर्वार्धांत व "**त्यागेनैके अमृतत्वमानशुः**" हें तत्व उत्तरार्धांत भगवंतांनीं स्पष्ट करून सांगितलें आहे असें उघड दिसतें. पूर्वार्धांत सांगितल्याप्रमाणें काम्य त्याग केल्यानें संन्यास होतो व त्यामुळें श्रवणाधिकार येतो. आणि उत्तरार्धांत सांगितल्याप्रमाणें कर्मार्पण केल्यानें ईश्वरप्रसाद होऊन आत्मसाक्षात्कार होतो व तदनंतर मोक्ष मिळतो. यावरून मोक्षप्राप्तीकरितां आश्रमसंन्यासाची जरूरच आहे असें नाहीं.

**त्याज्यं दोषवदित्येके कर्म प्राहुर्मनीषिणः ।**
**यज्ञदानतपःकर्म न त्याज्यमिति चापरे ॥ ३ ॥**

अर्थ—कर्म दोषयुक्त आहे ह्मणून टाकून द्यावें असें कित्येक बुद्धिमंत लोक ह्मणतात. व यज्ञदानतपादि कर्में टाकूं नयेत असें दुसरे लोक ह्मणतात.

टीका—कर्मांत बंध करण्याचा दोष आहे ह्मणून तें त्याज्य आहे असें **सांख्यांचें** मत आहे व वेदोक्त कर्म केलेंच पाहिजे असें **मीमांसकांचें** मत आहे. नित्यनिष्काम कर्म देखील बंधक आहे हें वर्म **सांख्यांना** कळलें, ह्मणून भगवान् त्यांस बुद्धिमंत ह्मणतात, व **मीमांसक** अल्पबुद्धि समजून त्यांस "**अपरे**" ह्मणतात. मीमांसाशास्त्राचा कर्ता जैमिनि होय. तो व्यासाचा शिष्य होता, ह्मणून पूर्ण अद्वैती होता. तथापि अशुद्धचित्ताचे लोक मोक्षाधिकारी नसल्यामुळें, ते मोक्षमार्गास लागले तर त्यांचें व्यर्थ नुकसान होतें; ह्मणून त्यांस कर्मच योग्य आहे व त्यांनीं तें करावें या उद्देशानें मोक्षमार्गाचा निषेध करावा व कर्ममार्गाची स्थापना करावी, अशी व्यासाज्ञा झाल्यावरून, जैमिनीनें मीमांसाशास्त्र

उत्पन्न केलें. त्याचा तो हेतु अलिकडचे लोकांस न समजून कर्मच श्रेष्ठ म्हणून धरून बसले आहेत. ही मीमांसकांची अल्पबुद्धि जाणून भगवान् त्यांस बुद्धिमंत न म्हणतां " अपरे " म्हणतात. या मीमांसकांपेक्षां, कर्मास दोषवंत समजणारे सांख्य जास्त बुद्धिमंत आहेत एवढेंच भगवान् सुचवितात. परंतु कर्म अजीबात टाकून द्यावें हें त्यांचें मत आपल्यास संमत नाहीं असें यापुढें म्हटलें आहे.

**निश्चयं शृणु मे तत्र त्यागे भरतसत्तम ।**
**त्यागो हि पुरुषव्याघ्र त्रिविधः संप्रकीर्तितः ॥ ४ ॥**

**अर्थ**–हे पुरुषश्रेष्ठा अर्जुना, त्यागाविषयीं माझें निश्चयात्मक मत काय आहे तें ऐक. त्याग तीन प्रकारचा सांगितला आहे.

**यज्ञदानतपःकर्म न त्याज्यं कार्यमेव तत् ।**
**यज्ञो दानं तपश्चैव पावनानि मनीषिणाम् ॥ ५ ॥**

**अर्थ**–यज्ञदानतपादि कर्में न टाकतां तीं केलींच पाहिजेत. यज्ञदानतपांच्या योगानें विचारी मनुष्यांचें चित्त शुद्ध होतें.

**एतान्यपि तु कर्माणि संगं त्यक्त्वा फलानि च ।**
**कर्तव्यानीति मे पार्थ निश्चितं मतमुत्तमम् ॥ ६ ॥**

**अर्थ**–हे अर्जुना, हींच कर्में काम्याचा संग टाकून व बंधक फळांचा त्याग करून अगत्य आचरावीं असें माझें निश्चित मत आहे व तेंच उत्तम मत होय.

**टीका**–" **संग** " शब्दानें काम्य कर्मांचा त्याग सुचवून "**फल**" शब्दानें नित्य कर्मांचा ईश्वरार्पणविधि सांगितला आहे. याचेंच स्पष्टीकरण यापुढें केलें आहे.

नियतस्य तु संन्यासः कर्मणो नोपपद्यते ।
मोहात्तस्य परित्यागस्तामसः परिकीर्तितः ॥ ७ ॥

अर्थ–नित्य कर्मांचा त्याग करणें उक्त नव्हे. अविवेकानें त्यांचा त्याग केला तर त्याला तामस त्याग म्हणतात.

टीका–" नियतस्य तु संन्यासः " यांतील " तु " शब्दानें असें सुचविलें आहे कीं, काम्य कर्मांचा त्याग घडूं शकतो. नियत कर्मांचा त्याग म्हणजे न्यास घडूं शकत नाहीं, असें न म्हणतां, " संन्यास " घडूं शकत नाहीं असें म्हटलें आहे याचे कारणाचा विचार केला पाहिजे. नियत कर्मांचा त्याग तर घडूं शकत नाहीं व त्यागाशिवाय मोक्ष नाहीं, म्हणून फळभागमात्र त्याज्यांशांत काढितां येतो. फळभागाचा त्याग होऊं शकतो पण कर्मभाग उरतो, म्हणून सम्यक् प्रकारें त्याग होऊं शकत नाहीं म्हणजे कर्मभाग व फळभाग या दोहींचा त्याग होऊं शकत नाहीं असें " संन्यास " शब्दानें सुचविलें आहे. याकरितां जो नियतकर्म टाकतो तो अविचारी होय. अविवेक हें तमाचें लक्षण होय, म्हणून नित्यकर्मत्यागास तामसत्याग म्हटलें आहे.

दुःखमित्येव यत्कर्म कायक्लेशभयात्त्यजेत् ।
स कृत्वा राजसं त्यागं नैव त्यागफलं लभेत् ॥ ८ ॥

अर्थ–कर्म केल्यानें दुःख होतें म्हणून शरीरकष्टाच्या भयानें जो कर्म टाकतो, त्याचा तो त्याग राजसत्याग होय. असा त्याग केल्यानें त्यागाचें फळ मिळत नाहीं.

कार्यमित्येव यत्कर्म नियतं क्रियतेऽर्जुन ।
संगं त्यक्त्वा फलं चैव स त्यागः सात्त्विको मतः ॥ ९ ॥

**अर्थ**–हे अर्जुना, आपलें कर्तव्य ह्मणून जो नित्यकर्म आचरतो पण त्या कर्माचे ठायीं आसक्ति न ठेवितां फक्त फळाचा त्याग करितो त्याच्या त्या त्यागास सात्विक त्याग मानिलें आहे.

**टीका**–उत्तरार्धांतील "**चैव**" पदांतील "**च**"कारानें असें सुचविलें आहे कीं, संग आणि फळ दोन्हींहि टाकावीं. परंतु फळच टाकावें कर्म टाकूं नये असा "**एव**" शब्दानें बोध केला आहे.

**न द्वेष्ट्यकुशलं कर्म कुशले नानुषज्जते ।**
**त्यागी सत्त्वसमाविष्टो मेधावी छिन्नसंशयः ॥ १० ॥**

**अर्थ**–सत्वगुणयुक्त, स्थिरबुद्धीचा आणि ज्याचे सर्व संशय नष्ट झाले आहेत असा त्यागी बंधक कर्माचा द्वेष करित नाहीं व निष्काम-कर्माचे ठायीं आसक्ति ठेवीत नाहीं.

**टीका**–ज्याचे ठायीं सत्व बऱ्या प्रकारें प्रवेशलें आहे त्यास "**सत्वसमाविष्ट**" ह्मणावें. या शब्दाचें स्पष्टीकरण "**मेधावी**" आणि "**छिन्नसंशयः**" या दोन शब्दांनीं केलें आहे. "**मेधा**" ह्मणजे आत्मविद्यायुक्त बुद्धि होय. अशा बुद्धीनें त्रिगुणात्मक प्रपंच ब्रह्ममय दिसूं लागतो. ज्यास असा योग बाणतो त्याचे सर्व संशय नष्ट होतात, असें "**भिद्यते हृदयग्रंथिश्छिद्यन्ते सर्वसंशयाः । क्षीयन्ते चास्य कर्माणि तस्मिन् दृष्टे परावरे ॥**" या श्रुतीनें सांगितलें आहे. ज्यास असा अनुभव होतो त्याचे अंगीं बरऱ्या प्रकारें सत्व प्रविष्ट झालें असें समजावें. अशा पुरुषास **त्यागी** ह्मटलें आहे. हा त्यागी फळाचा त्याग करून विहित कर्माचरण करित असतो, परंतु त्या कर्माचे ठायीं आसक्ति ठेवित नाहीं. तथापि बंध करणारें काम्य कर्म करितांना कोणास पाहिलें, तर त्या कर्माचा तो द्वेष करित नाहीं. कारण मोक्षमार्गाचा ज्यास अधिकार नाहीं, त्यांनीं कांहीं न करण्यापेक्षां काम्य कर्म करणें बरें आहे असें तो जाणत असतो.

**न हि देहभृता शक्यं त्यक्तुं कर्माण्यशेषतः ।**
**यस्तु कर्मफलत्यागी स त्यागीत्यभिधीयते ॥ ११ ॥**

**अर्थ**—देहधारी मनुष्यास अखिल कर्म टाकणें शक्य नाहीं. ह्मणून जो कर्माचे फळाचा त्याग करितो त्यासच त्यागी ह्मटलें आहे.

**टीका**—मनुष्याचा देह कर्माचा बनला आहे, ह्मणून तो कर्मास टाकूं शकत नाहीं. तिसऱ्या अध्यायांतील "**न हि कश्चित्क्षणमपि**" या श्लोकानें हेंच तत्व सांगितलें आहे. त्या श्लोकाची टीका पहावी. या कारणाकरितां, जो कर्म करून फळाचा त्याग करितो, तोच त्यागी होय.

**अनिष्टमिष्टं मिश्रं च त्रिविधं कर्मणः फलम् ।**
**भवत्यत्यागिनां प्रेत्य न तु संन्यासिनां क्वचित् ॥ १२ ॥**

**अर्थ**—अनिष्ट, इष्ट आणि मिश्र असे कर्मफळाचे तीन भेद आहेत. अत्यागी लोकांना मरणानंतरहि तें सोडित नाहीं, परंतु फळत्याग करणाऱ्या संन्याशांस त्याचा बंध होत नाहीं.

**टीका**—अनिष्ट ह्मणजे दुःख, इष्ट ह्मणजे सुख व मिश्र ह्मणजे कांहीं दुःख व कांहीं सुख असें तीन प्रकारें कर्माचें फळ मिळतें. अत्यागी ह्मणजे काम्य कर्म करणारा होय. पुण्यामुळें मरणानंतर त्यास स्वर्गसुख मिळतें. पण हें सोन्याची बेडीच होय, ह्मणून तेंहि इष्ट नव्हे; कारण तें अंतवंत असतें. पापाचें फळ दुःख आहेच. तेंहि देहांतरीं भोगलें पाहिजे. एवंच मरणामुळें कर्माचें फळ भोगणें सुटत नाहीं. परंतु कर्मफळ टाकणारा संन्यासी या कर्मबंधापासून मुक्त असतो. आतां आत्म्याचे अकर्तृत्वाचा बोध व्हावा ह्मणून प्रकृतीचे कर्मकर्तृत्वाचे पांच भागांचें विवेचन भगवान् करितात.

**पंचैतानि महाबाहो कारणानि निबोध मे ।**
**सांख्ये कृतांते प्रोक्तानि सिद्धये सर्वकर्मणाम् ॥ १३ ॥**

**अर्थ**—सांख्यशास्त्रांत आणि वेदांतशास्त्रांत सर्व कर्मांचे सिद्धीस पांच कारणें सांगितलीं आहेत. तीं मजपासून ऐकून घे.

**अधिष्ठानं तथा कर्ता करणं च पृथग्विधम् ।**
**विविधाश्च पृथक्चेष्टा दैवं चैवात्र पंचमम् ॥ १४ ॥**

**अर्थ**—अधिष्ठान ह्मणजे शरीर, कर्ता ह्मणजे अहंकार, पृथग्विध करण ह्मणजे निरनिराळीं इंद्रियें, विविधा पृथक्चेष्टा ह्मणजे पंचप्राण, व दैव ह्मणजे इंद्रियाभिमानी देवता, असे पांच प्रकार आहेत.

**शरीरवाङ्मनोभिर्यत्कर्म प्रारभते नरः ।**
**न्याय्यं वा विपरीतं वा पंचैते तस्य हेतवः ॥ १५ ॥**

**अर्थ**—शरीर, वाचा आणि मन यांचे योगानें न्याय्य अथवा अन्याय्य जें जें कर्म करण्याचा मनुष्य आरंभ करितो, त्या त्या कर्मास हीं पांच निमित्तें होतात.

**तत्रैवं सति कर्तारमात्मानं केवलं तु यः ।**
**पश्यत्यकृतबुद्धित्वान्न स पश्यति दुर्मतिः ॥ १६ ॥**

**अर्थ**—अशा पांच कारणांनीं कर्म होत असतां, केवळ अशा आत्म्यास जो कर्ता ह्मणून पाहतो, तो दुर्मति अशुद्ध बुद्धीमुळें आंधळा झाला असतो.

**टीका**—ज्यानें आपली बुद्धि शुद्ध केली नाहीं त्यास अकृतबुद्धि ह्मणावें. बुद्धीची शुद्धि झाल्याखेरीज आत्मा अकर्ता आहे असें समजत नाहीं. आत्म्याचें अकर्तृत्व पाहणें हेंच ज्ञानाचें मुख्य फळ होय. आत्मस्वरूपाचें अज्ञान असलें ह्मणजे बुद्धि अविद्यामय असते. तेणें-

करून ती अहंभावयुक्त होते व कर्तृत्व आपले माथ्यावर घेते. तेंच, तिची शुद्धि झाली ह्मणजे ती विद्यायुक्त होऊन आत्म्याचें अकर्तृत्व पाहूं लागते व कर्तृत्व प्रकृतीचें आह असें समजूं लागते. याप्रमाणें ज्याची बुद्धि शुद्ध झाली नसते अशा अकृतबुद्धीचे पुरुषास "दुर्बुद्धि" असें नांव देतात.

हें ऐकून अर्जुनाचें मन घोटाळून गेलें कीं, अहंकार टाकून युद्ध करण्याकरितां इतका उपदेश भगवंतांनीं केला व अहंकाराशिवाय कोणतेंहि कर्म घडूं शकत नाहीं असेंहि तेच सांगतात. ही अर्जुनाची स्थिति जाणून त्याचे समाधानाकरितां यापुढील श्लोक भगवान् बोलतात.

यस्य नाहंकृतो भावो बुद्धिर्यस्य न लिप्यते ।
हत्वापि स इमाँल्लोकान्न हन्ति न निबध्यते ॥ १७ ॥

अर्थ—ज्यास अहंकाराचा भाव नाहीं व ज्याची बुद्धि लिप्त होत नाहीं, तो सर्व लोकांना मारूनहि मारित नाहीं व बद्ध होत नाहीं.

टीका—असा या श्लोकाचा शब्दार्थ आहे. परंतु एवढ्यानें त्याचें यथार्थ ज्ञान होत नाहीं, ह्मणून त्याचें स्पष्टीकरण करणें आवश्यक आहे. अहंप्रत्ययावांचून कोणतेंहि कर्म घडूं शकत नाहीं हें अगदीं निर्विवाद आहे. अक्रिय आत्मा आपल्यास समजला असें वाटणें देखील अहंकारच होय. तथापि आत्मा अक्रिय आहे असें उमजल्याबरोबर अहंकाराचा अभाव होतो. अलंकार मिथ्या आहे असें कळलें तरी त्याचा आकार दिसल्यावांचून राहत नाहीं. त्याचप्रमाणें अक्रिय आत्मा उमजला तरी अहंकाराचें स्फुरण होतें. तथापि अलंकार नाहींच असा त्याचा अभाव बुद्धीनें पाहतां येतो. तद्वत् अहंकाराचाहि अभाव पाहतां येतो. आत्मा अकर्ता आहे असें जोंपर्यंत कळत नाहीं, तोंपर्यंत त्याचा भाव ह्मणजे सद्भाव असतो. त्यालाच खरा अहंकार ह्मणावें,

कारण तें मीपणाचें स्फुरणच आत्मा वाटत असतो. सोन्याचें केलेलें केळ पाहिलें ह्मणजे खरोखर पिकलेलें केळच आहे असा भाव उत्पन्न होतो. तें सोनें आहे असें कळेपर्यंत जो भाव असतो तो केळ्याचा सद्भाव होय. जें आहेसें वाटतें तो त्या वस्तूचा सद्भाव व जें नाहींसें कळलें तो त्याचा अभाव होय. केळ नाहीं, सोनें आहे, असें कळलें ह्मणजे केळ्याचा आकार दिसूनहि त्याचा अभाव होतो. त्याप्रमाणें अहंकार मिथ्या आहे व सर्वत्र ब्रह्मच आहे असें अनुभवास आलें ह्मणजे अहंकाराचा अभाव झाला असें जाणावें. असें जरी कळलें तरी 'मी करीन, मी न करीन' असें बुद्धिवृत्तीचें स्फुरण झाल्याखेरीज अत्यंत स्वहित देखील घडूं शकत नाहीं. तथापि त्या मीपणाचें उपादान कारण आत्मा आहे असें समजलें ह्मणजे त्या अहंकाराचा अभाव होतो. याकरितां अहंकाराचा भाव, ह्मणजे तो आहे असा सद्भाव, ज्यास वाटत नाहीं व ज्याची बुद्धि लिप्त होत नाहीं, तो तीन्ही लोकांचा संहार करूनहि अक्रिय राहतो, असें भगवान् ह्मणतात. यावरून एकट्या अहंकाराच्या अभावानें अक्रियत्वसिद्धि होत नाहीं असें सुचविलें आहे. बुद्धि द्वंद्वातीत झाल्याखेरीज ती अलिप्त राहूं शकत नाहीं. केलेल्या कर्माची सिद्धि अथवा असिद्धि यांचे ठायीं बुद्धीचें समत्व राहिलें तर ती अलिप्त झाली असें समजावें. द्वंद्वाचें डोकें बाहेर निघालें कीं तेथें अहंकार तयारच असतो. याकरितां, अहंकाराचा अभाव पाहून जयापजयाची परवा न करितां युद्ध केल्यास त्या कर्मानें तूं बद्ध होणार नाहींस ह्मणून भगवान् अर्जुनास उपदेश करितात. याचप्रमाणें उपदेशारंभीं "**सुखदुःखे समे कृत्वा लाभालाभौ जयाजयौ**" ह्मणून भगवान् बोलले आहेत. अस्तु. या श्लोकांत आणखी एक खुबी आहे. ती अशी कीं, श्लोकांत सांगितल्याप्रमाणें अक्रियत्व राहूं शकतें असाविषयीं अर्जुनाची खात्री करण्याकरितां भगवंतांनीं आपले स्वतःचा दृष्टांत

दिला आहे. वास्तविक तीन्ही लोकांस मारण्याची कोणाहि मनुष्यांत शक्ति नाहीं. ती एकट्या भगवंताचे अंगींच आहे. तो आपल्या संकल्पमात्रेंकरून सर्व सृष्टि उत्पन्न करितो, पाळितो व तिचा संहारहि करितो. इतकें सर्व करूनहि तो अलिप्त असतो. याचें कारण हेंच कीं, त्यास स्वरूपस्थितीचें अखंड स्फुरण होत असतें. व जी घडामोड तो करितो त्याचा त्यास नेहमीं अभाव वाटतो. ह्मणून त्याची चिच्छक्ति (बुद्धि) अलिप्त राहते.

कोणतेंहि न्याय्य अथवा अन्याय्य कर्म घडण्यास जीं पांच कारणें असतात त्यांपैकीं अहंकार एक कारण आहे, हें ऐकून अर्जुनाचें मन घाबरलें होतें त्याचे समाधानाकरितां हा श्लोक प्रवर्तला. आतां न्याय्य कर्म व अन्याय्य कर्म यांची व्याख्या समजण्याकरितां स्ववर्णाश्रमोचित जें वेदोक्त न्याय्य कर्म त्याचे सिद्धीचे तीन प्रकार व विधीचे तीन प्रकार भगवान् सांगतात.

**ज्ञानं ज्ञेयं परिज्ञाता त्रिविधा कर्मचोदना ।**
**करणं कर्म कर्तेति त्रिविधः कर्मसंग्रहः ॥ १८ ॥**

**अर्थ**—ज्ञान, ज्ञेय आणि परिज्ञाता हे कर्माचे तीन विधि आहेत; आणि करण, कर्म व कर्ता हीं कर्माचीं तीन साधनें होत.

**टीका**—जें कर्म करावयाचें असतें त्यास "**ज्ञेय**" ह्मणावें, त्याचे साधनाचे ज्ञानास "**ज्ञान**" ह्मणावें, व कर्मसिद्धि इच्छिणारा "**परिज्ञाता**" होय. उदाहरणार्थ अश्वमेध यज्ञ घेऊं. यज्ञ "**ज्ञेय**" होय. कुंड कसें करावें, द्रव्यें कोणतीं असावीं, मंत्र कोणते ह्मणावे या साधनांचे ज्ञानास "**ज्ञान**" ह्मणावें. यजमानास "**परिज्ञाता**" ह्मणावें. असे हे विधीचे तीन प्रकार होत. उत्तरार्धानें कर्मव्यवहाराचे तीन प्रकार सांगितले आहेत. ज्ञेय तेंच कर्म, त्याचें साधन करण व परिज्ञाता कर्ता होय.

याप्रमाणें तीन्ही विधींचें ऐक्य होऊन कर्म झालें तर त्यास न्याय्य कर्म ह्मणावें; तद्विपरीत कर्म अन्याय्य होय.

**ज्ञानं कर्म च कर्ता च त्रिधैव गुणभेदतः ।**
**प्रोच्यते गुणसंख्याने यथावच्छृणु तान्यपि ॥ १९ ॥**

अर्थ—सांख्यशास्त्रांत गुणभेदंकरून ज्ञान, कर्म आणि कर्ता या प्रत्येकाचे तीन प्रकार सांगितले आहेत ते तूं यथाप्रकार ऐकून घे.

**सर्वभूतेषु येनैकं भावमव्ययमीक्षते ।**
**अविभक्तं विभक्तेषु तज्ज्ञानं विद्धि सात्विकम् ॥ २० ॥**

**टीका**—समुद्रांत निरनिराळ्या आकाराचे तरंग उठतात, ते दिसतात व नासतात. त्यांत अव्यय असें पाणी निरंतर असतें, तें तरंगाबरोबर नासत नाहीं. त्याप्रमाणें सर्व भूतें उत्पन्न होतात, कांहीं काळपर्यंत राहतात व नाश पावतात. कार्यरूपाच्या सत्राह्य असणारें ब्रह्म त्यांत पाहणें, या ज्ञानास सात्विक ज्ञान ह्मणावें. व्यापक ब्रह्मास अव्यय ह्मटल्यानें व्याप्य भूतांचा व्यय दर्शविला आहे. भूतांचा व्यय झाल्यावर जें शेष राहतें तेंच अव्यय ब्रह्म होय. यावरून प्रकृतिपुरुषांचा नेहमीं अद्वैतपणें जोड असतो असें सुचविलें आहे. "**अव्यय**" शब्दानें कालत्रयीं विद्यमान असणाऱ्या स्वरूपाचा बोध केला आहे. "**सद्भाव**" ह्मणजे आहेपणाचा भाव होय. यावरून स्वस्वरूप सत्य व भूतें असत्य होत. ह्मणून सत्यस्वरूपाचा अव्ययभाव सर्व असत्य भूतांचे ठायीं पाहणें या ज्ञानास सात्विक ज्ञान ह्मटलें आहे. हीं भूतें वेगळालीं दिसतात, तरी त्यांमध्यें असणारा अव्ययभाव अविभक्तच आहे असें "**अविभक्तं विभक्तेषु**" या चरणानें सुचविलें आहे. विभक्तांत अविभक्त भाव कसा असूं शकतो याचे स्पष्टीकरणाकरितां दृष्टांताची आवश्यकता आहे. भिंतीवर अनेक तऱ्हेचीं चित्रें काढिलीं असतात. त्या सर्वांत एकच भिंत

अविभक्तपणें असते. तशीं निरनिराळीं भूतें एकाच अव्यय ब्रह्माचे ठायीं आहेत, व त्या सर्वांत तें अविभक्तपणें आहे. असें समजणें हें सात्विक ज्ञान होय. यास विपरीत जें राजसज्ञान तें उत्तर श्लोकांत दर्शविलें आहे.

**पृथक्त्वेन तु यज्ज्ञानं नानाभावान्पृथग्विधान् ।**
**वेत्ति सर्वेषु भूतेषु तज्ज्ञानं विद्धि राजसम् ॥ २१ ॥**

**अर्थ**—सर्व भूतांमध्यें निरनिराळे असंख्य भाव आहेत असा समज ज्या ज्ञानानें होतो तें ज्ञान राजस होय असें समज.

**टीका**—यावरून द्वैत मत राजस ज्ञान होय असें स्पष्ट ठरतें, ह्मणून तें न्याय्य नव्हे. वेदांत सर्वत्र अद्वैत प्रतिपादन केलें आहे. असें असून द्वैत मतवादी, दिसणारें पृथक्त्व खरें मानून, वेदवाक्यांस जुमानीत नाहींत. अद्वैत प्रतीति गुरुकृपेशिवाय होत नाहीं ह्मणून ती वादांत देतां येत नाहीं; यामुळें हें मत चाललें आहे.

**यत्तु कृत्स्नवदेकस्मिन्कार्ये सक्तमहैतुकम् ।**
**अतत्त्वार्थवदल्पं च तत्तामसमुदाहृतम् ॥ २२ ॥**

**अर्थ**—ज्या ज्ञानाचे योगानें कोणत्याहि एका कार्याचे ठायीं ब्रह्मत्व स्थापन करून तेथें मनाची आसक्ति असते अशा मोक्षास हेतु न होणाऱ्या व तत्वार्थरहित अल्प ज्ञानास तामस ज्ञान ह्मटलें आहे.

**टीका**—एक असून जें अनेक झालें, अशा उपादान कारणास "**कृत्स्न**" ह्मटलें आहे. त्यापासून नाना रूपांनीं जें सर्व जगत् उत्पन्न झालें तें त्याचें कार्य होय, असें समजणें सात्विक ज्ञान होय. या कृत्स्न कारणासारखेंच त्याचें एखादें कार्य मानून त्या कार्याचे ठायीं कारण म्हणून आसक्ति ठेवणें, हें ज्ञान तामस ज्ञान होय. तें मोक्षास कारणीभूत नसतें, त्यांत तत्वार्थ नसतो व तें अल्प दृष्टीचें असतें. इत-

काच या श्लोकाचा उत्तानार्थ आहे. पण त्यापासून व्हावा तसा बोध होत नाहीं. याकरितां त्याचा विशेष खुलासा केला पाहिजे. श्रुति ह्मणते कीं सर्वच ब्रह्म आहे असें जाणावें. यावरून "सर्व" हें ब्रह्माचें नांव समजून "कृत्स्न" शब्दानें तें एथें सुचविलें आहे. हें "सर्व" एकत्वें कळणें यासच खरें ज्ञान ह्मणावें. परंतु कोणी भ्रांत लोक आकाशास, कोणी ज्योतीस, व कोणी देवतांतरास ब्रह्म समजतात. कार्यरूपा सर्वांत ब्रह्म आहेच; ह्मणून कार्यास ब्रह्म समजणें ज्ञान नव्हे असें म्हणतां येत नाहीं पण तें तामस ज्ञान होय असें भगवान् म्हणतात. कारण, त्यांमध्यें हें अज्ञान असतें कीं, कार्यरूपास ते कारण समजतात. सोनें कारण व मुकुटकुंडलादि अलंकार त्याचीं कार्यें होत. कुंडलास सोनें म्हटलें असतां तें सोनें नव्हे असें कोणासहि म्हणतां येणार नाहीं. पण कुंडलाचे आकृतीस कारणरूप सोनें म्हणणें चुकीचें होतें. तसें कृत्स्नकारण ब्रम्ह होय आणि आकाश, ज्योति, देवतांतरें इत्यादि त्या ब्रम्हाचीं कार्यें होत. हीं सर्व ब्रम्ह नव्हत असें म्हणतां येत नाहीं. तथापि त्यांचे आकृतीस अथवा रूपास ब्रम्ह म्हणतां येत नाहीं. अशा रीतीनें जगत्कारणाचे एखादे कार्याचे ठायीं कारणत्व स्थापून तेथें तशी आसक्ति ठेवणें तामस ज्ञान होय असें "कृत्स्नवदेकस्मिन्कार्ये सक्तं" या पदानें सुचविलें आहे. जें ब्रम्ह सर्व होऊनहि अविकृत राहतें, त्याचा महिमा विकारवंत वस्तूस देणें अज्ञान नव्हे असें कोणीहि विचारी मनुष्य म्हणणार नाहीं. "कृत्स्नासारिखें त्याचें कार्य मानून त्यांत जें ज्ञान सक्त झालें" असें भगवान् म्हणतात. यांतील "कृत्स्ना"सारखें या शब्दानें असें सुचविलें आहे कीं, कार्य, तत्व नव्हे; कारण, कार्यास कृत्स्नपण साधत नाहीं. कृत्स्नकारण ब्रम्ह देशपरत्वें व कालपरत्वें अनंत आहे, म्हणून त्यास "अनल्प" म्हटलें आहे. कार्यरूप जग त्यासारिखें नाहीं, म्हणून कार्याचे ठायीं सक्त झालेल्या

ज्ञानास "अल्प" म्हटलें आहे. ज्या ज्ञानाचें फळ मोक्ष आहे, तें तत्वार्थवत् ज्ञान होय. परंतु कार्याचे ठायीं ब्रम्हत्व स्थापणें हें ज्ञान अज्ञानमिश्रित असल्यानें त्यापासून मोक्ष मिळत नाहीं, याकरितां त्यास "अतत्वार्थवत्" म्हटलें आहे. एवंच कार्यरूपाची कारणत्वें उपासना करणें तामस ज्ञान होय व तें मोक्षास कारणीभूत होत नाहीं असा या श्लोकाचा मथितार्थ झाला. यावरून जगत्कारण जें शुद्धसत्वात्मक सगुणब्रम्ह, याची उपासना करणें सात्विक ज्ञान होय; तद्व्यतिरिक्त इतर देवतांची उपासना करणें तामस ज्ञान होय असें स्पष्ट सिद्ध झालें.

एथपर्यंत ज्ञानाच्या तीन प्रकारांचें वर्णन झालें. आतां कर्माच्या तीन प्रकारांचें विवेचन पुढील श्लोकापासून केलें आहे.

**नियतं संगरहितमरागद्वेषतः कृतम् ।**
**अफलप्रेप्सुना कर्म यत्तत्सात्त्विकमुच्यते ॥ २३ ॥**

**अर्थ**–फळाची इच्छा न करितां राग, द्वेष व कामना यांशिवाय जें वेदविहित नित्यकर्म घडतें त्यास सात्विक कर्म म्हटलें आहे.

**टीका**–रागद्वेषयुक्त नियत कर्मदेखील सात्त्विक कर्म नव्हे, कारण कर्माचा सहज अनादि गुण असा आहे कीं कर्त्याचे मनोभावाप्रमाणें फळ द्यावें मन हें झाड होय असें समजूं. या झाडास कर्मरूप कितीहि स्वच्छ पाणी घातलें तरी वृक्षाप्रमाणेंच फळें येतील. लिंबाचे झाडास गंगाजळ घातलें तरी त्याला लिंबोण्याच येतील. तद्वत् नियतकर्म जरी सात्त्विक कर्म आहे, तरी राजस मनानें केलें तर राजस फळच मिळणार. म्हणून रागद्वेषविरहित जें नियत कर्म घडतें, तेंच सात्त्विक होय असें म्हटलें आहे.

**यत्तु कामेप्सुना कर्म साहंकारेण वा पुनः ।**
**क्रियते बहुलायासं तद्राजसमुदाहृतम् ॥ २४ ॥**

**अर्थ**–पण जें कर्म मनांत कामना धरून अथवा अहंकारास्तव मोठे क्लेशानें घडतें त्यास राजस कर्म म्हटलें आहे.

**टीका**–अहंकारावांचून जें काम्य कर्म घडतें तें क्लेशानें सफळ होतें तरी त्यास क्लेशदायक म्हटलें नाहीं. आपली कीर्ति व्हावी म्हणून जे काम्य कर्म करितात त्यांस कीर्तिफळ मिळतें. तसेंच निरहंकारानें काम्य कर्म करणाऱ्यांसहि मिळतें. अहंकारानें कर्म करणाऱ्यांस क्लेशाचें फळ क्लेशरूपानेंच मिळतें, पण दुसऱ्यांस क्लेशाचें फळ स्वर्ग मिळतो. म्हणून अहंकारानें कर्म करणाऱ्यांचे क्लेश सांगितले आहेत. यांपेक्षां निरहंकारानें कर्म करणारा श्रेष्ठ होय. तरी त्याचे कर्मास न्याय्य म्हणतां येत नाहीं; कारण ज्या फळाकरितां इतक्या श्रमानें कर्म केलें जातें तें नश्वरच असतें.

**अनुबंधं क्षयं हिंसामनपेक्ष्य च पौरुषम् ।**
**मोहादारभ्यते कर्म तत्तामसमुदाहृतम् ॥ २५ ॥**

**अर्थ**–कर्म केल्यानें कोणता बंध होईल, धननाश किती होईल, परपीडा किती होईल व आपलें सामर्थ्य काय याचा विचार न करितां अविवेकानें जें कर्म घडतें त्यास तामस कर्म म्हटलें आहे.

**टीका**–अदृष्ट काम्य फळावर भरंवसा नसून केवळ धनमदानें उन्मत्त होऊन कौतुकार्थ यागाचा समारंभ कोणी करितो. या त्याचे कर्मास तामस कर्म म्हटलें आहे. एरव्हीं अनादि बंध तर असतोच त्यांत असें कर्म करून जास्त बंध होतो त्यास **अनुबंध** म्हटलें आहे. एक बेडी पायांत असून दुसरी गळ्यांत बांधल्याप्रमाणें अशा कर्माचा परिणाम होतो. स्वर्गादि फळाची इच्छा नसून असें कर्म करणं त्याचा हेतु केवळ बोकडाचा वध करून मांस भक्षण करण्याचा व सोमपान करून उन्मत्त होण्याचाच असतो. अशा कर्मास न्याय्य कर्म म्हणून कोण म्हणेल ?

यानंतर कर्त्याच्या तीन प्रकारांचें विवेचन भगवान् करितात.

मुक्तसंगोऽनहंवादी धृत्युत्साहसमन्वितः ।
सिद्ध्यसिद्ध्योर्निर्विकारः कर्ता सात्विक उच्यते ॥ २६ ॥

अर्थ–जो कर्ता कामनेपासून मोकळा असतो, ज्यास अहंकार नसतो, धैर्य आणि उत्साह यांनीं जो युक्त असतो व सिद्धि अथवा असिद्धि यांजमुळें ज्यास विकार उत्पन्न होत नाहीं, अशा कर्त्यास सात्विक कर्ता म्हणतात.

टीका–सात्विक कर्ता कोणास म्हणावें हें या श्लोकांत सांगितलें आहे. सात्विक कर्ता काम्य कर्माचा त्याग करितो. यापूर्वीं जे पांच प्रकारचे कर्महेतु सांगितले, त्या प्रकृतिभागांचें सर्व कर्तृत्व आहे, असें तो पाहतो. अपरोक्ष रीतीनें त्यास आत्मा कळला नाहीं तरी तो (आत्मा) अकर्ता असतो असें त्यास समजल्यामुळें, त्यापूर्वीं आपण कर्ता ह्मणून ह्मणत होता तें त्याचें बोलणें राहतें व आप्तवाक्यावर विश्वास ठेवून आत्मा अकर्ता आहे असें तो नुसतें ह्मणतो; ह्मणून त्यास **"अनहंवादी"** असें ह्मटलें आहे. तो स्वर्गादि फळांची धैर्यानें आशा सोडून देतो व नियत कर्म उत्साहानें करितो. आरंभिलेल्या कर्माची सिद्धि झाली तर त्यास हर्ष होत नाहीं व असिद्धि झाली तर खेद होत नाहीं. या दोन्ही प्रसंगीं तो निर्विकार राहतो; कारण ईश्वरार्पण करण्याकरितां तो निष्काम कर्म करित असतो. कार्यसिद्धि झाली तर अमुक फळ मिळेल अशी आशा असेल तरच सिद्धि अथवा असिद्धीनें हर्ष अथवा विषाद उत्पन्न होईल. सात्विक कर्ता केवळ भगवत्प्रीतीकरितां कर्म करित असतो. ती प्रीति मिळण्याकरितां कर्माची सिद्धि झालीच पाहिजे असें नाहीं. भगवत्प्रीति मिळावी या हेतूनें कर्मास आरंभ केला व तें सिद्धीस गेलें नाहीं तरी मायाळू भगवंत त्यास आपली प्रीति देतोच; कारण असा त्याचा सहज वात्सल्यधर्म आहे. आईस पाणी पाहिजे असें पाहून लेंकरूं कौतुकानें पाणी आणूं लागतें. परंतु शक्ति नसल्यामुळें

पाण्याचें भांडें न सांवरतां मध्येंच पाणी सांडून जातें, व आईस पाणी मिळत नाहीं. तरी त्याचा तो प्रेमयुक्त खेळ पाहून ती तृप्त होते. याप्रमाणें भगवत्प्रीतीकरितां केलेलें कर्म आरंभमात्रें करून फळदायक होतें.

**रागी कर्मफलप्रेप्सुर्लुब्धो हिंसात्मकोऽशुचिः ।**
**हर्षशोकान्वितः कर्ता राजसः परिकीर्तितः ॥ २७ ॥**

**अर्थ**—विषयासक्ति बाळगणारा, फलेच्छा करणारा द्रव्याभिलाषी, परपीडेच्या ठायीं चित्त ठेवणारा, शौचरहित व लाभालाभामुळें हर्ष शोक वाहणारा असा कर्ता राजस कर्ता म्हटला आहे.

**अयुक्तः प्राकृतः स्तब्धः शठो नैष्कृतिकोऽलसः ।**
**विषादी दीर्घसूत्री च कर्ता तामस उच्यते ॥ २८ ॥**

**अर्थ व टीका**—कांहीं तरी सत्कर्म करावयाचें पण त्याजकडे लक्ष न ठेवितां चहूंकडे ज्याचें चित्त बावरतें तो "**अयुक्त**" होय. प्रकृतीस वश राहणाऱ्या जड बुद्धीचे मनुष्यास "**प्राकृत**" ह्मणावें. "**स्तब्ध**" ह्मणजे गर्विष्ठ. जवळ पैसा असून गरिबांस न देणारा अथवा प्रातःस्नानादि कर्में करावीं लागूं नयें ह्मणून शक्ति असूनहि अशक्त ह्मणविणारा "**शठ**" होय. कर्माचा कंटाळा बाळगणाऱ्यास "**विषादी**" ह्मणावें. कर्म करावें न करावें असा संशय बाळगणाऱ्यास **दीर्घसूत्री** ह्मणावें. सात्त्विक कर्ताहि दीर्घसूत्री असला तर तोहि तामस कर्ता समजला पाहिजे असें "**दीर्घसूत्री**" शब्दापुढील "**च**"कारानें सुचविलें आहे. यापुढें बुद्धि आणि धारणा यांचे प्रकार भगवान् सांगतात.

**बुद्धेर्भेदं धृतेश्चैव गुणतस्त्रिविधं शृणु ।**
**प्रोच्यमानमशेषेण पृथक्त्वेन धनंजय ॥ २९ ॥**

अर्थ—हे अर्जुना, त्रिगुणांच्या अनुषंगेंकरून बुद्धि व धारणा यांचे तीन तीन भेद होतात. ते वेगवेगळे विस्तारपूर्वक सांगतों. तें ऐक.

**प्रवृत्तिं च निवृत्तिं च कार्याकार्ये भयाभये ।**
**बंधं मोक्षं च या वेत्ति बुद्धिः सा पार्थ सात्त्विकी ॥ ३० ॥**

अर्थ—हे अर्जुना, प्रवृत्ति आणि निवृत्ति, कार्य आणि अकार्य, भय आणि अभय व बंध आणि मोक्ष यांस जी बुद्धि जाणते ती सात्त्विकी बुद्धि होय.

टीका—बुद्धि सत्त्वयुक्त झाली ह्मणजे तिला बंध व मोक्ष समजतो. हें समजलें ह्मणजे ती प्रवृत्तिमार्ग टाकून निवृत्तिमार्ग धरिते; कारण प्रवृत्तिमार्ग बंध करणारा आहे असें तिला कळलें असतें. निवृत्तिमार्ग कळल्यावर गुरुकृपेनें तिला स्वस्वरूपाचा बोध होतो. तेव्हां तिला जड व चैतन्य यांचा विभाग समजतो. त्यामुळें जडमात्र कार्य आहे व त्या कार्याचें कारण ह्मणजे अकार्य आपला आत्मा आहे असें ती पाहूं लागते. याप्रमाणें कार्याकार्यांस जाणल्यावर कार्य पाहतां भवभय उत्पन्न होतें व अकार्य पाहतां निर्भयत्व येतें असें ती जाणते. कारण ज्या वेळीं ती कार्यास जडत्वें पाहते तेव्हां "मी, माझें" अशी तरफड होऊन तिला संसार अवघड वाटतो. परंतु तेंच कार्य पुन्हा चिद्रूप दिसूं लागलें कीं तिला समाधान वाटतें.

याप्रमाणें सात्त्विकी बुद्धीचें उत्तमत्व वर्णन करून, यापुढील श्लोकीं राजसी बुद्धीचें लक्षण सांगितलें आहे.

**यया धर्ममधर्मं च कार्यं चाकार्यमेव च ।**
**अयथावत्प्रजानाति बुद्धिः सा पार्थ राजसी ॥ ३१ ॥**

अर्थ—हे अर्जुना, ज्या बुद्धीच्या योगानें पुरुष धर्म आणि अधर्म, तसेंच कार्य आणि त्याचें कारण, यांस अन्यथा जाणतो, ती बुद्धि राजसी होय.

**टीका**-राजसी बुद्धीचा मनुष्य धर्म आणि अधर्म, त्याचप्रमाणें कार्य आणि कारण, यांचें यथास्थित तत्व जसें जाणावें तसें न जाणतां, तो जें अन्यथा जाणतो तेंच खरें आहे असें समजतो. प्रथम धर्माधर्मासंबंधानें विचार करूं. यज्ञ करणें हा वेदविहित धर्म आहे असें तो समजतो. वेदच सांगतात कीं, हिंसा करणें अधर्म आहे. असें असून यज्ञ करितांना पशुहिंसा करण्याची वेदांनीं काय ह्मणून परवानगी दिली याचें तत्व त्यास न कळतां, ज्या कर्मानें हिंसा घडते तें कर्म करणेंच धर्म आहे असें तो अन्यथा समजतो. कर्ममार्ग प्रवर्तविण्याचा अंतर्गत हेतु लोकांस निवृत्तिमार्गास लावण्याचा आहे. अनादि संस्कारांमुळें विषयप्रवृत्ति अनावर आहे, ह्मणून निवृत्तिमार्ग धरणें एकाएकी होत नाहीं. ती विषयप्रवृत्ति हळूहळू कमी करावी या हेतूनें कर्ममार्गाची स्थापना भगवंतांनीं केली आहे. मनास वाटेल त्या स्त्रीपुरुषांनीं एकमेकाशीं रमावें, वाटेल तशी हिंसा करून मांस भक्षण करावें, व दारू पिऊन उल्लू व्हावें हें पशूंचें वर्तन होय. पशुयोनींत केलेलें कर्म फलोन्मुख होत नाहीं, परंतु नरदेहीं केलेलें कर्म फळाची उत्पत्ति करितें. याकरितां मनुष्याचें असें स्वैर वर्तन अति घातक आहे. हें जाणून विवाहविधि प्रवर्तविला आणि स्वस्त्रीसंभोगार्थ देखील फायदेशीर अटी घालून ठेविल्या. त्याचप्रमाणें यज्ञ करून शेष राहिलेलें मांस भक्षण करण्याची परवानगी दिली. हें प्रकर्षें जाणावयाचें वर्म तो अन्यथा समजतो असें "**अयथावत्प्रजानाति**" या चरणानें सुचविलें आहे. वेदांत संध्या करावी असें सांगितलें आहे. हें वेदवाक्य माहित नसतें तर कोणी तरी संध्या केली असती काय? नाहीं. त्याप्रमाणें विवाह करून स्त्रीसंभोग करावा हें वेदवचन माहित नसतें तरी संभोगावांचून कोणी राहील काय? जर तसें घडतें तर संध्येप्रमाणें काम्य कर्महि वेदविहितकर्म आहे असें मानण्यास कांहीं हरकत नव्हती. लहान मुलें

आपलें शिश्न चोळतात. तसें केल्यानें होणारी इजा टाळण्याकरितां शहाणे आईबाप त्याचे कडदोऱ्यास सोन्याची लोळी करून घालतात. तद्वत् कर्ममार्गाची योजना आहे हें वर्म न जाणतां यज्ञयागादि करणें कर्तव्यच आहे ह्मणून वेदहेतु जो अन्यथा समजतो, त्याची बुद्धि राजसी होय असें भगवान् ह्मणतात. याचप्रमाणें तो अधर्मासहि अन्यथा जाणतो. राजसी बुद्धीच्या मनुष्यास जो अधर्म दिसतो तो अधर्म नाहीं असें विचारांतीं सात्त्विक बुद्धीस समजतें. पक्व ज्ञान्याची भेदबुद्धि नाहींशी झाल्यामुळें तो मूळचा ब्राह्मण असूनहि चांडाळाचें देखील अन्न भक्षण करितो. ज्यास ज्ञानमार्ग मान्य नसून कर्ममार्गच उत्तम वाटतो, अशा राजसीबुद्धीच्या माणसास असें हें ज्ञान्याचें वर्तन अधर्म वाटतो. पण ज्यास वर सांगितलेलें खरें वर्म माहित असतें तो तसें समजत नाहीं. प्रथम चरणांतील "**च**"कारानें राजसी बुद्धीचा माणुस धर्मास जसें अयथावत् जाणतो तसें अधर्मासहि जाणतो असें सुचविलें आहे. याचप्रमाणें दुसऱ्या चरणांतील दोन "**च**"कारांपैकीं एकानें असें सुचविलें आहे कीं, राजसी बुद्धीचा मनुष्य कार्यास अयथावत् जाणतो तसें कारणासहि जाणतो. व दुसऱ्या "**च**"कारानें दर्शविलें आहे कीं, प्रथम चरणांत सांगितलेल्या मनुष्याहून दुसऱ्या चरणांत वर्णिलेला मनुष्य अन्य आहे. पहिल्या चरणांत कर्ममार्ग आचरण करणाऱ्याचें वर्णन केलें आहे व दुसऱ्यांत ज्ञानमार्ग आचरणाऱ्या राजसी बुद्धीच्या माणसाचें लक्षण सांगितलें आहे. तें असें कीं, तो कार्य आणि कारण या दोहोंसहि अयथावत् जाणतो. ज्ञानमार्गीं ज्याची बुद्धि राजस असते तो कार्य जड आहे असें समजतो. तें तसें नाहीं असें नाहीं. तरी त्याचें तें जाणणें अयथावत् असतें. तें कसें हें दर्शविण्याकरितां "**एव**" शब्दाची योजना केली आहे. त्यावरून "**कार्यमेव प्रजानाति**" असा अन्वय जुळतो. ह्मणजे कार्यास तो मनुष्य कार्यच ह्मणून जाणतो. पण

त्या कार्याशीं आणि त्याचे कारणाशीं ऐक्य आहे हें तत्व तो कबूल करित नाहीं. ह्मणून तो जाणतो हें अयथावत् जाणतो असें भगवान् ह्मणतात. वरप्रमाणेंच "**एव**" शब्द "**अकार्य**" शब्दास जोडून "**अकार्य मेवायथावत्प्रजानाति**" असें भगवान् ह्मणतात. याचा भाव असा कीं, तो मनुष्य जें कारणरूप ब्रह्म त्रिगुणात्मक सृष्टि होऊनहि निराळें राहिलें आहे त्यास केवळ कारणपणेंच जाणतो; ह्मणजे कार्य विवर्त आहे व त्याचें अधिष्ठान ब्रह्म आहे असें तो कबूल करित नाहीं. कारणच कार्य झालें आहे असें श्रुतिसिद्ध तत्त्व त्यास कळत नाहीं ह्मणून "**अकार्यमेवायथावत्प्रजानाति**" असें ह्मटलें आहे. यांतील "**एव**" शब्दानें भेदमत सुचविलें आहे.

या श्लोकांतील "**अयथावत्**" शब्दाचा "**संशययुक्त**" असा कोणी अर्थ करितात. पण "**प्रजानाति**" या शब्दाचा व त्यांचे अर्थाचा मेळ कसा बसतो हें कळत नाहीं. प्रकर्षें करून जाणतो असें ह्मटल्यानें संशयरहित जाणतो असें होतें. अस्तु. सुज्ञांनीं याचा विचार करावा.

**अधर्मं धर्ममिति या मन्यते तमसा वृता ।**
**सर्वार्थान्विपरीतांश्च बुद्धिः सा पार्थ तामसी ॥ ३२ ॥**

**अर्थ**—हे अर्जुना, अज्ञानावरणामुळें ज्या बुद्धीस अधर्मच धर्म वाटतो व सर्व खरे अर्थ विपरीत वाटतात, ती बुद्धि तामसी होय.

**टीका**—बुद्धिवृत्ति सत्त्वात्मकच आहे पण ती तमानें वेढली गेली ह्मणजे तिला अधर्मच धर्म वाटतो. जारण, मारण, उच्चाटणादि निंद्य कर्में श्रुतीनें व स्मृतीनें निषेधिलीं असून तींच करणें उक्त आहे असें तिला वाटतें. आतां ज्यांची बुद्धि तामसी असते त्यांची वेदशास्त्रांत प्रवृत्ति नसेल असें ह्मणावें तर अधर्माचें नांव धर्म ठेवून ते त्याचें आचरण

करितात. जारणमारण, शास्त्र नवीन झालें असून तमावरणामुळें त्यास ते पुरातन समजतात. या शास्त्रांत सांगितलें आहे तें वेदमताविरुद्ध आहे असें त्यांस कळतें. परंतु पांडित्यबळानें ते वेदाचे विपरीत अर्थ करितात, असें "सर्वार्थान्विपरीतांश्च" या चरणानें सुचविलें आहे. यांतील "च"कारानें "तत्त्वमसि" इत्यादि वाक्यांचे भलभलते अर्थ करणाऱ्या भेदवाद्यांची सूचना केली आहे. यापुढें धारणेचे निरनिराळे प्रकार सांगितले आहेत.

**धृत्या यया धारयते मनःप्राणेंद्रियक्रियाः ।**
**योगेनाव्यभिचारिण्या धृतिः सा पार्थ सात्त्विकी ॥ ३३ ॥**

अर्थ—हे अर्जुना, ज्या धारणेच्या योगानें मन, प्राण आणि इंद्रियें यांच्या क्रिया ब्रह्मरूप वाटतात अशी धारणा अभ्यासानें अव्यभिचारिणी झाली ह्मणजे तिला सात्त्विकी धारणा ह्मणावी.

टीका—वर सांगितलेली धारणा पक्क ज्ञान्याची होय. ज्ञानहीन मनुष्य सात्त्विक आचरण करित असला तरी जड भाग त्यास जडत्वेंच भासत असतो. जडाचे ठायीं कारण दृष्टि होईपर्यंत त्या धारणेस सात्त्विकी ह्मणतां येत नाहीं. ह्मणून सर्वात्मनिष्ठाची धारणाच सात्त्विकी धारणा होय. सर्वात्मनिष्ठाचे धारणेस सर्व ठिकाणीं स्वरूपाचेंच स्फुरण होतें. ह्मणून त्या धारणेसच अव्यभिचारिणी ह्मटलें पाहिजे. मन, प्राण आणि इंद्रियें यांच्या सर्व क्रिया ब्रह्मरूप कशा भासतात, याचें विवरण केलें पाहिजे. कल्पना करणें ही मनाची क्रिया होय. हें मन एकच असून नाना आकार घेतें, असें स्वप्नाचे अनुभवावरून स्पष्ट दिसतें. परंतु त्याची कोणतीच क्रिया चित्स्फूर्तीवांचून घडूं शकत नाहीं. पृथ्वीवर तिच्या आधारानें सेना उभी असते. सेनाच पाहत असतां पृथ्वी दिसत नाहीं. परंतु सेना निघून गेली ह्मणजे पृथ्वी दिसूं लागते. तेव्हां तिजवांचून अन्य कांहींच दिसत नाहीं. त्याप्रमाणें मन कल्पनेला

कल्पून तिला पाहतें. त्यावेळीं चित्स्वरूपाचा बोध नसतो. परंतु ती कल्पना नाहींशी झाली ह्मणजे तिचें अधिष्ठान चित्स्वरूप आयतेंच अनुभवास येतें. अशा अनुभवाची विस्मृति झाली ह्मणजे मन पूर्ववत् कल्पना करूं लागतें व तमरूप विषयसृष्टि लिंग देहीं असणाऱ्या राजस इंद्रियांस भासूं लागते. अशी रजतमयुक्त धारणा सात्त्विकी नव्हे हें उघडच आहे. सर्व कल्पना चित्स्वरूप दिसूं लागली ह्मणजे ती धारणा सात्त्विकी समजावी. सर्व जड जग कल्पनेचेंच बनलें आहे. ह्मणून आपली कल्पना आत्मस्वरूप वाटूं लागली ह्मणजे सर्व जगहि तद्रूपच भासूं लागतें. अभ्यास करून असा अनुभव यत्नाशिवाय नेहमीं राहूं लागला ह्मणजे त्या धारणेस अव्यभिचारिणी ह्मणावें. चित्तचैतन्ययोगाचा अभ्यास करून धारणा अव्यभिचारिणी करावी असें या श्लोकांत ह्मटलें आहे. यावरून प्रथम मानसध्यान करावें ह्मणजे मग जगदात्मक ज्ञान ठसावतें असें सुचविलें आहे. आत्मा (ब्रह्म) निर्गुण आहे. परंतु चिच्छक्तीनें चित्स्फुरण होतें. त्या चित्स्फुरणानेंच जडपणहि स्फुरतें, ह्मणून मनच चिच्छक्ति आहे. जेथें जेथें मन जातें तेथें तेथें चित्स्वरूप पाहण्याचा दृढ अभ्यास केला ह्मणजे ती धारणा अव्यभिचारिणी होते. मनाचें धांवणें ही त्याची क्रिया होय व आकाराची कल्पना करणें ही त्याची विक्रिया होय. या दोन्हींहि त्या धारणेस ब्रह्मरूप दिसूं लागतें तेव्हां त्या धारणेस सात्त्विकी धारणा ह्मणावें. आतां प्राणवायूच्या क्रियेचा विचार करूं. प्राण दहा प्रकारें विभागला गेला आहे. प्राण, अपान, व्यान, उदान आणि समान असे पांच मुख्य भेद आहेत व नाग, कूर्म, कृकल, देवदत्त आणि धनंजय असे पांच उपभेद आहेत. यांस प्राणाच्या दश क्रिया ह्मटलें आहे. वर चढणारा वायु प्राण होय. अधोगत वायूस अपान ह्मणतात. ज्या वायूच्या योगानें अंगें गोळा करितां येतात व पसरतां येतात त्यास व्यान ह्मणतात. कंठगत वायूस

उदान ह्मणतात. आपण खातोपितो त्यास सारखें करणारे वायूस समान ह्मणतात. ज्यायोगें उद्गार निघतात त्यास नाग ह्मणतात. ज्यायोगें नेत्रांचीं पातीं उघडतां व झांकतां येतात त्यास कूर्म म्हणतात. ज्यायोगें शिंका येतात त्यास कृकल म्हणतात. ज्यायोगें जांभया येतात त्यास देवदत्त म्हणतात. मेल्यावरहि शरीरांत जो सर्वगत वायु असतो त्यास धनंजय म्हणतात. या प्राणाच्या दहाहि क्रिया ज्ञान्यास आत्मस्वरूप दिसतात. या प्राणांचेंहि उत्थान चित्प्रकाशावांचून होत नाहीं. वायूचा स्पर्श चित्प्रकाशावांचून कळत नाहीं म्हणून वायूचें वायुपणाहि त्यावांचून असूं शकत नाहीं. एवंच चैतन्यच या प्राणांचें अधिष्ठान आहे, म्हणून त्यांसहि ज्ञानी आत्मस्वरूप पाहूं शकतो. याचप्रमाणें इंद्रियांच्याहि क्रिया पाहतां येतात, व ज्ञानी त्या तशा पाहतो. आतां इंद्रियांत जसें चैतन्य आहे तसें इंद्रियांचे विषयांतहि असल्याशिवाय त्यांचें ग्रहण होऊं शकत नाहीं. हें स्पष्टपणें समजण्याकरितां सर्वांच्या अनुभवांतील दृष्टांत येथें देतों. डोळ्यांमध्यें स्वतःसिद्ध तेज आहे. तरी उजेडावांचून तो रूप पाहूं शकत नाहीं. बरें, डोळ्यास उजेडाचें साह्य मिळालें व रूप अंधारांत असलें तरीहि तो त्यास पाहूं शकत नाहीं. यावरून उघड दिसतें कीं डोळ्यांत व रूपांत ज्योति असल्याखेरीज डोळ्यास रूप दिसत नाहीं. या न्यायानें इंद्रियांत जो चित्प्रकाश आहे तोच विषयातहि आहे ह्मणून ते इंद्रियांस गोचर होतात. अस्तु. योगाभ्यासानें ज्ञान्यास मन, इंद्रियें आणि प्राण यांच्या क्रिया ब्रह्मरूप दिसूं लागतात. अशा धारणेस सात्त्विकी धारणा ह्मणावी असें भगवान् सांगतात. श्लोकांत फक्त मनाचाच उल्लेख केला आहे, तरी त्यायोगें बुद्धि आणि चित्त यांच्याहि क्रिया सुचविल्या आहेत असें गृहित केलें पाहिजे. कारण हे सर्व एका सत्त्वाचेच प्रकार आहेत. यापुढें राजसी धारणेचें लक्षण सांगितलें आहे.

**यया तु धर्मकामार्थान्धृत्या धारयतेऽर्जुन ।**
**प्रसंगेन फलाकांक्षी धृतिः सा पार्थ राजसी ॥ ३४ ॥**

अर्थ—हे अर्जुना, ज्या धारणेनें धर्म, अर्थ आणि काम चालतात व फळाची सर्वदा अपेक्षा असते ती राजसी धारणा होय.

टीका—धर्म करण्याकरितां पुष्कळ धन मिळवावें व इहलोकीं आणि परलोकीं कामोपभोग घ्यावा अशी कर्ममार्गाची धारणा असते तिला राजसी ह्मटलें आहे.

**यया स्वप्नं भयं शोकं विषादं मदमेव च ।**
**न विमुंचति दुर्मेधा धृतिः सा पार्थ तामसी ॥ ३५ ॥**

अर्थ—हे अर्जुना, ज्या धारणेमुळें निद्रा, भय, शोक, विषाद व मद उत्पन्न होतात, व जीमुळें मनुष्यास त्याची दुर्बुद्धि सोडित नाहीं, ती धारणा तामसी होय.

टीका—तामसी धारणेच्या मनुष्यास नेहमीं निद्रेनें गांठलेलें असतें. कसें होईल, काय होईल, असें त्यास नेहमीं भय असतें. होऊन गेलेल्या गोष्टींचा तो शोक करितो. इतके गुण अनुकूळ असल्यावर कर्म करण्याचा त्यास उल्हास नसतो हें सांगणें नको. जरा कांहीं सुख झालें कीं तो शिदोडासारिखा माजतो व थोडें दुःख झालें कीं रडूं लागतो.

**सुखं त्विदानीं त्रिविधं शृणु मे भरतर्षभ ।**
**अभ्यासाद्रमते यत्र दुःखांतं च निगच्छति ॥ ३६ ॥**
**यत्तदग्रे विषमिव परिणामेऽमृतोपमम् ।**
**तत्सुखं सात्त्विकं प्रोक्तमात्मबुद्धिप्रसादजम् ॥ ३७ ॥**

अर्थ—हे अर्जुना, सुखाचेहि तीन प्रकार आहेत ते मी सांगतों, ऐक. ज्या सुखाचे ठायीं अभ्यासानें चित्त रमतें तेथेंच दुःखाचाहि अंत

होतो ॥ ३६ ॥ व जें आरंभीं विषासारिखें वाटतें पण परिणामीं अमृतासारिखें गोड लागतें, त्या सुखास सात्त्विक सुख ह्मणातें. ज्या बुद्धीस आत्मस्वरूपाचा बोध झाला आहे तिच्या प्रसादानें हें सुख मिळतें.

**टीका**–प्रथम श्लोकाचे तिसऱ्या चरणानें निर्विकल्प योग व चवथ्या चरणानें सविकल्प योग सुचविला आहे. या दोन्ही प्रकारच्या समाधींचें सुखच सात्त्विक सुख होय. जेथें "**यत्र**" शब्द असतो तेथें "**तत्र**" शब्द आहेच असा नियम आहे. या "**यत्र**" शब्दाचा आणि "**च**"काराचा अन्वय जुळवावा. तो असा कीं, "**अभ्यासाद्रमते यत्र दुःखांतं च निगच्छति तत्र**". यांत द्विविध अभ्यासाची रीति कशी सांगितली आहे हें पाहूं. "**दुःखांतं च निगच्छति**" यांतील "**च**"कारानें दुसरा अभ्यास सुचविला आहे अभ्यासानें स्वरूपीं चित्त स्थिर करावें या वाक्यानें निर्विकल्पयोगाचा अभ्यास सांगितला आहे हें उघड आहे. परंतु चवथ्या चरणानें सविकल्पयोगाचा अभ्यास सांगितला आहे हें स्पष्ट करून दाखविलें पाहिजे. "**दुःख**" शब्दें क्षरभाग घ्यावा. या क्षरभागांत त्याचें अधिष्ठान चित्स्वरूप पाहिलें ह्मणजे दुःखरूप विवर्ताचा अंत होतो. क्षरभागाचा व्यतिरेकानें निषेध करून ज्या स्वरूपीं चित्त रमतें, तेथेंच क्षरभागाचा अंत पाहणें, या अभ्यासास सविकल्पयोग ह्मणतात. जडांमध्यें केवळ चित्स्वरूप पाहणें हा जडाचा अंतच होय. केवळ व्यतिरेकानें जडत्वभ्रांति जाणें दुर्घट आहे, याविषयीं अनेक ठिकाणीं यापूर्वीं विवेचन केलें आहे, तें वाटल्यास पहावें. स्वस्वरूप सुखरूप असतां त्याचे ठायीं चित्तास जबरदस्तीनें कां योजावें लागतें या शंकेचा परिहार उत्तर श्लोकांत केला आहे. तो असा कीं, तें सुख आत्मबुद्धिप्रसादावांचून मिळत नाहीं. ज्या बुद्धीस आत्मस्वरूपाचा बोध झाला आहे तिला "**आत्म बुद्धि**" ह्मणावी. रजतमांचा वियोग झाल्याशिवाय असा बोध होत नाहीं. रजोगुणापासून विक्षेप

होतो व तमोगुणापासून लय होतो. या लयामुळें आणि विक्षेपामुळें चित्त स्वरूपीं राहत नाहीं. या दोहोंचा निरास झाला ह्मणजे स्वरूप-सुखाचा अनुभव होतो. हा निरास करण्याकरितां अभ्यास केला पाहिजे. हें सुख आरंभीं विषासारखें पण शेवटीं अमृतासारखें गोड वाटतें असें भगवान् सांगतात. याचें कारण असें आहे कीं, अनादि विषयवासनारूप पित्त झालें असल्यामुळें स्वस्वरूपसाखर गोड असूनहि कडू लागते. पण त्या साखरेचें सारखें सेवन केलें ह्मणजे वासनारूप पित्ताचा नाश होऊन, स्वस्वरूपसुख गोड वाटूं लागतें.

**विषयेंद्रियसंयोगाद्यत्तदग्रेऽमृतोपमम् ।**
**परिणामे विषमिव तत्सुखं राजसं स्मृतम् ॥ ३८ ॥**

**अर्थ**—जें सुख विषय आणि इंद्रियें यांच्या संयोगापासून उत्पन्न होतें व जें आरंभीं अमृतासारिखें गोड वाटतें, पण परिणामीं विषवत् होतें तें सुख राजस ह्मटलें आहे.

**टीका**—विषयेंद्रियसंयोगापासून होणारें सुख कसें दुःखद होतें याचें विवेचन दुसऱ्या अध्यायांतील "**मात्रा स्पर्शास्तु कौंतेय**" व "**यं हि न व्यथयंत्येते**" या श्लोकांचे टीकेंत केलें आहे. "**मात्रा स्पर्शास्तु कौंतेय**" या श्लोकाचे टीकेंत असेंहि दाखविलें आहे कीं, विषयांत दुःखच आहे, सुख ह्मणून नाहीं. विषयांपासून जें सुख मिळतें तें आत्मसुखच होय. तेंच तत्त्व या श्लोकानेंहि दर्शविलें आहे. या श्लोकांत एकच "**यत्**" आहे पण "**तत्**" मात्र दोन वेळ आलें आहे त्यांपैकीं एक "**तत्**", मागील श्लोकांत जें सात्त्विक सुख सांगितलें आहे त्याचें दर्शक आहे, असें घेतलें ह्मणजे सुख तेवढें आत्म्यापासून व दुःख तेवढें विषयांपासून मिळतें असा तत्त्वबोध होतो. असा अर्थ न केला तर एक तत्पद निरर्थक होतें. या तत्त्वाचा चांगला बोध होण्याक-

रितां थोडेंसें स्पष्टीकरण केलें पाहिजे. सुख तेवढें आत्म्याचें आहे असें ठिकठिकाणीं श्रुति सांगते. आतां, विषयेंद्रियसंयोगापासून आरंभीं सुख होतें व परिणामीं दुःख होतें, ह्मणून विषयांत सुखहि आहे व दुःखहि आहे असें सिद्ध होतें. त्याचप्रमाणें विषयांत चैतन्य व जड भाव आहेत. चैतन्य सुखस्वरूप आहे ह्मणून दुःख तेवढें जड भावाचें आहे असें उघड झालें. स्वरूपीं निवळ सुख आहे तसें विषयांत नसून तें दुःखमिश्रित असतें, ह्मणून त्या सुखास राजस सुख ह्मटलें आहे.

**यदग्रे चानुबंधे च सुखं मोहनमात्मनः ।**
**निद्रालस्यप्रमादोत्थं तत्तामसमुदाहृतम् ॥ ३९ ॥**

**अर्थ**—जें सुख आरंभीं व अंतींहि आपणास मोह उत्पन्न करितें व जें निद्रा, आळस आणि प्रमाद यांपासून उत्पन्न होतें, त्यास तामस सुख ह्मटलें आहे.

**टीका**—झोंपेंत विवेक नसतो हें सर्वांस माहित आहे. झोंपेंतून जागे झाल्यावरहि जांभया येत असतात. व झोंपेच्या आरंभींहि तीच स्थिति असते. त्यावेळींहि विचार नसतो. ज्यावेळीं जें कर्तव्य असतें तेव्हां मूर्खपणानें तें न करणें व तसें करण्यांतच सुख मानणें, यास आळसाचें सुख ह्मणावें. यथाकाळीं आपण जें काम करित नाहीं, तें न करीपर्यंतच सुख वाटतें. तें काम तर करावेंच लागतें. पण योग्य वेळ निघून गेल्यामुळें काय करावें हें सुचत नाहीं. अशा प्रकारें आळसाचे आरंभीं व अंतींहि मोह होतो. प्रमाद ह्मणजे स्वहिताविषयीं असावधपण होय. मोहामुळें प्रमाद उत्पन्न होतो. तो असेपर्यंत मनुष्य निश्चिंत असतो. त्यामुळें जें सुख वाटतें ते प्रमादसुख होय. पण त्यामुळें कार्यनाश होण्याची वेळ आली ह्मणजे मग आपणावरच आपण रागावतों व कार्यनाश झाला ह्मणजे रडत बसतों. अशा रीतीनें प्रमादसुखाच्या आदीं आणि अंतीं मोहच असतो.

अशीं तीन प्रकारचीं सुखें सांगितलीं. या प्रत्येक सुखाचे वेळीं एक गुण प्रबळ असतो व दुसरे दोन गुण क्षीणबळ असतात. यावरून सात्त्विक सुख मिश्रसत्वाचें आहे असें होतें. कारण त्याचे आरंभीं दुःख होतें व परिणामीं सुख होतें. आतां शुद्ध सत्त्वात्मक सुख कसें असतें तें आपणास कळावें अशी अर्जुनास इच्छा झाली ती जाणून भगवंत उत्तर श्लोकानें सांगतात कीं, ईश्वराखेरीज शुद्ध सत्व कोठेंच नाहीं.

**न तदस्ति पृथिव्यां वा दिवि देवेषु वा पुनः ।**
**सत्त्वं प्रकृतिजैर्मुक्तं यदेभिः स्यात्रिभिर्गुणैः ॥ ४० ॥**

**अर्थ**–प्रकृतीपासून उत्पन्न होणाऱ्या तीन गुणांपासून मुक्त असें सत्त्व पृथ्वींत, स्वर्गांत किंवा ब्रह्मादि देवांचे ठायीं नाहीं व पुढें असणारहि नाहीं.

**टीका**–तिन्ही गुणांपासून मुक्त असें शुद्ध सत्त्व एका सगुण भगवंताखेरीज इतरत्र कोठेंहि नाहीं व असणारहि नाहीं असें या श्लोकांत ह्मटलें आहे. कारण शुद्ध सत्त्व ह्मणजे मूळमाया होय. तिच्यापासून सत्त्व, रज आणि तम असे तीन गुण उत्पन्न झाले व त्यांपासून सर्व सृष्टि उत्पन्न झाली आहे. ह्मणून अशा त्रिगुणात्मक सृष्टींत शुद्ध सत्त्व असणार नाहीं हें उघड दिसतें. “**पृथिव्यां वा**” आणि “**दिवि देवेषु वा**” या दोन्ही “**वा**” शब्दांनीं पृथ्वीखालचे सप्त पाताळ व वरचे स्वर्गादि सात लोक सुचविले आहेत. या चतुर्दश भुवनांत राहणाऱ्यांस आपला देह दिसतो तसें शुद्धसत्त्वोपाधीस नसतें. शुद्धसत्त्वोपाधि सगुण भगवंतास सर्वत्र आपण आहों असें वाटतें. असा प्रभाव इतरत्र नाहीं असा या श्लोकाचा भावार्थ आहे.

यापूर्वीं सांगितल्याप्रमाणें सात्त्विक कर्म, सात्त्विक बुद्धि आणि सात्त्विक सुख यांचें माहात्म्य ऐकून, सात्त्विक कर्मच करावें, युद्ध करूं

नये असें अर्जुनास वाटूं लागलें. हें भगवंतांनीं जाणून, प्रत्येकानें आपला स्वधर्म करावा, हें तत्व समजून सांगण्याकरितां चारी वर्णांच्या धर्माचें विवरण यापुढें केलें आहे.

**ब्राह्मणक्षत्रियविशां शूद्राणां च परंतप ।**
**कर्माणि प्रविभक्तानि स्वभावप्रभवैर्गुणैः ॥ ४१ ॥**

**अर्थ**–ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र, यांच्या स्वभावसिद्ध गुणांस अनुसरूनच त्यांचे कर्मांचे विभाग केले आहेत.

**टीका**–स्वभाव ह्मणजे आपला भाव, आपला भाव, ह्मणजे आत्मभाव आणि आत्मा ह्मणजे ब्रह्म होय. या ब्रह्मापासून प्रति कल्पीं सृष्टीच्या उत्पत्तीच्या आधीं सत्त्व, रज आणि तम, असे तीन गुण उत्पन्न होतात. या गुणांस अनुसरून वर्णाश्रमधर्मांचे विभाग केले आहेत, असें भगवान् सांगतात. '**स्वभाव**' शब्दानें असेंहि सुचविलें आहे कीं, मध्यान्हकाळीं सूर्यकिरणांपासून मृगजळाचा भास व्हावा, हा जसा सूर्यकिरणांचा सहज प्रभाव आहे, त्याप्रमाणें ब्रह्मापासून त्रिगुण उत्पन्न व्हावे, असा अनाद्यंत प्रवाह आहे. अशा गुणस्वभावानुरूप वर्ण झाले आहेत ह्मणून वर्णाश्रमधर्म करणें उचित आहे, असें भगवान् सुचवितात.

यावरून स्पष्ट सिद्ध होतें कीं, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य अथवा शूद्र असा भेद स्वभावानुरूप आहे. ब्राह्मणाचे पोटीं जन्म झाला ह्मणजे तो ब्राह्मण, व शूद्राचे पोटीं जन्म झाला ह्मणजे तो शूद्र असें समजणें बरोबर नाहीं. असें असून, आपले पूर्वज, जे मोठमोठे ऋषि होऊन गेले, त्यांनीं जन्मानुरूप भेद केले तें केवळ चुकीचें आहे, असें वाटणें साहजिक आहे. परंतु दीर्घदृष्टीनें विचार केला असतां त्यांचें तशा प्रकारचें शासन पोक्त विचाराचें आहे असें दिसून येईल. कायद्यांत

फक्त न्यायाचें तत्त्व सांगितलें असतें, पण त्याची अंमलबजावणी बरोबर व्हावी या करितां त्या तत्त्वास अनुसरून नियम करावे लागतात, हें सर्वांस माहित आहे. मुख्य सरकार कायदा करितें. त्यावर नियम केले नाहींत, तर कायद्याची अंमलबजावणी करणारे अधिकारी, आपआपल्या मताप्रमाणें अंमलबजावणी करूं लागतील, व त्यामुळें तिचे निरानिराळे प्रकार होऊन, घोंटाळा होऊन जाईल, ह्मणून स्थानिक सरकारास नियम करावे लागतात. ते झाले, ह्मणजे त्या नियमांस अनुसरून, कायद्यांतील तत्त्वाची अंमलबजावणी सर्वत्र एका शिस्तीनें होते. असे नियम करण्याची जबाबदारी स्थानिक सरकाराकडे असते, कारण प्रांताची प्रत्यक्ष व्यवस्था करणें त्याजवर सोंपविलें असतें. याचप्रमाणें वेदमुखें भगवंतांनीं गुणस्वभावानुरूप वर्णांचे भेद केले; तें मूळ कायद्यांतील तत्त्व होय. मुख्य सरकार भगवंत होय. त्याचें कायदा करण्याचें काम आहे, तो त्यांनीं केला व त्याची अंमलबजावणी करण्याचें काम वेळोवेळीं असणारे धर्माधिकाऱ्यांवर सोंपविलें गेलें. ह्मणून या कायद्याची अंमलबजावणी ज्या रीतीनें चांगली होईल असे नियम त्यांनीं करून दिले. अर्थात् त्यांनीं ते नियम अत्यंत विचारानें केले, ह्मणूनच ते इतका कालपर्यंत अबाधित चालले. पण एवढ्यानेंच कित्येक चौकस लोकांचें समाधान होणार नाहीं, ह्मणून त्यांचें समर्थन करणें जरूर आहे. **"यथा बीजं तथांकुरः"** असा नियम आहे. ह्मणून ज्याचा जसा स्वभाव असेल त्यास योग्य अशाच कुळांत जन्म मिळतो. हें तत्त्व सहावे अध्यायांत योगभ्रष्टास योग्याचे कुळांतच जन्म मिळतो, असें भगवंतांनीं सांगितलें आहे त्यावरून सिद्ध होतें; व सामान्य अनुभवहि असाच आहे कीं, प्रत्येक मनुष्यांत कुळस्वभाव दृष्टीस पडतो. त्याचे स्वभावाप्रमाणेंच घराण्यांत वागणुक असते. व आनुषंगिक इष्टमित्र मंडळीहि त्याच स्वभावाची असते. कारण **"समानशीलव्यसनेषु सख्यं"** असा

नियम आहे. या सर्व कारणांनीं त्याचा जन्मस्वभाव दिवसेंदिवस जास्त दृढ होत जातो. अशा स्वभावास, जें कर्म करणें योग्य असतें तेंच केलें तर चांगलें वठतें. त्याहून अन्य कर्म करण्याचा यत्न केला तर तें कर्म नीट तर वठतच नाहीं, पण प्रसंगीं घातास कारण होतें. उदाहरणार्थ एखादा वाणी घेऊं. त्यानें दुकानदारीचा धंदा न करितां, पलटणींत शिपायाची नौकरी करूं ह्मटलें तर त्याच्यानें ती नीट होऊं शकत नाहीं, कारण त्याची शरीरप्रकृति त्या धंद्यास अनुकूल अशी घडलेली नसते व त्याचें मनहि तसें नसतें. शिपायाचे घराण्यांत जन्म घेतलेला मनुष्य लढाईत दुसऱ्याचा जीव घेण्यास कधींहि मागें सरणार नाहीं. पण वाणीबुवाचा हात तसें करण्यास पुढें सरसावणार नाहीं. आतां कोणी असें ह्मणतील कीं, जन्मल्यापासून त्यास शिपाई करण्याचा यत्न केला तर तो शिपाई कां होणार नाहीं? त्याला उत्तर इतकेंच कीं, शिपाई केल्यानें शिपाई होऊं शकत नाहीं. त्याला स्वाभाविक धैर्य लागतें. तसें वाण्याचे अंगीं नसतें. यावरहि शंका घेतां येते कीं, संवयीनें स्वभाव बनतो. तेव्हां एक स्वभाव बदलून दुसरा स्वभाव कां करूं नये? याचें समाधान असें आहे कीं, स्वभाव एका दिवसांत बनत नाहीं. पुष्कळ काळपर्यंत एकसारखें वर्तन ठेविलें ह्मणजे एके प्रकारचा स्वभाव बनतो. तो बदलण्यास तितकाच काळ लागणार. तोंपर्यंत स्वहित विनाकारण अंतरतें. तसें नुकसान करून घेण्यापेक्षां स्वभावानुरूप कर्म करून त्यांतच आपलें स्वहित करून घेणें हें शहाणपणाचें कृत्य होय. शिवाय हेंहि लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, पाण्याचे विरुद्ध दिशेस पोंहत जाणें अति क्लेशाचें काम आहे व तसें करण्यांत पाण्याच्या थपडाहि चांगल्याच बसतात. त्याप्रमाणें एक स्वभाव बदलून दुसरा बनविणें ह्मणजे प्रवाहाविरुद्ध वर्तन होय. ह्मणून तसें करणें क्लेशदायक असून प्रसंगीं घातकहि होतें.

स्वभाव अनेक कर्मसंस्कारांचा परिणाम आहे. त्यांचा विचार करूनच मनुष्यांस ईश्वर जन्म देतो. ह्मणून ज्या कुळांत जन्म झाला त्या कुळाचा वर्णाश्रमधर्म करावा, असा आपले पूर्वजांनीं नियम घालून दिला आहे आतां चांगल्या कुळांत वाईट मनुष्य व वाईट कुळांत चांगला मनुष्यहि जन्मतो. परंतु तसें घडणें अपवादादाखल आहे. अपवादाकरितां नियम वाईट ह्मणतां येत नाहीं. हें बोलणें केवळ व्यवहारदृष्टीनें समजूत घालण्याकरितांच आहे. सर्वज्ञ ईश्वराचे करण्यास अपवाद लावणें रास्त नाहीं. असा जन्म देण्यास ऋणसंबंधाचें किंवा इतर कारण असलेंच पाहिजे. आपल्या अल्प दृष्टीनें तें त्याचें करणें अपवादादाखल दिसतें, इतकेंच.

आतां कालमानामुळें वर्णाश्रमधर्माप्रमाणें वागण्यास अडचण येते असा एक जबर आक्षेप नेहमीं पुढें येतो, त्या संबंधांत थोडासा विचार केला पाहिजे. कोणत्याहि कायद्याप्रमाणें नियम केले जातात, तेहि प्रसंगानुसार बदलावे लागतात. परंतु तसे फेरबदल कायद्याचे तत्त्वास धरूनच होतात. त्याप्रमाणें धर्माचे मूळतत्त्वास बाध न येईल अशा रीतीनें कालमानाप्रमाणें आवश्यक फेरबदल करणें अविचाराचें होईल, असें ह्मणतां येत नाहीं. पण ते फेरबदल करण्याचें काम प्रत्येकानें आपले हातीं घेणें नीट नाहीं. आपले धर्माचा जो कोणी अधिकारी असेल त्याचेकडून तें करून घेणें प्रशस्त आहे.

आतां, निरनिराळ्या वर्णांचा अन्नव्यवहार व लग्नसंबंध होऊं नये, असा जो प्रतिबंध आपल्या पूर्वजांनीं केला आहे तो बरोबर नाहीं, असें कित्येकांनें ह्मणणें आहे, त्याचा विचार करूं. प्रत्येक वर्णाचा आहार, त्यांचे कर्मास अनुकूळ असा ठेविला आहे. ब्राह्मणांस मांसभक्षण वर्ज्य केलें आहे व क्षत्रियांस तें वर्ज्य नाहीं. मांसाहार तमोगुण वाढविणारा आहे ह्मणून तो सात्त्विक ब्रह्मकर्मास घातक आहे व ब्राह्मणांचें सात्त्विक अन्न क्षत्रियांस गैरफायद्याचें आहे, कारण कढीभात खाऊन

लढाईचें सामर्थ्य येत नाहीं. ब्राह्मणाचे घरीं क्षत्रिय व क्षत्रियाचे घरीं ब्राह्मण जेवायास आला तर तो उपाशीं मरतो, असें नेहमीं पाहण्यांत येतें. अशा आहारवैचित्र्यामुळें त्यांचा तत्संबंधीं व्यवहार बंद केला, हें चुकीचें ह्मणतां येत नाहीं. लग्नाची गोष्ट तर याहून नाजूक आहे. व्यवहारांत आपण पहतों कीं, श्रीमंताची मुलगी गरिबाचे घरीं, अथवा गरिबाची मुलगी श्रीमंताचे घरीं दिली तर नीट जुळत नाहीं. तेव्हां आहारव्यवहार वगैरे सर्व गोष्टी जेथें भिन्न असतात, अशा निरनिराळ्या वर्णांचा लग्नव्यवहार बंद केला, हें फार शहाणपणाचें झालें. कोणत्याहि व्यवस्थेंत फायदे गैरफायदे असणारच, व तसा वाद करित बसलों तर कांहीं फायदा होत नाहीं. सारासार विचार करून जास्त फायदेशीर जें असेल तेंच शहाण्यांचे मतें चांगलें ठरतें. तशा रीतीनें विचार केला असतां, आपल्या ऋषींनीं जे नियम घालून दिले आहेत, ते विचाराचें आहेत, असें दिसून येईल व ते पाळणें आपलें कर्तव्य आहे.

**शमो दमस्तपः शौचं क्षांतिरार्जवमेव च ।**
**ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं ब्रह्मकर्म स्वभावजम् ॥ ४२ ॥**

अर्थ—शम, दम, तप, क्षांति, आर्जव, ज्ञान, विज्ञान आणि आस्तिक्य हीं ब्राह्मणाचें स्वभावसिद्ध कर्म होय.

टीका—"**शम**" ह्मणजे भगवंताचे ठायीं निष्ठा व "**दम**" ह्मणजे इंद्रियनिग्रह होय. तप तीन प्रकारचें आहे: कायिक, वाचिक आणि मानसिक. त्यांचीं लक्षणें सतरावे अध्यायांत स्पष्ट करून सांगितलीं आहेत. "**शौच**" ह्मणजे शुचिर्भूतपणा. तो दोन प्रकारचा आहे. माती अथवा पाणी याचे योगानें शरीराची बाह्य शुद्धि करणें हा एक प्रकार व वैराग्यानें चित्ताची शुद्धि करणें हा दुसरा प्रकार होय. "**ज्ञान**" ह्मणजे आत्मा ओळखणें व "**विज्ञान**" ह्मणजे तद्वि-

परीत जडांत चैतन्य पाहणें हें होय. "आस्तिक्य" ह्मणजे शास्त्रांत सांगितलेल्या गोष्टींचा अनुभव नसला तरी त्यांचे खरेपणाविषयीं भरंवसा ठेवणें हें होय. या श्लोकांत ब्राह्मणांचीं षट् कर्में सांगितलीं नाहींत, तरी तीं करणें त्याचें कर्तव्यच आहे. वेदाध्ययन करणें ब्रह्मकर्म आहे असें ह्मटलें ह्मणजे त्यांत उपनयनविधीचा समावेश होतोच. तसें शमदमादि ब्रह्मकर्मांचे पोटीं षट् कर्मांचा समावेश आहे असें समजावें.

**शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धे चाप्यपलायनम् ।**
**दानमीश्वरभावश्च क्षात्रं कर्म स्वभावजम् ॥ ४३ ॥**

**अर्थ व टीका**—"**शौर्य**" ह्मणजे पराक्रम. ज्यायोगानें दुसऱ्याचे मनावर स्वतःचे मोठेपणाचा ठसा उमटतो त्यास "**तेज**" ह्मणावें. "**धृति**" ह्मणजे धैर्य अथवा धारणा. युद्धक्रियेची व शत्रूंच्या क्रियेच्या प्रतिक्रियेची धारणा क्षत्रियाची धारणा होय. "**दाक्ष्य**" ह्मणजे दक्षता "**युद्धे चाप्यपलायनं**" याचा अर्थ असा कीं, युद्धांत पाठ दाखवून पळून न जाणें. "**दान**" ह्मणजे उदार बुद्धि. "**ईश्वरभाव**" ह्मणजे ईश्वराचे ठायीं भक्ति. ती आत्मज्ञानयुक्त असावी असें "**च**"कारानें सुचविलें आहे. याप्रमाणें क्षत्रियाचें स्वभावसिद्ध कर्म होय.

**कृषिगोरक्ष्यवाणिज्यं वैश्यकर्म स्वभावजम् ।**
**परिचर्यात्मकं कर्म शूद्रस्यापि स्वभावजम् ॥ ४४ ॥**

**अर्थ**—कृषि ह्मणजे शेतकी, गोरक्ष्य ह्मणजे गाई चारणें, वाणिज्य ह्मणजे क्रयविक्रय करून धन मिळविणें, हें वैश्याचें स्वभावजनित कर्म होय. आणि ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांची सेवा करणें हें शूद्राचें स्वभावजनित कर्म होय.

**स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः ।**
**स्वकर्मनिरतः सिद्धिं यथा विन्दति तच्छृणु ॥ ४५ ॥**

**अर्थ**—आपले स्वकर्माचे ठायीं जो रत राहतो त्याला उत्तम सिद्धि मिळते. स्वकर्माचे ठायीं रत असणाऱ्यास सिद्धि कशी मिळते, तें ऐक.

**यतः प्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदं ततम् ।**
**स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः ॥ ४६ ॥**

**अर्थ**—ज्यापासून सर्व भूतमात्रांची उत्पत्ति होते व ज्यानें सर्व जग व्यापिलें आहे अशा भगवंताचें स्वधर्मानें पूजन केलें असतां मनुष्यास मुक्ति मिळते.

**टीका**—स्ववर्णाश्रमोचित कर्मानें भगवत्पूजन करावें या वाक्याचा भाव असा कीं, प्रत्येकानें आपलीं कर्मं **श्रीविष्णूस** अर्पण करून त्याची कृपा संपादन करावी. हा अर्पणविधि यापूर्वीं वर्णन केला आहे. अशा कर्मार्पणानें भगवद्भक्ति उत्पन्न होते व तिच्या योगानें ज्ञान प्राप्त होऊन मोक्ष मिळतो. वेदांत ज्ञानाचे दोन प्रकार सांगितले आहेत. एक व्यतिरेक ज्ञान व दुसरें अन्वय ज्ञान होय. व्यतिरेक ज्ञानानें जगाचें कारण जें केवळ ब्रह्म तें समजतें. प्रथम चरणानें या ज्ञानाचा बोध केला आहे. तेंच ब्रह्म व्यापकत्वें चराचरीं पाहणें हें अन्वय ज्ञान दुसऱ्या चरणांत सांगितलें आहे.

**श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ।**
**स्वभावनियतं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ॥ ४७ ॥**

**अर्थ**—परधर्म आचरण्यास जरी चांगला असला व आपला धर्म गुणहीन असला तरी स्वधर्माचरणच कल्याणकारक आहे. स्वभावसिद्ध कर्म आचरल्यानें दोष लागत नाहीं.

**टीका**—प्रत्येक वर्णास त्याचे स्वभावानुरूप कोणतें कर्म योग्य आहे हें भगवंतानें ठरविलें आहे. स्वकर्म कितीहि दोषरूप असलें, तरी भगवदर्पण केल्यानें त्याचा दोष लागत नाहीं. दुसऱ्याचें कुत्रें जरी

मारिलें तरी त्याकरितां राजदंड होतो. परंतु राजाज्ञेनें राजपुत्रास मारिलें तरी तें कर्म राजदंडास पात्र होत नाहीं. भगवंत आपल्या सर्वांचा राजा आहे व स्वकर्म करणें ही त्याची आज्ञा आहे. याकरितां स्वकर्म कितीहि दोषयुक्त असलें तरी तें त्याचे आज्ञेनें घडतें, ह्मणून त्यापासून पाप जोडलें जात नाहीं. अमुक गुणामुळें अमुक कर्म घडावें असा अनादि सिद्ध नियम आहे व ते गुण अधिष्ठान ब्रह्मापासून उत्पन्न होतात. तेंच अधिष्ठान सगुण ब्रह्म होय. ह्मणून स्वभावनियत कर्म करणें ही भगवंताची आज्ञा होय. जसें राजाज्ञा टाळण्याचें सामर्थ्य आपणांत नसतें, तसें स्वभावनियत कर्म टाळण्याचें सामर्थ्य आपणांत नाहीं. ह्मणून तद्विरुद्ध वर्तन केलें तर श्रेयस्कर होत नाहीं.

**सहजं कर्म कौंतेय सदोषमपि न त्यजेत् ।**
**सर्वारंभा हि दोषेण धूमेनाग्निरिवावृताः ॥ ४८ ॥**

**अर्थ**—हे अर्जुना, सहज कर्म सदोष असलें तरी तें टाकूं नये. कारण अग्नि जसा धुरानें वेष्टिलेला असतो तशीं सर्व कर्में दोषांनीं युक्त असतात.

**टीका**—अग्नींत जसा धूर असतोच तसा कर्माचे अंगीं बंध करण्याचा दोष आहे हें यापूर्वीं अनेक प्रसंगीं स्पष्ट झालें आहे. मग स्वकर्म न करितां इतर वर्णांचा धर्म आचरल्यापासून फायदा तो कोणता? याकरितां स्वकर्म सदोष असलें तरी तें टाकूं नये असें भगवान् सांगतात. वस्तुस्वभावानें कर्म उत्पन्न होतें असें यापूर्वीं सांगितलें आहे. ह्मणून स्वकर्मास सहज कर्म ह्मटलें आहे. वस्तुस्वभावानें कर्म उत्पन्न होतें असें जरी आहे, तरी कारणाचा कांहीं तरी संस्कार कार्यांत दिसतोच. ह्मणून कुळधर्माप्रमाणें कर्माचरण करणें उक्त आहे. आपल्या घरांत सूर्याचा उजेड असतो तसाच राजमंदिरांतहि असतो. मग त्या उजेडाकरितां

राजमंदिरांत जाण्याचें कारण आहे काय? स्वकर्म कितीहि दोषयुक्त असलें तरी ईश्वरार्पण केल्यानें त्याचा बंध नाहींसा होऊन ईश्वरप्राप्ति होते. ह्मणून अन्य वर्णाचें कर्म आचरण्याची जरूर नाहीं, इतकेंच नाहीं, तर तें आचरल्यापासून उलटा गैरफायदा होतो. तो असा कीं, परधर्मावलंबन करण्यानें ईश्वराज्ञा मोडल्याचें पाप लागतें. याकरितां प्रत्येकानें स्ववर्णाश्रमधर्म आचरण करावा हेंच श्रेयस्कर होय. आतां स्वकर्माचा बंध (दोष) कसा चुकतो हें भगवान् उत्तर श्लोकानें सांगतात.

**असक्तबुद्धिः सर्वत्र जितात्मा विगतस्पृहः ।**
**नैष्कर्म्यसिद्धिं परमां संन्यासेनाधिगच्छति ॥ ४९ ॥**

**अर्थ**—जो कोणतेच कर्माचे ठायीं आपल्या बुद्धीची आसक्ति ठेवित नाहीं, ज्यानें आपली बुद्धि वश करून घेतली आहे व जो निस्पृहतेनें वागतो, तो कर्मार्पण विधीनें श्रेष्ठ अशा ज्ञानास पावतो.

**टीका**—स्वधर्माचरण करित असतां व देहनिर्वाहाकरितां अवश्य कर्म करित असतां जो फळासक्ति ठेवित नाहीं त्यास ज्ञान प्राप्त होतें असें या श्लोकीं सांगितलें आहे. अशी योग्यता येण्याकरितां बुद्धि स्ववश झाली पाहिजे व कोणत्याहि वस्तूची इच्छा मनांत नसली पाहिजे. अशा रीतीनें फलासक्ति टाकून सर्व कर्म ईश्वरार्पण करावें असें "**संन्यास**" शब्दानें सुचविलें आहे. "**संन्यास**" शब्दाचा अर्थ सम्यक् प्रकारें न्यास ह्मणजे त्याग असा आहे. आतां, या शब्दानें आश्रमसंन्यास अथवा काम्यत्यागसंन्यास न घेतां कर्मफळत्याग असाच अर्थ कां घ्यावा, हें सांगितलें पाहिजे. "**संन्यास**" शब्दाचा आश्रम-संन्यास असा अर्थ घेतला तर त्यावरून स्वधर्मत्याग सिद्ध होतो. परंतु चालू प्रकरण स्वकर्माचरणासंबंधाचें आहे असें मागील संदर्भानें दिसतें. याकरितां "**संन्यास**" शब्दाचा आश्रमसंन्यास असा अर्थ होऊं शकत

नाहीं. बरें, काम्यत्यागसंन्यास असा अर्थ घ्यावा, तर काम्यत्यागानंतरच स्वकर्माचरणानें नैष्कर्म्यसिद्धि मिळते असें "**स्वकर्मनिरतः सिद्धिं यथा विन्दति तच्छृणु**" यावरून स्पष्ट सिद्ध होतें. "**निरत**" शब्दाचा अत्यंत रत असा अर्थ आहे. यावरून तो पुरुष काम्यरत नसतो असें सुचविलें आहे. फळाची इच्छा धरून काम्यकर्म करणारा मनुष्य स्वकर्माचरण करितो, तें केवळ प्रत्यवायाच्या भीतीनें करितो. कारण स्वकर्माचरणानें शुद्धि झाल्याखेरीज काम्यफळप्राप्ति होत नाहीं, हें शास्त्ररहस्य त्यास माहित असतें; ह्मणून त्याचें स्वकर्म काम्यार्थच असतें. अशा मनुष्यास भगवान् "**स्वकर्मनिरत**" ह्मणतील हें संभवत नाहीं. शिवाय "**स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः**" असें यापूर्वीं ह्मटलें आहे व या श्लोकीं संन्यासें करून नैष्कर्म्यसिद्धि मिळते असें सांगितलें आहे. यावरून "**कर्मार्पण**" व "**संन्यास**" या शब्दांची एकाच अर्थीं योजना केली आहे हें स्पष्ट सिद्ध होतें. आतां नैष्कर्म्यसिद्धि याचा खरा अर्थ काय हें पाहूं. कोणी लोक त्याचा चित्तशुद्धि असा अर्थ करितात. पण तसा अर्थ हल्लींच्या प्रसंगीं अयुक्त दिसतो. कारण "**असक्तबुद्धि**", "**जितात्मा**" व "**विगतस्पृह**" हीं विशेषणें ज्याची चित्तशुद्धि झाली नाहीं अशा मनुष्यास लागूं शकत नाहींत. या ठिकाणीं "**नैष्कर्म्यसिद्धि**" याचा अर्थ "ज्ञान" असाच केला पाहिजे, हें पुढील श्लोकांत 'अशी सिद्धि पावल्यावर ब्रह्मप्राप्ति होते' असें म्हटलें आहे त्यावरून स्पष्ट सिद्ध होतें. कारण स्वरूपाचा बोध झाल्यावरच अभ्यासानें ब्रह्मप्राप्ति होते. एवंच स्वकर्माचरणानें चित्तशुद्धि होते व तदनंतर ही नैष्कर्म्यसिद्धि होते, ह्मणजे बुद्धीस स्वरूपबोध होतो, असें भगवान् ह्मणतात हें सिद्ध झालें.

**सिद्धिं प्राप्तो यथा ब्रह्म तथाप्नोति निबोध मे ।**
**समासेनैव कौंतेय निष्ठा ज्ञानस्य या परा ॥ ५० ॥**

**अर्थ**—हे अर्जुना, अशी नैष्कर्म्यसिद्धि ह्मणजे ज्ञानप्राप्ति झाल्यावर तो ब्रह्म कसा पावतो, हें संक्षेपानें मजपासून समजून घे. अशा ब्रह्मप्राप्तींत ज्ञानाची उत्तम निष्ठा असते.

**टीका**—स्वरूपबोध झाला ह्मणजे सर्व कार्य आटोपलें असें नाहीं. त्यानंतर अभ्यास करून तें ज्ञान पक्क झालें ह्मणजे ब्रह्मत्व प्राप्त होतें. ज्याचे मनांत ब्रह्मावांचून इतर कशाचेंहि स्फुरण होत नाहीं तो ब्रह्म झाला असें समजावें. स्वरूपबोध होणें ज्ञाननिष्ठाच होय. परंतु अभ्यासानें तशी निष्ठा पूर्णपणें बाणली ह्मणजे जी ब्रह्मस्थिति प्राप्त होते तिला "**ज्ञानाची परा निष्ठा**" असें म्हटलें आहे. ज्या अभ्यासक्रमानें ही पदवी प्राप्त होते तो यापुढें भगवान् सांगतात.

**बुद्ध्या विशुद्धया युक्तो धृत्यात्मानं नियम्य च ।**
**शब्दादीन्विषयांस्त्यक्त्वा रागद्वेषौ व्युदस्य च ॥ ५१ ॥**

**विविक्तसेवी लघ्वाशी यतवाक्कायमानसः ।**
**ध्यानयोगपरो नित्यं वैराग्यं समुपाश्रितः ॥ ५२ ॥**

**अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं परिग्रहम् ।**
**विमुच्य निर्ममः शांतो ब्रह्मभूयाय कल्पते ॥ ५३ ॥**

**अर्थ**-अत्यंत शुद्ध बुद्धीनें युक्त होऊन, धारणेनें चित्ताचें स्वरूपीं नियमन करून, शब्दादि विषय व रागद्वेष टाकून ॥ ५१ ॥ जो मनुष्य एकांतस्थानीं राहतो, लघु अन्नाचें सेवन करितो, आपलें शरीर, वाचा व मन आवरून धरितो, नेहमीं ध्यानयोगीं रत असतो, ज्यास वैराग्याचा उत्तम प्रकारें आश्रय असतो, ॥ ५२ ॥ आणि जो अहंकार, बळ, गर्व, काम, क्रोध व परिग्रह यांस टाकून देऊन ममतारहित व शांत होतो, तो ब्रह्म होण्यास योग्य होतो. ॥ ५३ ॥

**टीका**—यापूर्वी सांगितल्याप्रमाणें स्वकर्माचरणानें शुद्धता होऊन ज्या बुद्धीस स्वरूपबोध होतो तिला "**विशुद्ध बुद्धि**" ह्मटलें आहे. **धृति** शब्दानें अभ्यासाची सूचना केली आहे. धृति ह्मणजे धारणा होय. धारणेनें चित्ताचें नियमन करावें व तें स्वरूपीं स्थिर करावें असें "**आत्मानं नियम्य**" या शब्दांनीं सुचविलें आहे. असें नियमन विषयत्यागाशिवाय घडूं शकत नाहीं, ह्मणून तो करावा असें उत्तरार्धांत सांगितलें आहे. ज्यानें विषयांचा त्याग केला त्याचे ठायीं रागद्वेष उपजण्याचें कारणच नाहीं. असें असून रागद्वेषांचा त्याग विशेषत्वें कां सांगितला अशी शंका येते. तिचें समाधान असें आहे कीं, ज्ञान्यासहि प्रारब्धामुळें त्याचे इच्छेविरुद्ध विषयभोग घडतो. तशा प्रसंगीं रागद्वेषविरहित विषयांचा उपभोग घेतला ह्मणजे तो त्या कर्मानें बद्ध होत नाहीं. अभ्यासाचे व्यतिरेक आणि अन्वय असे दोन प्रकार आहेत, ते एथें सुचविले आहेत. कारण चित्ताचा जडत्वसंस्कार मोडल्याशिवाय चित्त स्वरूपीं स्थिर राहूं शकत नाहीं व तो जडत्वसंस्कार मोडण्यास विषय आत्मस्वरूप पाहण्याचा योग करणें आवश्यक आहे. ॥ ५१ ॥

स्वरूपीं चित्त स्थिर राहण्यास एकांतस्थळीं राहणें आणि हलकें व मित भोजन करणें जरूर आहे. शरीरचेष्टा, बोलणें व मनाच्या कल्पना यांचेंहि नियमन केलें पाहिजे; ह्मणजे नित्यकर्म व देहनिर्वाहार्थ कर्म करण्याकरितां ज्या शरीरचेष्टा, बोलणें व मनाच्या कल्पना करणें भाग पडेल तेवढ्याच कराव्या. "**ध्यानयोगपर**" म्हणजे सगुणध्यानतत्पर असलें पाहिजे. "**ध्यान**" म्हणजे सगुण ध्यानच होय. हें सहाव्या अध्यायांतील बाराव्या श्लोकाचे टीकेंत स्पष्ट करून दाखविलें आहे. भगवंताचें ध्यान सगुणत्वें करून, उपासना आत्मत्वें करावी, असें बाराव्या अध्यायाचे सहावे श्लोकांत सांगितलें आहे. तोच उपदेश "**ध्यानयोगपर**" या शब्दानें केला आहे. "**ध्यान**" म्हणजे सगुण

ध्यान व "योग" म्हणजे आत्मयोग असा बोध केला आहे. यावरून "ध्यानयोग" शब्दानें सगुणध्यानीं आत्मयोग पहावा असें सुचविलें आहे. असा ध्यानयोग साधण्यास वैराग्याचें साधन पाहिजे. ॥ ५२ ॥

"अहंकार" म्हणजे स्वदेहाची व तत्संबंधीं लोकांची ममता होय. "बल" शब्दानें शरीरबळ, धनबळ इत्यादिकांची सूचना केली आहे. "दर्प" म्हणजे गर्व होय. काम आणि क्रोध यांचा अर्थ उघडच आहे. "परिग्रह" म्हणजे नोकर, चाकर, पशु इत्यादि होत. या सर्वांचा त्याग केल्यानें मनुष्य ममतारहित होऊन त्याचे अंगीं शांतता येते, व नंतर तो ब्रम्ह होण्यास योग्य होतो असें भगवान् या श्लोकांतीं सांगतात. यावरून स्पष्ट सिद्ध होतें कीं, केवळ आत्म्याचें ज्ञान झालें म्हणजे इतिकर्तव्यता मानणें अगदीं चुकीचें आहे. याचप्रमाणें या गीतेंत वेळोवेळीं भगवान् सांगत आले आहेत व त्याचा उपसंहार या तीन श्लोकांनीं केला आहे. अशा रीतीनें जो ब्रम्ह झाला त्याचीं लक्षणें कोणतीं हें यापुढें सांगितलें आहे.

**ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा न शोचति न कांक्षति ।**
**समः सर्वेषु भूतेषु मद्भक्तिं लभते पराम् ॥ ५४ ॥**

**अर्थ**—जो ब्रम्ह झाला त्याचें चित्त प्रसन्न असतें. तो प्रवृत्तीचा शोक, अथवा निवृत्तीची इच्छा करित नाहीं. तो सर्वभूतीं सम असतो व त्यास उत्कृष्ठ अशी माझी भक्ति प्राप्त होते.

**टीका**—जो ब्रम्ह झाला त्याला सर्वत्र ब्रम्हच दिसूं लागतें, म्हणून त्याचें चित्त नेहमीं प्रसन्न असतें. प्रिय वस्तूचे प्राप्तीनें चित्त प्रसन्न होतें असा सर्वांचा अनुभव आहे व आपल्या आत्म्याहून इतर कोणतीहि वस्तु अधिक प्रिय नाहीं असेंहि यापूर्वीं सिद्ध करून दाखविलें आहे. असा प्रियरूप आत्मा ज्यास सर्वत्र दिसूं लागतो, त्याचें चित्त प्रसन्न

राहतें याविषयीं कोणासहि संशय असण्याचें कारण दिसत नाहीं. स्वप्नांत आपलें मन भीतिदर्शक नाना आकार धारण करितें. त्यांचे चिंतनानें जागृतींत चित्ताचा क्षोभ होत नाहीं. तद्वत् सर्व जग आपला आत्माच आहे असें त्यास भासत असतें, ह्मणून त्याचे चित्तास क्षोभ होत नाहीं. स्वप्नसृष्टिं जीवांची कल्पना होय, तसें सर्व जगत् ईश्वराची कल्पना होय अशी त्याची खात्री झाली असते. त्या ईश्वराचाच अंश आपण आहों ह्मणून आपल्या मनानें स्वप्नसृष्टि उत्पन्न होते. पाण्यांत सूर्याचें प्रतिबिंब पडतें तसें जीवाचें रूप आहे असें यापूर्वी स्पष्ट करून दाखविलें आहे. त्याच दृष्टांतानुरूप पाण्यांतीळ झळझळीनें भिंतीवर दुसरी झळझळ दिसते तें स्वप्नसृष्टीचें रूप होय. मन स्वप्नसृष्टि उत्पन्न करितें व तिच्यांत प्रवेश करून तें तिला सचेतन करितें. त्याचप्रमाणें ईश्वरकल्पनेनें जगत् उत्पन्न होतें. त्यांत प्रवेश करून ईश्वर त्यास सचेतन करितो. अशा प्रकारें ब्रह्म झालेल्या मनुष्याची खात्री होऊन ती त्याचे अंगीं भिनली असते, ह्मणून तो नेहमीं प्रसन्नचित्त असतो. अशा पक्क ज्ञान्यास देखील प्रारब्ध सुटलें नसतें. तथापि भोगकाळीं, 'मला विरक्तास हे भोग कां होतात', असा तो शोक करित नाहीं व कशाची अपेक्षाहि करित नाहीं; ह्मणजे तो प्रवृत्तीचा शोक करित नाहीं व निवृत्तीची अपेक्षा करित नाहीं असा दुसऱ्या चरणाचा भाव आहे. कोणी टीकाकार याचा असा अर्थ करितात कीं, तो धनादिकांची अपेक्षा करित नाहीं आणि त्यांचे हानीचा शोक करित नाहीं. पण असा अर्थ सयुक्त दिसत नाहीं, कारण साधकांचे अंगींहि हे गुण असतात. ज्ञान पक्क होण्याकरितां साधकांस प्रवृत्ति टाकून निवृत्ति धरावी लागते. ह्मणून प्रवृत्तीनें त्यास शोक होतो व निवृत्तीची तो अपेक्षा करित असतो. सिद्धांचें लक्षण साधकांसारखें नसून तद्विलक्षण असतें. यावरून हा त्यांचा अर्थ अयुक्त दिसतो. बरें, दुःख होतां तो शोक

करित नाहीं व सुख होतां तो त्याची इच्छा करित नाहीं असा अर्थ करावा, तर तेंहि साधकलक्षणच होय; कारण दुःख झालें ह्मणजे जो रडतो व सुख झालें असतां जो आनंद मानितो त्यास समाधिसुख कधींच मिळूं शकत नाहीं, पण साधकास तें मिळतें. या कारणांकरितां या टीकेंत केलेला अर्थच योक्त आहे असें ठरतें. आतां उत्तरार्धाचें महत्व कळण्याकरितां, पूर्वार्धापर्यंत त्यापूर्वी भगवंतांनीं जो साधनक्रम सांगितला, त्याचा गोषवारा केला पाहिजे. स्वधर्माचरण केल्यानें चित्तशुद्धि झाल्यानंतर नैष्कर्म्यसिद्धि ह्मणजे स्वरूपज्ञान होतें असें सांगून, पुढील तीन श्लोकांनीं अभ्यासक्रम सांगितला आहे व त्या अभ्यासानें साधक ब्रह्म व्हावयास योग्य होतो असें शेवटीं सांगितलें आहे. अशा रीतीनें ब्रह्म झालेल्या पुरुषाचीं लक्षणें पूर्वार्धांत सांगून तसा पुरुष सर्वभूतीं भगवद्भक्ति पावतो असें उत्तरार्धानें भगवान् बोलतात. सर्वभूतीं सम होणें हें ब्रह्मभूतत्वाचें लक्षण होय. सर्वांचे ठायीं तो सम होतो, म्हणजे सर्व मायिक जें विषम, त्या विषमांत समत्वें असणारें ब्रम्ह तो होतो. असा समब्रम्ह झाला म्हणजे सर्व भूतीं तो भगवद्भाव पाहतो. यासच सगुण भक्ति म्हणतात. आतां अशी सगुणभक्ति ज्ञानाचा कळस आहे असें कोणता विचारी मनुष्य कबूल करणार नाहीं बरें? याचकरितां या सगुण भक्तीचें वर्णन या गीतेंत पदोपदीं केलें आहे. "**भग**" शब्दानें ऐश्वर्य, धर्म, यश, श्री, ज्ञान आणि वैराग्य या सहा गुणांचा बोध होतो. हे सहा गुण ईश्वराच्या अंगीं आहेत म्हणून त्यास "**भगवंत**" म्हटलें आहे. हेच भाव जो सर्वत्र चराचर जगीं पाहतो त्यास "**भागवत**" म्हटलें आहे. या विषयाचें स्पष्टीकरण करण्याकडे वळूं.

ऐश्वर्य म्हणजे सामर्थ्य होय. वास्तविक हें जगत् नसूनहि इंद्रियद्वारा त्याची मिथ्याभासप्रतीति होते हें भगवंताचें ऐश्वर्यच होय. अविद्येनें सर्व प्रपंच सत्य भासतो, पण विद्येनें तो भगवंताचा अघटित

घटना योग आहे असें पाहतां येतें; ह्मणून हा योग भगवंताचा ऐश्वर्य-दर्शक होय. अविद्याजनितकर्मचक्रानें सुखदुःखरूप विषम फळें भोगावीं लागतात, तीं ज्ञानदृष्टीनें भगवद्रूप दिसतात. अशीं विषम फळें जीवांस भोगावीं लागतात तरी भगवंत सम आणि सदय आहे असें पांचव्या अध्यायांत सिद्ध झालें आहे, त्यामुळें त्याजकडे "धर्म" हा गुण लागतो. हा समसदयत्वरूपी धर्मगुण ज्ञानी पुरुष कर्माचे ठायीं पाहतो. कोणा-चीहि उत्तम कर्तबगारी हें त्याचे यशाचें चिन्ह आहे. त्या न्यायानें जगाची अघटितघटना भगवंताचें यश दर्शविते, व ज्ञानी पुरुष तें तसें पाहतो. भूतें नसूनहि भासमान् होतात ही मायेची करणी आहे. ही मायाच श्रीरूपिणी होय व चराचर त्या मायेचेंच रूप होय, कारण तिला धारण करणारा श्रीधर अरूप आहे. श्री आणि श्रीधर दोन्हीं मायेचींच रूपें होत. त्या दोहोंत एकच प्रकाशक ब्रम्ह असतें. पण 'मी माया' असा भाव श्रीरूपीं असतो व 'मी ब्रम्ह' असा भाव श्रीधररूपीं असतो. चित्स्वरूप श्रीधर चराचररूप मायेस धारण करितो पण स्वतः अरूप असतो असें भक्त जाणतो. ह्मणून चराचराचा आकार भगवंताची श्री ह्मणजे माया आहे असें तो पाहतो. व्यवहार-दृष्टीनें "श्री" याचा संपत्ति असा अर्थ घेतात. अनेक वस्तूंची समृद्धि ह्मणजे अनेकत्व संपत्तीचें दर्शक आहे. पुष्कळ द्रव्य, पुष्कळ नोकर, पुष्कळ घोडेगाड्या, पुष्कळ घरें वगैरेचा जो मालक असतो त्यास श्रीमान् ह्मणतात. तसें या अनंत सृष्टीचा ईश भगवंत आहे ह्मणून ती त्याची श्री आहे असेंहि ज्ञानी पाहतो. ज्ञान चित्स्वरूप आहे व तें वृत्तिरूप सात्त्विकज्ञानाचें प्रकाशक आहे. तें ज्ञान भक्त चराचरांत पाहतो. मायायोगें निर्गुणीं ईश्वरत्वाचा प्रत्यय होतो. तो ईश्वर सृष्टि करण्याचा संकल्प करितो, तेव्हां साक्षित्व उत्पन्न होतें. अशा साक्षि-त्वासहित तो आपण आपल्यास षड्भावानें कल्पितो. ते सहा भाव

येणेप्रमाणें आहेतः जननभाव, अस्तित्वभाव, वाढण्याचा भाव, परिणामभाव ह्मणजे वाढ खुंटण्याचा भाव, क्षयभाव ह्मणजे दांत वगैरे अंगांचा क्षय पावण्याचा भाव, व नष्ट होण्याचा भाव. या भावांचा तो साक्षी होऊन राहतो. हे सहा भाव चराचरांत पहाण्यास "**ज्ञान**" ह्मटलें आहे. आपला आत्मा जो भगवंत त्याचे हे भाव आहेत असें समजून, या भावांनीं युक्त असलेले चराचर भक्त भगवद्रूप पाहतो. आपणास सर्व कल्पूनहि भगवंत स्वतः केवळ साक्षित्वानें राहतो हा त्याचा वैराग्य गुण होय. सर्व चराचर या गुणांचें दर्शक आहे ह्मणून ज्ञानी भक्त त्यास भगवद्रूप पाहतो. एवंच भगवंताचे षड्गुण चराचर सृष्टींत पाहतां येतात ह्मणून चराचर भगवद्रूप आहे हें सिद्ध झालें. चराचर भग होय व त्याचा प्रकाशक आत्मा होय; ह्मणून चराचर आत्मा भगवंताचें शरीर होय. आपल्या शरीरांत जसा आत्मा वास करितो तशा रीतीनें भगवंत चराचरीं वास करितो, ह्मणून त्यास "**वासुदेव**" ह्मणतात. यावरून या "**भगवत्**" व "**वासुदेव**" शब्दांनीं चराचर भगवद्रूप आहे असा बोध होतो. म्हणूनच "**ॐ नमो भगवते वासुदेवाय**" या मंत्राचा उपदेश नारदानें ध्रुवास केला होता, व त्याच्या प्रतापानें तो शाश्वत पदास पावला. या एकंदर कारणांवरून सगुणभक्ति ज्ञानाचा कळस होय असें स्पष्ट दिसतें. आत्मत्वें अशी सगुणभक्ति घडूं लागली म्हणजे इतिकर्तव्य झालें असें भगवान् या पुढील श्लोकानें सांगतात.

**भक्त्या मामभिजानाति यावान्यश्चास्मि तत्त्वतः ।**
**ततो मां तत्त्वतो ज्ञात्वा विशते तदनंतरम् ॥ ५५ ॥**

अर्थ—भक्तीनें तो मला सर्वत्र, मी जेवढा व जो आहें, तसा तत्त्वदृष्टीनें जाणतो व मला तत्त्वतः जाणून देहपातानंतर मजमध्यें प्रवेश करितो.

टीका—सर्वत्र भगवद्भाव पाहणें भक्ति होय असें पूर्व श्लोकीं सिद्ध झालें आहे. सगुणसाक्षी अनंत आहे व तो सगुणपणींहि निर्गुणत्वेंच असतो असें तत्त्वदृष्टीनें जाणून सगुणभक्ति केली असतां, तो भक्त देहपातानंतर भगवत्स्वरूपीं प्रवेश करितो असें या श्लोकानें सांगितलें आहे. "यावान्" शब्दानें भगवंताच्या साक्षित्वाचें अनंतत्व सुचविलें आहे आणि "यः" शब्दानें सगुणपणीं निर्गुणत्व सुचविलें आहे. "मला जाणतो" म्हणजे निर्गुण स्वरूपास जाणतो असें म्हणतां येत नाहीं, कारण ब्रम्ह झाल्यावर सगुणभक्ति प्राप्त होते असें पूर्वश्लोकींच भगवंतांनीं सांगितलें आहे. भक्तीनें सगुणपणीं अनंतत्व व निर्गुणत्व कसें पहावें याचा बोध व्हावा म्हणून नुसतें "जानाति" न म्हणतां "अभिजानाति" असें म्हटलें आहे. "अभिजानाति" याचा अर्थ सर्वत्र जाणतो असा आहे. जेथें सर्वपण असतें तेथें अंतपण नसतें, म्हणून "अभिजानाति" शब्दानें अनंतत्व सुचविलें आहे. ब्रम्ह अनंत आहे त्याप्रमाणें माया आणि ईश्वर हीं अनंत आहेत. सर्व चराचर मिथ्याभास आहे. चित्स्वरूप त्याचें प्रकाशक होय. या चित्स्वरूपावांचून सगुणपणाहि स्फुरत नाहीं. असें चित्स्वरूप (निर्गुण) सगुणांत सर्वत्र आहे, असें तो भक्त जाणतो हेंहि "अभिजानाति" शब्दानें सुचविलें आहे. देहपात होईपर्यंत भगवत्स्वरूपीं कायमचा प्रवेश होणें अशक्य आहे, कारण देह असेपर्यंत प्रारब्ध कर्म शिल्लक असतें. तें भोगतांना मनुष्य स्वरूपापासून चळतो.

याप्रमाणें अभ्यासक्रम व त्याचें फळ ऐकून अर्जुनास वाटलें कीं, असा अभ्यासच करावा हें बरें, कर्मांत पडण्यांत कांहीं हंशील नाहीं. हें जाणून भगवान् म्हणतात कीं,

**सर्वकर्माण्यपि सदा कुर्वाणो मद्व्यपाश्रयः ।**
**मत्प्रसादादवाप्नोति शाश्वतं पदमव्ययम् ॥ ५६ ॥**

अर्थ–माझा आश्रय केला असतां सर्व कर्में करूनहि माझ्या कृपेनें शाश्वत असें अव्यय पद प्राप्त होतें. कर्म करितांना भगवदाश्रय कसा करावा हें यापुढें भगवंत स्पष्ट करून सांगतात.

**चेतसा सर्वकर्माणि मयि संन्यस्य मत्परः ।**
**बुद्धियोगमुपाश्रित्य मच्चित्तः सततं भव ॥ ५७ ॥**

अर्थ–बुद्धीनें सर्व कर्में माझे ठायीं अर्पण करून, मत्पर होऊन, व बुद्धियोगाचा आश्रय करून सर्वकाळ मच्चित्त हो.

टीका–चित्त आणि चैतन्य यांच्या संयोगास "**बुद्धियोग**" ह्मणतात. जडभ्रांति निघून गेली ह्मणजे हा संयोग आयतच आहे. आत्मसाक्षात्कार झाल्यावांचून योग करितां येत नाहीं. बुद्धियोगाचा आश्रय करून सर्व कर्में भगवत्पदीं अर्पण करावीं असें ह्मटल्यानें कर्मी चित्स्वरूप लक्षून तीं अर्पावीं असें सुचविलें आहे. कर्म करितांना चित्स्वरूपाचें स्फुरण होईल तर फारच बरें. तसें न होऊं शकेल तर निदान अर्पण तरी ब्रह्मभावानें करावें. "**ब्रह्मार्पणं ब्रह्महविः**" या चतुर्थाध्यायांतील श्लोकांत जें तत्त्व सांगितलें आहे, तेंच "**बुद्धियोग-मुपाश्रित्य**" या चरणानें सुचविलें आहे. "**उप**" याचा समीप असा अर्थ आहे. यावरून समीप आश्रय करावा ह्मणजे बुद्धींत सर्वकाळ स्वरूपाचें स्फुरण असावें असा भाव दर्शविला आहे. अशा संवयीनें बुद्धि अनायासें योगीं मुरते. या बुद्धियोगाचे आश्रयानें सर्व कर्में चिन्मय दिसूं लागतात. याप्रमाणें कर्मास चिन्मय पाहून त्यांचें अर्पण करावें व तसें करितांना आपणहि चित्स्वरूप आहों अशी चित्तांत भावना ठेवावी, अशी "**मच्चित्तः**" या शब्दानें भगवान् सुचना करितात. कर्मार्पण करितांना भगवंत सर्वांहून थोर आहे व तोच आपला उद्धार करील अशी पूज्यबुद्धि ठेवावी, असा "**मत्पर**" शब्दांतील आशय आहे;

कारण अशा भावनेनें भगवत्कृपा होऊन अनायासें योग बाणतो. हें यापूर्वीं स्पष्ट करून दाखविलेंच आहे.

**मच्चित्तः सर्वदुर्गाणि मत्प्रसादात्तरिष्यसि ।**
**अथ चेत्त्वमहंकारान्न श्रोष्यसि विनंक्ष्यसि ॥ ५८ ॥**

**अर्थ**–तूं मच्चित्त झालास म्हणजे माझ्या प्रसादें करून सर्व विघ्नां-पासून सुटशील. परंतु अहंकारानें माझें बोलणें ऐकणार नाहींस तर तूं वांया जाशील.

**टीका**–कर्म करितांना त्याचे सिद्धीचे आड पदोपदीं विघ्नें येतात. त्या सर्व विघ्नांतून भगवत्कृपा पार पाडिते. ती मिळण्याकरितां त्याचे ठायीं चित्त ठेविलें पाहिजे. याच भावानें "**तेषामहं समुद्धर्ता**" असें बारावे अध्यायांत भगवंत बोलले आहेत. कर्म करणारच नाहीं असा अहंकार धरिला तरी प्रारब्धकर्म टाळलें जात नाहीं. म्हणून निदान त्यासंबंधानें तरी त्याचा निश्चय वायां जाणार यांत संशय नाहीं, अशी भगवान् उत्तरार्धानें खात्री करितात. साधारण पोहणारा देखील नदीच्या प्रवाहीं पडून पोहूं लागला तर तो हळूहळू पैलतीरास लागतो. परंतु कट्टा पोहणारा असूनहि कोणी उपराटें पोहूं लागला तर कांहीं वेळपर्यंत तो दम धरील हें जरी खरें आहे, तरी अखेरीस त्याचे नाकांत व तोंडांत पाणी जाऊन तो घाबरून आपलें पोहणें सुद्धां विसरेल व त्यामुळें जीवित्वास मुकेल. तद्वत् ज्ञानाचा अहंकार धरून प्रारब्धकर्म करणार नाहीं म्हणून कोणी हट्ट धरील, तर तेवढ्या वेळेपुरतें त्याचें ज्ञान झांकून जाऊन त्याचे हातून तें कर्म घडणारच. पण त्यांत त्याचें नुकसान होतें; तें असें कीं, ज्ञान नष्ट झाल्यामुळें तें कर्म बद्धक होतें. हेंच भगवान् उत्तर श्लोकानें सांगतात.

**यदहंकारमाश्रित्य न योत्स्य इति मन्यसे ।**
**मिथ्यैष व्यवसायस्ते प्रकृतिस्त्वां नियोक्ष्यति ॥ ५९ ॥**

अर्थ—अहंकाराचा आश्रय करून मी युद्ध करणार नाहीं असें ह्मणशील तर हा तुझा निश्चय व्यर्थ आहे. प्रकृति तुला तें करावयास लावील.

टीका—ज्ञान्याचें इतर कर्म नष्ट होऊन फक्त प्रारब्धकर्म उरलें असतें, ह्मणून कर्मप्रवृत्ति होऊं लागल्याबरोबर प्रारब्धभोगकाळ आला असें समजून तो त्यास मान देतो. सामान्य मनुष्यांचे ठायीं प्रारब्धकर्म व इतर कर्म यांचा फरक करूं शकत नाहीं. अर्जुन भगवत्कृपेनें ज्ञानसंपन्न झाला होता ह्मणून त्याची प्रकृति प्रारब्धरूपिणी होती. ती प्रारब्धरूपिणी प्रकृति युद्ध करावयास लावील असें भगवान् अर्जुनास सांगतात.

स्वभावजेन कौंतेय निबद्धः स्वेन कर्मणा ।
कर्तुं नेच्छसि यन्मोहात्करिष्यस्यवशोऽपि तत् ॥ ६० ॥

अर्थ—हे अर्जुना, मोहाचे स्वाधीन होऊन जें कर्म करण्यास तूं इच्छित नाहींस, तें तूं परतंत्र होतसाता करिशील, कारण स्वभावजनित स्वकर्मानें तूं बद्ध आहेस.

टीका—जन्मजन्मांतरीं घडलेल्या संस्कारांनीं जें कर्म उत्पन्न होतें त्यास स्वभावजनित कर्म ह्मणावें. त्या कर्माचे संचित क्रियमाण आणि प्रारब्ध असे तीन प्रकार आहेत. संचित आणि क्रियमाण दोन्हीहि बद्धक आहेत, तथापि ज्ञानानें त्यांचा बंध नाहींसा करितां येतो. परंतु या संचितांतूनच फळभोगरूपें जें प्रारब्ध बनतें, त्याचा क्षय भोगाशिवाय होत नाहीं. हा फरक दर्शविण्याकरितां "निबद्धः" असें पद येथें योजिलें आहे. प्रकृति स्वतः जड असून जीवांकडून जबरदस्तीनें भोग भोगविते, हें सामर्थ्य तिच्या अंगीं कशानें येतें, हें पुढील श्लोकांत सांगितलें आहे.

ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति ।
भ्रामयन्सर्वभूतानि यंत्रारूढानि मायया ॥ ६१ ॥

अर्थ–ईश्वर भूतांच्या हृदयांतरीं राहून कर्मयंत्रारूढ झालेल्या सर्व भूतांना आपले मायेनें भ्रमवितो.

टीका–"हृदय" ह्मणजे बुद्धि व "भूत" ह्मणजे देह असा येथें अर्थ घेतला पाहिजे. पूर्वकर्म हें यंत्र होय व बुद्धि मायासूत्र होय. या मायासूत्रानें ईश्वर प्राणिमात्रांचे देहांस नाचवितो असें ह्मटलें आहे. बुद्धीसच माया ह्मणतात. यावरून असें सुचविलें आहे कीं प्रकृति स्वतः जड आहे तरी सर्व शक्तिमान् ईश्वराच्या सत्तेनें ती कर्मफळ भोगविते. प्रारब्धकर्म भोगणें ही ईश्वराची आज्ञा होय. तो ईश्वर आह्मां सर्वांचा प्रभु आहे. राजाची आज्ञा जे पाळित नाहींत त्यांस राजदंड होतो व राजाचे अधिकारी जबरदस्तीनें त्या आज्ञेप्रमाणें त्यांस वर्तन करावयास लावितात. तद्वत् ईश्वराची ही आज्ञा पाळण्यास जे नाखुष असतात त्यांजकडून माया त्या आज्ञेप्रमाणें त्यांचे इच्छेविरुद्ध वर्तन करविते. जो कोणी राजाज्ञा पाळून राजास शरण जातो त्याचा निर्वाह नीट चालतो. तसें नारायणास शरण राहून जो प्रारब्धकर्म भोगितो त्याची काळजी तो वाहतो व त्यास कर्मबंध न होऊं देतां, संसारांतून पार पाडितो. हें तत्त्व यापुढें सांगितलें आहे.

तमेव शरणं गच्छ सर्वभावेन भारत ।
तत्प्रसादात्परां शांतिं स्थानं प्राप्स्यसि शाश्वतम् ॥ ६२ ॥

अर्थ–हे अर्जुना, त्यालाच तूं सर्वभावें शरण जा ह्मणजे त्याचे प्रसादानें तुला उत्कृष्ट शांति प्राप्त होऊन शाश्वत असें मोक्षपद मिळेल.

टीका–"सर्वभाव" शब्दानें सर्वत्र भगवद्भाव सुचविला आहे. यावरून सर्वत्र भगवद्भाव ठेवणें हेंच शरणागतीचें लक्षण होय असें स्पष्ट दिसतें. अशा शरणागतीसच "अनन्यशरणागति" ह्मणतात.

इति ते ज्ञानमाख्यातं गुह्याद्गुह्यतरं मया ।
विमृश्यैतदशेषेण यथेच्छसि तथा कुरु ॥ ६३ ॥

अर्थ—याप्रमाणें अत्यंत गुह्य असें ज्ञान मी तुला सांगितलें आहे. त्याचा पूर्वापर विचार करून तुला वाटेल तसें कर.

टीका—वेदाच्या तीन्ही कांडांत जें ज्ञान सांगितलें आहे तें सर्व भगवंतांनीं अर्जुनास सांगितलें असें "इति" शब्द सुचवितो. वेदांत जीं ज्ञानतत्त्वें सांगितलीं आहेत त्या सर्वांत अनन्यभक्तीचें तत्त्व अत्यंत महत्वाचें आहे असें "गुह्याद्गुह्यतरं" या पदानें सुचविलें आहे. हेंच तत्त्व या गीतेंत ठिकठिकाणीं श्रेष्ठत्वें थोडक्यांत सांगून बारावे अध्यायांत विस्तारानें सांगितलें आहे. या त्याचे महत्वाकरितां 'तेंच पुन्हा सांगतों' असें भगवान् यापुढें ह्मणतात.

सर्वगुह्यतमं भूयः शृणु मे परमं वचः ।
इष्टोऽसि मे दृढमितिस्ततो वक्ष्यामि ते हितम् ॥ ६४ ॥

अर्थ—सर्वांहून अत्यंत गुह्य मी तुला सांगतों तें पुन्हा ऐक. तूं माझा अत्यंत आवडता आहेस व दृढ निश्चयाचा आहेस, ह्मणून मी तुझ्या हिताची गोष्ट सांगतों.

टीका—वेदांतशास्त्र अत्यंत गुह्य आहे. त्याहून अपरोक्ष ज्ञान फार गुह्य आहे. त्याहून ही गुह्य गोष्ट सांगतों असें भगवान् ह्मणतात. द्वादशाध्यायांत जो भक्तियोग सांगितला आहे तोच येथें पुन्हा सांगितला आहे असें यापुढें स्पष्ट होईल.

मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।
मामेवैष्यसि सत्यं ते प्रतिजाने प्रियोऽसि मे ॥ ६५ ॥

अर्थ—माझे ठायीं मन ठेवणारा हो, माझा भक्त हो, माझा पूजक हो, व मला नमस्कार कर ह्मणजे तूं मलाच येऊन मिळशील, हें खरें आहे असें खात्रीनें समज. तूं माझा प्रियकर आहेस.

टीका—सकल विश्व भगवद्रूप आहे असें पहावें ह्मणून " मन्मना-भव " या पदांनीं अर्जुनास भगवान् बोध करितात. आत्मत्वें सगुणाचे ठायीं ज्याची भक्ति असते त्यास भक्त ह्मणावें. अशी भक्ति तीन लक्षणांनीं युक्त असली पाहिजे; ह्मणजे ती भक्ति निर्निमित्त, अखंड व अव्यभिचारिणी असली पाहिजे. ऐहिक अथवा पारमार्थिक लाभाची इच्छा न धरितां, केवळ भगवंताकरितांच जी त्याची भक्ति घडते तिला " निर्निमित्तभक्ति " ह्मणावी. कोणत्याहि वस्तूचे प्राप्तीचे हेतूनें जे भगवंताची भक्ति करितात ते वास्तविकपणें त्या इच्छित वस्तूचीच भक्ति करितात, असें ह्मटलें पाहिजे. मोक्ष प्राप्त्यर्थ भक्तिहि निर्निमित्त भक्ति ह्मणतां येत नाहीं. कुटुंबपोषणाकरितां जी राजसेवा घडते ती कुटुंबाचीच सेवा होय. त्याप्रमाणें आपल्याकरितां ( आत्मप्राप्तीकरितां ) जी भक्ति घडते ती आपलीच भक्ति ह्मणविली जाते. एकंदरींत कोणत्याहि लाभाची इच्छा न करितां केवळ भगवत्प्रीति संपादन करण्याकरितांच जी भक्ति घडते तिला " निर्निमित्तभक्ति " ह्मणावी. प्रीतियुक्त भक्तीस " अखंडभक्ति " ह्मणावी. या अखंडभक्तीचें लक्षण यापूर्वी सप्तमाध्यायांतील " तेषां ज्ञानी नित्ययुक्त " या श्लोकाचे टीकेंत स्पष्ट करून सांगितलें आहे, तें कृपा करून पहावें. भगवंत आपला आत्माच होय अशा ऐक्यभावनेनें जी भक्ति घडते तिला " अव्यभिचारिणीभक्ति " ह्मणावी. अशी त्रिविध भक्ति जो करितो तोच खरा भक्त होय. तसा भक्त होण्याकरितां भगवान् अर्जुनास अत्यंत प्रेमानें सांगतात. " मद्याजी " या पदानें ईश्वरप्रीत्यर्थ सर्व कर्में करावीं असें ह्मटलें आहे. त्याचप्रमाणें सर्वात्मभावें भगवंतास नमस्कार करण्याविषयीं उपदेश केला आहे. अशा रीतीनें जो भगवंताची सेवा करितो तो त्याचे स्वरूपास पावतो यांत संशय नाहीं असें प्रतिज्ञापूर्वक या श्लोकानें भगवंत सांगतात. द्वादशाध्यायांतहि हाच उपदेश " अभ्यासेऽप्यसमर्थोऽसि मत्कर्म परमो भव " या श्लोकानें केला आहे. ह्मणून हा श्लोक त्याची पुनरुक्ति आहे. या भागवतधर्मांत ज्ञान आणि कर्म दोन्ही असतात. दुसऱ्या भागवतधर्मास कर्मत्याग सांगितला

आहे. तो द्वादशाध्यायांत "अथैतदप्यशक्तोऽसि कर्तुं मद्योग माश्रितः" या श्लोकांत वर्णिला आहे. तोच येथें भगवान् यापुढील श्लोकानें सांगतात.

सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज ।
अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः ॥ ६६ ॥

**अर्थ**–सर्व धर्मांचा त्याग करून मला एकत्वें शरण हो ह्मणजे मी तुला सर्व कर्मबंधापासून मुक्त करीन; तूं शोक करूं नकोस.

**टीका**–सर्व धर्मांचा ह्मणजे सर्व विहितकर्मांचा त्याग करून सर्व विश्व एका भगवंताचेंच रूप आहे अशा ऐक्यभावानें त्यास शरण जाण्याविषयीं पूर्वार्धांत उपदेश केला आहे व अशा शरणागतीचें फळ उत्तरार्धानें सांगितलें आहे. तें असे कीं, सगुण भगवंत त्यास सर्व पापांपासून सोडवितो. "पाप" शब्दानें पाप आणि पुण्य दोन्हींहि सचविलीं आहेत. या शब्दाचा अशा दोन अर्थीं वेदवेदांतांत उपयोग केला आहे, हें दाखविण्याकरितां एक वेदांतसूत्र येथें देत आहें:–

तदधिगमे उत्तर पूर्वाघयोरश्लेषविनाशौ तद्व्यपदेशात् ।

अर्थ–तो आत्मा कळल्यावर पुढचे आणि त्या पूर्वींचे पापांचा नाश होतो.

यावरून असा बोध होतो कीं, संचिताचा नाश होतो व क्रियमाण अकर्त्रात्मभावें केल्यानें त्याचा बंध होऊं शकत नाहीं. पापकर्मानें बंध उत्पन्न होतो तसाच पुण्यकर्मानेंहि होतो हें यापूर्वीं स्पष्ट करून दाखविलें आहे. अशा प्रकारें ज्ञानसिद्धि झाल्यावर चिंता करण्यास कारणच राहत नाहीं. परंतु तशी स्थिति होईपर्यंत ज्ञान्यास चिंता असतेच व तिजमुळें त्यास शोकहि होतो. ह्मणून ज्ञानसिद्धीचा उपाय पूर्वार्धानें सांगून उत्तरार्धानें भगवान् अर्जुनाच्या मनाचें समाधान करितात.

असा या श्लोकाचा खरा आणि सरळ अर्थ आहे व याचप्रमाणें द्वादशाध्यायांतहि भगवंताचा उपदेश आहे. तथापि कित्येक टीकाकार याहून निराळा अर्थ दाखवितात. ते ह्मणतात कीं 'सर्व धर्मांचा त्याग केल्यानें जो, प्रत्यवायदोष लागेल त्यापासून मी तुला सोडवीन, तूं

शोक करूं नकोस ' असें भगवंतांनीं अर्जुनास ह्मटलें आहे. आतां मोक्ष ह्मणजे सुटका व्हावयाची ती बंधापासूनच होते आणि असा बंध ज्या धर्मत्यागापासून होतो अशी शरणागति भगवंतांनीं सांगितली हें त्यांस कबूल आहे. यावरून आधीं बंध उत्पन्न होण्यासारखें कर्म करावयास सांगून मग त्यापासून सोडविण्याचें वचन भगवंत देतात असें होतें. वाहवा ! काय सुबक अर्थ हा ! ! सकळ गुह्यांतील गुह्य ह्मणून सांगितलें तें हेंच काय ! ! !

**इदं ते नातपस्काय नाभक्ताय कदाचन ।**
**न चाशुश्रूषवे वाच्यं न च मां योऽभ्यसूयति ॥ ६७ ॥**

**अर्थ**–ज्याच्या अंगीं तप नाहीं जो अभक्त आहे, ज्यास श्रवणेच्छा नाहीं व जो मला दोष लावतो त्याला हें गीताशास्त्र कदापि सांगूं नको.

**टीका**–तप ह्मणजे विचार होय. गीताशास्त्र ऐकून त्याचें मनन करण्याची ज्यास शक्ति नाहीं त्याला अतपस्क ह्मटलें आहे. ही शक्ति अनंत जन्मपर्यंत तपाचरण केल्यानें प्राप्त होते. ज्यास भगवद्भक्ति नाहीं तो अभक्त होय. " शुश्रूषा " शब्दाचे श्रवणेच्छा व सेवा असे दोन अर्थ होतात. या दोन्ही अर्थीं या शब्दाची येथें योजना केली आहे. श्रवणेच्छा असल्याखेरीज कोणतीहि गोष्ट सांगणें गैरशिस्त आहे हें उघडच आहे. ती खरोखर आहे किंवा नाहीं हें समजण्याकरितां सेवा घेणें हें एक साधन आहे. ह्मणून श्रवणेच्छा असून सेवा करण्यासहि जो तयार असेल त्यालाच हें गीताशास्त्र सांगावें. पण भगवंत विषम व निर्दय आहे असें ह्मणणाऱ्यास अथवा त्याचे अवतारचरिताची निंदा करणाऱ्यास तें सांगूं नये असें भगवान् ह्मणतात.

**य इदं परमं गुह्यं मद्भक्तेष्वभिधास्यति ।**
**भक्तिं मयि परां कृत्वा मामेवैष्यत्यसंशयः ॥ ६८ ॥**

**अर्थ**–हें परम गुह्य असें गीताशास्त्र, माझ्या भक्तीस श्रेष्ठत्व देऊन, जो माझे भक्तास सांगेल तो मलाच पावेल यांत संशय नाहीं.

**टीका**–सर्व निगमांचें मथन करून काढिलेलें सार या गीतेंत सांगितलें आहे, असें प्रथम चरणानें दाखविलें आहे. हें सार भगव-

भक्तांखेरीज इतरास सांगण्यांत कांहीं हंशील नाहीं असा दुसऱ्या चरणाचा भाव आहे. गीतार्थाचें निरूपण कोणत्या विशेष लक्षणानें युक्त असलें पाहिजे हें तिसऱ्या चरणांत दर्शविलें आहे व त्याचें फळ सांगून त्याच्या सत्यतेविषयीं प्रतिज्ञा चतुर्थ चरणांत केली आहे. आतां, असें निरूपण कोणी करावें याचा विचार करूं. ज्याचें ज्ञान पक्क झालें असतें त्याला प्राप्तीची उरीच नसते, ह्मणून अशा भक्ताकरितां हा उपदेश नाहीं, हें उघड दिसतें. स्वस्वरूपाचें अपरोक्ष ज्ञान झाल्याखेरीज अशी श्रेष्ठ भक्ति घडणें अशक्य आहे हेंहि सिद्ध झालेंच आहे, ह्मणून तशा मनुष्याकरितांहि हा उपदेश नाहीं. तेव्हां ज्ञान झालें असून तें पक्क होणें राहिलें असतें अशा ज्ञानी भक्तास, त्याचें ज्ञानपरिपाकासाठीं, अशा प्रकारें गीतार्थ निरूपणाचा उपाय सांगितला आहे असें स्पष्ट होतें. या गीतेंत सगुणभक्ति व सगुणभक्त यांचें श्रेष्ठत्व सर्वत्र सांगितलें आहे अशी एथपर्यंत झालेल्या निरूपणानें सुज्ञ वाचकांची खात्री झालीच असेल. ह्मणून निर्गुणाभिमानी टीकाकारांनीं भक्तीचें श्रेष्ठत्व उडविण्याकरितां या श्लोकाचे जे भलभलते अर्थ केले आहेत त्यांचें खंडण करण्याचें कारण दिसत नाहीं. सगुणभक्ति केली असतां सुलभपणें मोक्षप्राप्ति होते ह्मणून तो मार्ग श्रेष्ठ आहे असें या गीतेंत दर्शविलें आहे. पण सगुणभक्तीवांचून मोक्ष मिळत नाहीं असें कोठेंहि ह्मटलें नाहीं. असें असून बलात्कारानें तिचा निर्गुणपर अर्थ करण्याची ज्यांनीं ह्मणून खटपट केली आहे त्यांचा, तसें करण्यानें केवळ दुरभिमान दिसतो, असें ह्मणणें भाग पडतें.

**न च तस्मान्मनुष्येषु कश्चिन्मे प्रियकृत्तमः ।**
**भविता न च मे तस्मादन्यः प्रियतरो भुवि ॥ ६९ ॥**

**अर्थ**—अशा मनुष्याहून माझ्या अत्यंत आवडीचें कृत्य करणारा सर्व मनुष्यांत दुसरा कोणीहि नाहीं व त्याहून या पृथ्वींत मला कोणीहि जास्त प्रिय नाहीं आणि पुढें होणारहि नाहीं.

**टीका**—मनुष्य देहांतच स्वहित साधतां येतें व तें इहलोकींच प्राप्त होतें असें “**मनुष्येषु**” व “**भुवि**” या शब्दांनीं सुचविलें

आहे. आहार, निद्रा, भय आणि मैथुन हे पशूसाहि असतात; ह्मणून जे केवळ या गोष्टींचे ठायींच तत्पर असतात त्यास मनुष्य ह्मणणें प्रशस्त नाहीं. याकरितां स्वहिततत्पर मनुष्यांमध्यें पूर्व श्लोकीं सांगितलेला भक्त आपणास विशेष प्रिय आहे असें भगवान् ह्मणतात.

**अध्येष्यते च य इमं धर्म्यं संवादमावयोः ।**

**ज्ञानयज्ञेन तेनाहमिष्टः स्यामिति मे मतिः ॥ ७० ॥**

**अर्थ**–हा तुझा आणि माझा धर्म्यसंवाद जो पठन करील त्यानें ज्ञानयज्ञानें माझें यजन केलें असें मी समजतों.

**टीका**–गीतार्थ निरूपणाचें फळ यापूर्वीचे श्लोकीं सांगून गीतापाठाचें फळ या श्लोकीं सांगितलें आहे. उंसाची पेर केली ह्मणजे गूळ व साखर पेरली असें ह्मणण्यास हरकत नाहीं; कारण त्यापासून गूळ व साखर होणारच. या भावानें गीतापठन केलें तर ज्ञानयज्ञानें भगवंताची पूजा केली असें भगवंत समजतात. सुवर्णालंकारांनीं भरलेली पेटी बंद करून कोणास बक्षीस दिली असतां त्यांतील अलंकार दात्यानें याचकास लेवविल्याप्रमाणेंच आहेत; कारण आपणास मिळालेल्या पेटींत काय आहे हें दान घेतांना जरी त्या मनुष्यास माहित नसतें तरी पेटी उघडून आंत काय आहे हें कधीं तरी पाहीलच व नंतर त्या पदार्थांचें उत्तमत्व जाणून त्यांचा तो उपयोग करीलच. याच न्यायास अनुसरून भगवान् या श्लोकांतील उक्ति बोलले आहेत कीं, कालांतरानें गीतापाठकास त्यांतील रहस्य कळण्याची इच्छा उत्पन्न होईल व तशी इच्छा झाली ह्मणजे तो गीतार्थ समजून घेईल, तेव्हां त्यास त्याचें महत्व कळून येईल. मग अर्थात् तो त्याचा अभ्यास करील ह्मणजे ज्ञानयज्ञ करील. आतां अर्थ न समजतां गीताश्रवणाचें फळ काय मिळतें हें उत्तर श्लोकीं सांगितलें आहे.

**श्रद्धावाननसूयश्च शृणुयादपि यो नरः ।**

**सोऽपि मुक्तः शुभाँल्लोकान् प्राप्नुयात्पुण्यकर्मणाम् ॥ ७१ ॥**

**अर्थ**–जो मनुष्य श्रद्धायुक्त व असूयारहित होत्साता गीताश्रवण करील तोहि पापांपासून मुक्त होऊन पुण्यकर्म करणारे ज्या उत्तम लोकास जातात त्याप्रत पावतो.

**टीका**—या श्लोकांत सांगितलेलें फळ प्राप्त होण्याकरितां "**श्रद्धा**" ह्मणजे आस्तिक्यबुद्धि व "**अनसूया**" ह्मणजे भगवंताविषयीं दोषरहित मन हीं आवश्यक आहेत.

**कच्चिदेतच्छ्रुतं पार्थ त्वयैकाग्रेण चेतसा ।**

**कच्चिदज्ञानसंमोहः प्रनष्टस्ते धनंजय ॥ ७२ ॥**

**अर्थ**—हे अर्जुना, चित्त एकाग्र करून तूं हें ऐकलें ना? अज्ञानामुळें तुला जो मोह झाला होता तो नाहींसा झाला ना?

**टीका**—एखादी महत्वाची गोष्ट कोणास सांगितली तर तीं त्यास बरोबर समजली अशी प्रत्येक शहाणा मनुष्य आपली खात्री करून घेत असतो. त्याच हेतूनें भगवंतांनीं अर्जुनास प्रश्न केला आहे. त्याचें उत्तर अर्जुन देतो कीं,

**नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा त्वत्प्रसादान्मयाच्युत ।**

**स्थितोऽस्मि गतसंदेहः करिष्ये वचनं तव ॥ ७३ ॥**

**अर्थ**—हे कृष्णा, तुझ्या प्रसादानें माझा मोह नाहींसा झाला आहे व मला आत्मस्मृतीची प्राप्ति झाली आहे. हा मी निसंदेह येथें उभा आहें व तुझ्या आज्ञेप्रमाणें वागण्यास तयार आहें.

**टीका**—अज्ञानावरणानें देहच आपण आहों असा मोह होतो तो व्यतिरेकज्ञानानें नष्ट होतो व आपण कोण हें समजतें. तें ज्ञान आपल्यास झालें असें अर्जुन प्रथम चरणानें सुचवित आहे. मुख्य लाभ हाच होय. तो झाला ह्मणजे तें ज्ञान दृढ करण्याचें केवळ श्रमाचें काम उरतें. तें करणें आपल्या स्वाधीन असतें. याप्रमाणें झालेला कृष्णार्जुनांचा संवाद संजयानें धृतराष्ट्रास सांगितल्यावर तत्संबंधांत संजयानें जे उद्गार काढिले त्यांचें वर्णन यापुढें केलें आहे. संजय ह्मणाला,

**इत्यहं वासुदेवस्य पार्थस्य च महात्मनः ।**

**संवादमिममश्रौषमद्भुतं रोमहर्षणम् ॥ ७४ ॥**

**अर्थ**—याप्रमाणें अद्भुत व रोमांच उभे करणारा कृष्ण आणि महात्मा अर्जुन यांचा संवाद मी ऐकला.

टीका–"आत्मा" ह्मणजे बुद्धि होय व ज्याची बुद्धि मोठी झाली आहे तो "महात्मा" होय. ज्याचे बुद्धीस आपला आत्मा भगवंत सर्वत्र दिसतो त्याचीच बुद्धि मोठी झाली व तो वासुदेवच होय असें ह्मटलें पाहिजे, कारण "**वासुदेवः सर्वमिति स महात्मा**" असें भगवंतांनीं सातव्या अध्यायांत ह्मटलें आहे. ह्मणून अर्जुनास "**महात्मा**" हें विशेषण देऊन संजयानें असें सुचविलें आहे कीं, कृष्णाप्रमाणें अर्जुनहि त्यास तेव्हां वासुदेव दिसूं लागला. या संवादानें संजयाचें मिथ्याभासरूपी द्वैतहि नाहींसें झालें असें "**अद्भुत**" शब्द दर्शवितो. हा अनुभव त्यापूर्वीं प्रगट नव्हता असें संजय पुढील श्लोकांत ह्मणत आहे.

**व्यासप्रसादाच्छ्रुतवानेतद्गुह्यमहं परम् ।**

**योगं योगेश्वरात्कृष्णात्साक्षात्कथयतः स्वयम् ॥ ७५ ॥**

**अर्थ**–श्रीव्यासाचे कृपेनें हा परम गुह्य योग योगेश्वर जो श्रीकृष्ण याचे स्वतःचे तोंडून मी ऐकिला आहे.

**टीका**–भगवान् व्यास संजयाचे गुरु होते. त्याजपासून संजयास अद्वैतोपदेश झाला होता, तरी त्यांत हें तत्त्व नव्हतें असें "**गुह्य**" शब्दानें सुचविलें आहे. व्यासशिष्य संजय पक्क ज्ञानी असून तो देखील याप्रमाणें सगुणभक्तीचें श्रेष्ठत्व कबूल करितो. तेव्हां जे लोक या भक्तीस हीनत्व देतात त्यांस काय ह्मणावें बरें ? असें वर्णन करित असतां संजयाचे अंगावर अत्यानंदामुळें रोमांच उठत होते असें यापुढें तो सांगत आहे.

**राजन्संस्मृत्य संस्मृत्य संवादमिममद्भुतम् ।**

**केशवार्जुनयोः पुण्यं हृष्यामि च मुहुर्मुहुः ॥ ७६ ॥**

**अर्थ**–हे धृतराष्ट्रा, केशवार्जुनांचा हा अद्भुत व पुण्यकारक संवाद पुनः पुन्हा आठवून मी आनंदभरित होतो.

**तच्च संस्मृत्य संस्मृत्य रूपमत्यद्भुतं हरेः ।**

**विस्मयो मे महान् राजन् हृष्यामि च पुनः पुनः ॥ ७७ ॥**

**अर्थ**–हे राजा, तें कृष्णाचें अत्यद्भुत रूप आठवून आठवून मला मोठा विस्मय होतो व पुनः पुन्हा मी आनंदांत निमग्न होतों.

यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः ।
तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवानीतिर्मतिर्मम ॥ ७८ ॥

अर्थ—जेथें योगेश्वर कृष्ण व धनुर्धारी अर्जुन आहेत तेथेंच राज्य, लक्ष्मी, विजय, वैभव व शाश्वत नीति आहेत असें मला निश्चयात्मक वाटतें.

टीका—यावरून असें सुचविलें आहे कीं, जेथें भगवदुपदेश होईल तेथें भगवान् श्रीकृष्ण व अर्जुन आहेतच व म्हणून तेथें श्री, विजय, भूति आणि नीति आहेत असें समजावें. अस्तु.

याप्रमाणें श्रीगीतेची गद्यात्मक टीका वामनरूपी श्रीकृष्णाचे कृपेनें निर्विघ्नपणें सिद्धीस गेली आहे. त्या अनंताची स्तुति करून मोठेमोठे थकले. तेथें मज अज्ञ पामराचा केवा तो किती? याकरितां त्या खटपटींत न पडतां त्याचे पायीं अनन्यभावें लोळण घ्यावें व आपले देहासहित ही टीका त्याचे चरणीं अर्पण करावी व ती ग्रहण करण्याविषयीं त्याची प्रार्थना करून हा ग्रंथ पुरा करावा हा सोपा मार्ग मला बरा दिसतो.

## भगवत्प्रार्थना.

### अभंग.

काय बोलूं मी अनंता । तुझे चरणीं माझा माथा ॥
केली टीका हें गीतेची । बाळ सेवा करि मातेची ॥
उदक देतां सांडुन गेलें । तरी माता प्रेमें डोले ॥
ग्रहण करी माझी सेवा । काय याहुनि मागूं देवा ॥
तूंचि बाप माझा ह्मणुनी । शरण आला व्यंकट चरणीं ॥



# शुद्धिपत्र.

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| १८ | ७ | असत् | असून |
| १९ | ९ | ह्मणून | तद्वत् |
| २१ | १ | दही | देही |
| २४ | ४ | अस | असें |
| २९ | १४ | मतांत | मनांत |
| ३० | ३ | भुते | भूतें. |
| ३२ | ९ | होते | होतो. |
| ३३ | २१ | तस्मादुतिष्ठ | तस्मादुत्तिष्ठ |
| ४० | २ | याचे | यांचे |
| ,, | ,, | त्यास | त्यांस |
| ४१ | ९ | सर्व | सर्प |
| ,, | १३ | नित्यत्वात्मक | नित्यसत्त्वात्मक |
| ,, | १८ | आत्मच | आत्माच |
| ५२ | १ | मोहं | मोह |
| ६३ | १ | नहमीं | नेहमीं |
| ,, | २३ | निर्गुण्यैक्यें | निर्गुणैक्यें |
| ६४ | २५ | रागद्वेषवियुक्तेस्तु | रागद्वेषवियुक्तैस्तु |
| ७० | २१ | सत्वरजतमरहित | सत्त्व, रजतमरहित |
| ७१ | ४ | विनाचित्तशुद्धीवांचून | चित्तशुद्धीवांचून |
| ८० | १२ | इष्टान्भौगान् | इष्टान्भोगान् |
| ८३ | ३ | नाकृते तेंह | नाकृते नेह |
| ८७ | २५ | वतन | वर्तन |

| | | | |
|---|---|---|---|
| ९० | ९ | त्वेदभ्यसूयंतो | त्वेतदभ्यसूयंतो |
| ,, | १९ | पुरुषाची | पुरुषांची |
| ९८ | ४ | एतैर्विर्मोहयत्येष | एतैर्विमोहयत्येष |
| ९९ | १४ | ज्ञानविज्ञानाच्या | ज्ञानविज्ञानाचा |
| ,, | १९ | कणारेरे | करणारे |
| १०२ | ८ | वेसेळ | वेळेस |
| ११४ | १३ | काष्ठग्नीचा | काष्ठाग्नीचा |
| १४६ | ९ | दुःखमाप्नु | दुःखमाप्नु |
| १५४ | १७ | न कर्माणि फलसंयोगं | न कर्मफलसंयोगं |
| १६० | १० | लोप | लेप |
| १६८ | १४ | नाहीं | आहे |
| १८३ | २३ | तहीं | तेंही |
| १८७ | १८ | सचेतना | चेतना |
| १९२ | ११ | त्या | |
| ,, | १२ | योगीं दृष्टि पडली म्हणजे | |
| २०४ | १४ | सर्वात्प्रयोग | सर्वात्मयोग |
| २०६ | ६ | आत्मबाधाहून | आत्मबोधाहून |
| २०८ | ६ | अपार प्रकृतिरूप | अपरा प्रकृतिरूप |
| ,, | ,, | ईश्वरपराप्रकृतीनें | ईश्वर पराप्रकृतीनें |
| ,, | १६ | निवेदून | निषेधून |
| २१० | १७ | शक्ताचें | शक्तीचें |
| २११ | १० | निर्गुणवांचून | निर्गुणावांचून |
| २१४ | १ | राजःसस्तमसाश्च | राजसास्तामसाश्च |
| ,, | १३ | विषयफळें | विषम फळें |
| ,, | १६ | त्रिभिर्गुणमयैर्भावेंरोभिः | त्रिभिर्गुणमयैर्भावैरेभिः |
| २२८ | १ | अधात्म | अध्यात्म |
| २३९ | १६ | नाहीं | आहे |

| | | | |
|---|---|---|---|
| २३७ | २३ | भावानें | भावानें |
| ,, | २६ | मार्मवेष्यैस्य | मामेवैष्यस्य |
| २३८ | २ | युद्धकर | युद्ध कर, ह्मणजे तूं मलाच पावशील यांत शंका नाहीं. |
| २४६ | ९ | प्रणामायाची | प्राणायामाची |
| २५० | २३ | लय होऊन | होऊन लय |
| २५१ | १७ | ब्रम्हयाचे | ब्रम्हाचे |
| २६८ | ८ | चक्षु | चक्षुः |
| २७३ | १५ | आसतो | असतो |
| २७७ | १८ | सतो | नसतो |
| २७९ | ७ | भत्या | भक्त्या |
| २८६ | २५ | भजन | यजन |
| ३०९ | २१ | व्यक्ति | व्यक्ति |
| ३११ | १६ | आत्मविभातियः | आत्मविभूतयः |
| ,, | १७ | देहच | देह |
| ,, | १८ | देह | देह होय. |
| ३१२ | ५ | हतंप्रभव | हतप्रभ |
| ३२४ | ११ | पूज्यश्च | पूज्यस्य |
| ३३७ | १० | याचा | त्याचा |
| ४५४ | २६ | अतां | आतां |
| ३६० | २ | पोक्षाधिकारी | मोक्षाधिकारी |
| ,, | २२ | क्षलणें | लक्षणें |
| ३६७ | १९ | जाव | जीव |
| ३७१ | १३ | महत्वरूपिणी | महत्तत्त्वरूपिणी |
| ३७२ | १७ | भ्रातीमुळें | भ्रांतीमुळें |
| ३७५ | २ | चित्स्वरूप | चित्स्वरूपीं |
| ,, | १३ | वैराग्यमनहकार | वैराग्यमनहंकार |
| ३७६ | २० | विविक्तदेशेसीवत्व | विविक्तदेशसेवित्व |

| | | | |
|---|---|---|---|
| ३७८ | ४ | आपण | आपला |
| ३७९ | ११ | ज्ञाननें | ज्ञानानें |
| ,, | २२ | उपपादान | उपादान |
| ,, | २४ | ,, | ,, |
| ३८० | १८ | पाणी | तेंच |
| ३८४ | २३ | भगवानरूप | भगवद्रूप |
| ,, | २९ | यथा | तथा |
| ३८६ | ३ | कर्तृस्व धर्म | कर्तृत्वधर्म |
| ३८८ | १९ | गुणसमुदया | गुणसमुदाया |
| ३२१ | २३ | सवात्मयोग | सर्वात्मयोग |
| ३९७ | २ | प्रकृतीच्या स्थितीस | प्रकृतीच्या पलीकडच्या स्थितीस |
| ४०० | १३ | ब्रह्मगर्भ | ब्रह्म गर्भ |
| ,, | २० | महत्व | महत्तत्त्व |
| ४०८ | १ | रज | रजः |
| ४२२ | १८ | कर्मबंधमुळें | कर्मबंधमूळें |
| ४३८ | १ | शतक | शकत नाहीं |
| ४६३ | १ | अन्नादकांचे | अन्नोदकांचे |
| ४७९ | ८ | सात्विकंम् | सात्त्विकम् |
| ४८२ | १७ | द्यावें | द्यावें. |
| ४८३ | १९ | करितां | करिता |
| ४७९ | ७ | अधिष्ठान | अधिष्ठान |
| ४८९ | १७ | विपरीताश्च | विपरीतांश्च |
| ४९० | १ | जारण मारण, शास्त्र | जारणमारणशास्त्र |
| ,, | १९ | कारण दृष्टि | कारणदृष्टि |
| ४९१ | ४ | लिंग देहीं | लिंगदेहीं |
| ४९४ | २४ | आत्म बुद्धि | आत्मबुद्धि |
| ५११ | ९ | पाण्यांतीळ | पाण्यांतील |